आजकालच्या गोष्टी–गोष्ट ५ वी.

# मायेचा बाजार.

( एक सामाजिक कादंबरी. )

रचणार

हरि नारायण आपटे.

पुणें.

किंमत २ रुपये.

हें पुस्तक पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत नटेश अप्पाजी द्रविड यांनीं छापिलें

व

हरि नारायण आपटे यांनीं प्रसिद्ध केलें.

---

# अनुक्रमणिका.

मित्रवर्य

रा० दत्तात्रय बळवंत पारसनीस

यांस

प्रेमादरपुरःसर अर्पण केलें आहे.

# मायेचा बाजार.

## प्रकरण १ लें.

### मैत्रिणी.



मालतीच्या चर्येवर अत्यंत आनंदानें येणारें तेज झळकत असून त्याचें प्रतिबिंब तिला जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं दिसूं लागलें होतें. आपलें मन सुप्रसन्न तर सर्व कांहीं सुप्रसन्न! आपल्या भोंवतालचीं माणसें सुप्रसन्न, वस्तु सुप्रसन्न, आकाश सुप्रसन्न, दशदिशा सुप्रसन्न. आपल्या सभोंवतालच्या सर्व व्यक्ति व सर्व वस्तू, जणूं काय आरशाप्रमाणें असून आपल्या सुप्रसन्नतेचीं प्रतिबिंबें त्यांत पडलीं आहेत असा भास आपणास होतो. हा अनुभव कोणास नाहीं!

मालतीच्या मनाची स्थिति या वेळीं अशीच झाली होती. तिच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या व लहरी उठत होत्या. आणि त्या उकळ्यांचा व लहरींचा विस्तार,–एखाद्या लहान व रमणीय पुष्करणीत क्रीडा करणाऱ्या सुंदर पक्ष्यांच्या बुडयांनीं आंतून उत्पन्न होणाऱ्या उकळ्यांच्या व सुगंधभारानें मंदावलेल्या वाऱ्यानें वरून उठणाऱ्या लहरींच्या विस्ताराप्रमाणें–क्षणोक्षणीं अधिकाधिक होत चालला होता. आनंद–त्यांतून सुंदर व मोहक, सुशील व प्रेमळ, शुद्ध व मुग्ध अशा तरुणीचा आनंद हा मोठा व्यापक असतो! तो तत्काळ आपल्याप्रमाणेंच दुसऱ्यास करतो.

मालती एका हातांत एक पत्र घेऊन वाचीत होती. नव्हे, त्या पत्रांतील शब्द जणूं काय आपल्या सुंदर व विस्तृत अशा नेत्रांनीं आकर्षून घेऊन मनांत भरून ठेवीत होती. त्या पत्रांतील शब्द जणूं काय तिला स्पष्टपणें ऐकूं येत असून तिचे कर्णही त्या शब्दांस आपल्या द्वारें मनांत सांठवून ठेवण्यास उत्सुक होते. तिचें मन तर त्या शब्दांनीं अगदीं गुंग होऊन गेलें होतें. यामुळें कोणीं आलें, तरी तिला दिसलें नाहीं. बोलले, तरी तिला ऐकूं आलें नाहीं. आणि तिच्या आसपास घडलेलें कांहींही तिला तिच्या मनाच्या

एकतानतेमुळें समजलें नाहीं. ती आपल्या आनंदविचारांत गर्क होती. ती त्या पत्राचें वाचन–नव्हे, पान करीत होती–किंबहुना त्या पानानें ती तर्र होऊन इहलोक विसरूनच गेली होती आणि तशा त्या हर्षित स्थितींत ती फारच मनोहर दिसत होती.

तिच्याहून थोडा मोठा असा तिचा भाऊ वसंत तिला कांहीं दाखविण्याकरितां आला होता, तो ही तिची आनंदमय मुद्रा पाहून स्तब्ध झाला आणि तिच्या मुद्रेचें प्रतिबिंब त्याच्या मुद्रेंत दिसूं लागलें. आपली मालती जें पत्र वाचण्यांत गर्क होऊन गेली आहे, तें पत्र कोणाचें हें त्यास ठाऊक होतें. तेव्हां तिला उद्देशून कांहीं विनोदपर बोलावें असा विचार त्याच्या मनांत आला. आपण हें बोलण्याबरोबर ती लाजेल आणि पटकन् तें पत्र लपवून ठेवील. मग आपण तिला असें असें ह्मणूं अशा प्रकारच्या विचारांत गुंग होऊन जाऊन तो तिच्याकडे नुसताच कौतुकानें, अभिमानानें, आनंदानें — पहात उभा राहिला.

मध्येंच त्यानें " मालुताई, तुला कांहीं सांगायचं आहे, आमच्याकडे पहा. " असें हळूंच ह्मटलें. परंतु तिनें त्याचे शब्द मुळींच ऐकले नाहींत. आपले शब्द ती ऐकेल आणि आपल्याला उत्तर देईल हें त्यास संभवनीय वाटतच नव्हतें. परंतु आपण पुढें विनोद करूं, तेव्हां आपल्याला तिचें हें इतकें गाढ दुर्लक्ष्य फार उपयोगाचें होईल हें जाणूनच त्यानें वर सांगितलेलें वाक्य उच्चारलें होतें. तिनें आपलें बोलणें ऐकलें नाहीं हें पाहून त्यास ज्यास्तच हंसूं आलें आणि तो फारच कौतुकानें तिच्याकडे पाहूं लागला. तिच्या त्या मुग्ध, रमणीय व आनंदित चर्येकडे पाहून तो तटस्थ झाला. आपण तिचा आतां कांहीं तरी विनोद करून तिला सध्यांच्या हर्षस्थितींतून काढून साधारण स्थितींत आणणें अगदीं अनिष्ट, अगदीं अप्रशस्त असें त्यास वाटलें !

वसंतरावास आपल्या बहिणीच्या प्रत्येक गुणाबद्दल,–सौंदर्याबद्दल, सुशीलतेबद्दल, चातुर्याबद्दल, सुशिक्षिततेबद्दल, कर्तृत्वाबद्दल आणि शुद्धत्वाबद्दल–प्रत्येक गुणाबद्दल फार फार अभिमान वाटत असे. त्याला असें वाटे, कीं आपल्या मालतीसारखी दुसरी स्त्री जगांत कोठें नाहींच. जेव्हां जेव्हां तो तिला पाही तेव्हां तेव्हां त्याला या अभिमानाचें भरतें येई. त्यांत आज तसें भरतें येण्यास विशेषच कारण झालें होतें. ज्या व्यक्तीचें पत्र मालती आपल्या हातांत घेऊन वाचण्यांत इतकी गर्क झाली होती, त्याच व्यक्तीचें पत्र त्यासही आलें होतें. जो मजकूर त्याच्या पत्रांत होता तोच मजकूर–अर्थातच फार निराळ्या शब्दांनीं–तिच्याही पत्रांत असला पाहिजे, असें त्यास निदान बांधतां आलें.

वसंतराव ज्याप्रमाणें आपल्या बहिणीकडे अगदीं साभिमान, सानंद आणि सकौतुक दृष्टीनें पहात उभा राहिला, त्याचप्रमाणें आणखी एक व्यक्ति तशीच तेथें उभी राहिली. ही व्यक्ति वसंतरावाच्या मागून थोड्याच वेळांत तेथें आली होती.

म्हातारी गिरजा–त्यांच्या घरची मोलकरीण–फार वर्षांची–जवळजवळ पन्नास वर्षांची मोलकरीण—एक घरांतली आजीबाईच होऊन बसली होती. वसंतराव व मालती हीं इतरांच्या दृष्टीनें आतां मोठीं झालीं असतील, परंतु तिच्या दृष्टीनें अगदीं लहानच होतीं. इतरांना त्यांच्याशीं आतां मोठ्या अदबीनें वागण्याची जरूरी वाटत

असेल, परंतु तिला तशी वाटत नव्हती. वसंतरावाच्या हातीं जें पत्र होतें तें व दुसरें मालतीच्या नांवचें, अशीं दोन पत्रें टपालवाल्यानें त्याच्या हातीं सकाळींच दिलीं. त्यांतलें एक त्यानें मालतीकडे पाठविलें व दुसरें आपल्या नांवचें होतें तें फोडलें, तेव्हां गिरिजा त्याच्याजवळच होती. त्या पत्राच्या वाचनानें त्याच्या चर्येवर काय परिणाम झाला तो तिनें पाहिला आणि कांहीं तरी फार आनंदाचा मजकूर त्यांत आहे असें तिला कळलें. त्याबरोबर तिनें त्यास प्रश्नही विचारला, परंतु त्यानें तो प्रश्न ऐकला नाहीं. आपल्या पत्रांतील मजकूर व आपल्या बहिणीच्या पत्रांतील मजकूर यांची तुलना करून पहाण्यासाठीं म्हणून तो आपल्या बहिणीच्या खोलींत गेला. कांहीं तरी फार आनंदाची गोष्ट आहे, एवढें गिरिजाबाईस समजून आलें आणि काय आहे तें समजून घेण्यासाठीं तीही त्याच्या पाठोपाठ तिकडेच गेली. त्या दोघांची ती हर्षपूर्ण स्थिति पाहून तिलाही फार आनंद झाला. ज्यांच्यावर आपण आपल्या मुलांपेक्षांही अधिक प्रेम करतों त्यांचा आनंद तो आपलाही आनंद होऊन जातो. तशीच गिरिजेची स्थिति झाली.

तिच्याही चर्येवर त्या दोघांच्या आनंदाचें प्रतिबिंब दिसूं लागलें. आनंदाचा काय प्रकार किंवा मजकूर असेल, त्याचा अजमास तिला बरोबर करितां येईना, परंतु थोडासा तर्क तिनें केला होता. वसंतरावाला आपला आनंद दाबून धरून मालतीची थट्टा करावयास सांपडावें ह्मणून आत्मसंयमन करतां आलें, तसें गिरिजाबाईस करणें शक्यच नव्हतें. तिला तो देखावा पाहून एकदम हंसूं फुटलें व ती मालतीस मोठ्यानें ह्मणालीः “कां ताईबाई, रावसाहेबांचा कागुद आला वाटतं मी अमक्या दिवशीं येतों ह्मंगून ? लई खुषींत दिसतां. पर त्येनीं मङ्डुम नाहींना एखादी आनली बराबर ! ”

गिरिजाबाईला नाजूकपणा कोठला ? ती हें मोठ्यानें बोलली आणि त्याच्याहीपेक्षां मोठ्यानें हंसली. तें बोलणें ऐकतांच मालती एकदम भानावर आली. व थोडी लाजली. तथापि पत्रावरून डोळे न काढतां ह्मणालीः “ गिरिजाबाई, तूं दिखील माझी अशी थट्टा करतेस का ? ”

इतकें ती बोलते तों वसंतराव एकदम ह्मणालाः “ कोणी जवळ येऊन उभा राहिला, बोलला, त्यांनं हांका मारल्या, तरी देखील आपलं लक्ष्य जर त्याच्याकडे जाईना तर त्यानं काय करावं ? मालती, मी किती वेळ इथें उभा आहें, आणखी तुला काय काय बोललों याची कांहीं तुला शुद्ध आहे का ? एक तास झाला मला तुझ्यापुढं येऊन उभा राहिल्याला ! तूं अगदीं आपल्या रंगांत दंग. लोकंही आपल्या बायकांना पत्रं लिहितात, लोकंही आपलं अभ्यास संपवून उत्तम तऱ्हेनं सगळ्यांतून पार पडून मोठ्या हुद्याच्या जागा मिळवतात, पण त्यांच्या बायका इतक्या अगदीं वेडावून गेल्याचं नाहीं बुआ आपल्याला कुठं उदाहरण दिसलं ! ”

वसंतराव हें बोलत असतांना मालती लाजेनें अगदीं खालीं मान घालून उभी राहिली होती. तिच्या त्या आनंदपूर्ण चर्येवर आतां लज्जेची खुलावट झाल्याकारणानें ती आतां फारच मनोहर दिसूं लागली. आपला भाऊ आपली थट्टा करतो आहे, परंतु मनांतून त्याला आपल्यापेक्षांही अधिक आनंद झालेला आहे हें तिला स्पष्ट

दिसत होतें. त्यालाही पत्र आलें असून त्या पत्रांतील मजकूर आपल्याला सांगण्यासाठीं तो आला असावा आणि आपण अशा प्रकारें आपलें पत्र वाचण्यांत व वाचून होणाऱ्या हर्षात गर्क झालेल्या पाहून अशी थट्टा त्यानें आरंभली आहे हें तिनें जाणलें; व ह्मणून त्याची थट्टा तिनें मुकाट्यानें ऐकून ती स्तब्धच उभी राहिली. ती कांहींच न बोलतां उभी राहिली हें पाहून वसंतरावाची मोठी नाउमेद झाली. आपल्या थट्टेवर कांहीं तरी ती बोलेल, मग आपण तिला कांहीं प्रत्युत्तर करूं अशी त्याची अपेक्षा होती.

गिरिजाबाई तर तिची ती लाजलेली मुद्रा पाहून फारच आनंदली व एकदम तिला प्रेमाचा उमाळा येऊन तिच्याजवळ जाऊन तिची दृष्ट काढल्याप्रमाणें करून आपल्या कानशिलांवर बोटें मोडून ह्मणते: "माझी ताई ती, एकदां चार वर्स सपून रावसाहेब आले अन् तुला घेऊन गेले ह्मणजे आमचं पांग फिटलं, नाहीं तर अशी इलायतेला गेलेलीं पोरं काय काय फंद करून येतात तें काय आपन ऐकलं न्हाई ? माझ्या बाईचं वंगाळ व्हायचंच नाहीं. चखोटच व्हायचं. अशी चांगली बायकु टाकून मडम कोन आनील ...?"

ह्मातान्या गिरिजाबाईची वटवट आणखीही पुढें लांबती, परंतु मालतीनें तिला मध्येंच ह्मटलें: "गिरजाबाई, मी तुमची नातना ? नातीची अशी थट्टा करतां ? "

"मी तुमची नातना ?" हे शब्द तिच्या तोंडांतून बाहेर पडतांच ह्मातारीला एकदम गहिंवरून आलें. तिच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले आणि ती एकदम रडक्या स्वरानेंच ह्मणते: "बाई, मी कुणब्याची, तुह्मी बामण, पण मला आजीसारखं ह्मनतां ह्मंगून तर माझा या घरांत सारा जलम गेला. देवा, आतां एकदां रावसाहेब इथें येऊन माझ्या बाईचा संसार थाटलेला मला पाहूं दे ह्मणजे मी सुखाची मरन मग माज आऊक्ष त्या दोघांना दे."

इतक्यांत वसंतराव हंसून त्या ह्मातारीला ह्मणतो: "पण गिरजाबाई, परवांच्या दिवशीं तर आपलं उरलेलं आयुष्य मला देण्याबद्दल देवाला सांगितलंस ना ? आतां या दोघांना द्यायला शिल्लक आहे कुठें ? तुझं आयुष्य तूं मग मला देणार का मालूताईला आणखी तिच्या नवऱ्याला देणार ? कुणाला देणार तें नीट देवाला सांग, नाहींतर परवां एक सांगितलंस आज एक सांगतेस. तेव्हां त्यानें तरी काय करावं ? नीट सांग हो एकदां, नाहीं तर तो ह्मणेल कुणालाच देऊं नये, ह्मातारीचं ह्मातारीलाच ठेवावं !"

गिरिजाबाई:—नकोरे बाबा आतां मला. तुला देऊं दे, मालूताईला देऊं दे नाहींतर तिच्या नवऱ्याला देऊं दे. पन रावसाहेब कधीं येनार ? नीट सांग मला खोटंनाटं नको सांगूं.

"आज पंधराव्या दिवशीं येणार" वसंतराव तिला म्हणाला: "आज बोटींत बसले असतील. आम्ही मुंबईला जाणार आहोंत त्यांना आणायला. मी जाणार, दादासाहेब जाणार, आई जाणार, तुह्मी याल का ? मात्र एका माणसाला न्यायचं कीं नाहीं याचा विचार आहे !"

मालतीनें त्यावर हंसून थोड्याशा वांकड्या नजरेनें आपल्या भावाकडे पाहिलें. तो आपली केवळ थट्टा करतो आहे हें तिला दिसतच होतें. तिची ती वक्रदृष्टि वसंतरावानें पाहिली आणि तिला तो कांहीं बोलणार इतक्यांत खालून एक मुलगा वसंतरावास सांगावयास आला कीं "दादा,

साहेब हिंडून आले आहेत, आणि ते आपल्याला बोलावताहेत विलायतच्या डाकेचें कांहीं पत्र आलें असलें तर घेऊन. ”

वसंतरावानें त्याला “ मी येतों म्हणून सांग ” असें ह्मटलें आणि आपल्या बहिणीकडे वळून हंसत हंसत तो म्हणालाः “ आण तें विलायतचें पत्र इकडे. दाजीसाहेबांचा मला आलेला निरोप नाहीं का ऐकलास विलायतचें कांहीं पत्र आलें तें घेऊन ये ह्मणून ! ’,

मालती त्यावर उसना राग दाखवून म्हणतेः “ पुरे तुझी थट्टा. तुला आलं आहे ते नेऊन दाखव त्यांना. माझं पत्र नाहीं कांहीं त्यांनीं मागितलं. ”

“ नाहीं कसं ! विलायतचं कांहीं पत्र आलं असेल तें मागितलं आहे. तुझंन् माझं असं कुठें त्यांनीं सांगितलं ? आण, आण. दे बरं तें इकडे. विलायती झालेला नवरा— त्यांत सिव्हिल सुर्वंट–आपल्या गांवढळ बायकोला पत्रं लिहितो तरी कशीं, हें तर आह्मांला पाहूं दे. ”

“ विलायती नवरा आणखी गांवढळ बायकु ! ” गिरिजाबाई मध्येंच म्हणतेः “ असं काय बोलावं तें. माझी मालूताई कांहीं गांवढळ का आहे ? चांगली मास्तरनीशीं तास तास यस् फ्यस् करते रोज ! ”

यावर आणखीही विनोदाचीं भाषणें झालीं असतीं. परंतु तितक्यांत वसंतरावाच्या आईनें मोठ्यानें वसंतरावास हांक मारून ह्मटलें: “ अरे येतोसना इकडे ! पत्राची वाट पहायची आहे. असं काय तें ? मग पुनः बाहेर जायचं आहे कायसं ! ”

आतां वसंतरावास गेल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. तरी जातां जातां त्यानें आपल्या बहिणीस एवढें ह्मटलेंचः “ असं कुठें यस् फ्यस् करून गांवढळपणा जातो का काय ? जें माणूस गांवढळ तें गांवढळच. तो वेडोबा काय एवढं पाहून एवढीं लंबे लंबे पत्रं लिहितो कुणाला ठाऊक ! तुझीं पत्रं तर असतील कुत्र्याचे पायन् मांजराच्या मिशा ! ”

इतकें बोलून तो तेथून गेला. त्याच्या मागोमाग आपला भाऊ आपल्या आईबापांना काय सांगतो तें पहाण्यास मालतीही गेली आणि गिरिजाबाई तिच्या खोलीचा केर काढून तेथें व्यवस्था लावण्याच्या नादास लागली.

प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें मालतीच्या आनंदाचें व प्रसन्नतेचें प्रतिबिंब सगळ्या माणसांवर पडलें. मालूताईचा नवरा सर्व परीक्षा निर्विघ्नपणें पास होऊन इंग्लंडांहून इकडे येण्यास निघाला व आतां पंधरा दिवसांचे आंतच आपल्या घरीं येणार ही पत्रांतून आलेली बातमी सर्वांस कळतांच जिकडे तिकडे हर्षच हर्ष झाला.

दाजीसाहेबांचें कुटुंब ह्मणजे एक सुखाचें माहेरघर होतें. दाजीसाहेब मूळचे सुखी; त्यांत त्यांना शिक्षण चांगलें मिळून मोठ्या सरकारी अधिकाराची जागा मिळाली. पुढें ती जागा वाढत वाढत जाऊन तिच्याबरोबर पगारही वाढत गेला होतां होतां मोठ्या अब्रूनें दिवस काढून दाजीसाहेब पेन्शनपर्यंत येऊन त्यांस स्पेशल पेन्शन रुपये पांचशेंचें झालें. आतां ते आपल्या पेन्शनचा सुखानें उपभोग घेत राहिले होते. त्यांस दोन मुलगे व एक मुलगी. वडील मुलाचें नांव वसंतराव. हा आतां तेवीस वर्षांचा होता. त्याचेहून लहान मुलगी मालती. ही आज वीस वर्षांची होती आणि तिच्याहून लहान मुलगा चंद्रशेखर. हा आज सतरा वर्षांचा असून कॉलेजांत बी. ए.च्या ज्यूनियर वर्गांत होता. तो आज घरीं

नव्हता. दादासाहेबांच्या कुटुंबाचें नांव अनसूयाबाई. या पात्रांच्या स्वभाववर्णनाचें कार्य आजच मी उरकून टाकीत नाहीं, कथानुषंगानें वाचकांस त्याचें उद्घाटन आपोआपच होईल. सध्यां मालतीसंबंधानें दोन शब्द लिहून आपल्या कथानकाचें सूत्र धरून पुढें चालूं.

मालती स्वरूपानें, गुणांनीं वगैरे कशी होती याचें वर्णन वर आलेंच आहे. मालती बारा वर्षांची झाली, तेव्हांपासून दाजीसाहेबांच्या नात्याच्या व अनसूयाबाईच्या माहेरच्या माणसांनीं "ही उफाड्याची मुलगी आहे, हिचं लग्न लवकर केलं पाहिजे," अशी कुरकुर दाजीसाहेबांच्या मागें लाविली. परंतु दाजीसाहेब न बोलतां आपल्या विचाराप्रमाणें मुकाट्यानें कार्य करावयाचें तें करून टाकणारे गृहस्थ होते. त्यानीं 'हूं हूं' करून मालतीस सोळावें वर्ष लागूं दिलें. आणि मग आपल्या बरोबरीच्या व फार सुशील अशा एका गृहस्थाच्या मुलाशीं तिचें लग्न लावून दिलें. हुंडापांडा, करणीबिरणी कांहीं नांव नाहीं. संथपणें लग्न लावून घेतलें. कोणाच्या मानापानाच्या तक्रारी, कुरकुरी कानावर आल्या तेव्हां त्यांनीं चार लुगडीं जास्त देऊन निकाल केला; पण दोघेही व्याही समानस्थितीचे व मताचे असल्यामुळें त्यांनीं जें काय केलें दिलें, घेतलें तें चवथ्या कानाला कळूं दिलं नाहीं. मालतीचें लग्न होतांच तिच्या सासऱ्यानें दाजीसाहेबांस सांगितलें कीं, "मी पोराला सिव्हिलसर्व्हिसच्या परीक्षेचा अभ्यास करण्यासाठीं विलायतेस पाठविणार आहे. तो तेथें नानाप्रकार पाहील. तिकडल्या विद्वान् स्त्रिया पाहून त्याला आपली बायको अगदीं टाकाऊ वाटेल, एवढ्याकरितां तिला इंग्रजी शिकविण्याची तजवीज करा. आणि दर आठवड्याला तिचें पत्र त्याला जाऊं देत जा. आपल्या गळ्याशीं जिचा गळा बांधला आहे अशी एक स्त्री हिंदुस्थानांत आपल्या जन्मभूमींत आहे हें त्याला दर आठवड्यास कळूं देत जा."

दाजीसाहेबांस तें ह्मणणें पटलें व त्यांनीं लग्नाचे दुसरे दिवसापासून मालतीस इंग्रजी शिकविण्याची तजवीज केली. सोळा वर्षेंपर्यंत अविवाहित राहिल्याकारणानें तिचें मराठी शिक्षण पुरें होऊन इंग्रजी पांचवे इयत्तेपर्यंत अभ्यास झाला होता. आतां पुढें परीक्षेचे विषय न शिकवितां इंग्रजी मात्र शिकविण्याची तजवीज केली. मुलीला परीक्षेस बसविण्याचा विचार कोणाच्याच मनांत नसल्याकारणानें बाप व सासरा दोघांनींही तिला शाळेंत पाठविण्याचा विचार मनांत आणला नाहीं. चार वर्षांत तिचा इंग्रजीचा अभ्यास चांगला झाला. मास्तरीण हुषार असल्यामुळें मालतीचें अक्षर आणि लिहिणें हीं पुष्कळ चांगलीं झालीं. आमच्या गोष्टीच्या आरंभाच्या वेळेस तर तिला साधारण इंग्रजी पुस्तक वाचून चांगलें समजे व ती साधारण मजकुराचीं पत्रें शुद्ध लिही आणि शुद्ध बोलेही. अशी स्थिति झाली होती. नवरा विलायतेला गेल्या दिवसापासून तिनें त्यास प्रथम मराठींत व पुढें कधीं इंग्रजींत व कधीं मराठींत अशीं पत्रें लिहिण्याचा प्रघात सुरू केला व तो कायम ठेवला. त्याचेंही तिला न चुकतां दर आठवड्यास पत्र येत असे. होतां होतां सर्व कामांत पूर्ण यश संपादन करून त्याचें परत येण्याचें पत्र आलें. आणि त्या पत्रानेंच त्या घरांत आज सगळीकडे आनंदी आनंद झाला. मुंबईस आपल्या जांवईबोवांचें स्वागत करण्याकरितां काय काय

करावयाचें यावद्दल वाटाघाटी सुरू झाल्या आणि एकंदर तयारी मोठी जारीची होणार असें दिसून आलें.

आपलें सुख व दुःख आपल्या मित्रां-मैत्रिणींना सांगितलें तर सुख दुप्पट होतें व दुःख निम्मे होते. असा अनुभव सर्वांस आहे. आपल्या पतीचें पत्र आल्यापासून मालतीच्या सुखानंदाला पारावार नाहींसा झाला. सगळ्या घरांतल्या मंडळींनीं आपल्या आनंदानें तिच्या आनंदांत भर घातली. तरी मालतीच्या मनाला संतोष झाला नाहीं.

तिची एक फार लहानपणापासूनची मैत्रीण, तिच्या वडिलांच्या स्नेह्याची मुलगी, गांवांतच होती, तिला एकदां आपल्या आनंदाची वांटेकरीण केव्हां करीन असें मालतीला होऊन गेलें. "मी पद्मावतीकडे जाऊं का ?" असें आईला विचारण्याला ती त्या दिवशीं लाजूं लागली. आठवड्यांतून चारदां तरी त्या एकमेकींस भेटावयाच्याच, परंतु आज विचारण्यानें आपली कदाचित् थट्टा होईल असें तिला वाटलें. दुपारच्या चार वाजेपर्यंत जेमतेम तिनें वेळ व दम काढला. पुढें तिला अगदींच दम निघेना. यामुळें तिनें शेवटीं आपल्या आईला विचारलेंच. आईही तें ऐकून हंसली व तिनें तिला जा ह्मणून सांगितलें.

मालती आपल्या नवऱ्याचें पत्र घेऊन आपल्या मैत्रिणीकडे जाण्यास निघाली. वाटेनें जातांना "आतां आपण आपला हा सुखसमाचार आपल्या मैत्रिणीला सांगितला व आपलें पत्र वाचण्यास दिलें ह्मणजे तिला किती तरी आनंद होईल" असा विचार तिच्या मनांत अनेकवार आला हें सांगावयास नकोच. पद्मावतीला तिनें आपल्या नवऱ्याचीं पत्रें आजपर्यंत अनेकवार दाखविलीं होतीं आणि पद्मावतीची व तिची स्थिति कांहीं बाबतींत अगदीं सारखी असल्याकारणानें पद्मावतीला त्यापासून फार आनंद होई.

पद्मावतीचा बाप दादासाहेबांप्रमाणेंच सुखवस्तु-पेन्शनर होता. त्यानें आपल्या एकुलत्या एक मुलीचें लग्न चवदावे वर्षीच एका गरीब होतकरू मुलाशीं करून त्यास आपला घरजांवई केलें होतें व त्याचा सगळा शिक्षणक्रम झाला तेवढा करून नुकतेंच त्याला आपल्या खर्चानें विलायतेस पाठविलें होतें. 'झाला तेवढा करून' असें ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, तो बी. ए. पर्यंत पोंचला नाहीं. मधल्याच परीक्षेंत नापास झाला व तेव्हांपासून त्यानें आपल्या सासूच्या व बायकोच्याद्वारें सासऱ्याची पाठ पुरवली होती कीं, आपण बॅरिस्टर होऊन येण्यास विलायतेस जाणार, आपली तजवीज करा. सासऱ्यानें पुष्कळ दिवस " पाहूं पाहूं " "इथले बी.ए. तुह्मी व्हा, मग पाहूं." असें ह्मणून चाळवण्या दाखविल्या, परंतु त्याचा आग्रह राहीना. तो पद्मावतीस त्रास देऊं लागला. तेव्हां शेवटीं सुमारें सहा महिन्यांपूर्वीं त्यास त्यांनीं विलायतेस पाठविलें होतें. प्रथम प्रथम त्याचीं दर आठवड्यास मोठीं गोड गोड पत्रें येत, तीं पद्मावती आपल्या मैत्रिणीस दाखवीत असे. यामुळें दर आठवड्यांतून शनिवारचा दिवस त्या दोघींस मोठ्या आनंदांत जात असे. त्यांत आजचा दिवस तर किती तरी आनंदांत जाईल असें मालतीस वाटलें. कारण आजच्या मालतीला आलेल्या पत्रांत मोठी आनंदाची गोष्ट असून शिवाय किती तरी विनोद होता.

मालती पद्मावतीच्या घराशीं गेली व उंबऱ्यांत पाऊल घालतांच तेथें असलेल्या

स्वयंपाकीण बाईस 'तिनें पद्मावती कुठें आहे?' ह्मणून विचारलें.

"पद्मावतीबाई सकाळपासून आपल्या खोलीला कड्या लावून बसल्या आहेत. कांहीं केल्या उघडीत नाहींत. एकदां आबासाहेबांनीं मोठमोठ्यानं हांका मारल्या, तेव्हां त्यांनीं मोठ्या कष्टानं दार उघडलं. आणि त्यांचं त्यांचं काय बोलणं झालं तें कोणास ठाऊक. पुनः त्यांनीं जें दार लावून घेतलं आहे तें अजून तसं लावलेलेंच आहे. वहिनीबाई पंढरपुराला गेल्या आहेत. परवां का तेरवां येतील, घरांत त्यांची समजूत घालायला, काय झालं तें विचारायला सुद्धां कोणी नाहीं. बरं झालं तुह्मी आलांत. तुह्मांला त्या कदाचित् दार उघडतील........"

तें ऐकून मालतीच्या मनास चरका बसला. तिचा आनंद मावळला, काय असेल त्याचा तिला तर्क होईना. "आपण आपल्या मैत्रिणीस सुखाची वांटेकरीण करूं ह्मणून आलों, पण तिची ही स्थिति! अशी कां बरं झाली असावी?" असें मनांत ह्मणून मालती अगदीं मंद पावलें टाकीत जिना चढून वर गेली आणि पद्मावतीच्या खोलीशीं जाऊन तिनें हळूच दारावर ठोठावलें. किती वेळ झाला आंतून प्रत्युत्तर येईना, किंबहुना आंत कोणी माणूस आहे अशी चाहूलसुद्धां लागेना. आपण मोठ्यानें हांक मारून आपला आवाज ऐकल्याशिवाय पद्मावती दार उघडणार नाहीं असें मालतीस वाटलें, आणि तिनें एकदम "पद्माताई, पद्माताई, आज अशी दार कां लावून बसली आहेत? मी मालती ती. दार उघड" असें मोठ्यानें ह्मटलें.

त्याबरोबर आंतून एक अत्यंत दुःखाचा हुंदका तिच्या कानीं पडला. दाराची कडी काढली गेली आणि तिच्या प्रियकर मैत्रिणीनें तिच्या गळ्यास मिठी मारून तिच्या खांद्यावर मान टाकिली. तिचा खांदा अश्रूंनीं भिजला. मालतीच्याही डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. दोघीही तशाच स्थितींत खोलीच्या दारांतच किती वेळ तरी स्तब्ध उभ्या राहिल्या. पलीकडे एका पत्राचीं पांच सात पानें–त्यांतलीं कित्येक अश्रूंनीं भिजलेलीं अशीं–अस्ताव्यस्त पडलीं होतीं.

---

# प्रकरण २ रें.

## हितगुज.



अर्धा तास झाला. हालचाल कांहीं एक नाहीं. दुःखानें होरपळलेले प्राणी आपल्या मित्राच्या सान्निध्यानेंच शांत होतो. त्या मित्रानें समाधानाचे शब्द उच्चारले नाहींत, तरी सुद्धां हरकत नाहीं. कित्येक वेळां तर समाधानाचे दहा शब्द बोलल्यानें जें समाधान, जी शांति मिळत नाहीं, तें समाधान, ती शांति मित्राच्या केवळ स्नेहपूर्ण दृष्टिक्षेपानें व प्रेमपूर्ण स्पर्शानें मिळते. अत्यंत दुःखी प्राण्यास शाब्दिक समाधानाची अपेक्षा नसते. त्यास शब्द पोकळ वाटतात. ते मनांत भिनत नाहींत. हृदयांत शिरत नाहींत. शिरले तरी ठरत नाहींत. एकंदरीत खऱ्या प्रेमास शब्दांची अपेक्षाच नसते. शब्दावांचूनच त्याचें अस्तित्व फार चांगलें अनुभवास येतें. कोण्या एकानें ह्मटलें आहे, शब्द हे अंतःकरणांतील भाव लपविण्याकरितां आहेत, दर्शविण्याकरितां नाहींत. हें वरून विरोधी दिसणारें विधान आंतून पाहिलें तर तथ्यपूर्ण आहे असें दिसून येईल. रोजच्या व्यवहारांत सुद्धां मनुष्य आपले मनांत काय आहे, आपणास काय वाटतें तें स्पष्ट सांगण्यापेक्षां तें लोकांस स्पष्ट कळूं नये ह्मणूनच शब्दांची योजना करीत असतो. व्यवहारज्ञ तो कीं, जो अशा तऱ्हेनें बोलतो कीं आपलें हृद्गत लोकांस समजूं देत नाहीं. मुत्सद्दी तो कीं, जो अशा तऱ्हेनें बोलतो कीं खोटें बोलल्याचा आरोप अंगावर न येऊं देतां खरें कळूं देत नाहीं. चतुर व चाणाक्ष तो कीं, जो आपल्या शब्दांनीं आपल्या मनाचा पत्ता मुळींच लागूं देत नाहीं किंबहुना आपल्या मनाचा पत्ता लागणार नाहीं, अशी शब्दयोजना नेहमीं करतो !

परंतु प्रेमाचें तसें नाहीं. प्रेमी—सत्यप्रेमानें भरलेल्या अंतःकरणाचा माणूस—आपलें प्रेम लपवूं इच्छित नाहीं. आणि त्यानें यदाकदाचित् लपविण्याचा यत्न केला—त्यानें असत्य शब्दांची योजना करून विपरीत अर्थाचा भास दाखविण्याचा खटाटोप केला, तरी तो सफल होत नाहीं. प्रेमास आपलें स्वरूप प्रकट करण्यास अनेक द्वारें आहेत. पृथ्वीच्या अंतर्गत पाणी असें कितीही ठिकाणीं तिनें लपवून ठेविलें तरी तें कोठेंना कोठें तरी बाहेर पडतें, तसें प्रेम हें कितीही पोटांतल्या पोटांत ठेविलें, शब्दांच्या द्वारें बाहेर दिसूं द्यावयाचें नाहीं असा प्रयत्न केला, तरी तें प्रेमी व्यक्तींची दृष्टादृष्ट होतांच अनेक द्वारांनीं बाहेर पडतें. जितकें प्रेम उत्कट, तितकीं त्याचीं दर्शनद्वारें अधिक ! जिव्हेनें प्रेम प्रकट करण्याचें नाकारलें तरी चर्या जिव्हेपेक्षां हजारों पटींनीं तें काम करते. प्रेमाला आत्मस्वरूप व्यक्त कर-

ण्यास जिव्हा हें एकच साधन आहे काय? नाहीं. जिव्हापल्लवी ही त्याची एकच भाषा नव्हे. त्याला करपल्लवी, पादपल्लवी, नेत्रपल्लवी, चर्यापल्लवी, रोमांचपल्लवी इत्यादि अनेक भाषा आहेत. या एक एक भाषेनें जें प्रेमाचें कार्य होतें, तें हजारों शब्दांनीं व शेंकडों वाक्यांनीं होत नाहीं.

मुलगा फार दिवसांनीं घरीं आला ह्मणजे त्याचें स्वागत आई शब्दांनीं करो वा न करो, तें तिच्या प्रेममय पहाण्यानें होतें तसें कशानेंच होत नाहीं. फार वर्षांच्या विरहानंतर आलेल्या पतीचें पत्नी स्वागत करते, तें शब्दांनीं कधीं खऱ्या प्रकारानें व्यक्त होतें काय? तें स्वागत तिच्या केवळ नेत्रांनींच होतें. फार दिवसांनीं भेटलेले मित्र नुसते एकमेकांचे हात धरतात व एकमेकांकडे पहातात. तेवढ्यांतच परस्परांच्या भेटीपासून होणारें सुख परस्परांस कळून चुकतें. तेथें शब्दांची जरूरी लागतच नाहीं. एखाद्या मैत्रिणीवर दुःखाचा कडेलोट झाला असतां भेटावयास जाणाऱ्या मैत्रिणीनें तिला पोटाशीं धरलें पुरे, तिच्या दुःखाचें ओझें अर्धें अधिक हलकें होतें. शब्द त्या प्रसंगीं अगदीं अनवश्यक किंबहुना फोल, वायफळ होतात. प्रेमानें, स्नेहानें व सहानुभूतीनें तुडुंब भरलेल्या अंतःकरणांत शब्दोच्चाराची इच्छाच होत नाहीं.

पद्मावती व मालती यांची अशीच स्थिति झाली. दोघींनीं एकमेकींस मिठी मारण्याबरोबर मालती ज्या आनंदभरांत आली होती तो तिचा आनंद पार मावळला. पद्मावतीच्या दुःखाचें कारण ठाऊक नसतांही त्या दुःखानें तिचें अंतःकरण व्याकुळ झालें. मालतीनें पद्मावतीला आपल्या स्कंधावर मान टाकून देऊन मनसोक्त रडूं दिलें. "असें कां करतेस? अशी कां रडतेस? काय झालें?" वगैरे विचारण्यापेक्षां तिला घट्ट मिठी मारून तिचा दुःखभार हलका होऊं द्यावा हेंच तिला फार चांगलें वाटलें. दुःखभार कमी झाला ह्मणजे आपोआपच शब्दोच्चार होईल. ती आपला आनंद आपल्या मैत्रिणीस देऊन तो दुणावून घेण्याच्या इच्छेनें आली होती. आपल्या मैत्रिणीचा दुःखभार वांटून घेण्याचा प्रसंग आपल्यावर येईल, हें तिच्या स्वप्नींही नव्हतें. तेव्हां आल्याबरोबर हा विलक्षण प्रसंग पाहून तिला कसेंसेंच झालें. आपल्या मनाच्या सुप्रसन्नतेचें प्रतिबिंब आतांपर्यंत तिला जिकडे तिकडे दिसत होतें, परंतु आतां तिच्याच मनाची सुप्रसन्नता पार नाहींशी झाली. आपल्या आनंदाची हकीकत सांगण्याचें दूर सारून पद्मावतीच्या दुःखाचें कारण विचारण्याचा प्रसंग तिजवर आला. मात्र तिनें तें एकदम विचारलें नाहीं.

किती वेळ झाला, पद्मावतीचें रडें आवरेना. ती आपलें डोकें मालतीच्या खांद्यावरून काढीना. तिचे हुंदके कांहीं केल्या थांबेनात, ते एकसारखे उमाशाउमाशांनीं बाहेर पडत होते. तिचे अश्रू आवरेनात. जणूं काय तिनें त्यांस किती वेळ तरी दाबून धरलें. यामुळें आतां ते अगदीं अनावर होऊन निघत होते.

अशा प्रकारें बराच वेळ झाल्यानंतर तिला काय वाटलें, ती एकदम माळतीस दूर सारून तिच्या दोन्ही खांद्यांवर आपले दोन्ही हात ठेवून आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं तिच्याकडे टक लावून पहात ह्मणते: "मालती, आजपर्यंत मीं तुझ्याशीं फार फार प्रतारणा केली, तूं माझ्याशीं तशी कधीं केली नाहींस पण मीं केली. पण गडे, तुला माझ्याशीं प्रतारणा करण्याची जरूरीच

नव्हती. माझ्यापासून लपवावं असं गुपीत तुझ्यापाशीं नव्हतंच. मला मात्र प्रतारणा करण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता. वाटे कीं, आपल्या घरांतलं काय आहे न् काय नाहीं हें दुसऱ्याला सांगून काय करायचं आहे. आपलं सांगण्याजोगं असेल तें सांगावं, दाखविण्याजोगं असेल तें दाखवावं. पण आतां मला रहावत नाहीं. आज नाहीं उद्यां आपले दुःखाचे दिवस जातील. आणि मग मागल्या गोष्टींची आठवण पार बुजेल अशी मोठी आशा करून होतें. पण आतां ती सगळी गेली; जळाली. आतां तिचीं पाळंमुळंसुद्धां राहिलीं नाहींत. हें सगळं बोलायला, सांगायला तुझ्याखेरीज मला आहे कोण ! कोणी नाहीं."

मालती तिला भेटण्यासाठीं येईपर्यंत जणूं काय पद्मावतीच्या शोकाला बंधारा पडला होता, तो तिच्या येण्याबरोबर एकदम फुटून शोकाचा लोंढा बाहेर पडला. हुंदक्यावर हुंदके उठून वाहूं लागले. पुढें सुमारें पाऊण-तास तो शोकावेग मनसोक्त बाहेर पडल्यावर त्याची तीव्रता थोडी कमी होऊन जणूं काय शब्दोच्चाराला आतांपर्यंत बसलेला बांध भंगला व ती वर सांगितल्याप्रमाणें एकदम भराभर बोलूं लागली.

मालतीस तिच्या बोलण्याचा अर्थ बरो-बर समजेना. परंतु तो अर्थ समजून घेण्या-करितां प्रश्न विचारणें कांहीं बरोबर नाहीं. आतांपर्यंत तिला मनसोक्त रडूं दिलें, तसेंच बोलूंही द्यावें. तिचा शोकावेग ओसरल्यावर मग हळूच सर्व कांहीं तिच्याकडून काढून घेऊं असा विचार करून पद्मावतीस तिनें बोलूं दिलें. पद्मावती वर सांगितल्याप्रमाणें बोलून थोडी थांबली. आपल्या बोलण्याचें आपल्या मैत्रिणीस काय वाटलें हें तिच्या चर्येवरून जाणण्यासाठींच कीं काय आतां ती आपले डोळे पुसून तिच्या मुखाकडे पुनः टक लावून पाहूं लागली. मालती तिला कांहीं बोलली नाहीं. फक्त प्रेम व सहानुभूति यांनीं ओतप्रोत भरलेल्या **आपल्या** नेत्रांनीं ती आपल्या त्या मैत्रिणीच्या मुखाकडे तट-स्थपणें पहात होती. पद्मावती ह्मणजे तिचें प्रेमसर्वस्व होतें असें त्या तिच्या उत्कट पहाण्यानेंच स्पष्ट दिसत होतें.

एखाद्या चित्रांत काढलेल्या—किंवा नितांत शुभ्र व निष्कलंक अशा संगमरवरांत कोरलेल्या दोन अत्यंत रमणीय पुतळ्यां-प्रमाणें त्या थोडा वेळ परस्परांचीं मनें जाणण्याकरितां परस्परांकडे एकाग्रतेनें पहात उभ्या राहिल्या. नंतर मालतीनें पद्मावतीस हळूच आपल्या डाव्या बाजूस घेऊन ह्मटलें: " पद्मे, मीं इतका वेळ तुला कांहीं विचारलं नाहीं. पण तुला ठाऊकच आहे, कीं तुझ्या केंसाला धक्का, तो माझ्या जिवाला धक्का, तेव्हां मला जरी तुझ्या दुःखाचं कारण समजलं नाहीं, तरी देखील तुला अशा स्थितींत पहाण्याबरोबर माझ्या काळजाला चरका बसला. त्यांत आणखी मी...पण मीं आपलं काय सांगून करायचं ? तुझी ही अशी स्थिति कशानं झाली मला सांग पाहूं ! हें इथें पत्र पडलं आहे, त्या-वरून मला समजेल,पण........"

" पण काय ! मालूताई, मीं तुला सांगितलंना कीं,मीं आजपर्यंत तुझ्याशीं फार फार प्रतारणा केली. जें कांहीं खरं नव्हतं तें तुला खरं ह्मणून भासविलं. पण माले, मीं तुला फसवायच्या हेतूनें नाहीं हो हें केलं ! आपलं नशीब फुटकं तें दुसऱ्याला सांगून आणखी दुसऱ्याजवळ आपलं रड-गाणं गाऊन, उगीच त्याच्या सुखांत काय ह्मणून माती कालवावी ? असा विचार करून मीं नाहीं तुला कळूं दिलं. पण आतां

आज कुठें तरी बोलल्याखेरीज उपाय नाहीं. त्याखेरीज माझं मन हलकं व्हायचंच नाहीं. अन् बोलायचं तें मग तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणाजवळ बोलायचं आहे! माले, माझ्या-सारखी दुर्दैवी कोणी, कोणी या त्रिभुवनांत कोणी नसेल. माझा आतां हा जन्म जाणार तरी कसा ? "

मालती तिला मध्येंच थांबवून ह्मणाली: " पण असं, इतकं एकाएकीं झालं तरी काय ! मला सांग तर खरं "

" एकाएकीं" पद्मावती एकदम उद्गारली: " अग एकाएकीं झालं कां ह्मणतेस ! एका-एका नाहीं झालं. लग्न झाल्यापासून आज-पर्यंत अगदीं असं चाललं आहे. आबांनीं त्रासून थोडेसे पैसे दिले, कीं चार दिवस जरा बोलणं चालणं ठीक चालायचं, ते पैसे संपले, आणखी पुनः आबांकडे मागणं करायला सांगून मी तें केलं नाहीं, किंवा करून आबांनीं ऐकलं नाहीं, कीं झाली पुनः पहिल्याप्रमाणें सुरुवात ! असं एकसारखं चाललं असे. पुढें विलायतेला जाण्याचं डोक्यांत घेतल्यापासून तर कांहीं विचारूं नको. आबांनीं पुष्कळ सांगितलं कीं 'इथलं सगळं शिक्षण पुरं होऊं द्या. मग विलाय-तेला जा, मी तुह्मांला पाठवीन. ' पण छे. एक एक बोलायलान् बडबडायला सुरुवात झाली ! बस मी इथें कांहीं आतां अभ्यास करायचा नाहीं. इथल्या युनिव्हर्सिट्या भिकार, इथलीं कॉलेजं भिकार, इथलं शिक्षण भिकार. इथलं सगळं भिकार. तेव्हां मला विलायतेला जाण्याला लागणारे, आणखी तिथें गेल्यावर चार वर्षपर्यंत रहाण्यापुरते पैसे दिले पाहिजेत. नसलां देत तर मला वाटेल तिकडे मी आपला निघून जाईन. पुनः तुमच्या घराची पायरी चढ-णार नाहीं. पुनः तुमच्या माणसांचं तोंड पहाणार नाहीं........ "

मालती हें सर्व ऐकून अगदीं चकित झाली. तिनें पद्मावतीच्या नवऱ्यासंबंधानें कांहीं कांहीं प्रतिकूल अशा गोष्टी ऐकल्या होत्या. परंतु इतका प्रकार होऊन तो विलाय-तेला गेला असेल हें तिला मुळींच ठाऊक नव्हतें. तो आपल्या बायकोला पैशासाठीं छळीत असेल, ही कल्पनाच तिला कधीं झाली नाहीं. पद्मावती स्वभावानें अतिशय गोड व स्वरूपानें सुंदर, अशी असल्यामुळें तिजवर कोणी रागावत असेल किंवा रागावूं शकेल हा विचारच तिला कसासाच वाटे. पद्मावतीनें तर एक वेळ सुद्धां आपल्या तोंडावाटे नवऱ्याच्याविरुद्ध ब्र काढिला नाहीं. काढण्याची इच्छा तिला कधीं झाली नाहीं. मालतीनें आपल्या नवऱ्याच्या प्रेमाच्या गोष्टी सांगितल्या ह्मणजे हिनेंही आपल्या नवऱ्याचें प्रेम आपल्यावर फार आहे असें दाखविण्याजोग्या गोष्टी सांगाव्या. मालतीनें आपल्या नवऱ्याचें पत्र दाखविलें ह्मणजे हिनेंही एखादें पत्र अगर त्यांतील कांहीं अनुकूल भाग तेवढा वाचून दाख-वावा. केव्हां केव्हां मालतीस " सर्व कांहीं दिसतं तसं नाहीं " असें वाटे. परंतु ती आपल्यास काय वाटतें, तें बोलून दाखवीत नसे. कां कीं तिला वाटे आपण तसें कांहीं बोलून दाखविल्यास पद्मावतीस दुःख होईल.

मुलीच्या अंतःकरणाला एवढेंसें जरी दुःख झालें, तरी तें जाऊन बाबाजवळ किंवा आईजवळ केव्हां सांगेन असें मुलांस वाटण्यास अवश्यक लागणारा जो विश्वास तो उत्पन्न होण्यास आईबापांचें व त्यांच्या मुलांचें प्रेम कांहीं निराळ्याच प्रकारचें असतें. अगदीं लहानपणी जेव्हां आईखेरीज दुसरें कोणी जगांत मुलांस दिसत नाहीं

तेव्हां तें मूल यत्किंचित् दुःख झालें असतां आपल्या आईकडे धांवतें. आपल्या दुःखाचा परिहार करणारें माणूस तेवढेंच आहे अशी त्याच्या मनाची खात्री असते. परंतु आपल्या आईचें प्रेम, आपल्या आईची कळकळ, आपल्या आईची सहानुभूति आपल्यास पाहिजेशी वाटेल, तेव्हां ती मिळेलच याचा नेम नाहीं असा अनुभव मुलांस थोडा थोडा येऊं लागला, ह्मणजे मूल पहिल्याप्रमाणें आतुरतेनें आईकडे धांव घेईनासें होतें. ज्या कोणापासून प्रेम व कळकळ हीं मिळतील त्याच्याकडे त्या मुलाचें मन आणि त्याचे पाय धांवतात.

धाक आणि प्रेम या दोन गोष्टी फार भिन्न आहेत. आईबापांस आज्ञाधारकपणा फार आवडतो, आज्ञाधारकपणा मुलाचे अंगीं असला ह्मणजे त्याजवर त्यांचें मन विशेष असतें. परंतु हा आज्ञाधारकपणा मुलाचे अंगीं आणण्यास प्रेम उपयोगी पडेल का धाक उपयोगी पडेल याचा निर्णय पुष्कळ आईबापांस होत नाहीं. अनेक प्रसंगीं आपणांस असें दिसून येतें कीं, मुलें आईची आज्ञा झट्कन् ऐकतात. बापाची जरा नाखुषीनें ऐकतात. कित्येक वेळां आईचें मुलींच ऐकत नाहींत, परंतु बापानें हांक मारून कांहीं सांगितलें की पुरे, तीं तावडतोब करतात. याचें कारण काय ? तर आईबद्दल प्रेम वाटतें व बापाबद्दल धाक वाटतो, हेंच कारण होय. आईची आज्ञा मोडली तरी ती प्रेमाच्या जोरावर मोडतात. आणि आज्ञा मोडण्याचीं कारणें सांगून तिचें समाधान करूं पहातात; परंतु बापाची आज्ञा होतांच मनांत नसतांही सांगितलेली गोष्ट तेव्हांच करतील, किंवा एखादे वेळ करावयाची नाहीं असा निश्चय करून हट्टानें तट्ट फुगून बसतात, मारहाणीच्या धाकानें सुद्धां मग तीं हलावयाचीं नाहींत.

बहुतेक मुलांस आईबद्दल प्रेम आणि बापाबद्दल धाक वाटत असतो. आई आपल्या प्रेमानें मुलांचा आज्ञाधारकपणा संपादिते. बाप तोच आज्ञाधारकपणा केवळ धाकानें संपादितो. प्रेमाविरुद्ध हट्ट किंवा बंड करण्याची मुळींच इच्छा होत नाहीं. झालीच तर ती फार वेळ टिकत नाहीं. टिकलीच तर तिच्याबद्दल फार लवकर पश्चात्ताप होतो. धाकाविरुद्ध हट्ट किंवा बंड करण्याची इच्छा फार आतुरतेनें होते, व इच्छा झाली कीं, तिला कृतीचें स्वरूप देण्यास फार वेळ लागत नाहीं, आणि एकदां कृतीचें स्वरूप दिलें ह्मणजे त्याबद्दल पश्चात्ताप न होतां अभिमान उत्पन्न होतो. प्रेमानें प्रेम परंतु धाकानें द्वेष उपजतो. प्रेम जवळ नेतें, धाक दूर नेतो.

पद्मावतीच्या घरच्या स्थितींत वर सांगितलेल्या सर्व विधानांचा सत्यपणा चांगल्या प्रकारें दिसत होता. पद्मावतीचा बाप तिजवर प्रेम करीत नसे असें नाहीं, परंतु प्रेमापेक्षां धाकामुळेंच ती त्यांचें फार ऐके. पद्मावतीची आई फार नेमधर्मीक, अगदीं जुन्या चालीची; पद्मावतीचा बाप सुधारणेचा—नवीन प्रकारच्या सुधारणांचा—मोठा चहाता. त्याची वागणूक किंवा वागवणुकही मुलांच्या मनांत प्रेम उत्पन्न होण्याजोगी नसे. धाक उत्पन्न करणारी असे. पद्मावती त्याच्या ह्मणण्याबाहेर एक तिळभरही जात नसे. तो ह्मणेल तें निमूटपणें करावयाचें हा तिचा निर्धार. तिच्या आईला तिचें हें वागणें आवडत नसे. ती ह्मणे सर्वच बाबतींत पुरुषांचें ऐकूं नये. मी करतें तसें करावें. ऐकायचें तेवढें ऐकावें, नाहीं तें साफ करीत नाहीं ह्मणून सांगावें.

परंतु पद्मावतीला तसें करण्याचें व बोलण्याचें धैर्य नव्हतें. अर्थात् तिनें आपल्या आईच्या इच्छेचें कांहीं मनांत न आणतां वडिलांच्या इच्छेप्रमाणें वागण्यास सुरुवात केली. आई रागावली, तरी आपल्याला तिचा राग सहज दूर करतां येईल. बाप रागावून निभावयाचें नाहीं. असा विचार तिला करावा लागला. अर्थात् पुढें आईनेंही तिच्या बाबतींत कांहीं बोलावयाचें नाहीं असा निश्चय केला आणि त्याप्रमाणें व्रत चालविलें. इकडे कांहीं झालें तरी ती ह्मणून त्यांत कांहीं बोलावयाची नाहीं. असा प्रकार झाल्याकारणानें पद्मावतीस आपलें अंतःकरण उकलून सांगण्यास घरांत कोणी नव्हतें. तिला दोघे भाऊ होते, परंतु ते घरांत नव्हते एवढेंच तेथें सांगून ठेवतों.

घरांत कोणीही मन उकलून सांगण्यास नाहीं आणि बाहेरच्या माणसास आपलें गृहच्छिद्र सांगण्याची इच्छा होईना. यामुळें पद्मावती मनांतल्या मनांत झुरूं लागली. मालती तिची अत्यंत मोठी मैत्रीण. तिची व हिची शाळेपासून एकसारखी मैत्री, परंतु तिच्याजवळ सुद्धां आपलें हृद्गत बोलण्यास पद्मावती धजत नसे. यामुळें मालतीस त्यासंबंधानें कितीही शंका आल्या तरी खात्रीलायक कांहीं समजत नसे. पद्मावती नेहमीं आनंदी चर्या ठेवी. नेहमीं सुखाचें असेल तेवढेंच दाखवी.

आज मात्र तिच्याच्यानें तसें झालें नाहीं. होणें शक्यच नव्हतें. अर्थात् आजपर्यंत जें काय कोंडून कोंडून ठेविलें होतें तें सर्व फार वेगानें, फार जोरानें बाहेर पडलें. पद्मावतीला मालतीनें दारापासून आंत खोलींत चालविलें. पद्मावतीनें तिला आपल्या तेथें असलेल्या पलंगावर नेऊन बसविलें आणि ह्मटलें:

" मालती, आज मी तुझ्याजवळ सगळं कांहीं सांगणार. आजपर्यंतचं माझं सुख सगळं दिखाऊ होतं. आंतून कीड लागलेल्या अमृतफळासारखं होतं. तें काय होतं आणखी कसं होतं तें तुला समजायला आधीं तें तिथें पडलेलं सबंध पत्र वाच. मग आपण बोलूं. "

मालतीनें जाऊन तें पत्र—तीं अस्ताव्यस्त झालेलीं पत्राचीं पानें—गोळा केलीं, त्यांजकडे पाहिलें, तीं नीट लाविलीं आणि आतुरतेनें वाचण्यास सुरुवात केली.

---

# प्रकरण ३ रें.

## पत्र.



मालतीनें एकवार त्या पत्राचीं पानें बरोबर जुळवून त्यांच्यावर नजर फिरविली. नंतर पहिलें पान वाचण्यास सुरुवात केली. पहिलें वाक्य वाचतांच तिला अत्यंत खेदयुक्त आश्चर्य वाटल्याप्रमाणें तिची चर्या दिसू लागली. तिनें एकदां पद्मावतीकडे पाहिलें आणि पुनः आपली दृष्टि त्या पत्राकडे फिरविली. थोड्याच वेळांत ती तें वाचण्यांत अगदीं गर्क होऊन गेली. पत्र फार लांबलचक होतें तरी महत्वाचें ह्मणून तें जशाचें तसेंच येथें देतों. " आज मी तुला नेहमींप्रमाणें—केवळ उपचारार्थ आजपर्यंत लिहीत आलों त्याप्रमाणेंसुद्धां— " प्रिये पद्मावती " वगैरे कांहीं लिहीत नाहीं. आजपर्यंत लिहीत आलों तें केवळ कांहीं तरी उपचारार्थ लिहीत आलों. तूं मला मुळींच प्रिय नसतां उगीच प्रिये, प्राणप्रिये असें काय ह्मणून लिहावें ? आजपर्यंत मीं आपलें खरें मन तुला कळूं दिलें नाहीं. परंतु आतां यापुढें तुह्मी किंवा तुझ्या बापाची तशी कींव करण्याचें मला कांहीं कारणच उरलें नाहीं. उलट मीं आपलें मन स्पष्टपणें खुलें करून तुमच्या डोळ्यांवरलें भुरळ दूर करावें असाच वेळ आला आहे.

तुझ्या बापाला व त्यामुळें तुलाही श्रीमंतीचा मद चढला आहे. तुम्हांला असें वाटतें, कीं तुमच्या पैशावरच सगळें जग चाललें आहे. तुझ्या बापानें सालंकृत कन्यादान करून मला घरजांवई केलें, ह्मणजे एक गुलाम विकत घेऊन तुझ्या सेवेस दिलें अशी तुमची दोघांचीही समजूत झाली आहे. मी तुमच्या घरीं होतों तेव्हां यासंबंधानें मला दर मिनिटास अनुभव आला. परंतु जोंपर्यंत तुमच्या अन्नावर मला रहावें लागत होतें, तोंपर्यंत तोंड बांधून बुक्क्याचा मार, ह्मणून मी आपला सारें कांहीं सोसून रहात होतों. मनांत मला काय यातना होत होत्या त्या माझ्या मला माहीत ! त्या यातनांमुळें मला अभ्यास होईना. शिकण्याकडे मन लागेना. तुह्मांस वाटे, कीं मी आपला आयतोबा खातों आहें. अभ्यास वगैरे कांहीं न करतां चंदुलालासारखा बसतों. अशा प्रकारचे स्पष्ट उद्गार तुझ्या बापानें काढले, तुझ्या भावानें काढले, ते मीं स्वतः ऐकले. माझ्या अंगाचा तिळपापड झाला, परंतु मी डोक्यावर कातडें ओढून स्वस्थ बसलों. तुझें प्रेम तर माझ्या ठिकाणीं मुळींच नव्हतें. तूं आपल्या तोऱ्यांत, तूं मला मदत करावास, माझा

अभिमान बाळगावास, तें एकीकडेच राहून तूंही माझी चेष्टाच करीत असस. निदान इतरांनीं माझी चेष्टा केल्यास त्यापासून तुला वाईट वाटल्याचें मला कधीं दिसून आलें नाहीं. मला काय लागेल, काय नाहीं हें आपणच न सांगतां जाणून, तें तात्काळ मिळेल अशी तजवीज करायची तें तर एकीकडेच, परंतु मला अमुक पाहिजे आहे, तें आणून द्यायला सांग असें तुला अनेकवार सांगितलें असतां तिकडे अगदीं कानाडोळा करून किंवा "मागितलें तर बाबा काय ह्मणतील, आई काय ह्मणेल ?" अशा दीर्घ शंका काढून, टोलवाटोलवी करीत असस. आणखी जेव्हां अगदीं डोक्यांत राख घालण्याची पाळी प्रत्येक वेळीं आणावी तेव्हां मला काय हवें तें मिळावें. अशा स्थितींत अभ्यास व्हावा कसा ? आणि परीक्षा पास व्हाव्या कशा ? पुनः परीक्षांत नापास झालों, ह्मणजे तुमच्या टीका आहेतच. तेव्हां पासून वैतागून मी इंग्लंडांत येऊन बॅरिस्टर होऊन जाण्याचा हट्ट धरला. तें तरी तुझ्या बापास बरें वाटलें ? नाहीं, इतका थोरला पैसा असून त्यांनीं मला इकडे धाडण्याच्या कामीं हजारों आढेवेढे घेतले. मला इकडे न धाडण्यासाठीं तूंही त्यांना भर दिलीस. पण मला तुमच्या दोघांपासून दूर कोठें तरी—जेथें तुमचें तोंड दिसणार नाहीं, नांव सुद्धां ऐकूं येणार नाहीं अशा ठिकाणीं—जाण्याची उत्कट इच्छा झाली. ह्मणून त्रागा केला, संतापलों, तेव्हां त्यांनीं एकदां इकडे माझ्या येण्याची तजवीज केली.

इकडे आलों, तेव्हां एकदां वाटलें कीं आतां आपली कर्मकटकट टळली. परंतु ती कोठली टळायला ! प्रत्येक वेळीं पैशाची नड आली कीं तुमची पायधरणी करावी लागे. पण परक्या देशांत पडलों, तेव्हां तुझ्या बापाला लिहिण्यावांचून दुसरी गति काय ? तुझ्या बापाला नाहीं तर तुला, चारचारदां त्याहावें तेव्हां तुमच्याकडून मोठ्या मिनतवारीनें पैसे यावे. इंग्लंडांत पुष्कळ विद्यार्थी माझ्यासारखेच शिकण्याकरितां येऊन राहिले आहेत, परंतु त्यांना लागणाऱ्या रकमा त्यांच्या मंडळींनीं येथील नामांकित बँकांतून भरून ठेविल्या आहेत. वाटेल तेव्हां जरूर तेवढ्या रकमेचा चेक पाठवून रकमा घेतां येतात. माझी स्थिति मात्र सगळ्यांहून निराळी. मला येथें दारिद्र्याप्रमाणें वागावें लागतें. कारण पैसा नाहीं. येथली स्थिति काय असते ती तुह्मांला काय ठाऊक ! तुह्मांला तुमच्या पैशाची काय ती काळजी. तुह्मांला वाटतें मी येथें आपला उगीच तुमच्या पैशाची उधळपट्टी करीत बसलों आहें ! तुझ्या बापानें माझ्यावर येथें डिटेक्टिव्ह ठेविले आहेत, याचा मला गेल्या आठवड्यांत अनुभव आला आणि तेव्हांपासून असा संताप झाला आणि असें वाटलें कीं पुनः तुमचें तोंड पाहूं नये. मला पहिल्यापासून तुझा तिटकाराच होता. परंतु लग्न झाल्यानंतर विनाकारण हा तिटकारा दाखवा कशाला ? चारचौघे रहातात तसें आपणही रहावें असें वाटून मी दिवस काढीत होतों. माझ्यावर तुमचा, कोणाचा—तुझ्या बापाचा व तुझा मुळींच विश्वास नाहीं. मी एक कोणी तरी लुच्चा सोदा तुह्मांला लुचाडतों आहें अशी तुमची समजूत आहे हें जेव्हां दिसलें, तेव्हां आतां स्वाभिमान ह्मणून कांहीं माझ्यांत आहे हें स्पष्टपणें तुमच्या अनुभवास आणून दिलें पाहिजे असें वाटून हें पत्र मी तुला लिहीत आहें. तुझ्या बापाला लिहिण्याचें मला प्रयोजन नाहीं. कदाचित् वाटलेंच तर

एक दोन ओळींत त्यांची चांगली खरडपट्टी काढून लिहीन.

माझ्यावर डिटेक्टिव्ह ठेवावे ! मी कोण चोर कीं गुन्हेगार ? कीं आहे तरी कोण ? तुझ्याशीं माझें लग्न झालें तेंही माझ्या वडील भावानें फसून करून दिलें आणि फसून मी तुमच्या घरीं राहिलों, ह्मणून कांहीं मी तुमचा बंदा गुलाम झालों, कीं काय झालों ? आहे तरी काय ? मी तुमचा संपर्क नको ह्मणून तेथून पांच हजार मैलांवर येऊन बसलों. आणखी तुह्मी तेथूनही माझा छळ करतां आहांच. तेव्हां आतां काय ह्मणावें ! कोठला **फेअरब्रेन**साहेब, आणखी त्यानें मला बोलावून नेऊन उपदेश करावा ? तो काय ह्मणून ? माझें काय त्यानें पाहिलें ? आणि आह्मी इतक्या लांब येतों, तें काय असल्या लोकांच्या ताब्यांत रहाण्याकरितां येतों ? त्यानें मला बोलाविलें, तेव्हांच मला शंका आली आणि त्या तिरीमिरीसारखा मी त्याला “ येत नाहीं. माझा तुझा कांहीं संबंध नाहीं ” असें लिहिणार होतों. पण पुनः वाटलें, कीं एकदां काय आहे तें ऐकून तर घ्यावें. ह्मणून गेलों आणि त्याच्या व्याख्यानाचें चऱ्हाट सुरू होऊन तो आढ्यतेचा आव घालून बोलूं लागतांच त्याला साफ सांगितलें कीं “ मला कांहीं तुझ्या देखरेखीखालीं ठेविलें नाहीं आणि माझ्या कामांत तुला पडण्याचें कारण नाहीं. मी जें काय बोलतों आहें, हें ज्यांनीं तुला पत्र लिहिलें त्यांना बेलाशक सांग. पुनः माझ्या भानगडींत पडूं नकोस. ”

इतकें बोलून मी ताडकन् त्याच्या तेथून उठून निघून आलों. माझ्या वर्तनावर नजर ठेवण्याला तुह्मांला सांगितलें कोणीं ? तुह्मांला जर कांहीं शंका होती, तर तुह्मीं मला स्याहायचें होतेंन, मीं तुह्मांला स्पष्टपणें लिहिलें असतें. पण माझ्यावर डिटेक्टिव्ह ठेवायचा आणखी तो काय ह्मणून ? तर मी तुमचे पैसे घेतों ह्मणून. ठीक आहे. पैसे पाठवूं नका. आतां याउपर मी तुमच्या पैशाला शिवणारही नाहीं. तुझ्यावर मात्र अणुमात्र प्रेम नसतां तें आहे असें दाखवून मीं आजपर्यंत तुझ्या बापाचे पैसे घेतले याबद्दल मला फार वाईट वाटत होतें. ते पैसे मीं कधीं तरी परत करीन असा निश्चय केला होता. परंतु आतां स्पष्टपणें खरें काय तें बोलण्याचा प्रसंग आला तेव्हां तसें करतों. माझें तुझ्यावर प्रेम नाहीं. तूं मला दृष्टीसमोर नकोस. काडी मोडून देतां आली असती, तर मीं तुला आज दिली असती. खरें प्रेम ह्मणजे काय हें आपल्या तिकडल्या लोकांना ठाऊक कोठें आहे ? खरें प्रेम ह्मणजे काय, खरें स्वातंत्र्य कशाला ह्मणतात, हें इकडे युरोपांत शिकावें. इकडल्या स्त्रिया किती सुंदर, चतुर, हुषार, विद्वान्—अगदीं मोलकरणीचें काम करणारी असते, परंतु तिच्याशीं बोलण्यांत किती आनंद वाटतो ! किती शिक्षण मिळतें ! किती......पण तुह्मांला हें सारें लिहिण्यांत अर्थ काय ? डुकरांपुढें मोतीं पसरण्यासारखेंच होईल ! तुला मी आतां हें पत्र लिहितों आहें तें एवढ्याकरितां, कीं माझ्या मनांत तुझ्याविषयीं काडीइतकेंही प्रेम नाहीं, मला तूं नकोस, हें स्पष्टपणें सांगावयाचें. तुझ्या ठिकाणीं मन जडेल, चित्त आकर्षेल, असें आहे तरी काय ? सौंदर्य नाहीं, विद्वत्ता नाहीं, शहाणपणा नाहीं, वाक्चतुरता नाहीं आणि दुर्गुण तेवढे ओतप्रोत भरलेले आहेत. येऊनजाऊन तुझ्या बापाच्या पैशासाठीं मीं आपला डोळ्यांवर कानडें ओढून दिवस काढीत होतों, तुला भ्रमांत ठेवीत आलों. तेव्हां मीं आतां असा निश्चय केला आहे,

कीं पुनः त्या भिकार हिंदुस्थानांत यावयाचें नाहीं स्वातंत्र्याच्या पुण्यभूमींतून दास्याच्या पापारण्यांत कोण येऊन पडेल ! शिवाय तुमचा फेरत्रेन् तुह्मांला लिहिणारच. तेव्हां मीं तरी कां लिहूं नये ? होय. मीं येथें दुसरी बायको केली आहे. शुद्ध प्रेम ह्मणजे काय असतें त्याचा मला येथें अनुभव आला. पण त्या अनुभवाचें वर्णन तुझ्यासारख्या डुकरिणीजवळ---अगदीं अशुद्धाळ व दगड बायकोजवळ-करण्यांत अर्थ काय ? मी जर या नवीन स्वर्गिक प्रेमपाशांत सांपडलों नसतों, तर कदाचित् परत येऊन आमचे असंख्य मेंढीनंदन संसार करीत आहेत तसाच मीही तुला घेऊन संसारविस्तार करीत बसलों असतों. कदाचित् तुझ्या बापाच्या अनुमतीनें किंवा विरुद्ध जाऊन आपण निराळें बिऱ्हाड करून राहिलों असतों. मग तुझ्या बापाला आणि तुलाही वाईट वाटलें असतें. तेंही आतां तुह्मांला वाईट वाटायला नको. आतां मी तुमच्या दोघांच्या आड येत नाहीं आणि तुमच्या पैशाची ऊब घेत रहाण्यास तुह्मांस पूर्णपणें मोकळें सोडतों. माझा तुह्मांला बिलकुल त्रास होणार नाहीं आणि तुह्मी मला देऊं नका. मी काय करतों याच्यावर तुमची नजर नको. मी तुमच्यासंबंधानें काडीभरसुद्धां चौकशी करणार नाहीं. तुमच्या पैशाला माझी कीड लागली होती ती नाहींशी झाली असें समजा. काय जगांत पैसा तुमचेचजवळ आहे ? तुमच्यापेक्षां हजारपटींनीं श्रीमंत अशी मंडळी या जगांत आहेत. हिंदुस्थानांत आहेत. त्यांनीं आपलीं मुलें, आपले भाचे, आपले जांवई इकडे पाठविले आहेत. परंतु तुमच्यासारखी पिरपिर त्यांच्या पाठीमागें नाहीं किंवा कोणी डिटेक्टिव्हही त्यांजवर ठेविले नाहींत. पण मी उगाच जास्त लिहितों आहें कशाला ? जिच्यायोगानें मला स्वर्गिक सुख मिळत आहे, तिच्या दैवी समागमाचा वेळ तुझ्यासारख्या कैदासणीला पत्र लिहिण्यांत मीं काय ह्मणून खर्चावा ! तुझें लोढणें माझ्या गळ्यांत त्यांनीं बांधलें, तें केवळ स्वतःची जबाबदारी टाळावी ह्मणून बांधलें. परंतु आतां माझें मला चांगलें कळूं लागलें आहे. तेव्हां मी तरी काय ह्मणून दुसऱ्यानें माझ्या गळ्यांत घातलेली घोरपड तशीच उराशीं बाळगूं ? त्या घोरपडीला तरी मी कोठें हवा आहें ? तिला आपल्या बापाचा पैसा आणि आपला बाप हीं काय तीं पाहिजेत. ठीक आहे. घेऊन बसा. तुह्मी तिकडे, आह्मी इकडे. आतां यापुढें आपल्या एका छदामाची सुद्धां जरूरी नाहीं. तुह्मी पाठविलेत तरी मी आतां त्या पैशांना शिवणार नाहीं, समजलांत. आतां माझ्या या स्पष्ट लिहिण्यानें तरी आपल्याला खरें काय तें समजूं द्या. खरें काय तें समजण्यासाठीं माझ्यावर डिटेक्टिव्ह ठेवण्याच्या भानगडींत पडूं नका. आणि कोणा आपल्या जुन्या गोऱ्या देवतेकडून आह्मांला उपदेश करविण्याचें रिकामटेकडें काम वडिलांना ह्मणावें करण्याच्या भानगडींत पडूं नका. यापुढें आह्मी आपले जांवई नव्हे. आपली मुलगी-आमची बायको- ( हा पवित्र शब्द लिहितांना सुद्धां हात कांपतो, कारण हा शब्द तुला लावणें शक्यच नाहीं ! ) नव्हे. आतां आमचें कांहीं झालें तरी तुह्मांला कांहीं वाटायला नको. आणि तुमचें कांहीं झालें, तरी मला वाटावयाचें नाहीं. पुनः पुनः आणखी काय लिहूं ! मला तुझा आणखी तुझ्या बापाचा, तुमच्या मजवर डिटेक्टिव्ह ठेवण्यानें इतका तिरस्कार आला आहे, कीं मी तुमच्या तेथें किंवा तुह्मी

येथें माझ्याजवळ नाहीं ह्मणूनच ठीक आहे नाहींतर काय झालें असतें तें मला सांगवत नाहीं. तुझा बाप सगळा जन्म दास्य करून त्या दास्यानें मिळविलेल्या पैशानें उन्मत्त झाला आहे. यामुळें त्याला गोरे अधिकारी अगदीं देवापेक्षांही अधिक वाटतात. आणि ह्मणूनच त्यांनीं फेअरब्रेनसाहेबांस मजवर नजर ठेवण्यास लिहिलें. पण मी असा त्यांच्या नजरेखालीं राहून त्यांच्या कृपेनें मिळणाऱ्या तुकड्यांवर पोट भरणारा नाहीं. माझ्यावर नजर त्यांची काय ह्मणून ? ते कोण ! या स्वातंत्र्यभूमींत—या इंग्लंडांत-प्रत्येक माणूस स्वतःचा राजा आहे. त्याच्या-वर दुसऱ्यानें नजर ठेवणें ह्मणजे त्याचा जाणूनबुजून उपमर्द करणें आहे. जो जन्टल-मन आहे तो अशा गोष्टी कधींही सहन करून घेणार नाहीं आणि मीं सहन करून घेतलेंच नाहीं. माझा मी मालक. मला विचारस्वातंत्र्य आहे, उच्चारस्वातंत्र्य आहे, आचारस्वातंत्र्य आहे, कृतिस्वातंत्र्य आहे, आणखी प्रीतिस्वातंत्र्यही आहे. या सर्व स्वातंत्र्याचा मी वाटेल तसा उपभोग घेणार. मला तूं असें कर आणि तसें करूं नको असें बोलणारा कोण ! कोणाला तो अधि-कार पोंचतो ? तुझ्या बापाला ? आणि ज्याचे बूट पुसून त्यानें बढत्या मिळविल्या, त्या त्याच्या जुन्या वरिष्ठांना ? आणि तो अधिकार काय ह्मणून ? तुह्मीं मला आज चार सहा वर्षें आपल्या घरीं आणि आज चार सहा महिने या इंग्लंडांत पोसलें ह्मणून ? काय करूं ? मला तुमचे रुपये फेडाव-याला सामर्थ्य नाहीं, नाहीं तर या घटकेस एक सबंध रकमेचा चेक पाठवून दिला असता ! बस्. मला तुमची जरूरी नाहीं, तुला मीं काडी मोडून दिली असें समज. आणखी तुला वाटेल त्याप्रमाणें वाग आणि मला वाटेल त्याप्रमाणें वागूं दे. पुनः कधीं आतां माझ्या मार्गांत तूं किंवा तुझा बाप किंवा दुसरें कोणी येतां कामा नये. जी काय माहिती तुह्मांला पाहिजे ह्मणून तुह्मीं येथें माझ्यावर डिटेक्टिव्ह ठेविलेत, ती माहिती मींच तुह्मांला दिली आहे. अजून पुरती नसली, तर पुनः एकदां सांगतों, कीं मीं येथें दुसरी बायको केली आहे. तूं आतां माझी बायको नव्हेस. तुह्मीं पाठ-विलेला पैसा मीं वाटेल तसा उडविला. या-पुढें पाहिजे तर पाठवूं नका. माझ्या मार्गां-तून आपलें तोंड काळें करा......"

हें पत्र वाचतांना मालतीच्या मनाची स्थिति किती विलक्षण झाली ! तिनें किती तरी सुस्कारे टाकले, किती अश्रू गाळले, किती दुःखोद्गार काढले ! हें आपण वाचतों आहोंत तरी काय हेंच तिला समजेना. आपण पत्र वाचतों आहोंत ? आपल्या अत्यंत जिवलग मैत्रिणीला तिच्या नव-ऱ्याचें पत्र आलेलें आहे तें वाचतों आहोंत ? स्वप्नांत आहोंत कीं जाग्या आहोंत ? आहोंत तरी कोठें ? कांहीं जणूं काय तिला समजे-नासें झालें. पद्मावतीचा नवरा थोडा चम-त्कारिक आहे—विक्षिप्त आहे असें तिला आपलें मधून मधून ऐकूं येई. क्वचित् कांहीं गोष्टी ऐकून तिला शंकाही येई, परंतु पद्मा-वतीच्या तोंडून तिनें कधीं ह्मटल्या कधीं सुद्धां त्या बाबतींत एक शब्दही ऐकला नव्ह-ता. त्याच्या स्तुतिपर किंवा कौतुकपर असेच उद्गार तिच्या तोंडून तिनें ऐकले होते. आणि आज एकदम असलें हें भयंकर पत्र तिच्या हातीं तिच्या मैत्रिणीनें वाचावयाला दिलें. तें वाचतांना कित्येक शब्दांनीं तिच्या मनास विलक्षण धक्का बसला. हा लिहिणारा आहे तरी कोण ? पशु आहे कीं राक्षस आहे कीं पिशाच्च

आहे ? त्याच्या हातून असलें निर्दयतेच्या-क्रूरतेच्या शब्दांनीं भरलेलें पत्र--विषार फांसलेल्या कागदांप्रमाणें भयंकर पत्र--लिहवलें तरी कसें ? त्यांतील शब्द मनुष्याच्या लेखणीवाटे कागदावर पडलेले शब्द नव्हेत, एखाद्या कृष्णसर्पाच्या दांतांवाटे आपल्या मैत्रिणीच्या अंगांत संचार करण्यासाठीं सोडलेल्या विषाच्या चिळकांड्याच होत. या विषाचा भयंकर परिणाम तिजवर होऊन तिला मृत्यु आला, निदान तिचें डोकें फिरून तिला वेड लागलें, ती भ्रमिष्ट झाली तर त्यांत आश्चर्य कांहींच नाहीं, असें तिच्या मनांत वाटलें. पुढें त्या पत्रांतील शेवटला शेवटला भाग वाचतांना तिचें अंग थरारून आलें. तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले, डोळे ताठ झाले, श्वासक्रिया बंद झाली आणि ती अगदीं तटस्थ होऊन कोठें तरी पाहूं लागली. ही स्थिति कांहीं वेळ चालल्यानंतर ती एक अत्यंत दीर्घ उसासा टाकून आतांपर्यंत दाबून ठेवलेला श्वास जणूं काय एकदम सोडून तोंडानें "राक्षस, राक्षस ते आणखी कसे असतात !" असें आपल्याशींच पुटपुटली. आपल्या मैत्रिणीस-मालतीस काय बोलावें ? तिचें समाधान कसें करावें? तिच्याकडे पहावें तरी कसें ? हें तिला कांहीं कळेना. तिच्याकडे पहाण्याचें तिला धैर्यच होईना म्हणून तिनें तें दुष्ट पत्र तसेंच हातांत धरून उगीच त्याच्याकडे पहाण्याचें मिष केलें. परंतु अशा पत्राकडे पहाण्याचें मिष करणें सुद्धां सत्ववृत्तीच्या माणसास अशक्य ! फार वेळ तिच्यानें त्या पत्राकडे पहावेना. पत्र हातांतून टाकून यावें असेंही तिच्या मनांत एकदां आलें, परंतु पुनः काय तिला वाटलें, तिनें त्याच्या घड्या घालण्यास सुरुवात केली. जणूं काय तिला तें कोठें तरी फार फार जपून ठेवावयाचें होतें. मनुष्याला कांहीं सुचेनासें झालें म्हणजे त्याचे हातपाय कांहीं तरी चाळे करूं लागतात. तशीच स्थिति आतां तिच्या हातांची होऊन ते त्या पत्राच्या घड्या करूं लागले असावेत.

कांहीं केल्या आपल्या त्या दुःखमूर्ति मैत्रिणीकडे तिच्यानें पहावेना. मग बोलण्याची तर कोठली गोष्ट ! ! परंतु असें किती वेळ चालणार ? शेवटीं ती सद्गदित कंठानें पद्मावतीस म्हणते:

" पद्मे, आतां मी काय बोलून तुझं समाधान करणार ? राक्षसाच्या दाढेखालीं सांपडलेल्या प्राण्याचं बाहेर दूर सुरक्षित उभ्या असलेल्या प्राण्यानं समाधान काय करायचं ! "

पद्मावती तें ऐकून किंचित् वेळ स्तब्ध बसली. नंतर पुनः मालतीस म्हणते: 'मालती, तूं वाचलंस हें कांहींच नाहीं. मला थोडी शांत होऊं दे म्हणजे त्याच्याहूनही कांहीं भयंकर गोष्ट तुला सांगते. '

# प्रकरण ४ थें.

## पांच भावंडें.



" अरे, ताई आली, ताई आली, आतां अगदीं गप्प बसा. तिनं आपल्याला सांगितलं आहेना भांडाभांडी करूं नये म्हणून ! " हें बोलणारा मुलगा सुमारें बारा वर्षांचा होता. त्याचें तें बोलणें ऐकतांच पलीकडे लहान मुलें आपापसांत भांडत होतीं, तीं एकदम गप्प राहिलीं आणि एकदम हंसतमुख होऊन " कुठें आहे ताई ! कुठं आहे ताई ! " असें ओरडून विचारूं लागलीं. आणि पलीकडे पसरलेल्या एका अंथरुणावर पडलेली एक सुमारें दहा वर्षांची मुलगी अगदीं क्षीण अशा आवाजानें ह्मणाली, " आली का ! ताई जवळ असली, कीं मला बरं वाटतं. मन्या, हांक मार रे तिला. "

" अग, ती घरांत आली, कीं तुझ्या जवळ यायचीच ! तिला हांक मारायला कशाला पाहिजे ! घरांत आली कीं पहिली चौकशी तुझी हीं पहा तिचींच नाहीं का पावलं वाजत ! "

असें बोलणें होतें आहे, तों एक सुमारें वीस बावीस वर्षांची तरुण स्त्री त्या खोलीच्या दारांत आली. खोलींत बराच अंधार होता, यामुळें ती क्षणमात्र दारांतच उभी राहिली. तिच्या डोळ्यांनीं तिला प्रथम कांहीं दिसेना. इतक्यांत तिच्या पायांस तीं दोन भांडणारीं मुलें विळखे घालून ह्मणतात: " ताई, तूं आलीस ? आह्मी तुझी केव्हांचीं वाट पहातों आहों. ताई, आह्मी भांडलों नाहीं बरं का. आगखी आपल्या बचीला कटकट केली नाहीं. कनी तिला चांगली झोंप लागली होती ! "

तें ऐकून ती तरुण स्त्री त्या मुलांच्या डोक्यांवर हात ठेवून त्यांच्या माना वर उचलून त्यांस ह्मणाली, " नाहींना भांडलां ! भांडूं नयेच मुळीं. आपली बची आजारी आहे तिला कटकट होईल असं करूं नये. चला आपण बची काय करते आहे तें पाहूं. "

असें ह्मणून तिनें त्या दोघांस दूर करून पलीकडे एका अंथरुणावर पडून तिच्याच-कडे मोठ्या उत्कंठित नेत्रांनीं पहात असलेल्या मुलीजवळ ती गेली व तिच्याजवळ बसली. तिनें त्या मुलीच्या कपाळावर हात ठेवून कपाळ जरासें चेपलें आणि " बचे, कसं काय वाटतं आहे तुला ? डॉक्टर ह्मणाले आहेत कीं मी संध्याकाळीं चार साडेचार वाजतां येऊन पाहीन, पण आतां तुला ताप नाहीं. कांहीं खायला हवं का ? "

बची लागलीच तिला ह्मणाली: " ताई, मला खायला कांहीं नको; पण तूं, माझ्या-जवळ बस. ताई, तूं माझ्याजवळ असलीस ह्मणजे फार बरं वाटतं, पण तुला बसायला

वेळच नाहीं. " तें त्या दहा वर्षांच्या दुखणाईत पोरीचें भाषण अगदीं साधें सहजगत्या निघालेलें असें होतें. परंतु तें ऐकतांच ताईचें तोंड एकदम खिन्न झालें आणि तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. हे अश्रू दुसऱ्या कोणाच्या नजरेस पडूं नयेत अशाबद्दल ती उत्कंठित दिसली; कारण तिनें लागलींच एके बाजूस तोंड वळवून ते पुसले व त्या दुखणेकरी मुलीस ती ह्मणालीः " बचे, आह्मी नाहीं का बरं आळीपाळीनं तुझ्याजवळ बसत. इतका वेळ मनोहर बसला आहे. त्याला आज सुट्टीच आहे. आणखी दोन अडीच तासांनीं मी येईन. मनोहर, तूं बसतोसना एकसारखा इच्याजवळ. मी आज बाईंना सांगून अंमळ लवकर येईन बरं का ! काय करूं ! मीं रजा मागितली पण बाई म्हणतात तुह्मांला नुकत्याच लाविल्या आहेत. आणखी इतक्यांत कसली रजा मागतां ? बचे, तूं बरी हो, ह्मणजे आपली माझ्याबरोबरच तुला घेऊन जात जाईन शाळेंत. यांही दोघांना शाळेंत न्यायला बाईंनीं परवानगी दिली ह्मणजे मग कांहींच अडचण पडणार नाहीं. तूं लवकर बरी हो ह्मणजे झालं. "

इतक्यांत मनोहर मध्येंच ह्मणतोः "ताई, तुझी हेडमास्तरीण मोठी निर्दय दिसते बोआ. तुला रजा देत नाहीं ह्मणून सांगितलंन् ? घरीं आपलं कोणी आजारी असलं तरी दिखील हाताखालच्यांना रजा देत नाहीं."

" मनू, वेड्या असं बोलूं नये. त्यांनीं तरी काय करावं बरं ! आणखी महिना दीड महिन्यावर परीक्षा आल्या आहेत, तेव्हां मुलींचे अभ्यास नकोत का व्हायला ? ज्यांत आपल्याला समजत नाहीं त्यांत लहान मुलांनीं बोलूं नये. त्यांनीं रजा दिली नाहीं यांत त्यांच्याकडे कांहीं सुद्धां दोष नाहीं. "

तें बोलणें ऐकून मनोहर थोडासा वरमला आणि ताईकडे नुसतेंच पहात उभा राहिला.

दुसरीं धाकटीं दोन मुलें ताईच्याजवळ येऊन तिच्या गळ्याला मिठ्या मारीत होतीं. त्यांस पुनः दूर सारून ताई बचीस ह्मणतेः " बचे, मघांची राहिलेली थोडीशी लापशी पुनः घे. आतां मी जातें. उरलेलं एक वेळचं औषध मनू तुला देईल. चंडू, विठू, तुह्मी आतां दोन घटका असंच खेळा. आणखी भूक लागली कीं ती भाकरी ठेविली आहे ती तुह्मांला दादा काढून देईल ती खा. मी पुनः शाळेंत जाऊन येतें अं ! आलें ह्मणजे मग आपण......मनोहर, त्यांना संभाळ आणखी डॉक्टर येतील त्यांना नीटपणें बचीची हकीकत सांग. मी सांगून आलेंच आहे, पण ते आले ह्मणजे वेड्यावेड्यासारखं करूं नको. बचे, तूं दिखील काय होतं आहे तें नीट सांग बरं का ? मी जातें आतां. "

इतकें ह्मणून ताई तेथून निघून गेली. बचीची मोठी निराशा झाली असावी असें दिसलें. ती आपल्या विस्तृत नेत्रांनीं ताईकडे एकसारखी पहात राहिली. ताई गेल्यानंतर तिनें आपले नेत्र मनोहराकडे वळविले आणि त्यास ह्मणतेः " काय तरी ताईची हेडमास्तरीण आहे ? रजाच देत नाहीं ह्मणून सांगितलंन् ना ? मनुदादा, आपल्या ताईला आपण किती तरी त्रास देतों ! नाहीं बरं ? माझा तर तिला फार फार त्रास होतो, पण मी बरी झालें ह्मणजे मग तिला कसला ह्मणून त्रास द्यायचा नाहीं. मला समजतं आहे. ताईला मी...... "

इतक्यांत मनोहर मोठ्या आतुरतेनें व अभिमानानें ह्मणतोः " बचे, तूं बरी हो,

ह्मणजे सगळं कांहीं आह्मांला पावलं." हें बोलून मनोहर आढ्यतेनें तिच्याकडे पहात राहिला. आपण मोठे, आपल्यांला आपली जबाबदारी समजते. ह्मणून ताईनें सगळें घर व आपलीं भावंडें संभाळण्याचें काम आपल्याकडे दिलें आहे हें मनांत येऊनच त्याला अभिमान वाटूं लागला होता. तो त्या दुसऱ्या भावंडास तीनतीनदां "अरे,तुह्मांला खायला हवं असलं,तर मला सांगा, मी काढून देईन. पण गडबड करूं नका. ताईनं सांगितलं आहे ना कीं भांडूं नका म्हणून !" असें ह्मणे व दहावीस मिनिटांनीं बबीच्याजवळ जाऊन तिला ह्मणेः " मी आहें बरं का इथें. तूं अगदीं भिऊं नकोस. तुला कांहीं पाहिजे असलं तर मला सांग, मी तुला देईन."

अशा प्रकारें त्या एवढ्याशा खोलींत तीं भावंडें आपला वेळ काढीत होतीं. सुमारें दोन तास झाले. साडेचोहोंचा सुमार झाला आणि डॉ. भगवंतरावांची गाडी दाराशीं येऊन उभी राहिली. ते चटकन उतरले तों त्यांच्या गाडीचा आवाज ऐकून बाहेर आलेला मनोहर त्यांच्यापुढें उभा राहिला. डॉक्टराबरोबर आणखी एक गृहस्थ होता. त्याच्याकडे डॉक्टर वळून ह्मणतातः" ही एक केस पहा. प्लेगानं उध्वस्त केलेल्या कुटुंबांपैकींच हें एक अनाथ कुटुंब आहे. आई मेली, बाप मेला, एक चुलता होता तोही मेला. आतां रहातांपैकीं हीं पांच भावंडं राहिलीं आहेत. हा मुलगा आहे, याच्या पाठचीं दोन दोन तीन तीन वर्षांच्या अंतराचीं तीन अर्भकं आहेत. हा मुलगा आतां बारा वर्षांचा आहे, याची एक थोरली बहीण आहे, तीच यांचं पालन-पोषण करते. ती तरुण दुर्दैवी वैधव्य प्राप्त झालेली अशी आहे. तिला लिहितां वाचतां येत असल्यामुळं तिनं एका मुलींच्या शाळेंत शेवटल्या मास्तरणीची जागा मिळविली आणि तेवढ्यावर हें छोटं कुटुंब राहलं आहे बघा !"

इतकें त्या गृहस्थाकडे पाहून ह्मणून स्वारी त्या मुलाकडे वळली आणि त्या मुलास ह्मणालीः "कायरे, तुह्मी ताई दुपारीं आली तिनं सांगितली मला हकीकत, आतां कसं काय आहे पोरीचं ?"

" बरं आहे." मनोहर एकदम ह्मणाला, "आपण येणार आहां ह्मणून ताई सांगूनच गेली होती."

मनोहर पुढें, आणखी डॉक्टर मागें व त्यांच्या मागें तो त्यांच्याबरोबरचा गृहस्थ, त्या भावंडांच्या खोलींत इतका अंधार असे कीं, बाहेरून येणाऱ्या प्रत्येकास दारांत थबकावेंच लागे. डोळ्यांना आंतल्या अंधाराची संवय झाल्याखेरिज स्पष्ट दिसूं लागत नसे. डॉक्टर त्याप्रमाणें थांबले व मग वांकून त्यांनीं आंत प्रवेश केला. आंत शिरतांना ते तोंडानें पुटपुटलेः " असल्या भिकार, कोंदट अंधेऱ्या जागेंत रहाणारीं मुलं निरोगी व्हावीं कशीं ? शक्यच नाहीं. परंतु तुमच्यासारख्यांचं लक्ष्य इकडे जातं आहे कुठें ? तुमचं सगळं लक्ष्य पैशाकडे !"

"आह्मी काय करणार ?" त्या गृहस्थानें विचारलें.

" तुह्मी ? तुह्मी नाहीं तर कोण काय करणार ? तुह्मींच, या गोष्टींचा विचार करून, अशा लोकांची कींव करून यांना फार थोडक्यांत पण मोठ्या सुखांत रहातां येईल अशा चाळी बांधून याव्या. नाहींतर जी स्थिति मुंबईची झाली आहे, तीच आपली या गांवाची लहानशा प्रमाणावर होईल. अशा भिकार जागेंत रहावं लाग-

त्यामुळं किती मुलं विनाकारण मरतात याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ?..."

इतकें बोलून डॉक्टर भगवंतराव त्या मुलीजवळ गेले व फार प्रेमाचा आवाज काढून त्या मुलीस ते म्हणतातः " बबे, जरा पाहूं तुझा हात. आणखी जीभही पाहूं दे एकदां. ठीक. आज पुष्कळ बरं आहे तुझं, बरं का ! काय खाल्लं होतंस ? साबूची पेज ना ? तीच चालूं दे बरं का ! भाता-बिताचा हट्ट धरून तूं आपल्या ताईला त्रास देऊं नको. शेवटला उरलेला डोज् दिला कारे इला ? किती वाजतां द्यायचा होता ! "

" आतांच द्यायची वेळ आहे. " मनोहर ह्मणाला.

" ठीक आहे, तर मीच देतों. " असें ह्मणून डॉक्टरांनींच तेथली ती बाटली उचलून बबीला औषध दिलें व तिच्या उशाशीं ठेविलेल्या वाटींतून दोन मनुका तिला तोंडांत टाकण्यास दिल्या. डॉक्टर आल्यापासून त्यांना पाहून भिऊन दोनही लहान मुलें एका कोंपऱ्यांत जाऊन उभीं राहिलीं होतीं. डॉक्टरांचें त्यांच्याकडे लक्ष्यही गेलें नाहीं, परंतु आतां बबीच्या हातावर मनुका देतांना त्यांना त्यांचें स्मरण झालें, तेव्हां त्यांनीं मनोहरास " अरे, तुझीं धाकटीं भावंडं कुठें गेलीं ? " असें विचारलें. तेव्हां त्यानें " तीं पहा, तुह्मांला पाहून घाबरून कोंपऱ्यांत उभीं आहेत " असें हंसत सांगितलें.

तें ऐकतांच डॉक्टर आश्चर्यचकित मुद्रा करून ह्मणतातः " मला पाहून घाबरून ! मला पाहून घाबरून ! कायरे पोरांनो, अरे मला पाहून घाबरतां ? या इकडे पाहूं. मला कां घाबरतां तें सांगा. "

परंतु मुलें अधिक अधिकच भिंतींत शिरूं लागलीं ! तेव्हां डॉक्टरांनीं त्या वाटींतल्या मनुका घेतल्या आणि ते त्या मुलांजवळ जाऊन त्यांची भीति घालवूं लागले. मुलांनीं त्यांच्या हातच्या मनुका मात्र घेतल्या, परंतु जागा सोडली नाहीं. डॉक्टरांनीं त्यांस न भिण्याविषयीं पुष्कळ सांगितलें. परंतु तीं भिंत सोडून एक अंगुळभरसुद्धां पुढें येईनात. तेव्हां डॉक्टर निराश होऊन जरा धाक दाखविण्याच्या आवाजानें ह्मणाले, " दम धरा गुलामांनो, तुमच्या ताईला सांगतों, कीं तुह्मी अगदीं वाईट मुलं आहां. तूं यांना आपल्याजवळ घेऊं नको, कीं यांच्याशीं बोलूं न को. ह्मणजे मग कसं होईल ? "

डॉक्टरांनीं असें ह्मणण्याचा अवकाश, कीं तीं मुलें एकदम पुढें आलीं व त्यांपैकीं थोरला ह्मणालाः " नका, नका. ताईला असं सांगूं नका, आह्मी आलों. तुमच्याजवळ आलों. "

तो प्रकार पहातांच डॉक्टर भगवंतराव व त्यांचे बरोबरचा तो गृहस्थ दोघेही आश्चर्यचकित झाले. आणि एकमेकांकडे पाहूं लागले. नंतर डॉक्टरांनीं त्या मुलांस ह्मटलें, " ठीक. आतां तुह्मी शहाणे झालां. आतां आम्ही कांहीं ताईला सांगत नाहीं. पण पुनः मीं बोलावलं कीं जवळ येत जा. आणि मी आलों कीं पळून जात जाऊं नका. मी तुम्हांला बबीच्या औषधाबरोबर थोडासा खाऊ पाठवीन. मनोहर, तुझी ताई शाळेंतून आली, कीं तूं आमच्या दवाखान्यांत ये. हिचं औषध बदलून देईन. होईल आतां एक दोन दिवसांत ती बरी ह्मणून सांग. ताईला ह्मणावं काळजी नको करायला ! " इतकें ह्मणून डॉक्टर व ते गृहस्थ तेथून निघाले. रस्त्यांत येऊन दोघे गाडींत बसल्या-

नंतर तो गृहस्थ डॉक्टरास म्हणतो, "डॉक्टर, तुम्ही या कुटुंबाबद्दल अगदीं घरच्या माणसांप्रमाणें काळजी वहातांसं दिसतं. आपलंन् यांचं कांहीं नातं आहे का काय ?"

"नातं ! हो. त्यांचं आणखी माझं फार जवळचं नातं आहे."

"तरीच. अहो नाहीं तर आपल्या पदरचे दाम खर्च करून, वेळ खर्च करून गरीबांची एवढी काळजी कोणता डॉक्टर करणार आहे ? पण मघाशीं आपण त्या कुटुंबाची हकीकत सांगितलीत, तेव्हां आपलं नातं आहे असं नाहीं ह्मणालांत ?"

"अहो, माझंचसं काय ?" डॉक्टर त्या गृहस्थाकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहून ह्मणतातः "तुमचं सुद्धां या कुटुंबाशीं अगदीं जवळचं, माझ्याइतकं जवळचं नातं आहे. तुम्ही मानीत नाहीं, आम्ही मानतों इतकंच. बाकी मानायला पाहिजे दोघांनीं सारखंच."

डॉक्टरांचें तें बोलणें ऐकून तो गृहस्थ फारच चकित झाला व डॉक्टरांकडे जिज्ञासायुक्त दृष्टीनें पाहूं लागला. डॉक्टर जेव्हां कांहीं बोलेनात, तेव्हां त्यांस ह्मणतो, "आह्मी मानीत नाहीं, तुह्मी मानतां, आणखी माझंन् तुमचं यांच्याशीं सारखंच नातं आहे ! तुह्मी काय कोडं घालून बोलतां आहां समजत नाहीं बोआ !"

"कोडं नाहींन् बिडं नाहीं. माझं बोलणं समजण्याला अगदीं सोपं आहे. समजून घेण्याची इच्छा मात्र पाहिजे. तुमचंन् यांचं नातं आहे. तुम्ही मानीत नाहीं, तुह्मी मुद्दाम डोळ्यांआड लोटतां. मी मानतों, मी डोळ्यांआड लोटीत नाहीं. या गोष्टी अगदीं अक्षरशः खऱ्या आहेत."

या धीरगंभीरपणें उच्चारलेल्या शब्दांनीं तर तो गृहस्थ फारच गोंधळला. आतां काय बोलावें हें त्यास समजेना. शेवटीं तो डॉक्टरांस एवढेंच ह्मणालाः "कोणत्या प्रकारचं नातं आहे मला स्पष्टपणें सांगा तरी. ह्मणजे आमच्या हातून होईल तें साहाय्य आम्हीही करूं."

हें त्याचें बोलणें ऐकून डॉक्टर हंसले. गाडी चाललेलीच होती. डॉक्टर एवढ्या मोठ्यानें हंसले, कीं रस्त्यावरून जाणारे लोक कौतुकानें त्यांच्या त्या गाडीकडे पाहूं लागले. डॉक्टरांच्या तें लक्ष्यांतही नाहीं. ते आपले त्या त्यांच्याबरोबर असलेल्या गृहस्थास ह्मणालेः "अहो, या गरीब निराश्रित मंडळींचं तुमच्यासारख्या श्रीमंताशीं इतकं जवळचं नातं असून तें तुह्मी विसरून गेलां आणखी दुसऱ्यांनीं आठवण करून दिली तरी तें तुम्हांला आठवत नाहीं, तेव्हां काय म्हणावं ? बरं तर मी सांगतों तुमचं यांचं नातं. मग तरी तुम्हांला त्याची कांहीं आठवण होते का पाहूं. तुमचं आणखी यांचं—अशा लोकांचं नातं म्हणजे फार मोठं नातं. तें भूतदयेचं नातं. अहो, आमच्या नशिबानं आम्हांला तुमच्यासारख्यांकडून पैसे रगड मिळतात. तेव्हां या मंडळींना पिळून घेण्याची किंवा त्यांना आमची मदत मिळाली नाहीं ह्मणून मरूं देण्याची इच्छाच होत नाहीं. हीं मुलं फार चांगलीं आहेत. यांची बहीण तर केवळ एखाद्या भूदेवतेसारखी आहे. तिला तुम्हीं पाहिलं म्हणजे असं वाटेल, कीं या मुलांची काळजी प्रत्यक्ष परमेश्वराला पडून त्यानें ही योजना केली आहे. आईबाप वारले, घरांत अठराविश्वे दारिद्र्य. आणि हीं लहान लहान मुलं स्वतः अनाथ व तरुण विधवा ! अशा स्थितींत उत्तम प्रकारें राहून इतक्या तोंडांत अन्न

घालून भरून दिवस काढण्यासाठीं एकसारखी तिची धडपड चालावी, आणखी आमच्यासारख्यांनीं केवळ औषधपाण्याची मदत करूं नये म्हणजे पशुवत् आचरण करण्यासारखंच आहे. आम्हीं असं साहाय्य केलं, तर कांहीं विशेष केलं असं नाहीं. पण जे करणार नाहींत त्यांचं मात्र विशेष आश्चर्य. बोला मी म्हणतों हें यांचंन् तुमचं नातं आहे कीं नाहीं ? आहे असं वाटत असलं, तर बोला मग शीं म्हटल्याप्रमाणें काय मदत करतां तो. नाहीं तर......नाहीं तर काय म्हणायचं ! "

इतकें बोलून डॉक्टर थांबले. दुसरा गृहस्थ आपल्याशींच हंसला, आणि आपलें डोकें खाजवूं लागला. डॉ. भगवंतराव त्यास खिजवावें या हेतूनें म्हणतात, " कां ? आतां अगदीं गप्प बसलां ? कांहीं बोलावं असं राहिलंच नाहीं वाटतं ? "

" बोलावं असं न रहाण्यास काय झालं आहे ? अहो, तुम्ही भूतदयेचं नातं एकान् दोन कुटुंबांशींच कां लावून स्वस्थ बसतां ? अशीं नात्याचीं माणसं हुडकून काढून त्यांना मदत देत बसलां, कीं तुम्हांला याच नात्याच्या जोरावर इतरांपासून स्वतःसाठीं मदत मागण्याची पाळी येईल. मीं म्हटलं मघांपासून जवळचं नातं, जवळचं नातं कोणतं एवढं काढताहेत अशीं नात्याचीं मंडळीं सगळ्या आपल्या या शहरांतच काय, पण सगळ्या दुनियेभर दर वांकणाला सांपडतील. काय डॉक्टर घेऊन बसलां आहां ! चला. मी अशीं नात्याची मंडळी तुम्हांला निदान पन्नास तरी दाखवितों. असे रोजचे पन्नास नात्याचे रोगी सांपडले म्हणजे तुम्हांला आमच्यासारख्याकडे यायला वेळच नाहीं मिळायचा. आम्हांला आपलं औषध देऊन लावून या घरीं म्हणजे ठीक होईल. मग बसा तुम्ही पन्नास असले नात्याचे रोगी घेऊन " डॉक्टरांस या बोलण्याचा फार राग आला; इतका कीं, आतां त्या गृहस्थास " इतकं असलं तर तुम्ही आपले जा. माझ्यापाशीं आपल्याला द्यायला औषधंही नाहींत. दुसरे कोणी आपल्याच मताचे डॉक्टर बघा. " असें म्हणावें आणि आपण त्या गाडींतून उतरून चालतें व्हावें असें त्यांच्या मनांत आलें.

आपल्या बोलण्याचा डॉक्टरांस खास बराच राग आला हें त्या गृहस्थास स्पष्ट दिसलें. आणि त्यामुळें थोडेंसें मनाला वाईटही वाटलें, म्हणून तो आपली बाजू सांवरून घेण्याच्या मिषानें म्हणतो:"अहो, आपण जसं मला स्पष्टपणानं सांगितलं, तसं मींही पण सांगितलं. कोणी कोणावर दया करूं नये असं थोडंच आहे ? आणखी दया हा विकार कोणी कोणाला शिकवून त्याच्या मनांत थोडाच उत्पन्न होणार आहे ! तो विकार त्याचं कारण कुठें उद्भवलं कीं आपोआपच उद्भवतो, आणि लागलीच हातून कृतिही करवितो. अंतर इतकंच कीं, ज्या ठिकाणीं आपल्या मनांत हा दयेचा विकार उद्भवतो, त्या ठिकाणीं आमच्या मनांत उद्भवत नाहीं. आमच्या मनांत उद्भवेल, तिथें तुमच्या मनांत उद्भवणार नाहीं. आणखी हेंच बरं नाहीं कां ? निरनिराळ्या व्यक्तींबद्दल निरनिराळ्या व्यक्तींच्या मनांत दया उद्भवून तशी ती कृतीच्या रूपानं बाहेर पडली तर सगळ्यांचं काम होतं. प्रत्येक व्यक्तीबद्दल हजारांच्या मनांत दया आली तर कोणाचाच कांहीं फायदा व्हायचा नाहीं. कांहीं ठिकाणीं आम्ही दया दाखवूं. कांहीं ठिकाणीं तुम्ही दाखवा. मिळून जगांतलीं दुःखं कमी करण्याचं काम चालतं.

तुम्ही जिथें दया दाखवाल तिथें लोकांनीं दाखविली नाहीं ह्मणून तुह्मांला राग कां यावा ? "

या त्यांच्या बोलण्याकडे डॉक्टरांचें लक्ष्यच नव्हतें. त्यांनीं आपला राग आटपून धरला आणि शेवटीं त्या गृहस्थाकडे नुसतें हंसून पाहिलें. इतक्यांत गाडी त्यांच्या दवाखान्याशीं आली आणि ते उतरून वर गेले. वर गेल्याबरोबर त्यांनीं बबीच्या औषधाबद्दल कंपाउंडरांना काय सांगावयाचें तें सांगितलें. एका नोकरास कांहीं खाऊ आणून ठेवण्यास सांगितलें. आणि ते आपल्या टेबलाजवळ जाऊन बसले. बरोबर आलेल्या गृहस्थाच्या औषधाची तजवीज केली व त्यास लावून देऊन ते तेथें जमलेल्या आपल्या रोग्यांकडे लक्ष्य देऊन काम करूं लागले. लवकरच त्यांचें चित्त त्यांच्या कामांत गढून गेलें.

इकडे शाळा सुटतांच मथुराताई आपल्या भावंडांच्या ओढीनें झटकन घरीं येण्यास निघणार, तों त्यांच्या हेडमास्तरीणबाईंनीं त्यांस बोलावून नेऊन कांहीं क्याटलॉग वगैरे भरण्याचें काम सांगितलें. काम चांगलें एक तास दीड तास खाईल असें होतें. तें पहातांच मथुराताईस फार वाईट वाटलें. " ताई, तूं माझ्याजवळ बस. " असें बबीनें त्यांना दुपारीं ह्मटल्या वेळेपासून, शाळा सुटेल केव्हां आणि मी परत घरीं जाईन केव्हां असें त्यांना होऊन गेलें होतें आणि आतां ऐन निघण्याच्या वेळीं हें काम हेडमास्तरीणबाईंनीं पुढें ठेविलेलें पहातांच त्यांना कसेंसेंच होऊन गेलें. " मी घरीं घेऊन जाऊन हें काम उद्यांला करून आणून देतें. माझी धाकटी बहीण आजारी आहे तेव्हां मला आतां जाऊं द्यावें " असें ह्मणण्याची त्यांना इच्छा झाली, परंतु पुनः त्यांच्या मनांत असें आलेंच कीं, आपल्या आजपर्यंतच्या अनुभवावरून आपल्या हेडमास्तरणीकडून आपणास तशी सवलत मिळेल हें संभवनीयच नाहीं. तेव्हां एक दीर्घ उसासा टाकून त्यांनीं मास्तरीणबाईपासून क्याटलाग मागून घेतले आणि आपल्या वर्गांत बसून कामास सुरुवात केली. राहून राहून घरांतली हकीकत मनांत येतच होती. परंतु तावेदारीपुढें काय उपाय होता ?

मथुराताई एकसारखी एक तासभर बसली, तरी अर्धें सुद्धां काम झालें नाहीं. जों जों उशीर होत चालला तों तों तिला जास्तच काळजी वाटूं लागली आणि कामाकडे चित्त लागेनासें झालें, तेव्हां आतां काम घरीं घेऊन जाऊन पुरें करावें आणि सकाळीं हेडमास्तरीणबाईकडे द्यावें असें तिनें मनांत पुनः योजिलें आणि ती आतां काम आवरून उठणार, तोंच हेडमास्तरीणबाईच्याकडून शाळेची झाडसारव करणाऱ्या बाईच्या हातीं निरोप आला कीं काम संपलें ह्मणजे माझ्या घरीं तें आणून देऊन मग घरीं जावें ! आज हा प्रसंग तरी काय आहे हेंच तिला कळेना. तिचें चित्त फार उद्विग्न झालें. हेडमास्तरीणबाई मुद्दामच हें सर्व करते आहे कीं काय ! आपली धाकटी बहीण फार आजारी आहे हें तिनें तिला सांगितलें होतें. असें असून तिनें रजा दिली नाहीं तर नाहीं, पण आतां शाळेच्या वेळेबाहेर बसवून ठेवून घरीं जाण्यास उशीर करणार, हें आहे काय !

शेवटीं तिनें तेथें बसून तें काम संपविण्याचा निश्चय केला. आणि ती नेटानें बसली. इकडे ती शाळा सुटतांच न आल्यामुळें मनोहरला मोठी काळजी लागली. बबीनें तर ताई अजून कां आली नाहीं

ह्मणून विचारण्याचा एकसारखा सपाटा लाविला लहान मुलें रडण्याच्या बेतांत आलीं. मनोहरास फारच विलक्षण झालें. ताईच्या शोधाकरितां जावें, तर घरांत हीं लहान तीन मुलें कोणाचे हातीं सोंपवावीं ? तो चुळचुळ चुळचुळ करूं लागला. शेवटीं त्यानें बचीस ह्मटलें: " बचे, मी ताईचा शोध करून येतों, तोंपर्यंत तूं कसं तरी करून या मुलांना संभाळ. "

परंतु बची एकही उत्तर देईना ! मनोहर तिच्याजवळ जाऊन पहातो तों बचीची स्थिति कांहीं चमत्कारिकच झालेली !

# प्रकरण ५ वें.

## बची.



पोरीची दांतखिळी बसलेली. डोळे ठिकाणावर नाहींत आणि सगळें अंग लांकडासारखें ! मनोहरानें मृत्यु पाहिले नव्हते असें नाहीं. प्लेगानें त्याच्या घरांत त्यास प्राणाहून प्रिय अशा माणसांचे मृत्यु दाखविले होते. त्या मृत्यूंत आणि बचीच्या या स्थितींत त्यास कांहीं अंतर दिसलें नाहीं. तो घाबरला. त्यानें बचीस हांका मारण्याचें सोडलें आणि नुसते डोळे ताठून तो तिजकडे पाहूं लागला. त्याची स्वतःची स्थिति बचीसारखी अगदीं तटस्थ झाली. त्या दोन लहान मुलांना त्या प्रेताजवळ सोडून आपण जावें तरी कोठें ! अशा चकित अवस्थेंत, तटस्थपणांत थोडा वेळ गेला. तो अजून बाराच वर्षांचा होता. त्याला धैर्य कोठलें ! थोडेंसें असलें तरी तें किती वेळ टिकणार ! त्यास एकदम हुंदका आला तो कांहीं केल्या आवरेना. तो मोठ्यानें बाहेर पडला. तो त्याचा हुंदका ऐकतांच तीं दोन लहान मुलें एकदम आपला खेळ चालला होता तो सोडून त्याच्याकडे पाहूं लागलीं. तो आपल्या बचीजवळ बसून रडतो आहे हें पहातांच त्यांतला धाकटा एकदम त्याच्याजवळ धांवत आला आणि त्याला ह्मणतो: "दादा- तूं रडतो आहेस पण आपली बची आजारी आहे तिला कटकट होईलना ? रडूं नको. तुला काय पाहिजे तें ताई आल्यावर तुला देईल. आह्मी बघ बरं आतां रडतों का ? "

दुसरा त्याहून मोठा होता, तो दूर होता तेथेंच उभा राहिला होता. त्या धाकट्या- इतकी त्याची अजाण स्थिति नव्हती. त्या धाकट्याच्या चमत्कारिक बोलाचें दुसऱ्या एखादे वेळीं कौतुकच झालें असतें, परंतु ही वेळ तशी नव्हती आणि त्या बोलांचें कौतुक करण्यास कोणी जाणतें घरांत नव्हतेंही.

मनोहर त्यास कांहीं बोलला नाहीं. त्याचे हुंदके त्यास अनावर झाले होते, यामुळें त्याचें चित्त दुसरीकडे जाणेंच शक्य नव्हतें. पोरगी तर तशीच पडलेली. इतक्यांत एक बाई दारांतून डोकावून हलकेंच

ह्मणालीः " मनोहर, दिवा लाविला नाहींस कांहीं, आणखी रडत कां बसलास बाळ ? "

मनोहर कांहीं बोलला नाहीं. तेव्हां ती बाई आंत शिरली, आणि " आगपेटी कुठें आहेरे ? मी दिवा लावितें " असें ह्मणाली. त्याबरोबर त्या लहान मुलांपैकीं मोठ्यानें तिला आपल्या दिव्याच्या कोनाड्यांतून आगपेटी काढून दिली. तिनें पटकन् काडी ओढून दिवा लाविला आणि तो दिवा घेऊन ती बबीच्या अंथरुणापाशीं गेली. पहाते तों बबीची ही अवस्था झालेली. तिनें मनोहरास झटकन् दूर लोटलें आणि " वेड्या, असा रडत काय बसलास ? आधीं डॉक्टरांच्याकडे पळत जा. तुझी ताई कशी अजून आली नाहीं ! " इतकें म्हणून तिनें बबीचे हात चेपून पाहिले, तिच्या कपाळावर हात ठेविला. नंतर डोळे मुद्दाम उघडून पाहिले, आणखी ह्मणाली: " दम धर, घरीं कोणी आलें नाहीं तों मी मात्रा आणून दोन वळसे घालतें, आणखी आधीं एक अंजन आमच्याकडे आहे चांगलंसं तें डोळ्यांत घालूं लवकर येतें हो. घरीं यायचं झालं कीं मग सगळं संपलंच. मग तुमच्या घरांत पाऊलसुद्धां घालायची सोय नाहीं. "

हीं शेवटचीं एक दोन वाक्यें ती आपल्याशींच पुटपुटत बाहेर गेली. थोड्याच वेळांत ती थोडासा मध, एक सहाण आणखी कसल्याशा दोन गोळ्या घेऊन परत आली. तिनें मनोहरास दूर करून थोडेंसें पाणी आणलें आणि एक गोळी घेऊन सहाणेवर खसाखसा उगाळली. आपलीं दोन बोटें त्या उगाळल्या औषधानें भरून घेतलीं आणि मग मनोहरास म्हणते: " हं चल, बायकांसारखा रडत बसूं नको. इकडे ये, वेड्या, तिला कांहीं झालं नाहीं. हे अंजनाचे वळसे बसले कीं आतां खडबडून जागी होईल. पण तुझी ताई कशी अजून आली नाहीं ! इकडे बघ. हे हिचे थोडे हात धरून ठेव " असें म्हणून तिनें लागलीच आपल्या एका हाताच्या बोटांनीं बबीचा एक डोळा उघडला आणि औषध लाविलेलें एक बोट एकदम तिच्या त्या डोळ्यांतून फिरविलें. तें तसें फिरवून दुसऱ्याही डोळ्यांत दुसऱ्या बोटाला लाविलेल्या औषधाचा प्रयोग करणार, तों बबी " अयाई अयाई, आग झाली " असें ओरडून हात पाय झाडूं लागली. त्या बाईनें तें पहातांच " अशी दम धर, आतां तुला मात्रेचे दोन वळसे देतें आणखी जातें. " असें म्हणून सहाण धुवून आपल्या बरोबर आणलेल्या मात्रेचे चार वळसे मधांत उगाळून तिनें बबीस तें औषध चाटविलें व मनोहराकडे मग वळून ती ह्मणालीः " पोरा, असं कांहीं झालं तर मला हांका मारायच्या का रडत बसायाचं ! मी आलें असतें आणखी केव्हांच मात्रा दिली असती, अंजन घातलं असतं, सगळं कांहीं केलं असतं. आतां कांहीं कोणी घरांत नव्हतं. "

मनोहर आतां हुशार झाला. आपल्या बबीला त्या बाईनें उठविलें तें पहातांच त्याचें तें रडेंबिडें सगळें कोणीकडच्या कोणीकडे गेलें. तो त्या बाईस म्हणालाः " तें खरं वगुताई, पण दिगंबरपंतांनीं आम्हांला कितीदां बरं सांगितलं, कीं तुम्ही कोणी माझ्या घरांत पाऊल घालाल तर तुमची तंगडी मोडीन म्हणून ! तुमच्याकडे यावं असं आम्हांला फार वाटतं. ताई तर म्हणते कीं तुमच्यासारखी माउली त्रिभुवनांत सांपडायची नाहीं, पण त्यांच्यापुढें काय करावं ! त्यांना ताई दृष्टीसमोर नको. त्यांनीं बायांना तिच्यावरून किती तरी

त्रास दिला !......याचा बारल्यावर आई-लाही त्यांनीं किती त्रास दिला....आणखी तुम्हांला तरी ....... "

"जाऊं देरे," बगुताई त्यास मध्येंच म्हणाल्या: "त्यांचा स्वभावच तसला. तुम्हीं एक नाहीं येणार. पण मी काय करणार ! तें कांहीं नाहीं. असं कांहीं झालं, कांहीं लागलं संवरलं, कीं तुम्ही अगदीं वेळाशक सांगायला मागायला येत जा. ते काय सारा दिवस घरांत बसून रहाताहेत ! "

इतकें त्यांचें बोलणें होतें आहे, तों बाहेरून डॉक्टरांचा आवाज ऐकूं आला: "मनोहर, अरे मनोहर, कसं काय आहेरे बबीचं ? " आणि शब्दाबरोबरच डॉक्टरांचें पाऊलही आंत पडलें. त्यांच्या मागोमाग ते सकाळचे गृहस्थ होतेच. नंतर इकडे तिकडे पाहून त्यांनीं विचारलें: "कायरे, अजून तुझी ताई नाहीं आली ! "

डॉक्टरांच्या या प्रश्नाबरोबर त्यांच्याबरोबर असलेल्या त्या गृहस्थाच्या भिवया एकदम वर झाल्या व त्याच्या तोंडावर व्याजस्मित दिसूं लागलें. तो दारांतच राहिला होता. डॉक्टरांची पाठ त्याच्याकडे होती. त्यांस तें कांहीं दिसलें नाहीं. डॉक्टर बबीच्याजवळ आंत गेले होते. त्यांनीं तिची नाडी पहाण्यासाठीं हात उचलला व ते कांहीं बोलणार, तों मनोहर त्यांस ह्मणतो: "डॉक्टर, ती आतां अगदीं......मी तर समजलों कीं...... "

परंतु बगुताईंनीं त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. त्या एकदम म्हणाल्या: "तिला वाताचा झटका होऊन ती अगदीं लांकडासारखी निश्चेष्ट पडली होती. सगळं अंग गार पडलं होतं. दांतखिळी बसली होती. श्वास बंद झाल्यासारखा झाला होता. पण कानशिलाच्या शिरा उडत होत्या. तेव्हां झटलं आमचा आपला बायकी उपाय करून पहावा. ह्मणून आमच्या घरच्या एका अंजनाचे दोन वरसे डोळ्यांत घातले. आणखी ती शुद्धीवर आल्याबरोबर आमची मात्रा दोन वेढे उगाळून दिली. "

बगुताईचा शब्द ऐकतांच मागें दारांत असलेल्या त्या गृहस्थानें कपाळास आंठ्या घालून डोळे आकुंचित करून बगुताईकडे पाहिलें. डॉक्टर बगुताईचें बोलणें ऐकत असतां असतांच विचारमग्न झाले व बबीची विशेष तपासणी करण्यासाठीं त्यांनीं दिवा आपल्याजवळ आणण्यास सांगितलें. नंतर तिची नाडी पहात ह्मणतात, "अंजन घालण्यापूर्वीं किती वेळ ती अशी पडली होती ? "

"बराच वेळ पडली असावी. मला तर कांहीं भलतंच वाटून मी घाबरून नुसता इथें रडत बसलों. मला कांहीं सुचेना. इतक्यांत या बगुताई माझं रडणं ऐकून आंत आल्या म्हणून बरं झालं. नाहीं तर आणखी किती वेळ तशी पडली असती आणखी काय झालं असतं कांहींच सांगतां येत नाहीं. "

हें त्यांचें सगळें बोलणें डॉक्टरांनीं ऐकलें कीं नाहीं कोणास कळे ! कारण त्यांचें सगळें चित्त त्या पोरीच्या तपासणींत होतें. त्यांनीं नळी काढली व ती तिच्या छातीला, पोटाला लाविली. तिचे डोळे तपासून पाहिले, तिचीं नखें पाहिलीं आणि ह्मणाले, "मी सहज आतां या बाजूनं यांच्या घरीं जात होतों तेव्हां वाटलं आणखी एकदां बबीचा समाचार घ्यावा. पुनः गाडी उभी करून आंत आलों. यांच्या घरीं मला कदाचित् रोज एक दोनदां जावं लागेल, तेव्हां मी इथेंही येत जाईन. आणखी मला वाटतं हिला तशी दिवसांतून दोनदां तरी पहायला

पाहिजे चार दिवस. कांहीं हरकत नाहीं, मी येईन. दोनदां सोडून चारदां सुद्धां येईन."

हे शेवटले शब्द ऐकतांच दारांतल्या गृहस्थांनीं पुनः आपल्या भिवया उंच केल्या. व्याजस्मित केलें. परंतु डॉक्टरास तें कांहीं दिसलें नाहीं. ते आपले पुढें बोलतच होते.

" पण कायरे, तुमच्या ताई अजून कशा नाहीं आल्या ! रोज शाळेंतून यायला इतका उशीर होतो का काय ? का कुठें आणखी शिकवणी बिकवणी धरली आहे ? "

" छे. शिकवणी नाहींन् कांहीं नाहीं. त्या रोज पांच वाजल्यावर लागलींच येतात" बगुताईंनीं उत्तर दिलें.

बगुताईचें बोलणें ऐकून डॉक्टर त्यांस ह्मणतातः " बाई, तुह्मीं आज या मंडळीवर अनंत उपकार केलेत. ही जर तशीच आणखी कांहीं वेळ पडती, तर काय झालं असतं आणखी काय नाहीं, याचा कांहीं नेम नाहीं. फार चांगलं प्रसंगावधान तुह्मी ठेवलं ! ताई असत्या तर मीं त्यांना आतां पुढें काय केलं पाहिजे तें सांगितलं असतं. पण अजून त्या तर कांहीं आल्या नाहींत, आणखी मला तर यांच्याबरोबर गेलं पाहिजे. तरी हरकत नाहीं, मी इकडून परत येतांना येतों. कदाचित् नच आलों तर त्यांना एवढच सांगा, कीं रात्रीं मघाप्रमाणें जर पुनः हिला झटका आला, तर तुह्मी अनमान न करतां अगदीं किती वाटेल तितकी रात्र झाली असली, तरी मला हांक मारायला पाठवा. झटका नाहीं आला, तर ठीकच आहे. मी सकाळीं येतोंच आहें. औषध जें चाललं आहे तें चालूं द्या. अन् थोडी लापशी खाऊन तिला जर झोंप लागली तर मुळींच तिला उठवूं नका. झोंप हें सगळ्यांत उत्तम औषध. मी आतां जातों. त्या आल्या असत्या तर बरं झालं असतं. पण रोज लवकर येतात, तर आज कशा इतका वेळ त्या बाहेर राहिल्या ! "

या प्रश्नानें दाराजवळच्या गृहस्थाच्या भिवया आणखी उडाल्या व त्याचें व्याजस्मित होतें तें व्याजहास्य झालें. परंतु आपलें हें व्याजहास्य डॉक्टरांस कळूं नये म्हणूनच काय, तो गृहस्थ डॉक्टरांस ह्मणतोः " अहो महाराज, चालतांना आपण. डॉक्टर आणखी वकील, सतरा हजार..."

"हें पहा. आमच्या तंत्रानं घ्यायचं असेल, तर त्यांनीं आमच्याकडे यावं. तसं ज्याला नको असेल तर त्याच्यावर कांहीं आमचा जुलूम नाहींनर तुम्हांला पन्नास डॉक्टर आहेत. यांना एखाद् दुसरा सुद्धां मिळायची मारामार ! "

" मला वाटतं यांच्या ताई ज्याला बोलवायला जातील तो हां हां म्हणतां उभा राहील. दयाशील डॉक्टर–निदान यांच्या-संबंधांत तरी दयाशील तुह्मीच एकटे नाहीं निघणार ! " हें बोलतांना त्या गृहस्थाची चर्या जर डॉक्टरांस दिसती,—त्यानें डोळे कितीदां मिचकाविले, तिरळें कितीदां पाहिलें, त्याचें स्मित कशा प्रकारचें होतें—हे सर्व प्रकार जर त्यांस दिसते, तर त्यांनीं काय केलें असतें कोणास ठाऊक !

परंतु डॉक्टरांचें त्यांच्या बोलण्याकडे लक्ष्यच नव्हतें; कारण तितक्यांत ताई आलेल्या दिसल्या. त्यांस पहातांच डॉक्टर त्यांच्याकडे पाहून एकदम म्हणतातः "अहो, पोरगी इतकी आजारी, आणखी तुह्मी शाळा सुटून दोन तीन तास झाले तरी आलां नाहीं. तुह्मांला तर मी सांगितलं कीं आठ दिवसांची किरकोळ रजा घ्या...... "

" काय करूं, रजा मिळत नाहीं. आणखी आज क्याटलागाच्या बेरजांचं वगैरे काम हेडमास्तरीणबाईंनीं माझ्याकडे दिलं.

सांगितलं कीं हें काम करून माझ्या घरीं कागद पोंचवून मग घरीं जा. "

" रजा मिळत नाहीं ? शाबास. मी करतों तुम्हाला रजा मिळण्याची तजवीज. अशा वेळीं रजा नाहीं म्हणजे काय ह्मणावं? बरं पण रात्रीं तरी आतां काळजी घ्या. त्या बगुताई आहेतच तुम्हांला मदत, पण वारंवार अंजन घालून उपयोगी नाहीं. मघांच्यासारखं झालं तर मला बोलाविण्याला संकोच करूं नका. मनोहराला माझ्याबरोबर द्या. मी बबीचं औषध फरक करून पाठवून देतों. पहिल्यानं मला वाटलं होतं, औषध बदलायची जरूरी नाहीं. परंतु आतां वाटतं कीं थोडं बदलून द्यावं. मी परत जातांना त्याला हांक मारतों, तयार राहूं द्या. "

असें ह्मणून डॉक्टर व तो गृहस्थ निघून गेले. त्या गृहस्थानें दारच अडवून धरलें होतें यामुळें बगुताई अडकून राहिल्या होत्या. त्यांची फारच त्रेधा उडाली होती. त्या आपल्या घरांत जाण्यासाठीं तरंगल्या होत्या. आपण अशा या ताईच्या चिन्हाडांत आहोंत इतक्यांत आपले पतिराज घरीं आले, तर आपल्यावर काय प्रसंग ओढवेल आणि काय नाहीं असें त्यांस वाटत होतें. तो गृहस्थ दारांतून दूर झाला तेव्हां त्यांस मोठें संकट दूर झाल्याप्रमाणें वाटून त्या बाहेर पडल्या. कर्मधर्मसंयोगानें त्यांना जें भय वाटत होतें, तें अद्यापि घरीं आलें नव्हतें. पतिराज घरीं आलेले नाहींत हें पाहून तिला फारच समाधान झालें व ती पुनः मथुराताईच्या घरांत जाऊन तिला झालेली हकीकत सांगावी या हेतूनें तिकडे गेली, तों बबी मथुराताईच्या गळ्याला मिठी मारून ह्मणाली: " ताई ताई, तूं शाळा सुटल्याबरोबर येईन ह्मणालीस, पण आली नाहींस. ताई माझा तुला त्रास होतो काय ? ह्मणून का तूं लवकर आली नाहींस ? पण ताई, मी आपल्याला काय होतं तें तुला नको सांगूं, तर कोणाला सांगूं ? मला असं वाटतं, कीं, तूं माझ्याजवळ बसून राहिलीस तर मला लौकर बरं वाटेल. तूं नव्हतीस तर मला कसंसंच झालं. "

बबी डॉक्टर जाईपर्यंत—नव्हे तिची ताई येईपर्यंत—अगदीं निश्चेष्ट पडली होती. कांहीं बोलली नाहीं. कांहीं हालचालसुद्धां तिनें केली नाहीं. परंतु तिची ताई येतांच तिला भरतें आल्याप्रमाणें झालें आणि ती वर सांगितल्याप्रमाणें भडभड बोलूं लागली. तिच्या ताईनें तिचें समाधान केलें. आपण लवकर न येण्याचें कारण तिनें तिला सांगितलें. इतक्यांत बगुताईनीं तिची अवस्था काय झाली होती तीहि तिला सांगितली आणि थोडा वेळ त्या बहिणीचा तो प्रेमप्रसंग पाहून त्या आपल्या चिन्हाडांत आल्या.

बगुताईनीं पाहिला तो प्रेमप्रसंग होता. तो पाहून व त्यापूर्वीं त्या मुलीसाठीं जें काय त्यांनीं केलं तें सर्व आठवून त्या फार सुखांत होत्या. त्यांचें मन उच्च प्रकारचा अनुभव घेत होतें. परंतु घरांत पाऊल घातल्यावर त्यांस नेहमींच्या परिपाठांतला ' अ '—पूर्व प्रेमप्रसंग आणि ' अ '—पूर्व समाधान, हीं अनुभवावीं लागलीं. त्यांचे पतिराज येऊन त्यांचीच वाट पहात बसले होते. बगुताईनीं पाऊल आंत टेवितांच दिगंबरपंत एकदम त्यांच्या अंगावर ओरडून ह्मणतात, " कुठं गेली होतीस ? " बगुताई कांहींच बोलल्या नाहींत. त्या आपल्या स्वयंपाकघरांत गेल्या.

त्यांच्या उत्तर न देण्यामुळें तर दिगंबरपंत सुनके फारच संतापले. त्यांनीं अजून

आपला जामानिमा उतरला नव्हता. तेही आपल्या कुटुंबाच्या मागोमाग स्वयंपाक-घरांत गेले आणि संतापून ओरडतात: "तुला काय वाटलं कीं, तुझ्या मागें कोणी कुत्रा भोंकत सुटला आहे, म्हणून तूं इतकी धांवत आलीस आंत होय ? मीं काय विचारलं ? बोल, काय तुला काय विचारलं, तें सांग." बगुताई कांहीं बोलेनात. चुलीवर आधण होतें, त्यांत त्यांनीं तांदूळ मात्र वेरले आणि चुलींतलीं लांकडें त्या नीट सारूं लागल्या. उन्हांत ठेविलेल्या थर्मामीटरमधला पारा जसा झटकन् एकदम वर चढतो, तसा दिगंबरपंतांचा संताप झटकन् वर चढला, आणि ते एकदम कुटुंबाच्या अंगावर धांवून जाऊन म्हणाले, " बोल, त्या वेसवेच्या घरांत कां गेली होतीस ! "

बगुताईच्यानें तें ऐकवेना. त्या एकदम म्हणाल्या, " हें काय बोलणं हें ! दुसऱ्याला असं बोलणं...... "

" मला वाटेल तसं मी बोलेन. तूं कां त्या घरांत पाऊल घातलंस तें बोल आधीं. मीं तुला सांगितलं होतं, कीं ' त्या भ्रष्टाकाराच्या घरांत पाऊल घालायचं नाहीं म्हणून.' बोल तूं कां गेलीस ? कां गेलीस ? बोल. "

" त्या बबीचं थोडं जास्त होतंसं वाटलं म्हणून...... "

" जास्तनू कमती झालं नाहीं. ती मेली, तरी तुलान् मला काय सुतक धरायला लागणार आहे ? अशीं भ्रष्टाकाराचीं कारटीं मेलीं कायन् जगलीं काय सारखींच. अन् तूं जाऊन काय केलंस तिथें बोल. मी तसं ऐकायचा नाहीं. मला सगळं कांहीं कळलं आहे. पण तूं बोल, मला तुझ्या तोंडून काय तें खरं कळूं दे. मग सांगतों काय तें."

बगुताई कांहीं बोलल्या नाहींत. त्यामुळें दिगंबरपंतास अधिकच चेव आला आणि त्यांनीं तिच्या अंगावर धांवून जाऊन व तिच्या खांद्यास हिसडा मारून म्हटलें: "बोल, मला तूं किती खरं सांगतेस तें पाहिजे आहे. मला सारं कळलं आहे. आतां मला......बोल बोल, नाहीं तर आज तुझी आली आहे !"

बगुताईस हा अनुभव अपूर्व नव्हता. खरें सांगितलें तरी काय होणार तेंही त्यांना माहीत होतें, तथापि लपविण्यांत तात्पर्य नाहीं हें जाणून त्यांनीं त्यांस म्हटलें:"कांहीं नाहीं. त्या पोरीला वाताचा झटका झाला होता. अगदीं दांतखिळी बसून हातांपायांचीं लांकडं झालीं होतीं, मनोहराच्या मनांत भलतंच येऊन तो ओरडूं लागला. तें ऐकून मी गेलें. ताई नव्हत्या; तेव्हां आपली मात्रान् अंजन घेऊन जाऊन तिच्या डोळ्यांत अंजन घातलं, आणखी तोंडांत मात्रा घातली तेव्हां तिचा वात साफ उतरून ती इकडे तिकडे पाहूं लागली...... "

बबीचा वाताचा झटका साफ उतरल्याची गोष्ट ऐकतांक्षणींच दिगंबरपंतास वाताचा झटका चढला आणि एकदम बगुताईच्या एक थोबाडांत भडकावून व लाथ मारून ते म्हणाले, " तुला दिखील उन्माद-वाताचा झटका झाला आहे तो उतरविण्यासाठीं हें अंजन घालून ही मात्रा दिली पाहिजे. ज्यांचं तोंड सकाळीं दिसलं तर मला अपशकुन वाटतो, संताप येतो, त्यांच्या घरांत जाऊन तूं त्यांना माझ्या घरच्या मात्रान् अंजनं देतेस ? आणखी माझ्या घरांतलं धान्यधुन्य दिखील देत असशील. मला आज हें कळलं, कीं मी जरी इतका धर्मानं वागतों, त्या धर्मभ्रष्टांची सावली-सुद्धां पडूं नये म्हणून झटतों, तरी तूं आपली

आंतून सगळा भ्रष्टाकार करतेसच, याला आतां काय ह्मणावं ? उद्यांपासून रात्रीं आणखी दिवसां मी इथें नसेन तेव्हां तुला कोंडूनच ठेवणार अन् आज आतां तुला जेवण नाहीं. माझं मी आपलं पाहून घेईन." असें ह्मणून त्या आततायी मनुष्यानें चुलींत पाणी ओतिलें.

बगुताईला फार लागलें होतें. तरी पण लागण्यापेक्षां तिला संताप फार आला होता. बिचारी काय करणार ? हा मार खाण्याचा प्रसंग तिला कांहीं नवीन नव्हता. मात्र आजचा हा मार दुसऱ्यावर उपकार केल्याबद्दलचा होता. दिगंबरपंत त्या अनाथ निराश्रित कुटुंबाचा विनाकारण द्वेष करीत असे तें तिला अगदीं आवडत नसे. परंतु त्याच्यापुढें तिचें काय चालतें ? तिच्या मनांत आलें तरी तिनें त्या अनाथास यामुळें प्रत्यक्ष साहाय्य कधीं केलें नाहीं. जें केलें तें आजच; आणि त्याबद्दल हा प्रकार झाला.

दिगंबरपंतांचें व मथुराताईच्या बापाचें अशीं दोनच बिऱ्हाडें त्या घरांत होतीं. मोठें बिऱ्हाड दिगंबरपंतांचें. प्लेगामुळें त्यानें आपलीं मुलेंमाणसें गांवीं पाठवून दिलीं होतीं. तो स्वतः मात्र कांहीं कारणांनीं येथेंच राहिला. अर्थातच त्याच्या बायकोस आपल्या मुलांना सोडून येथेंच रहावें लागलें. प्लेगाचा अंमल आतां बहुतेक नाहींसा झाला होता. शहर पुनः भरलें होतें. परंतु दिगंबरपंताची लहर अजून आपलीं मुलेंमाणसें आणण्याकडे लागली नव्हती. बायको ' त्यांस आणा ' ह्मणे यामुळें तर त्यांना आणावयाचें नाहीं असा त्यांचा आग्रह अधिक झाला.

मथुराताईचा बाप फार दरिद्री. त्याला बिचाऱ्याला आपलीं मुलेंबाळें कोठें घेऊन जाणें कोठलें शक्य ? यामुळें तो तेथेंच राहिला आणि मथुराताई व तिचा नवरा हींही दरिद्रीच, यामुळें त्यांनाही गांवांतच रहावें लागलें. त्या सालीं प्लेगास मथुराताईचा नवरा पहिल्याप्रथम बळी पडला. तिच्या बापानें अर्थात् तिला आपल्या घरीं आणलें. दिगंबरपंतानें प्रथम आपल्या घरांत प्लेग आणून घातल्याबद्दल हांकाटी केली. नंतर दहावे दिवशीं तिचें केशवपन करावें ह्मणून तिच्या बापाच्या मागें हुटहूट सुरू केली. तो बिचारा आपल्या दुःखांत. त्यानें यांच्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. हें काय तें त्यांच्यावरल्या रागाचें पहिलें कारण; पुढें त्याचा भाऊ वारला तेव्हां त्याच्या बायकोवर सोंवळी करण्याबद्दलची हुटहूट सुरू झाली. परंतु त्या भावाची बायको आपल्या माहेरीं गेली तरी यांची मथुराताईबद्दल हुटहूट सुरू होतीच. पुढें मथुराताईचा बाप स्वतः लागला आणि वारला. त्या मृत्यूच्या दिवशीं त्यानें मथुराताईस व तिच्या आईस असा निरोप पाठविला कीं, तुमच्या सोंवळें न होण्यामुळें जें पाप होतें आहे त्यानें हीं संकटें तुमच्यावर येताहेत आणि तुमची सगळी पुरुषमंडळी संपलीं तेव्हां या घरांत आतां मजवर गदा येईल. करितां तुह्मी तेवढें करून टाका. परंतु त्यांनीं याच्या निरोपाकडे लक्ष्यच दिलें नाहीं. स्वतः त्यांच्या घरांत शिरून त्यांस त्यानें तोंडावर असें सांगितलें कीं, तुह्मीं हा अनाचार जर ताबडतोब बंद केला नाहीं तर मी तुह्मांला घरांतून घालवून देईन.' तरी त्यांनीं याच्या म्हणण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. दर अवज्ञेगणिक यांच्या संतापाच्या लहरी चढत चढत जाऊन द्वेष अतिशय वाढला.

पुढें ती आई वारली तेव्हांही या निर्दयानें पुनः मथुराताईला असाच निरोप पाठविला कीं ' जोंपर्यंत तूं सोंवळी न होतां घरांत रहाशील तों तों अशींच तुझीं सगळीं लहानमोठीं माणसं पटापटा माशांसारखीं मरणार. तर तूं माझं ऐक. सोंवळी होऊन माझ्या घरीं स्वयंपाकाला रहा आणि पोरांना मधुकरी मागायला लाव. '

---

# प्रकरण ६ वें.

## दिगंबरचरित.



मथुराताईंच्यासंबंधांत दिगंबरपंतांचा वर सांगितलेला उपद्व्याप पाहून वाचकांस—ऱ्याच वाचकांस असें वाटलें असेल, कीं दिगंबरपंत कोणी तरी फार वृद्ध—अगदीं जरठ असे गृहस्थ होते, व त्यांची जुन्या गोष्टींवरील श्रद्धा फारच विलक्षण दृढ होती. दिगंबरपंतांविषयीं असा भ्रम ज्या वाचकांस झाला असेल, त्यांनीं तो अगदीं तांतडीनें काढून टाकावा. कां कीं तो निव्वळ भ्रम होय. दिगंबरपंतांची पसतिशी उलटली होती, आणि त्यांत आणखी ते अगदीं तरुणाप्रमाणें दिसत असत. त्यांना तीस वर्षें झालीं होतीं असें सुद्धां कोणास वाटणें शक्य नव्हतें. त्यांची अंगकाठी अगदीं बारीक. अंगांतली धडपड व वाचाळतेची तडफड हीं फार जबरदस्त. यामुळें ते सरासरी तीस वर्षांचे असावेत, असें पहाणारास वाटे. आणि तेही आपलें वय कधीं कोणास झटपट सांगत नसत. विचारणारा विचारीत असतां जसा प्रसंग असेल त्या मानानें त्यांचें वय कमी अधिक होत असे. चाळिशी उलटून गेलेल्या लोकांत बसून भाषण चाललें असलें व वय अधिक असून शरीराची सर्वांगीण दृढता कायम रहाणें सुदैवाचें आहे, असें कोणी म्हटलें तर दिगंबरपंत म्हणावयाचे, ' माझें वय एकूणपन्नास वर्षांचें. परंतु आपण तारुण्यांत जी मेहनत केली व कुस्त्या वगैरे मारल्या त्याचीं फळें आपलें शरीर, आरोग्य व बलदार्ढ्य हीं होत.' बरें, तरुण पंचविशी अंमलांत असलेल्या लोकांत बसले असतां गोष्टी निघाल्या तर हे ' अरे, मी तुमच्यांतलाच आहें. एखाद दुसरं वर्ष कमी अधिक' असेंही ह्मणण्यास तयार ! केव्हां प्रसंगविशेषीं ते तरुणांत वृद्धत्वाची घमेंड मारीत, केव्हां वृद्धांत तरुणपणाची बढाई झोंकीत. सारांश, त्यांचें भाषण बहुतांशीं वस्तुस्थिति सोडून देऊन प्रसंगोचितपणाकडे लक्ष्य देऊन चाले.

दिगंबरपंतांच्या वडिलांनीं चार पैसे कमावून ब्ऱ्याच जमिनी व दोन चार घरें घेतलीं होतीं. शिवाय थोडाबहुत द्रव्य व सुवर्ण यांचा संचयही केला होता. इतक्या बेताचा कीं, दिगंबरपंतांनीं साधारण देखरेख केली ह्मणजे त्यांस स्वतः एक कप-

र्दिकही न मिळवितां घरीं बसून चारचौघां सुखवस्तु लोकांप्रमाणें संसार चालवितां यावा. त्यांच्या वडिलांची फार इच्छा होती, कीं दिगंबरपंतांनीं इंग्रजीचा चांगला अभ्यास करून बी. ए. एल एल. बी. व्हावें. निदान वकील व्हावें. याकरितां त्यांनीं यांना शाळेव्यतिरिक्त मास्तर वगैरे ठेवून शिकविण्याची व्यवस्था केली. परंतु दिगंबरपंतांस त्या शिकण्याचें महत्व वाटेनासें होऊन ते सरासरी म्याट्रिक्युलेशनपर्यंत कसे तरी ढकलत ढकलत आले; आणि त्या परीक्षेच्या दोन वाऱ्या करून त्यांत तुकल्यावर त्यांनीं पुढें शिकण्याचें नाकारलें. तेव्हां " आहे, तो नाहीं शिकला तरी तो नीट राहिला तर त्याच्या पोटापुरतें. चारचौघांत अब्रूनें दिवस काढतां येतील इतकें आहे. " असें ह्मणून त्यांच्या वडिलांनीं त्यांना शिकण्याबद्दल आग्रह धरला नाहीं. धरला तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं हें ते पक्केपणीं जाणत होते. पुढें लवकरच दिगंबरपंतांचें लग्न झालें, बायको मोठी झाली आणि या सुमारास त्यांचे वडील वारून सर्व व्यवस्था दिगंबरपंतांच्या हातांत आली. ते व्यवस्था पाहूं लागले. आणि द्रव्य हातून सुटूं यावयाचें नाहीं असा त्यांचा निर्धार असल्यामुळें त्यांचा संसारही नीट सुरू झाला.

पुढें दिगंबरपंतांस अशी इच्छा झाली कीं, आपण नुसते आपली शेतवाडी पाहून स्वस्थ बसतों, तें कांहीं बरें नाहीं. आपण कांहीं तरी लोकहिताचें कार्य हातीं घेऊन आपली कर्तृत्वशक्ति दाखवावी. कुचेष्टेखेरीज प्रतिष्ठा वाढत नाहीं. तेव्हां आतां कुचेष्टा कोणाची करावी ह्मणजे आपल्याला आपली प्रतिष्ठा वाढवून घेतां येईल ? याचा त्यांनीं विचार करून सुधारक लोकांस त्यांनीं आपल्या बाणांचें लक्ष्य बनविलें. " या सुधारकांनीं सगळा सत्यनाश केला. यांनीं आमच्या धर्माची नासाडी मांडली. यांचा नायनाट केला पाहिजे. " असलीं भाषणें त्यांनीं सुरू करून व साधारणतः विद्वत्तेमुळें व लोकहिताविषयींच्या कळकळीमुळें लोक ज्यांना फार मानीत, त्यांना शिव्या देण्याचा यांनीं सपाटा चालवला. " आपण जरी बी. ए. झालों नाहीं, तरी आपल्याला इंग्रजी वाचनाचा नाद असल्यामुळें आपण मिल, स्पेन्सर, जॉन्सन, शेक्सपीअर वगैरे वाचले असून आपल्या प्राचीन तत्ववेत्त्यांच्या व कवींच्यापेक्षां ते किती तरी कमी दर्ज्याचे आहेत असें आपलें ठाम मत झालें. त्याचप्रमाणें आपण इंग्रजी व संस्कृत दोनही भाषांतील धर्मग्रंथांचें परिशीलन केलें आहे. तेव्हां आपल्यापुढें बोलण्याची कोणाचीच प्राज्ञा नाहीं " असें ते फार जोरानें लोकांस सांगत. आणि 'जें काय केलें पाहिजे तें जुन्या धर्माचें, जुन्या भाषेचें, जुन्या चालीरीतीचें पूर्ण संरक्षण केलें पाहिजे ' असें ते ज्यास त्यास अट्टाहासानें प्रतिपादीत. जुन्या भटाभिक्षुकांत तर स्वतःच्या इंग्रजी ज्ञानाविषयीं त्यांची इतकी घमेंड चाले कीं, त्यांचे श्रोते अंगदीं थक्क होऊन जात. त्यांचीं धर्ममतें–( त्यांचें धर्माचरण नव्हे हो! ( याप्रमाणें जुन्याच्या अभिमानानें तुडुंब ओथंबलेलीं होतीं. आणि या आपल्या मतांचें उद्घोषण ते रोज रात्रीं मोठ्या अट्टाहासानें करीत असत. त्यांचे घराचे समोरच एक पिंपळाचें फार मोठें झाड होतें. या झाडाखालीं एक मारुती होता. त्या मारुतीला यापूर्वी कधीं कोणीं महत्व दिलें नव्हतें; परंतु आपल्या पेठेंतला हा मारुती आहे, त्याचें महत्व आपण राखलें पाहिजे ' असें ह्मणून त्यांनीं लोकांपासून

वर्गण्या गोळा करून त्या मारुतीचें सरासरी चार पांच चौरस फुटांचें देऊळ बांधलें. ज्यांनीं वर्गण्या दिल्या, त्यांची आपसांतली तक्रार अशी होती, कीं दिगंबरपंतांनीं वर्गणी मुळींच दिली नाहीं. परंतु दिगंबरपंत ह्मणत, 'सगळा खर्च आपल्यावर पडला. कोणीं कांहीं विशेष दिलें नाहीं.' या मारुतीच्या देवळाच्या पुढें त्यांनीं जागा साफ करवून तेथें रोज रात्रीं आपली श्रोतेमंडळी जमवावयाचा आरंभ केला. श्रोतेमंडळींत अग्रगण्य स्थान कांहीं गांवगुंडांना होतें. कांहीं सरकारी ऑफिसांतले कारकून, दोन तीन भिक्षुक, बरीचशीं चटोर पोरें हा तेथला साधारण समाज; आणि शनिवारीं रात्रीं अरुाच थोडा मोठा समाज जमे. वक्ते अर्थातच दिगंबरपंत. ते जुन्या चालीरीतींचा नाश व सरकारचा जुलूम याबद्दल वक्तृत्वविस्तार करीत. त्यांचा आवाज खणखणीत व त्यांच्या शिव्या शेलक्या यामुळें ऐकणारांस गंमत वाटे. स्वधर्माकरितां कसकसे प्रयत्न झाले पाहिजेत आणि किती बळी पडले पाहिजेत, याबद्दल भाषण निघालें ह्मणजे त्यांच्या वक्तृत्वाला जो भयंकर पूर येई तो कांहीं विचारूंच नये. वर सांगितलेल्या एवढ्याच बाबतींत त्यांचें भाषण होत असे, असें नाहीं. गांवांतल्या मोठ्या लोकांच्या निंदा, गरीबगुरीब मथुराताईसारख्या बायाबापड्यांच्या कुटाळक्या व खोट्या नालस्त्या करण्यांत दिगंबरपंतांचा अगदीं हातखंडा! त्यांची प्रेमाची मंडळी तेवढीच असली, ह्मणजे मग या असल्या कुटाळक्या—व्यक्तींच्या नालस्त्या—फार चालावयाच्या आणि ज्यांच्या नालस्त्या त्यांच्याकडून होत, त्यांचें नुकसान जिकडून होईल तिकडून करण्यासाठीं त्यांची धडपड चाललेली असावयाची.

मथुराताईच्याच बाबतींत त्यांनीं किती प्रकारांनीं कमाल केली हें पहा. मथुराताईच्या बापानें त्यांचें ऐकलें नाहीं, तेव्हां त्याच्या यजमानांकडे जाऊन बोलून त्यांचें अन्न काढण्याची खटपट तर केली. परंतु ती साधली नाहीं, तेव्हां त्या गृहस्थाबद्दल ते भलतें भलतेंच बोलूं लागला. पुढें तो वारल्यावर घराच्या मालकाकडे अशी खटपट चालविली कीं त्यानें मथुराताईस व तिच्या आईस बिऱ्हाड सोडण्यास लावावें. तसें न झाल्यास आपण जागा सोडून जातों ह्मणून धाकही घातला. परंतु मालक दयाशीलबुद्धीचा असल्यामुळें त्यानें त्यांस 'आपल्याला वाटेल तर जा, परंतु मी त्या गरिबांना अशा संकटसमयीं कांहीं एक अडचणींत घालणार नाहीं', असें उत्तर दिलें. तेव्हां पंतांना अतोनात संताप येऊन त्यांनीं बिऱ्हाड सोडण्याचा आव घातला; आणि मथुराताईबद्दल अद्वातद्वा बोलूं लागून तिचा विलक्षण द्वेष आरंभला. तिला असें झालें कीं, त्या आळींतून बिऱ्हाड काढून जावें कोठें तरी. दिगंबरपंताच्या विषारी भाषणांच्या योगानें आळींतल्या सर्व लोकांचें मन तिजविषयीं फार कलुषित झालें होतें. अर्थात् चटोर पोरें व दिगंबरपंताचे कुटाळगण तिची अप्रत्यक्ष रीतीनें विटंबना करीत. परंतु मथुराताई अतिशय धीराची व निश्चयाची स्त्री असल्यामुळें तिनें कधीं यांच्या बोलण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. यानें आपल्याकडून तिला अन्य प्रकारें जितका त्रास द्यावयाचा तितका देण्यांत कधीं कसूर केली नाहीं. घरांतल्या नळीवर पाणी भरण्यापासून तिला त्रास होऊं लागला. तिनें घरांतल्या नळीवर पाण्यास जाण्याचें टाकलें. तिच्या घरा-

 थोड्या अंतरावर म्युनिसिपालिटीची

सार्वजनिक तोटी होती, तेथें ती जाऊन आपल्याला लागणारें पाणी आणूं लागली.

एके दिवशीं तेथें एका आपल्या धटिंगणाला पाठवून त्याचेकडून तिची नळाखालीं लाविलेली बादली त्यानें फेंकून देवविली आणि तिचीं लुगडीं रस्त्यांत उडविलीं. त्याच्या असें करण्यास कारण असें लाविलें कीं, अशा तऱ्हेनें रहाणाऱ्या बायका ब्राह्मण धरतां येणार नाहींत, तर त्यांनीं ब्राह्मणांच्या नळीवर पाऊल घालतां कामा नये. हें त्यांचें कृत्य पाहून रस्त्यानें जाणाऱ्या एका गृहस्थास फार संताप आला व त्यानें त्या धटिंगणास निषेधिलें. त्यावरून फारच चिडून त्या धटिंगणानें त्या गृहस्थास शिव्या देऊन 'असे तुमच्यासारखे लोक असल्या... कैवार घेतात ह्मणून सगळा भ्रष्टाकार झाला आहे,' असें व्याख्यान देण्यास सुरुवात केली. त्या गृहस्थाबरोबर त्याचा नौकर एक भय्या होता. आपल्या यजमानास हा धटिंगण शिव्या देतो आहे असें पहातांच भय्यानें धटिंगणरावांस धरून रस्त्यावर हापटलें. हिरवट पुरभय्या तो. तो काय ऐकतो! त्यानें आपल्या मालकाचें सुद्धां ऐकलें नाहीं. धटिंगणराव नुसते "हूं हूं हूं" करून पोलिसाच्या गोष्टी सांगूं लागले. भय्या कुंबलीतच होता. रस्त्यावर ही गर्दी जमली! दिगंबरपंत प्रथम दुरून मजा पहात होते; परंतु हा प्रकार पहातांच आपल्या घरांत जाऊन कांहीं वेळानें दुसऱ्या बाजूनें बाहेर चालते झाले. रात्रीं आपल्या सभास्थानांत मात्र त्यांनीं त्या मार खाल्लेल्या धटिंगणाचें समाधान या शब्दांनीं केलें: " अरे बाबा, स्वधर्मरक्षणासाठीं असाच मार खाल्ला पाहिजे, नव्हे रणं पडलीं पाहिजेत. प्राचीनकाळीं या धर्मरक्षणासाठीं हजारों रजपूत वीर पडले आणि शिवाजीमहाराजांच्या वेळीं मराठे पडले. आज तुझ्यासारख्यांनीं पडलं पाहिजे." मंडळीपैकीं कित्येकांनीं त्या पुरभय्यावर फिर्याद करण्याची गोष्ट काढली व वर्गणी करून फिर्यादीचा खर्च भागवावा. असें काढलें असतां "फिर्याद करणं हें भागुबाईचं लक्षण आहे; आणि त्यांतून हिंदूनं हिंदूवर फिर्याद करणं हें तर अगदींच नादानपणाचं काम आहे" असें दिगंबरपंतांनीं प्रतिपादिलें. त्यांच्या मंडळींतही चाणाक्ष लोक कांहीं होतेच, त्यांनीं ताडलें व आपापसांत ते कुजबुजलेही कीं, या गुळामाला स्वतः दमडी द्यायला नको. याकरितां हा फिर्यादीच्या भानगडींत पडूं नये असें प्रतिपादितो आहे. शिवाय एकानें असेंही ताडलें कीं, फिर्यादींत कदाचित् मथुराताईस त्रास देण्याच्यासंबंधांत मूळ चिथाविणारा कोण हें बाहेर पडून भलतेंच कांहीं होईल याची त्यांस भीति वाटते आहे. शेवटीं फिर्यादअर्याद न करतां खाल्लेला मार केवळ स्वधर्माकरितांच आपल्याला बसला, अशा विचारानें संतुष्ट राहून चार दिवस हळदबोळाचा उपयोग करून नीट होण्यासाठीं त्या धटिंगणरावांस घरांत पडून रहावें लागलें. दिगंबरपंत त्यास भेटून "भले पठ्याजी" असें ह्मणून समाधान देण्याचा यत्न करीतच होता.

मथुरीताईवर आलेली संकटपरंपरा ताजी ताजी असतांनाच दिगंबरपंतांचे हे सर्व प्रयत्न झाले. ती बिचारी दुसरी जागा कोठें तरी पहातच होती. परंतु तिला कोठें जागा मिळूं नये अशाबद्दलही त्यांच्या हातून यत्न झाले नाहींत असें नाहीं. आपल्या घरांत तिनें तर काय, परंतु तिच्या घरांतून मांजर आलें तर त्या मांजराला सुद्धां दिगंबरपंतानें घरांतून हांकून

लावण्याचा अट्टाहास करावा! आपल्या बायकोस तर त्यानें सक्त ताकीद देऊन सांगितलेंच होतें, कीं त्या भ्रष्ट झालेल्या घरांत पाऊल घालतां कामा नये. त्याप्रमाणें होतां होईतों ती वागे, परंतु मथुराताईवर आलेल्या दुर्धर प्रसंगामुळें त्या माउलीच्या मनांत स्वाभाविकच कळवळा उत्पन्न झाला. त्यांत आणखी तीं लहान लहान मुलें, आणि त्यांत एक मुलगी आजारी! तेव्हां दिगंबरपंत घरीं नसले व लवकर येण्याचा संभव नसला ह्मणजे तिनें त्यांच्याकडे जावें आणि त्यांच्या उपयोगी पडावें. त्यांत ते दिवशीं तर तिनें त्यांस फारच महत्वाची मदत केली. न जाणों ती वेळेवर जाऊन जर त्या पोरीला मात्रा न देती, तर ती गरीब पोरगी हातीं लागतीना! बगुताई स्वतः लेंकुरवाळ्या होत्या. त्यांसही दोन मुली आणि एक मुलगा होता. तेव्हां त्यांच्या स्वाभाविक दयाळूपणास मातेच्या अनुभवाचेंही पाठबळ होतें. यामुळें नवऱ्याच्या कठोर आज्ञेचीही पर्वा न करतां त्या गरीब कुटुंबाचा यथाशक्ति समाचार घेण्याचें काम गुप्तपणें त्या करीत असत. दिगंबरपंतांस तसा संशय असे. परंतु प्रत्यक्ष पुरावा कधींच मिळाला नव्हता. कारण ते गांवगुंड असल्यामुळें घरीं फारच थोडा वेळ असत. सगळा दिवस तर कोठें तरी बाहेर लष्करच्या भाकरी भाजण्यांत मग्न असतच. परंतु रात्रीं देखील ते कोठें तरी बाहेर जात. प्लेगाच्या दिवसांत गांवांत निजलें नाहीं म्हणजे झालें, मग प्लेगाचें भय नाहीं असें त्यांचें मत होतें. ह्मणून ते कुटुंबाला प्लेगांत घर सांभाळण्यास टाकून आपण गांवाबाहेर कोठें तरी जात आणि गांव भरल्यानंतर बराचसा रात्रीचा वेळ वर सांगितलेल्या मारुतीच्या पटांगणांत व बाकीचा दुसऱ्या कोठें घालवीत! तेव्हां कुटुंबानें शेजारच्यांची सोबत पाहूं नये हें संभवनीय तरी कसें? परंतु दिगंबरपंतांचा सक्त हुकूम कीं, त्या माणसांची सावली घेतां कामा नये. वर सांगितलेंच आहे कीं, आपली पत्नी त्या शेजारच्या भिकारड्या भ्रष्ट मंडळीकडे जाते अशाबद्दल पुरावा दिगंबरपंतांस मिळाला नव्हता, परंतु तशी त्यांस कधीं कधीं शंका मात्र येई. आज त्यांस पुरावा मिळाला.

वाचकांस आठवतच असेल, कीं डॉक्टर भगवंतरावाबरोबर दुसरे एक गृहस्थ मथुराताईच्या घरांत दुपारीं व रात्रीं दोनही वेळां गेले होते. हे गृहस्थ दिगंबरपंतांचे फार फार—अगदीं जीवश्च कंठश्च स्नेही. हे श्रीमंत असून इनामदार होते आणि आपणास जुन्याचे कैवारी ह्मणवीत. त्यांना आपलें घराणें फार थोर, जुनें, कुलीन अशाबद्दल फारच अभिमान होता व त्यामुळें सर्व जुन्या रीतीभाती, आचारविचार, धर्मकर्म, ह्यांच्या रक्षणाचें काम आपल्याकडे आहे असें वाटत असे. नव्हे, परमेश्वरानें सांप्रत त्या जुन्या रीतीभातींचा, आचारविचारांचा, धर्मकर्मांचा उच्छेद होतो आहे तो थांबवून त्या सर्व प्राचीन संस्थांचा उद्धार करण्याकरितांच आपणास निर्माण केलें आहे असें तें अत्याग्रहानें ज्यास त्यास सांगत व दिगंबरपंतांप्रमाणेंच सर्व उद्योग करीत.

उद्योग काय व कसे हें या कथानकांत वाचकांस पुढें पहावयास सांपडेल. सध्यां सांगावयाचें एवढेंच कीं, डॉक्टरांबरोबर दुसऱ्या वेळेस हे आले, तेव्हां त्यांनीं बगुताईस मथुराताईच्या घरांत पाहिलें व यांनीं डॉक्टरांस बर्वीला शुद्धीवर आणण्यासाठीं काय काय उपाय योजिले तें सांगितलें तें

सर्व ऐकिलें. आपल्या धर्मनिष्ठ मित्राची बायको असल्या धर्मभ्रष्टांच्या घरांत वावरून त्यांस मदत करते याबद्दल त्यांस फार आश्चर्य वाटलें. त्यांनीं त्या वेळीं आपल्या भिवया उडविल्या व तेव्हांच असा निश्चय केला, कीं आपल्या मित्रास–दिगंबरपंतांस–हें कसें काय ह्मणून विचारावयाचें. या गृहस्थांचें नांव कृष्णाजीपंतदादा होय. कृष्णाजीपंतदादांवर आपला वंश व धर्म यांच्या संरक्षणार्थ विवाह करण्याचे दुर्धर प्रसंग फार वेळां आले व आतां त्यांचें चवथें कुटुंबही तसाच आणखी एक दुर्धर प्रसंग आणणार अशी भीति वाटूं लागली होती. त्यांनीं या कुमारीचें पाणिग्रहण अकरावे वर्षाचे अखेरीस करून तेरावे वर्षाच्या मध्यावर तिला आपल्या वंशाच्या आधारस्तंभाचें मातृत्व दिलें; परंतु तो आधारस्तंभ इहलोकांत आल्यापासून तिसरेच दिवशीं वडिलांच्या आशेचा भंग करून गेला व त्याची अल्पवयस्क जननीही त्याच्या मागोमाग जाते कीं काय असें भय वाटण्याजोगी तिच्या प्रकृतीची स्थिति झाली. प्रथम चार दिवस वैद्य व जुने वैद्यक झाले, परंतु नंतर डॉक्टर—डॉक्टरी उपाय केल्याखेरीज उपाय नाहीं असें पुष्कळांनीं ह्मटल्यावरून कृष्णाजीपंतदादांनीं डॉक्टर आणण्याचें ठरविलें. डॉक्टर भगवंतरावांसारखे धर्मभ्रष्ट खरे, परंतु त्यांची विद्या व कुशलता यांच्याकडे आपणास पहावयाचें असा बुद्धिवाद करून कृष्णाजीपंतदादांनीं डॉक्टर भगवंतरावांस आणून आपल्या कुटुंबास औषध सुरू केलें. जुन्याचा अभिमान सोडल्याबद्दल दिगंबरपंतांनीं अर्थातच त्यांस उपरोधिक भाषणांनीं छेदिलें, इतकेंच नव्हे, तर चार झाल्या तशी पांचवी होईल. तीन गेल्या तशी चवथी जाईल, पण तुमच्यासारख्या जुन्या घराण्यांनीं जर जुन्याचा अभिमान सोडला, तर कसें होईल ? अशीही बोलणीं तो आचरट बोलला. परंतु कृष्णाजीपंतदादाही तसेच खमंग असल्यामुळें त्यांनीं आपल्या मित्राची उलट चेष्टा करून ह्मटलें कीं, " अरे दिगंबरपंत, या डॉक्टरांत कांहीं अर्थ नाहीं हें प्रत्यक्ष सिद्ध करून घेण्याला आह्मीं स्वतः घरांत अनुभव घेऊन पाहिले असं सांगायला आपल्याजवळ पुरावा पाहिजेना ? शेवटीं येणार तें आपल्या वैद्यकाघर ! त्याखेरीज कांहीं गत्यंतर नाहीं. पण हेंही उपाय करून पाहिले. तूं आमच्या घरच्या कागदांत आणखी बखरींत स्पष्ट असं लिहिलेलं वाचलंच असशील, कीं आमच्या पणजोबांनीं सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत गोऱ्या डॉक्टरांचीं औषधं घेतलीं होतीं, तेव्हां पाहूं तर खरं खरं. अन् शिवाय जितकं आपण बोलतों इतकं सगळं हातून होतं आहे थोडंच. हें कसं नाहीं तुझ्या लक्ष्यांत येत ? "

दिगंबरपंतांची अशी समजूत घालून स्वारींनीं डॉक्टर भगवंतरावांस घरीं नेऊन त्यांची फी देऊन औषध सुरू केलें. या त्यांच्या करण्यावरून दिगंबरपंत चार दिवस रागावले. त्यांच्या घरीं समाचाराला सुद्धां गेले नाहींत. परंतु चवथे दिवशीं गेले आणि डॉक्टरांचा काय प्रकाश पडला ह्मणून विचारूं लागले. हे जाण्याच्या पूर्वीं दहाच मिनिटें डॉक्टर व कृष्णाजीपंतदादा मथुराताईच्या घरांतून जाऊन आले होते आणि डॉक्टर कृष्णाजीपंतदादांच्या कुटुंबाची प्रकृति पहाण्यांत गढले होते. इतक्यांत दिगंबरपंत तेथें गेला आणि डॉ. भगवंतराव त्या बाईस तपाशीत आहेत हें ठाऊक होतें, तरी जणूं काय माहीत नाहीं ह्मणूनच मोठ्यान

ह्मणतो, " डॉक्टरांच्या दारूबाजी औषधांचा काय प्रकाश पडला ! दादा, तुह्मीं या फंदांत पडावं हें चांगलं नाहीं बोआ. कांहीं ह्मणा. अन् त्यांत डॉक्टर कोण ! तर......... "

परंतु तितक्यांत कृष्णाजीपंतदादांनीं त्यांना " शुत् " करून नाकावर बोट ठेवून दाबलें.

त्याबरोबर दिगंबरपंत साश्चर्य मुद्रा करून ह्मणतात, " कोण ! डॉक्टर भगवंतराव, हें पहा, मी तुम्हांला व्यक्तीला कांहीं कोणत्याही तऱ्हेनं लागावं म्हणून बोललों नाहीं. मी बोललों तो केवळ जुन्या वैद्यकापुढें इंग्रजी वैद्यक कुचकामाचं आहे, आणखी इंग्रजी औषधं सगळीं धर्मबाह्य आहेत अशी माझी पक्की खात्री आहे म्हणून बोललों. तुम्हांला माहीतच आहे, कीं मी उगीच अज्ञान्यांसारखं कांहीं तरी कधींच बोलत नाहीं. मला इंग्रजी चांगलं येत असल्यामुळें दोनही पद्धतींची, दोनही पंथांची पूर्ण माहिती मिळवून मग बोलतों. मीं तुमची इंग्रजी फजि-लॉलजी वाचली आहे. तसंच तुमचा मढीआमडका पाहिला आहे. तुमचं कोणतं औषध स्पिरिटवांचून बनतं सांगा. ओ नो. आह्मांला आमचं वैद्यक पाहिजे. हें पहा स्पष्ट बोलतों याचं कांहीं वाटूं देऊं नका. तुमच्या सारख्याला स्पष्टवक्ते भेटत नाहींत हेंच फार वाईट आहे. "

डॉक्टर भगवंतरावांनीं अणुमात्र त्याच्या भाषणाकडे लक्ष्य दिलें नाहीं. त्यांची तपासणी चाललीच होती. इतक्यांत कृष्णाजीपंतदादा दिगंबरपंतांला एकीकडे नेऊन ह्मणतात, " कायहो, अहो, मला आपण गप्पा मारल्यात, कीं मी माझ्या कुटुंबाला त्या भिकाऱ्यांच्या घरांत जाऊं देत नाहीं, आणखी आज तर आपल्या कुटुंबानं त्या आजारी कारटीला आपल्या घरच्या मात्रा देऊन आणखी खायला प्यायला घालून तिचा समाचार घेतलेला मीं पाहिला ! "

" काय ! " दिगंबरपंत चिडलेल्या कुत्र्याच्या वाणाचें तोंड करून म्हणतात, ' काय ? माझी बायको ? माझ्या बायकोबद्दल तुह्मी बोलतां काय ? बिशाद् आहे माझी बायको तिथें पाऊल घालील. मी काय प्रकारचा माणूस आहें, तिला पक्कं माहीत आहे ! "

" असेल, पण मीं आपल्या स्वतःच्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिली, तेव्हां असं वाटलं कीं आपलंच हृदय द्रवलं असून आपणच त्यांना तिकडे पाठविलं असेल ! "

कृष्णाजीपंतदादांचें हें भाषण अत्यंत उपरोधिक होतें, त्यामुळें " पहातों आतां " असें कुरपणानें ह्मणून दिगंबरपंत पिसाळलेल्या कुत्र्यासारखा धांवतच सुटला.

# प्रकरण ७ वें.

## पद्मावतीचे वडील.



पद्मावती मालतीस कांहीं तरी फार विलक्षण गोष्ट सांगणार होती, परंतु तिला तशी सवड मिळाली नाहीं. ती सांगण्याचा उपक्रम करणार तोंच पद्मावतीचे वडील बाहेर गेले होते ते आले, आणि मालती आली आहे असें त्यांस कळल्यावरून ते तिला भेटण्यासाठीं पद्मावतीच्या खोलीशीं आले. ज्याप्रमाणें पद्मावतीवर त्याचप्रमाणें मालतीवरही त्यांचें फार प्रेम असे. त्यांनीं अचानक हांक मारण्याबरोबर अर्थातच पद्मावतीचें व मालतीचें बोलणें तितकेंच राहिलें. मालतीनें झटकन उठून दार उघडलें. पद्मावतीनें आपलें रडें वगैरे दिसूं नये म्हणून यत्न करून चर्या शांत दाखविण्याचा यत्न केला. बापाबद्दल तिला धाक वाटे. आपण झाल्या गोष्टीबद्दल अद्यापि रडतों आहोंत, असें त्यांस दिसलें तर ते आपल्याला रागें भरतील, अशी तिची समजूत होती. यामुळें वर सांगितल्या प्रकारचा प्रयत्न केला आणि ती उठून उभी राहून खालीं पाहूं लागली.

आबासाहेबांनीं आंत पाऊल टाकतां टाकतां मालतीस म्हटलें, "मालती, तूं आपली आनंदाची हकीकत सांगण्याकरितां आली असशील ना? वा! आम्हांलाही फार आनंद झाला. मी दादासाहेबांकडे जाणार आहें आतां केव्हां तरी त्यांचं अभिनंदन करायला. मला आतां तुमचा वसंतराव भेटला होता त्यानं सगळी हकीकत सांगितली. आमच्या जांवईबोआंची हकीकत तुला पद्मेनं सांगितलीच असेल! बरं चला. आपण आपल्याकडून चांगलं तें करीत असावं. नाहीं झालं तर आपला काय दोष! होईल त्यांतच समाधान वाटून घ्यावं. मी पद्मेला सांगतों आहें, कीं तूं अगदीं सुद्धां काळजी करूं नकोस. तिच्या हयातींत तिला खाण्यापिण्याला कमी पडणार नाहीं. एखादी लोकोपयोगी संस्था काढून तिला मदत करण्याचं तिनं मनांत आणलं, तरी अडचण पडणार नाहीं अशी तजवीज तिची लावितों. इंग्लंड वगैरे देशांत अविवाहित राहून लोकहितकार्य करणाऱ्या बायका थोड्या असतात! तशीच ही. लग्न झालंच नाहीं म्हणावं. दुसरं काय आतां? तूं सांग तिला आतां दोन गोष्टी. सकाळपासून अगदीं घोंगट घालून बसली आहे वेड्यासारखी. आणखी आमच्या घरांतली मंडळी काय? गेली आहेत पंढरपुराला! जाऊं द्या. पंढरपूर होऊं द्या. काशीवाराणशी

करा, काय वाटेल तें करा. हिला मात्र मी आतां असं सांगणार आहें, कीं तुला शिकवलं सवरलं आहे, तें वाढव. वाटलं, तर कॉलेजांत जाऊन शिकायला लाग. पण झाल्या गोष्टाचा नुसता खेद करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्या फेअरब्रनसाहेबाला काय वाटलं असेल ! तो केवळ एक धर्मात्मा आहे ! त्यानं त्या दामोदरपंताच्या सीतारामापासून सर्व मुलांस किती प्रकारांनीं इंग्लंडांत मदत केली*! आणि आतां तर ते स्वस्थ बसले आहेत, परंतु इकडून तिकडे जाणाऱ्या प्रत्येक तरुण गृहस्थास आपल्याकडून साहाय्य झालं तर करीत असतात. माझ्यासारख्या त्यांच्या हाताखालीं काम केलेल्या इसमाबद्दल तर त्यांच्या मनांत फार प्रेम, यामुळें त्यांना किती कळकळ वाटायची ! किती आनंद व्हायचा ! पण आमच्या नशिबीं पाहिजेना ? आमचे जांवईबोआ विधुटे ! त्यांनीं हा प्रकार केला ! मला आतां असं झालं आहे कीं फेअरब्रेनसाहेबांला लिहूं तरी काय ? कांहीं ल्याहायला तोंडच नाहीं. ''

इतकें बोलून आबासाहेब थांबले. बिचारी मालती त्यांचें तें लांबलचक बोलणें स्वस्थपणें त्यांच्याकडे पहात ऐकून घेत होती. आपण मध्यें काय बोलावें ? असें तिला झालें. आबासाहेब कांहीं वेळ थांबले. नंतर पुनः म्हणतात, '' हिला सांग चार विचाराच्या गोष्टी. माझ्या मनांत तुला मुद्दाम बोलावून आणून हें सांगायचं होतं. आमच्या घरांतून जर विनाकारण माझ्या पाठीमागें त्रास लागला नसता तर मीं हिला अविवाहित ठेविली असती, आणखी चांगली बी. ए. करून डॉक्टरीण केली असती. सगळ्यांनींच लग्न करून काय करायचं आहे ! पण ह्या घरांतल्या रोजच्या त्रासापुढें वंगलों, आणखी हें असं करून बसलों. तूं चांगल्या नशिबाची बोआ. ठीक, आम्हांला समाधान आहे........ ''

पुनः त्यांचं लांबलचक बोलणें सुरू झालें, आणि पद्मेच्या चर्येवर तर त्रासल्याचीं चिन्हें पूर्णपणें दिसूं लागलीं. तेव्हां कांहीं तरी दुसरेंच बोलून त्यांचें मन दुसरीकडे न्यावें या हेतूनें मालती आबासाहेबांस म्हणते, '' आबा, पद्मताईला चार दिवस आमच्या घरीं रहायला पाठवा. आम्हा सगळीं मुंबईला जाणार आहोंत, तिकडे चार दिवस मजेनं जातील. ''

'' काय मुंबईला ! '' आबासाहेब एकदम म्हणाले, '' आणखी मी एकटा इथें राहूं ! ती येत असली तर जा घेऊन. पण........... ''

'' तिच्या येण्याचं काय आहे ! '' मालती त्यास म्हणाली, '' आपण जा म्हणून सांगितलं तर ती येईल. ''

इतकें बोलून मालतीनें पद्मेस बोलण्याविषयीं खूण केली. परंतु पद्मेनें वर सुद्धां पाहिलें नाहीं.

आबासाहेबांनीं त्या बोलण्यावर कांहींच उत्तर न देतां ह्मटलें: '' तूं इकडे पद्मेकडे आली आहेस आणखी तुझा नवरा इंग्लंडाहून इकडे यायला निघाला आहे हें मला तुमच्या वसंतानं सांगितलं. तो रस्त्यांत मला दिसला तेव्हां सहज मीं विचारलं, तर त्यानं सांगितलं कीं तुम्ही आतां मुंबईला जाणार आहां. उद्यां सकाळीं आतां मी तुमच्या घरीं येईन. आतां जांवईबोआ आले, आतां तुझे भाऊ जाणार का ? काय चमत्कार पहा ! तुमची आणखी आमची सगळ्या बाबतींत अगदीं सारखी स्थिति, परंतु आमचीं कारटीं अशीं

* जग हें असें आहे हें पुस्तक पहा.

निघालीं. एवढी ही पोरगी चांगली आहे, तर...... "

परंतु पद्मेला तें त्यांचें बोलणें बरें वाटलें नाहीं, ह्मणून कीं काय कोण जाणे ती एकदम आपला मुग्धपणा टाकून मध्येंच ह्मणाली: "आबा, आतां काय त्याचं? दुसऱ्याचंन् आपलं मनांत आणून उगीच खेद करीत कशाला बसावं? तुह्मी मला जर जा ह्मणत असाल, तर मी मालती-बरोबर दोन दिवस जातें त्यांच्या घरीं रहायला. आपलं नाहीं धड तर नाहीं, पण आपल्या मैत्रिणीचं चांगलं पाहून त्यांत कां आपण आनंद मानूं नये!"

पद्मावतीचें हें भाषण ऐकून आबासाहेबांस फार फार आश्चर्य वाटलें! आजपर्यंत पद्मावती इतक्या मोठ्यानें आणि अशा प्रकारें कधींच त्यांच्यासमोर बोलली नव्हती! वडील सांगतील त्याप्रमाणें वागावयाचें हा निश्चय तिनें कायम ठेविला होता. एखादी त्यांनीं सांगितलेली गोष्ट तिला आवडली नाहीं, तरी तिनें त्यांच्या मर्जी-खातर ह्मणून करावी. मला ती करावी असें वाटत नाहीं असें सांगूं सुद्धां नये. परंतु आजचा सगळाच प्रकार आबासाहेबांस थोडा निराळा वाटला; आणि त्यामुळें ते अगदीं आश्चर्यस्तब्ध होऊन तिच्याकडे पाहूं लागले. पद्मा तशी वस्ताद होती. तिनें आपले डोळे खालीं जमिनीकडे लाविले. त्यांच्या डोळ्यास डोळा दिलाच नाहीं.

इतक्यांत मालती त्यांना ह्मणते: "आबा, खरंच धाडा तिला चार दिवस. त्याखेरीज झाल्या गोष्टीचा तिला थोडाबहुत तरी विसर पडणार नाहीं. तुह्मी ह्मणालांतना—'ती येत असली, तर तिला घेऊन जा' ह्मणून. पहा, ती तुमच्या समोर कध्धीं बोलायची नाहीं कीं मी अमुक करतें किंवा अमुक करीत नाहीं. आपलं तुह्मी ह्मणाल तसं करायची. पण आज तिच्या मनांत खरोखर माझ्याबरोबर यायचं आहे. आतां येऊं द्या. नाहीं नका ह्मणूं."

मालतीचें तें बोलणें ऐकून आबासाहेब फारच विचारांत पडले. पद्मेवर त्यांचा फार जीव. त्यांच्या थोड्याशा करड्या व शिस्त-खोर स्वभावामुळें, त्यांचें प्रेम कधीं कोणाला दिसून येत नसे. वस्तुतः पहातां ते फार प्रेमळ असत. परंतु त्यांच्या अपत्यांस त्या प्रेमाचा हृदयस्पर्शी अनुभव कधींही आला नसल्या-मुळें त्यांस केवळ करडेपणा व कैदवारपणा मात्र दिसे. अर्थात् त्यांच्याविषयीं त्यांच्या अपत्यांचे मनांत प्रेम उत्पन्न होण्याच्या-ऐवजीं धाक व दहशत हीं मात्र उत्पन्न झालीं. ही स्थिति आबासाहेबांच्या ध्यानांत मुळींच आली नाहीं.आपलीं मुलें आपल्या-ला चळचळा कांपतात. भोंकाड पसरून रडत असलीं तरी आपला आवाज ऐकतांच अगदीं एकदम गप्प होतात. या गोष्टी ऐकून व पाहून ते आपल्या कैदवारपणाचें-शिस्तकदरींचें कौतुक करीत असत. याचा परिणाम असा झाला कीं, यांचे दोघेही मुलगे वाह्यात् निघून घरांतून निघून गेले. एक आपण होऊन निघून गेला व दुसऱ्यास यांनीं घालवून दिलें. अशी स्थिति झाली तरी यांस आपल्या शिस्तीकदरीबद्दल कौतुक व अभिमान हींच वाटत. असलीं पोरटीं घरांत ठेवण्यापेक्षां घालवून दिलेलींच बरीं, असें त्यांनीं ह्मणावें. दुसऱ्या कोणी त्यांस त्यांच्या निष्ठुरपणाबद्दल कांहीं खेद वगैरे प्रदर्शित केल्यास यांनीं त्या गृहस्थास मोडून काढून मी अशा गोष्टींबद्दल गय करणारा माणूस नाहीं, पोरांना क्षणभर घरांत उभें करणार नाहीं, असें आढ्यतेनें ह्मणावें. पोरगीला घरांतून जाणें शक्य नव्हतें, हें

तर खरेंच, परंतु ती त्यांच्या इच्छेप्रमाणें पूर्णपणें वागे यामुळें तिजवर त्यांचें प्रेम असून तिचेबद्दल करडेपणाही फार कमी असे. अर्थात् तिचा नवरा घरांत होता, तोंपर्यंत त्याच्यावरही यांच्या या करडेपणाच्या वागण्याचा व भलत्याच गोष्टींत कैद्वारपणाचा फार वाईट परिणाम झाला होता. परंतु तो पद्मेचा नवरा यामुळें त्याच्या बाबतींत यांची शिस्त अगदीं मुलांच्या इतकीच कडक नव्हती हें उघडच आहे.

पद्मेनें त्याप्रमाणें आपली मालतीच्या घरीं जाण्याबद्दल इच्छा दर्शविली, आणि मालतीचाही आग्रह दिसला, तेव्हां आबासाहेबांस मोठी पंचाईत पडली. आबासाहेबांस बोलण्यासवरण्याला काय तें एकच माणूस पद्मावती. कुटुंब आपल्या सोंवळ्या ओंवळ्यांत आणि देवदेवतार्चनांत असावयाचें. आबासाहेबांस त्या सर्वांचा फार तिटकारा. ते केव्हां कुटुंबाशीं बोललेच तर त्या देवदेवतार्चनाबद्दल वेडेंवांकडें व उपरोधिक बोलावयाचे. त्यांच्या कुटुंबाचें व्रत एक "मौनं सर्वार्थसाधनम्". आपल्याला जसें वागावयाचें त्यांत रतिभरसुद्धां टाळटाळ करावयाची नाहीं, आणि कोणी कांहीं बोललें तरी त्याला उत्तर ह्मणून द्यावयाचें नाहीं. असा एकंदर प्रकार असल्यामुळें आबासाहेबांचें व त्यांचें दोन दोन महिन्यांत भाषणसुद्धां व्हावयाचें नाहीं! अशा स्थितींत पद्मावतीही गेली, तर आपल्याला बोलावयाला कोणीच रहाणार नाहीं हें त्यांच्या मनांत आलें. त्यांचा वाचण्याचा जबरदस्त व्यासंग असल्यामुळें त्यांस कोणी बोलावयाला पाहिजेच् असें नसे. ते प्रार्थनासमाजाचे मेंबर होते. आणि त्यामुळेंच त्यांचें भक्तिपंथी व एकेश्वरी ग्रंथांचें वाचन चालत असे. कोणी असें ह्मणत कीं, ते कांहीं ग्रंथ—आपल्या मतांचा प्रतिपादक असा ग्रंथ—लिहिण्याच्या उद्देशानेंच वाचन करीत आहेत.

तें कसेंही असो, त्यांचीं पुस्तकें त्यांजला होतीं, पण पद्मावती जाऊं ह्मणते आहे हें त्यांस बरें वाटलें नाहीं. तथापि आतां तिला "जाऊं नको" ह्मणणें बरें नाहीं असें मनांत येऊन ते तिला ह्मणाले: "पद्मे, तुझ्या मनांतून जायचं असलं तर जा. बाकी ती मंडळी आपल्या आनंदांत. त्यांचा जांवई येणार, आणखी तुझं हें असं झालं आहे. तेव्हां तुझ्यामुळें त्यांच्या आनंदांत कमीपणा येणार, आणखी त्यांचा आनंद पाहून तुझ्या दुःखांत भर पडणार, हें बरं का ?"

तें ऐकून मालती एकदम त्यांस ह्मणते: "आबा, हें काय तुह्मी असं बोलतां हें ? असं नका बोलूं. आमच्या आनंदांत कमीपणा कसला आणखी काय कसलं ? तुह्मी आपले तिला माझ्याबरोबर पाठवा कसे ! ह्मणजे ती सगळं विसरून जाईल."

**आबासाहेबः**—पुनः आपलंच. मी कांहीं तिला नाहीं ह्मणत नाहीं. तिला बरं वाटणार असलं तर जाऊं दे. अगदीं बेलाशक घेऊन जा.

पडत्या फळाची आज्ञा घेऊन आपलें काय करावयाचें तें करावें असें मनांत आणून पद्मावती एकदम आपली तयारी करूं लागली. आबासाहेब पहात उभे राहिले. पद्मावतीनें टांगा जोडावयास सांगितलें आणि थोड्याच वेळांत ती आपल्या मैत्रिणीबरोबर तिच्या घरीं गेली. आपल्या बापाच्या मनांत नसतांना आपण केवळ पडत्या फळाची आज्ञा ह्मणून अशा कां निघून आलों याचें कारण पद्मावतीनें आपण होऊन आपल्या मैत्रिणीस त्या रात्रीं

सांगितलें तें असें: " आई घरीं आल्यानंतर आबांचं आणि तिचं भाषण होईल, तें माझ्या देखत व्हायला नको ह्मणून. दुसरं कांहीं नाहीं. तिला माझ्या तोंडून सर्व हकीकत कळायला नको. तिला वाचायला येत नाहीं. ह्यामुळें हें पत्र कांहीं तिच्यापुढें टाकून संपायचं नाहीं. तेव्हां आपल्या पश्चात् सगळ्या गोष्टी तिला समजल्यावर मग आपलं तिच्यासमोर जावं तें बरं."

पद्मावतीच्या निघून येण्याचें हें एवढेंच कारण होतें कीं आणखीही कांहीं दुसरीं कारणें होतीं हें समजणें कठिण आहे. त्या वेळच्या तिच्या मनःस्थितीचें पूर्ण पृथक्करण कोण करूं शकणार आहे ? त्याचें हें स्थळही नव्हे व काळही नव्हे.

पद्मावती मालतीकडे आली तेव्हां सर्वांना फार आनंद झाला. कारण तिच्यासंबंधाची खरी स्थिति काय होती हें कोणासच ठाऊक नव्हतें. जें तें तिला ह्मणूं लागलें कीं आतां तूं आमच्याबरोबर मुंबईस चल. तुझा नवरा असाच सर्व परीक्षा वगैरे पास होऊन परत येईल तेव्हांही आह्मी सर्व मंडळी येऊं. त्याचप्रमाणें त्याचें कांहीं पत्र आलें का ? त्यांची प्रकृति कशी काय आहे वगैरे गोष्टी तिला कोणी सहज, कोणी प्रेमानें विचारूं लागलें, त्या प्रश्नांचीं उत्तरें मालतीनेंच सर्वांस दिलीं. पद्मावतीच्या चर्येनें काय कोणास दिसलें असेल तें निराळें, परंतु अन्य कोणत्याही प्रकारें तिच्यासंबंधाचा खरा प्रकार कळून आला नाहीं.

पद्मावती आली त्याच्या दुसरे दिवशीं तिचे वडीलही आदले दिवशीं ठरल्याप्रमाणें दादासाहेबांस भेटण्यास आले. मालतीनें मुद्दाम सांगून ठेविल्यामुळें दादासाहेबांनीं आबासाहेबांस असें सांगितलें कीं, आमचे मनांतून पद्मावतीलाही मुंबईस न्यावयाचें आहे. तेव्हां आतां मुंबईहून आह्मी सर्व मंडळी परत येईपर्यंत पद्मावतीला आह्मी कांहीं परत पाठवीत नाहीं. आबासाहेब थोडे गुटमळले. परंतु दादासाहेबांच्यापुढें त्यांचें कांहीं चालेसें नव्हतें. यामुळें त्यांनीं शेवटीं रुकार दिला व ते हंसत हंसत ह्मणाले, " मग आह्मांलाही कां नाहीं बोलावीत ? आह्मी येऊं."

**दादासाहेबः**– वा ! आपण आलांत, तर काय बहारच होईल. पण असल्या यःकश्चित् गोष्टीसाठीं आपल्याला काय बोलवायचं ! पद्मेची गोष्ट फार निराळी आहे. ती आली ह्मणजे तिच्या मैत्रिणीला तेवढा आनंद, तुमची आमची लहानपणची आठवण करा, ह्मणजे येईल कल्पना पद्मावतीनं येण्यांत मालतीला काय आनंद आहे तो !

आबासाहेब त्यावर कांहीं बोलले नाहींत; इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलून ते निघून गेले.

नियमित दिवशीं मालती व तिची सर्व मंडळी मुंबईस जाण्यास निघाली. पद्मावतीही त्यांच्याबरोबर गेली. ज्या बोटीनें मालतीचा नवरा यावयाचा होता, त्या बोटीस मुंबईस येण्यास तीन दिवसांचा अवकाश होता; परंतु मंडळी थोडी आधींच गेली. तेथें जाऊन सर्व स्थिरस्थावर व्हावें तें बरें असें त्यांस वाटलें.

पद्मावती आतां आपलें दुःख अजीबाद विसरली. निदान तें अद्यापि जागृत आहे, असें तिनें कोणास शब्दांनीं किंवा दृष्टिक्षेपानें सुद्धां दिसूं द्यावयाचें नाहीं, असा निश्चय केलेला होता. यामुळें एकट्या मालतीखेरीज व वसंताखेरीज कोणासुद्धां तिच्या चर्येवर खिन्नता दिसली नाहीं.

वसंतास मात्र सर्व कांहीं ठाऊक होतें. त्यास आबासाहेब स्वतः भेटले, तेव्हांच त्यांनीं सांगितलें होतें. पहिलाच उमाळा, आणि वसंतासारखा आपल्या जांवयाच्याच वयाचा तरुण पुरुष भेटला. तेव्हां ह्मातान्याच्यानें रहावेना, यामुळें सर्व कांहीं त्यानें भडभडा ओकून टाकलें. वसंतास तें ऐकून फार फार वाईट वाटलें. कारण बिचाऱ्या पद्मावतीबद्दल मालतीप्रमाणेंच त्याच्या अंतःकरणांत अत्यंत प्रेम व आदर वसत असे. तो घरीं आल्यानंतर त्याला जेव्हां मालती भेटली तेव्हां त्यानें तिला एके बाजूस गांठून आबासाहेब असें असें ह्मणत होते त्याचें काय असा प्रश्न केला. मालतीनें त्यास सवडीनें सांगेन असें ह्मणून दुसरे तिसरे दिवशीं सांगितलेंही. तें ऐकल्या वेळेपासून तर वसंतास पद्मावतीबद्दल फार फारच वाईट वाटूं लागलें. विलक्षण दुःखास असें कारण असतां ती आपल्या मैत्रिणीच्या घरीं येऊन तिच्या आनंदाची वांटेकरीण होण्यास सिद्ध झाली; इतकेंच नव्हे, तर ती आपलें दुःख यत्किंचितही दिसूं देत नाहीं हें पाहून त्याला तिच्याबद्दल अत्यंत आदर वाटूं लागला.

परंतु मुंबईस गेल्यानंतर पद्मावतीच्या दुःखांत आणखी एक भर पडावयाची होती ती त्या बिचाऱ्यास काय ठाऊक! ठाऊक असती तर त्यानें ती भर पडूं दिली नसती. ती भर काय हें पुढें कळेल.

---

# प्रकरण ८ वें.

## कोण ?



मालतीचा नवरा ज्या बोटीनें यावयाचा होता, ती बोट येण्यास एक दिवस अवकाश होता. मालतीची मंडळी मुंबईस येऊन एक दिवस झाला होता. त्यांची व्यवस्था नीट लागून स्थिरस्थावर झालें होतें. संध्याकाळचीं जेवणें होऊन मंडळी दिवाणखान्यांत बसली होती. मालतीचे वडील सर्व मंडळीबरोबर आले नव्हते. ते व त्यांचा धाकटा मुलगा दुसरे दिवशीं संध्याकाळीं ह्मणजे बोट येण्याच्या आदले दिवसाच्या संध्याकाळीं येणार होते, यामुळें मंडळीच्या हास्यविनोदास कांहीं प्रतिबंध नव्हता. पद्मावती, मालती, वसंतराव, वसंतरावांचा एक मुंबईचा मित्र गंगाधर, इतकी मंडळी जेऊन विडा खाण्याचा त्यांचा उपक्रम चालला होता. जेवतांना वसंतराव विनोदानें आपल्या बहिणीस ह्मणालाः "मालती, आपले पतिराज आतां आमच्यासारखे गांवढळपणानं पाटावर बसण्याचं, हातांच्या बोटांनीं जेवण्याचं आणि भुरके मारण्याचं अगदीं विसरून गेले असतील नाहीं बरं! ते आह्मांला असल्या पोषाखांत पाहून ओळखतील कीं नाहीं कोण जाणे! आमचं तर राहूंद्या. पण ही लुगडं नेसलेली, चोळी घातलेली बायको तरी त्यांना ओळखेल कीं नाहीं कोण जाणे!"

गंगाधर मध्येंच म्हणाला: "खरंच बोआ, विलायतेस सगळ्या मडमा झगा नेसलेल्या! तेव्हां आपल्या बायका पाहिल्याबरोबर या आपल्या बायका असंसुद्धां या मंडळीला वाटायची पंचाईत! सगळंच इकडचं विसरून जायचे हे! हे ह्मणायचे, "अहो बायका नव्हेत या......हे कोणी दुसरेच प्राणी आहेत!"

गंगाधर याप्रमाणें बोलतो आहे तों मालतीची आई तेथें आली व त्यास म्हणाली: "कायरे उठल्या सुटल्या तिची थट्टा करतां? तिचा नवरा कांहीं असा बावळा आहे कीं काय आपल्या बायकोची ओळख विसरून जायला!"

**वसंतराव**:-बावळा? सात बावळा आहे! त्याखेरीज का ही त्याला लांबलचक पत्र पाठवीत असे. तिला वाटे कीं न जाणों एखादा आठवडा चुकला, कीं आपल्याला विसरून जाऊन तो तिथें दुसरी बायको करायचा! आणखी हें बघ गंगाधर, तुला ठाऊक नाहीं हिनं इतक्या दिवसांत चार वेळां तरी आपले फोटोग्राफ काढून त्याच्याकडे कां पाठविले तें? त्यानं आपली ओळख विसरूं नये ह्मणून!

मालती तें ऐकून कांहीं सुद्धां बोलली नाहीं. हंसली देखील नाहीं. नुसती त्याच्याकडे गंभीरपणें पहात राहिली. तेव्हां पद्मावती मात्र म्हणाली: "तुह्मी वाटेल तेवढी थट्टा करा. ती कांहीं बोलत नाहीं कीं हंसत सुद्धां नाहीं."

**आई**:-हंसेल कशाला न् बोलेल कशाला? तिचं माणूस तिला ठाऊक आहे. तुह्मी कांहीं का ह्मणाना!

**वसंतराव**:-झाले, बघ, बघ. आई सुद्धां आतां तुह्मी थट्टा करायला लागली. तिला वाटतं आहे कीं बायकोला सुद्धां ओळखायचा नाहीं तो असं जर ह्मटलं तर मग सासूला ओळखील ह्मणून म्हणावं कसं?

आपल्या थट्टेच्या भाषणांत आपला हा भाऊ आईला ओढतो आहे असें पहातांच मालतीनें थोड्या कपाळाला आंठ्या घातल्या. आणखी आपल्या आईकडे वळून ती म्हणाली: "आई, याला कांहीं सुमार आहे का कुणाला काय बोलावं आणखी काय नाहीं याचा! तोंडाशीं आलं कीं बोलून टाकायचं. म्हणून मी आपली त्याच्याशीं बोलत नाहीं. आपली अगदीं गप्प बसतें."

**वसंतराव**:-गप्प बसतें, आणखी ते आले म्हणजे त्यांच्यापाशीं काय काय आमचीं गाऱ्हाणीं सांगायचीं तीं रचून ठेवतें असं का ह्मणेनास! आपल्याला बोलायला सुचत नाहीं, तेव्हां आईचाच कैवार घेऊन कांहीं तरी बडबड करायची.

वसंतराव याप्रमाणें बोलत असतां खालून एक गडी येऊन त्यास ह्मणाला: "आपल्याकडे कोणी बोआ आला आहे."

**वसंतराव**:-अरे कोणी बोआ आला आहे असं काय सांगतोस आहेस? त्याला नांव विचारावंस कीं नाहीं?

**गडी**:-नांव विचारलं, पण तो ह्मणाला कीं नांव सांगायची जरूरी नाहीं, त्यांनीं मला पाहिलं म्हणजे ते ओळखतील. तूं जाऊन निरोप सांगून ये. ते आंत सुद्धां येईनात. वरांड्यांतच दाराच्या आड उभे राहिलेले आहेत. मीं त्यांच्याकडे पाहिलं पण......

वसंतराव एकदम मध्येंच उद्गारला: "असा कोण बोवा अशा वेळीं माझ्याकडे येणारा? आणखी नांव सांगत नाहीं...बरं जा. मी खालीं येतों. तोंपर्यंत त्यांना आपल्या त्या हॉलांत खुर्चीवर बसायला तर सांग, मी आलोंच."

गडी गेला, तेव्हां वसंतराव पुनः ह्मणतोः " कोण बरं असेल ! मला कांहीं कल्पना होत नाहीं. "

तें ऐकून मालती त्यास ह्मणतेः "कल्पनानू विल्पना करण्याची जरूरी तरी काय हें मला समजत नाहीं. नुसता कुणी गृहस्थ आला आहे. त्याला भेटायला जायचं, काय काम आहे काय नाहीं विचारायचं आणखी परत यायचं तें टाकून लागला आपल्याशीच शंकासमाधान करायला ! "

**वसंतरावः**—हं ! आतां आपल्याला शब्द फुटला वाटतं ? पहातों आतां, खालून जाऊन येतों, मग देतों याचं उत्तर तुला.

असें म्हणून तो तेथून खालीं गेला. तों दुरून त्यास दिसलें, कीं गड्यानें सांगितलेला गृहस्थ द्वारांतच अंमळ आड असा उभा आहे. तेव्हां वसंतराव थोडा राग दाखवून गड्यास ह्मणतोः " कायरे, तुला मीं सांगितलं होतंना यांना हॉलांत नेऊन बसव म्हणून ! "

गडी त्यावर उत्तरलाः " मीं पुष्कळ सांगितलं साहेब यांना कीं आपण हॉलांत येऊन बसा, पण हे ह्मणालेः ' नको. मी इथेंच उभा रहातों, बे आल्यावर पाहूं. ' त्याला मी काय करूं ! "

परंतु वसंतराव इतक्यांत त्या गृहस्थाच्याजवळ गेला. आणि त्याच्याकडे निरखून पाहूं लागला. आणि तो गृहस्थ उंच असून लांब इंग्रजी तऱ्हेचा ओव्हरकोट घातलेला-एकंदर पोषाख इंग्रजी थाटाचा—डोक्याला टोपीसुद्धां इंग्रजी—असा होता. दाढी वाढविलेली होती आणि डोळ्यांला काळ्या कांचांचा चष्मा त्यानें लाविलेला होता. वसंतराव जवळ येतांच त्यानें त्यास एकदम ह्मटलें, " वसंतराव, तुह्मी मला या स्थितींत ओळखणार नाहींच. पण मी तुमच्याकडे कांहीं कामासाठीं आलों आहें. "

त्या माणसाचा आवाज ऐकतांक्षणींच वसंतराव थोडा मागें सरकला असावा असें दिसलें. परंतु पुढल्याक्षणींच त्यानें आपल्या मनास काय वाटलें असेल तें दूर सारून ह्मटलें, " आपलं काय काम आहे तें तर आपण पाहूंच. पण आंत या. या हॉलांत येऊन बसाल तर बरें ! "

" नाहीं, नाहीं. मला बसायला वेळ नाहीं. शिवाय कांहीं कारणामुळें माझं काम आपल्याला इथें सांगायलाही यायचं नाहीं. आपण माझ्याबरोबर थोडें बाहेर या. तिथें थोड्या अंतरावर कांपाउंडांत जाऊन मी आपल्याला माझं काम; काय तें सांगतों. आपण कांहीं भिऊं नका. मी आपल्या ओळखीचा नाहीं असं नाहीं; पण आपण मला ओळखीत नाहीं तेव्हां मी आतांच आपल्याला ओळख पटवूं इच्छीत नाहीं. "

" कांहीं हरकत नाहीं " वसंतराव ह्मणाला, " आपली इच्छा नसली, तर मी आपल्याला ओळख सांगा, नांव सांगा, असं सुद्धां ह्मणत नाहीं. परंतु आपण ज्या कामासाठीं आलां तें काम स्वस्थपणानं सांगण्यासाठीं तर बसाल. स्वस्थ बसून काम काय तें सांगितलं ह्मणजे बरं नाहीं का होणार ? या. असे आंत या. खुर्चीवर बसा गुप्तपणानं सांगायचं असलं तर कोणी इकडे येणार नाहीं आपल्या बोलण्यांत व्यत्यय करायला असं करूं, परंतु......"

" नाहीं बोआ, मी कांहीं आंत येऊन बसण्याला आतां तयार नाहीं. आपण जर बाहेर येत असाल तर पहा. काम माझं नाहीं आपलं आहे. निदान आपलं ज्या कोणा व्यक्तीवर फार प्रेम आहे अशा व्यक्तीचं आहे, तेव्हां पहा. "

आतांचें त्या गृहस्थाचें बोलणें थोडें कुत्सार्चें दिसलें. आपण माझ्या ह्मणण्याप्रमाणें आलां नाहींत तर माझें कांहीं जात नाहीं. आपली किंवा आपल्या कोणाची तरी फार नुकसानी होईल, हा त्याच्या बोलण्याचा आशय होता.

वसंतराव तें ऐकून थोडा वेळ विचार करीत स्तब्ध राहिला. नंतर त्याला म्हणतो, " मला आपलं बोलणं थोडं चमत्कारिक दिसतं. बाहेर कांपाउंडांतच काय विशेष आहे ? तुह्मांला सांगतोंना, कीं इथें काय तुह्मी बोलाल तें कानाच्या कोंपऱ्याला सुद्धां समजणार नाहीं. आणखी काय पाहिजे ? आपण दार लावून घेऊं. आणखी काय आपल्याला सांगायचं असेल तें स्वस्थचित्तानं बोला. "

वसंतरावाचें हें बोलणें ऐकून तो गृहस्थ थोडा गुटमळला आणि नंतर वसंतरावाला ह्मणतो, " आपण म्हणतां तें खरं, पण... बरं कांहीं हरकत नाहीं. चला या हॉलांत. कोणी येणार नाहीं, अशी तजवीज करा कीं झालं. आपल्याला माझं भय वाटतं आहे असं दिसतं. कीं न जाणों मी आपल्याला बाहेर नेऊन काय करीन आणखी काय नाहीं. होय ना ! "

वसंतरावानें त्यास उत्तर दिलें नाहीं. फक्त कपाळाला आंठ्या घातल्या. नंतर त्यानें गड्यास सांगितलें कीं, " आह्मी हॉलांत बसलों आहोंत तोंपर्यंत इकडे कोणी येऊं नये अशी तजवीज कर. येथेंच उभा रहा. कोठें जाऊं नको. "

. इतकें बोलून त्यानें हॉलाचें दार स्वतः उघडून त्या गृहस्थास आंत जाण्यास सांगितलें. तो गेल्यावर स्वतः वसंतराव आंत गेला व त्यानें दार लावून टाकलें. नंतर त्या गृहस्थाच्या समोर बसून त्यानें त्यास ह्मटलें: ' बोला काय तें. '

इकडे गंगाधर वगैरे मंडळी आश्चर्य करीत राहिली. वसंतराव खालीं इतका वेळ काय करीत आहे ? असा कोण गृहस्थ आला आहे ? दहा मिनिटें झालीं, पंधरा झालीं, वीस झालीं, तेव्हां गंगाधर खालीं आला, तों तो गृहस्थ व वसंतराव हॉलांत शिरत होते. गंगाधरानें त्या गृहस्थास ओझरतें पाहिलें. तेव्हां त्यास विशेषच आश्चर्य वाटलें. नंतर तो खालीं उतरला आणि त्या गड्यास त्यानें तो गृहस्थ दिसण्यांत कसा काय वगैरे विचारलें. परंतु गड्यानें जेव्हां त्यास तें सर्व सांगून पुढें वसंतरावानें आपणास इकडे कोणास येऊं देऊं नये असें बजाविलें आहे हें सांगितलें, तेव्हां तो मुकाट्यानें वर गेला. परंतु त्याच्या चर्येवर थोडीशी चिंता दिसली. हा माणूस आपण कोठें तरी पाहिला असावा. हा अशा प्रकारचा माणूस आहे, कीं असल्या ठिकाणीं त्यानें येऊं नये, असें असून वसंतरावाकडे हा आला कसा ? असे कांहीं विचार त्याच्या मनांत आले असावे. वर जाऊन त्यानें त्या मंडळीस वसंतराव व आलेला गृहस्थ बोलत बसले आहेत असें सांगितलें आणि तो आपणही तेथें बसला. परंतु त्याचें चित्त स्वस्थ दिसेना. पुनः खालीं जाऊन आपण आड उभें राहून या गृहस्थाला नीट पहावें असें त्याच्या मनांत आलें.

आणखी सुमारें पंधरावीस मिनिटें गेलीं. अद्यापि वसंतरावाचें व त्या गृहस्थाचें बोलणें संपून वसंतराव वर कसा येत नाहीं याबद्दल ज्याला त्याला आश्चर्य वाटूं लागलें. आणि त्या दिवाणखान्यांतलीं तीं तीन चार माणसें अगदीं स्तब्ध एकमेकांकडे पहात राहिलीं. मधून मधून एखाद्यानें ' इतकं

हितगुज करायला कोण गृहस्थ आला आहे बोआ! ' असें ह्मणावें इतकेंच.

आणखी पंधरा मिनिटें अशाच रीतीनें गेलीं. मंडळी नुसत्या जांभया देत एक-मेकांकडे पहात राहिली होती. वास्तविक ह्मटलें ह्मणजे वसंतरावाकडे एखाद्या माण-साच्या येण्यानें इतकी मोठी अस्वस्थता उत्पन्न होण्याचें कांहींच कारण नाहीं. काय कोणी माणसें दुसऱ्या कोणाकडे येत नाहींत? या माणसांची वर सांगितल्याप्रकारची स्थिति झाली, याला कांहींच कारण—निदान दृश्य कारण नव्हतें. तो गृहस्थ व वसंतराव हे खोलींत जाऊन बसून पाऊण तास जेव्हां झाला, तेव्हां गंगाधर पुनः एकदां उठला. तो आपण जाऊन काय आहे, कोण आहे तें पाहूंच असा निश्चय करून उठला, आणि खालीं आला. खालीं येऊन तो पहातो, तों हॉलाचें दार उघडून तो गृहस्थ बाहेर पडत होता. त्यानें आपल्या डोक्याची टोपी काढली होती, ती त्याच्या हातांत होती. यामुळें टांगून ठेविलेल्या दिव्याचा उजेड त्याच्या चेहऱ्यावर पडला व त्याच्या चेह-ऱ्याचा बराच भाग गंगाधराच्या नजरेस पडला. तो पहातांच गंगाधर थोडासा दच-कल्यासारखा झाला व मागें सरला. तो गृहस्थ त्या हॉलाच्या दारांतून बाहेर पडून टोपी चढविल्यावर पुनः एकदां वसंतरावा-कडे वळला व त्याला मोठ्यानें ह्मणालाः "आतां मीं आपलं स्नेह्याचं स्नेह्यासाठीं जें कर्तव्य करायचं तें केलं आहे. तुह्मांला वाटलं, तिला घेऊन या, अगर नका येऊं. मी अधिक कांहीं बोलत नाहीं. गुड्बाय."

ते शब्द बऱ्याच मोठ्यानें उच्चारले होते, यामुळें गंगाधरास स्पष्टपणें ऐकूं आले. त्याबरोबर त्यानें आपल्या भिवया किंचित् उंच केल्या आणि मान हलविली. हा माणूस कोण हें पूर्णपणें आपण आतां ओळखलें अशा अर्थाचेंच तें मान हलविणें होतें.

तो गृहस्थ गेल्यानंतर वसंतराव वास्त-विक लागलीच वर जावा, परंतु त्यानें तसें केलें नाहीं. त्याची मुद्रा अत्यंत सचिंत दिसली; आणि तो त्या हॉलाच्या बाहेरही आला नाहीं. उंबरठ्यांतच उभा राहिला. जणूं काय आतां जें काय आपणास या बोवानें सांगितलें आहे, त्याचें पुढें काय करावें, हें त्यास कांहीं समजेना. वरून खालीं येण्याच्या जिन्याच्या तळाशींच गंगाधर होता, तो त्याच्याकडे टक लावून पहात होता. गडी वसंतरावानेंच उभा केला होता तोही एकसारखा त्याच्याकडे पहात होता; वसंतराव तसाच एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें उभा राहिला. आणि शेवटीं आपल्याशींच पुटपुटलाः "किती तरी बिचारी दुर्दैवी!"

———

# प्रकरण ९ वें.

## डॉक्टर भगवंतराव.



दिगंबरपंतांनीं किती तऱ्हांनीं जरी आपल्या बायकोचा निषेध केला, तरी बगुताईचें मन ह्मणून फिरलें नाहीं. आपल्या नवऱ्याचा हा छळ कांहीं जन्मोजन्मीं आपल्याला भोगावा लागणार नाहीं, परंतु आतां जीं काय उपकारांचीं कामें करूं तीं आपल्याला पुष्कळ जन्म उपयोगी पडतील. अशी तिच्या मनाची पक्की श्रद्धा होती. आतां आपल्यास भोगावा लागणारा छळ हा पूर्वीच्या जन्मीं हस्तें परहस्तें कोणा दुसऱ्याचा छळ केला त्याचें फळ आहे. तो या जन्मीं सहनशीलपणें भोगला म्हणजे संपलें. आतां जें काय करूं तें पुढल्या जन्मीं उपयोगी पडणार. तें नीट केलें पाहिजे. असा विचार करून तिनें जास्तच जोरानें निश्चय केला कीं, आपण मथुराताईला व तिच्या त्या लहानशा परिवाराला आपल्याला शक्य ती मदत करावयाची. मग नवऱ्यास आपला हट्ट करून त्यानें आपला प्राण घेण्यासाठीं डोक्यांत धोंडा घातला तरी हरकत नाहीं. कित्येक वेळां मन हें पाण्याप्रमाणें वागत असतें. कोंडलेल्या पाण्यावर दाब घालणें फार कठिण असतें. कांहीं जोर करून पाण्याच्या पृष्ठभागावर दाब घातला कीं त्याची प्रत्यावृत्ति होऊन तें जोरानें उसळी मारून निघतें. तशीच कांहीं व्यक्तीच्या मनाची गोष्ट आहे. त्याला कृत्रिम दाबांत ठेवण्याचा खटाटोप करावयाला गेलें, कीं तें केव्हां दुप्पट, केव्हां दसपट, जोरानें उसळी मारतें. बगुताईच्या मनाची अगदीं अशी स्थिति झाली होती. आजपर्यंत अनेक तऱ्हांनीं त्यांच्या नवऱ्यानें त्यांस दाबलें. अमुक एका बाबतींत असें असें करावयाचें असा तिनें उद्गार काढला कीं दिगंबरपंतांनीं तिला ह्माणून पाडलेंच. होतां होतां अशी स्थिति झाली, कीं आतां यापुढें तसा त्रास सोसण्याइतकें त्राण तिच्या बिचारीच्या अंगांत उरलें नाहीं. लहानसें किरडूं किंवा सुरवंट असला, आणखी त्याच्या अंगावर कोणीं पाय दिला, तर तो सुरवंट किंवा तें किरडूं सुद्धां उलट तोंड फिरवून डसण्याचा आविर्भाव केल्याखेरीज रहात नाहीं. मग बिचाऱ्या बगुताईसारख्या मानवी प्राण्याची तशी जर स्थिति झाली, तर त्यांत नवल काय! आज कित्येक वर्षेपर्यंत दिगंबरपंतांचें वर्तन बगुताईस पूर्ण निराशाव्याप्त माणसांच्या स्थितीला नेऊन पोंचवीत होतें आणि तें कधीं एक पाऊल, कधीं दोन पावलें, कधीं चार–पांच पावलें त्या बाजूस चाललें होतें.

परंतु आजच्या या प्रसंगानें तें किती पुढें गेलें त्याचा सुमार त्यांचा त्यांनाही राहिला नाहीं. त्यांच्या मनानें असा पक्का निश्चय केला कीं, यापुढें कांहीं वाटेल तें जरी आपल्या नवऱ्यानें केलें, तरी आपल्या मनाला वाटेल त्याप्रमाणें वागण्यास मागें घ्यावयाचें नाहीं. त्यानें जीव घेतला तरी हरकत नाहीं !

मागील प्रकरणांत दिलेल्या हकीकती-वरून वाचकांस ठाऊक झालेंच आहे कीं, मथुराताईस त्रास देण्याचा—तिचा छळ करण्याचा—दिगंबरपंतानें विडाच उचलला होता आणि त्या कामीं आपल्यास आपल्या बायकोचें साहाय्य मिळत नाहीं, इतकेंच नव्हे तर आपल्या इच्छेविरुद्ध तिचें वर्तन आहे हें पाहून त्यांस फार संताप आला. त्या संतापाच्या भरांत त्यांनीं बगुताईचे अंगावर हातही टाकला. शेवटीं ' न भूतो न भविष्यति ' अशा प्रकारच्या शिव्या स्वतःच्या कुटुंबास व मथुराताईसही दिल्या आणि आपल्या बायकोस धाक घातला कीं " पुनः तूं त्या * * ला जर कोणत्याही प्रकारची मदत करशील, तर तुला जुनं पटकूर नेसायला देऊन घराच्या बाहेर घालवून देईन, पुनः तुझं तोंड पहाणार नाहीं. "

बगुताईनीं त्यांना कांहीं उलट उत्तर दिलें नाहीं. मात्र मनांत पक्का निश्चय केला कीं, आतां इतक्या थरावर गोष्ट आली आहे, तर आपल्या मनाला वाटेल त्याप्रमाणेंच वागा-वयाचें. मग अखेरीस काय होईल तें पहातां येईल. दिगंबरपंतांनीं आपल्या कुटुंबास नाना-प्रकारच्या आणा शपथा आणि धाक घातले, ते कांहीं हळूच बोलून घातले नाहींत. मुद्दाम आपल्या जागेच्या बाहेर सर्वांची रहदारीची जाण्यायेण्याची वाट होती तेथें येऊन ओरडून घातले. मनांतला हेतु हा कीं, आपलें बोलणें मथुराताईस पूर्णपणें ऐकूं जावें; आणि तिला झाला प्रकार कळावा. ही त्यांची इच्छा पूर्णपणें सिद्ध झाली.

मथुराताईस त्यांचें सर्व बोलणें स्पष्टपणें ऐकूं आलें, परंतु ती बिचारी या गृहस्थानें आपल्या गरिबाचा काय म्हणून द्वेष करावा, अकारण वैर काय म्हणून करावें, याबद्दल आपल्या आपल्याशींच अचंबा करीत राहिली. आपण आतां हें बिऱ्हाड सोडून कोठें तरी जावें, असें आज कित्येक दिवस तिला वाटतच होतें. परंतु आज आतां तर तिला नक्की असें वाटलें कीं, या पुढें आपण क्षणभरसुद्धां या घरांत राहूं नये. दिगंबरपंतास कोण-त्याही प्रकारची लाजलज्जा नव्हती. आपण बोलतों आहोंत याचा परिणाम काय होईल, याची तर त्यांस मुळींच दिक्कत नव्हती. मथुराताईचा भाऊ जर मोठा तरुण असता, तर या भित्र्या माणसानें तिच्यासंबंधानें एक चकार शब्दही काढला नसता. परंतु या घरांत आपल्या फाजील-पणाचें शासन करणारा एकही प्राणी नाहीं, हें त्यास पक्कें ठाऊक असल्यामुळें व अंगवळलेला अपमानास्पद बोलण्याखेरीज कोठेंही शौर्य दाखविण्यास त्याला या जगांत स्थान नसल्याकारणानें त्यानें या वेळीं आपलें जिव्हास्त्र अगदीं स्वैर सोडलें. त्यांत मथुराताईस डॉ. भगवंतराव इतक्या प्रका-रांनीं फुकट मदत काय म्हणून करतात, याबद्दलही अत्यंत गलिच्छ अशा शब्दांत त्याला जें काय बोलावयाचें होतें तें तो बोलला. या बोलण्यानें मथुराताईस त्याचा अत्यंत तिटकारा आला. परंतु बिचारी काय करणार ? तिनें त्यांतल्या त्यांत समा-

धान वाटून घेतलें तें एवढेंच कीं, आपल्या भावंडांपैकीं कोणीही त्याचें तें आचरट-पणाचें भाषण ऐकण्याला जागें नव्हतें. याचीं हीं असलीं गलिच्छ बोलणीं त्या मुलांच्या विशेषतः मनोहराच्या कानीं जाऊं नयेत अशी तिला इच्छा; परंतु जावें कोठें ? जेथें आपला बस बसला आहे, तेथें जागा टाकून दुसरीकडे आपण गेल्यास आपली अवस्था कशी लागेल ? हा विचार तिच्या मनांत वारंवार येई. ज्या घरांत ती होती, त्या घराच्या मालकानें तिला एका शब्दानेंही दुखविलें नाहीं. उलट तिला घालवून द्यावें असें दिगंबरपंतानें सांगितलें असतां मालकानें त्याला असा निरोप पाठविला कीं, " आपल्यास बरें वाटत नसल्यास आपण बिन्हाड सोडावें, परंतु त्या बिचाऱ्या गरीब स्त्रीवर एकावर एक भयंकर प्रसंग आले असतां मी कांहीं तिला तूं आमचें घर सोड असें ह्मणून तिच्या दुःखांत भर घालणार नाहीं. " असा प्रकार असतां आपण येथून जावें कसें ? आणि कदाचित् गेलों तरी अशी सोयीचा जागा आणखी इतक्या थोडक्यांत आपल्याला मिळणार कशी ? असें तिच्या मनास वाटणें किती साहजिक !

परंतु मथुराताईस असले विचार करण्यास फार अवधि सांपडला नाहीं. कारण बबीचा पुनः दोनप्रहरप्रमाणेंच प्रकार झाला. पोरगीला झोंप लागली कीं काय, हें पहाण्यासाठीं मथुराताई सहज तिच्याजवळ जाऊन तिनें तिच्या कपाळाला हात लावून पाहिलें तों तें अगदीं काल्याप्रमाणें थंड लागलें. हात-पाय चापसून पाहिले तों त्यांची स्थिति तीच. तेव्हां तिच्या तोंडचें पाणी पळालें. तिनें लागलीच मनोहराला उठविलें, आणि त्याला ह्मटलें, " मनोहर, बबीची पुनः संध्याकाळसारखी स्थिति झाली. तूं तिच्याजवळ बसतोस ? का डॉक्टरांना हांका मारायला जातोस ? मी इथें बसतें. बाचारे, त्यांचे आपल्यावर अनंत उपकार आहेत. त्यांना एक दमडीच्या कवडयाही आपल्यापासून मिळण्याची आशा नाहीं, पण ते तिला तपासतात, औषध देतात. तेव्हां त्यांना जितका कमी त्रास द्यावा तितका बरा. पण काय करूं ? आतांची वेळ अशी आहे कीं, त्यांना बोलाविल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं...... "

मनोहरानें लागलीच आपला सदरा चढविला, टोपी घातली आणि तो डॉक्टराकडे जाण्यास निघाला. जातां जातां तो आपल्या बहिणीला ह्मणतो, "तूं जर बगुताईना हांका मारल्यास तर त्या मघांची मात्राबित्रा घालून तिला उठवितील. "

परंतु मथुराबाईनें त्याला नुसतें " तूं आपला जा लवकर, मी पहातें काय आहे तें. घाबरून जाऊं नकोस. नीट हांका मार. रस्त्यांत भिऊं नकोस. वाट नाहींना चुकणार ? " असें म्हटलें.

आपल्या बहिणीचें पुरतें बोलणें त्यानें ऐकिलें सुद्धां नाहीं. तो हरणासारखा निघाला. त्याला डॉक्टरांच्या बोलण्याचें स्मरण झालें. 'कशीही रात्र झाली असली किंवा कांहीं असलें तर संकोच न धरितां मला हांका मारायला या' असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें होतें. तेव्हां आपल्या अपरात्रीं जाऊन हांका मारण्यानें ते रागावतील अशी शंकाही त्याच्या मनास वाटली नाहीं. तो तडक निघाला. डॉक्टरांच्या घरीं गेला. पहातो तों त्याही प्रसंगीं कृष्णाजीपंतदादांची गाडी त्यांच्या दाराशीं उभी असून डॉक्टर आपल्या दवाखान्यांत कांहीं तरी काम करीत

आहेत. त्यानें डॉक्टरांस हांका मारल्या. डॉक्टरांनीं एकदम त्यास ओळखलें नाहीं. परंतु तो जवळ जातांच त्याच्या पाठीवर हात मारून ते मोठ्या खुषीनें ह्मणाले: " काय मनोहर, बर्चा पुनः संध्याकाळच्यासारखी पडली आहे वाटतं ? बरं पण तुला तुझ्या ताईनीं पाठविलं एवढ्या रात्रीं. संकोच करून ' काय होईल तें होईल ' असं नाहीं ह्मणाल्या. बस जरा, मी येतों हां ! या कृष्णाजीपंतदादांच्याही घरून मला गाडी आली होती. त्यांच्या कुटुंबाची प्रकृति पाहून मी आतांच आलों. त्यांना कांहीं पुड्या पाठवायच्या आहेत त्यांच्या गाडी-वाल्याबरोबर. त्या तयार करतों आणखी मग त्याच गाडींत आपण तुझ्या घरीं जाऊं. मला तिथें तो सोडील आणखी पुढें जाईल. मी येईन मग चालत. " असें ह्मणून ते औषध काढावयाचें होतें तें काढून तयार करूं लागले. तोंडानें त्यांची मनोहराजवळ कांहीं तरी विचारपूस चाललीच होती. इतकी रात्र झालेली. परंतु त्यांना काडी-इतका सुद्धां त्रास झाला असावा किंवा वाटत असावा. असें त्यांच्या आवाजावरून किंवा शब्दावरून वाटण्यास जागा नव्हती.

थोड्याच वेळांत त्यांचें औषध तयार झालें. लागलीच त्यांनीं त्याच्या पुड्या बांधल्या. आपल्या हातांनीं एका कागदावर मराठींत कांहीं लिहिलें, आणि तो कागद व त्या पुड्या गाडीवाल्याजवळ त्यांनीं दिल्या व त्यास ह्मटलें: " थांब, इतक्यांत जाऊं नको. वाटेवर मला यांच्या घरीं जायचं आहे, तिथें मला सोडून मग पुढें जा. " इतकें बोलून त्यांनीं आपली हँडब्याग, आपला स्टेथास्कोप, एक मेणबत्तीचा दिवा, अशी सामग्री आपल्याबरोबर घेऊन ते व मनोहर गाडींत बसले आणि मनोहराच्या बिऱ्हाडीं आले ते तडक मथुराबाईच्या घरांत गेले. मथुराबाई त्यांची वाट पहातच होत्या. डॉक्टरांनीं त्यांना " काय ह्मणते आमची बबी ? " असें विचारीत विचारीत बबीचा हात आपल्या हातांत धरला.

मथुराताई दूर झाली. " आहे हें असं आहे. तसं कांहीं विशेष नसतं, तर मीं आपल्याला इतक्या रात्रीं अशी तसदी दिली नसती. पण काय करूं ? आपण दया करीत आलां, तेव्हां संकट आलं कीं आप-ल्याकडे धांव घ्यावी असं वाटतं. "

तिचे ते शब्द अगदीं साधे होते. परंतु ते ज्या कंठांतून आले तो किती सद्गदित झाला होता, हें प्रत्येक अक्षरागणिक समजत होतें. डॉक्टरांचें पूर्ण लक्ष्य तिच्याकडे नसल्याकारणानें त्यांस तिचा कंठ सद्गदित झाला आहे, याखेरीज कांहीं सुद्धां समजलें नाहीं. त्यांनीं आतां आपल्याबरोबर आण-लेला दिवा लाविला आणि शांतपणें त्या आजारी मुलीची तपासणी चालविली. त्यांनीं एक वेळां तिची नाडी पाहिली, कपाळ पाहिलें, नंतर आपल्या ब्यागेंतून कांहीं औषध काढून तिच्या नाकाजवळ धरलें. तें औषध कांहीं सेकंद धरलें, नंतर चट्कन दूर केलें व त्याचा काय परिणाम होतो तो पहाण्यासाठीं त्यांनीं तिच्या चेहऱ्याकडे लक्ष्यपूर्वक पाहिलें. परंतु कांहीं नाहीं. तेव्हां त्यांची चर्या फार गंभीर झाली. त्यांनीं भिवया वर केल्या, दांत एकमेकांशीं घट्ट धरले, डोळे विस्तारले. हें एक क्षणभर झालें. पुनःदुसरी एक बाटली काढली व ती उघडली, बबीच्या नाकाशीं धरली, व भिवयाचा संको-च व डोळ्यांचा संकोच केला आणि ते सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागले. एका हातांत त्यांनीं तिचा एक हात नाडी पहाण्यासाठीं धरलाच होता. बाटली लावून एक पांच सेकंद झाले नस-

तील तोंच त्यांनीं तिचें कांचेचें बूच आंगठा व पहिलें बोट याच्या चिमटींत धरलें होतें, तें बाटलीस लाविलें. व अधिक सूक्ष्म दृष्टीनें त्या प्रेतवत् पडलेल्या मुलीच्या चेहऱ्याकडे पाहूं लागले. क्षणांत त्यांच्या चर्येवर जरा समाधान दिसूं लागलें. आणखी एक क्षण जातांच तें समाधान अधिक स्पष्ट झालें. नंतर त्यांनीं एक सुस्कारा टाकला व मान हालविली. बचीनें " आयाई आयाई " असें एकवार केलें, नंतर ती घाबरल्यासारखी झाली, ताडकन् उठली. कावरीबावरी होऊन " ताई, ताई. " असें ओरडून पुनः खालीं पडली. मथुराताईनें तिच्याजवळ पटकन् जाऊन " बचे, बचे, मी जवळ आहें बरं, घाबरूं नकोस " असें ह्मटलें.

डॉक्टरांचें लक्ष्य बचीखेरीज कशाकडे नव्हतें. त्यांनीं पुनः एकवार तिची नाडी पाहिली. नंतर मथुराताईकडे वळून ते ह्मणाले, " बचीबद्दल तुह्मी अगदीं काळजी करूं नका. मी तिला बरें करणार. आतां मी तिला औषध देतों. पण त्याचा परिणाम काय होतो आणखी आतां जरी तिची फिट पार गेली, तरी पण ती पुनः येते केव्हां, काय प्रकार होतो, हें सारं पहाण्यासाठीं मला इथें बसलं पाहिजे. मी बसणारही. मी तुमचा भाऊ आहें असं समजा. तुह्मी मुळींच संकोच करूं नका. या मनोहराची झोंप झाली आहे. तेव्हां तो थोडासा पाहिजे तर बसेल जागत माझ्याबरोबर. पण तुह्मी अंमळ पडा. तुह्मांला सगळ्या दिवसाची दगदग, आणखी आतां रात्रीचं जागरण ठीक नाहीं. असंच चाललं तर तुह्मी आजारी पडाल. तर तसं करूं नका. तुह्मी जर आजारी पडलां, तर या सगळ्यांचं कसं होईल ? तुह्मी स्वस्थ विश्रांति घ्या. अगदीं अगदीं मनांत संकोच करूं नका. चार घटका पडलांत तर तेवढीच तुह्मांला विश्रांति मिळेल. तुह्मी या पोरीला आमच्या घरीं नेऊं याल, तर... परंतु तसं कसं तुह्मांला म्हणावं ? तें जाऊं द्या. पण तुह्मी उठा. "

डॉक्टरांच्या तोंडून निघणारा प्रत्येक शब्द अगदीं मनःपूर्वक व शुद्धभावानें निघत होता. परंतु मथुराताईच्या मनास फार संकोच झाला. हा परकी गृहस्थ डॉक्टर आपण होऊन आपल्या बहिणीसाठीं इतक्या काळजीपूर्वक व आस्थेनें येथें बसतो आणखी आपल्याला स्वस्थ निजा म्हणून सांगतो, हा याचा केवढा थोरपणा ! ही याची केवढी परोपकारबुद्धि ! आपल्या घरांत धड दिवाही नाहीं तर हा आपण होऊन घरून दिवा आणतो. ज्याला श्रीमंतांच्या घरीं गाड्या पाठवून बोलावून फी देऊन नेतात, तो आपला पायीं जाईन परत असें ह्मणून अपरात्रीं आपल्या घरीं येतो आणखी तासतास बसतो, वाटेल तितक्यांदा येतो. आणखी आपल्याला मी तुमचा भाऊ आहें, तुम्ही संकोच धरूं नका म्हणतो या सगळ्याचा अर्थ काय ! तिला वाटलें कीं, आपल्या चामड्याचे जोडे करून जरी याच्या पायांत घातले, तरी याचे उपकार आपल्या हातून फिटावयाचे नाहींत.

मथुराताईच्या मनांत अशा प्रकारचे विचार चालले होते. इकडे डॉक्टर भगवंतराव आपल्या ब्यागेंतून कांहीं औषध काढून तें नीट मोजून मापून बचीच्या तोंडांत घालतांना, त्यांना " तुह्मी पडा. खरोखरीच अंथरुणावर पडा. झोंप नाहीं आली तर नुसते हात-पाय ताणुन-डोळे मिटून तास

दोन तास पडलें तरी झोंपेचा आराम ह्या पडण्यापासून मिळतो. मात्र डोक्यांत विचारविचार कांहीं येऊं देऊं नयेत. पडा खरंच पडा " असा एकसारखा आग्रह करीतच होते. शेवटीं मथुराताईंनीं मनोहरास डॉक्टरसाहेबांच्या जवळ बसण्याबद्दल हळूच खूण केली व आपण तीं लहान मुलें अगदीं पलीकडे गाढ निजलीं होतीं त्यांच्या शेजारीं जाऊन त्या पडल्या. त्यांना झोंप थोडीच येते आहे! डोळे मिटणें त्यांच्या हातचें होतें, परंतु झोंप आणणें थोडेंच शक्य होतें! आपल्या लुगड्याच्या चौघडीची घडी करून तीवर डोकें ठेवणें त्यांना सोपें होतें, परंतु डोक्याच्या आंतल्या भागांत शांतता आणणें त्यांना कोठलें साधणार? बबीच्या आजारासंबंधाचे, आपल्या दारिद्र्यासंबंधाचे, डॉक्टरांच्या परोपकारबुद्धीबद्दलचे आणि आपल्या धर्मिष्ठ शेजाऱ्याच्या अकारण वैराविषयींचे विचार तिच्या डोक्यांत आल्याखेरीज कसे रहाणार? या शेवटल्या दोन बाबतींतले विचार तर तिच्या मनांत एका वेळीं येऊन दिगंबरपंत व डॉक्टर भगवंतराव यांच्या वर्तनाचा विरोध एकदम उभा राहिला. एकानें आपल्याला आपली भगिनी ह्मणून आपल्यावर इतके उपकार करावे कां? आणि दुसऱ्यानें आपल्यास अगदीं शत्रु लेखून आपलें वाईट केव्हां होईल याबद्दल धडपडावें कां? एकाच्या मनांत आपल्याविषयीं इतकी प्रीति व आदर कां आणि दुसऱ्याच्या मनांत कोप व तिरस्कार कां? एकानें स्वतः येऊन आपल्या बहिणीला जगविण्यासाठीं श्रम करावे कां आणि दुसऱ्यानें आपल्या बायकोनें तसे थोडेसे श्रम केले ह्मणून उलट तिजवर संतापावें कां? वास्तविक पाहिलें तर आपल्या कुटुंबाचा व दिगंबरपंताचा सहवास फार. आपला बाप कसा होता, आई कशी होती, आपण कशा आहोंत याबद्दल दिगंबरपंतास माहिती जास्त. डॉक्टरांस माहिती झाली ती प्लेगाच्या भयंकर दिवसांत ते केवळ परोकारबुद्धीनें गरिबांचीं घरें तपाशीत असतां याही कुटुंबाची माहिती त्यांना लागून ते आपण होऊन या घरांत आले तेव्हांपासूनची. परंतु काय चमत्कार पहा! जीं संकटें त्या दीन कुटुंबावर आलीं यामुळें डॉक्टरांच्या मनांत अत्यंत दया उत्पन्न झाली, त्याच संकटांच्या येण्यानें दिगंबरपंतास या दीन अनाथ मंडळीविषयीं तिटकारा उत्पन्न झाला! असें कां व्हावें?

अशा नानाप्रकारच्या विचारांनीं तिचें मन व्याप्त होऊन ती " कां? कां? " हे प्रश्न कितीही वेळ करीत राहिली तरी काय होणार होतें! तिच्या मनाला त्रासापलीकडे त्यापासून काय लाभणार होतें? झोंप तर मुळींच आली नाहीं. डॉक्टर त्या रात्रीं अगदीं उजाडेपर्यंत तेथें बसले. आणि मग जातांना त्यांनीं मथुराताईस सांगितलें:"तुह्मी रजा घ्या. रजा नाहीं मिळाली तर चाकरी सोडून द्या, परंतु बबी बरी व्हावी अशी इच्छा असली तर तिच्याजवळ आठ दिवस तरी अहोरात्र माणूस पाहिजे. तिची शुश्रूषा झाली पाहिजे. नीट शुश्रूषा झाली तरच ती वांचेल. मी तुमच्या वरिष्ठांना चिठ्ठी लिहून रजा देण्याची शिफारस करतों, जरूरी दाखवितों. इतक्या उपर त्यांनीं रजा नाहीं दिली तर चाकरी सोडून द्या, कसं होईल अशी विवेचना करूं नका. मी तुमची सगळी व्यवस्था करीन. तुह्मी बबीची शुश्रूषा करा. " हे डॉक्टर भगवंतरावांनीं जातां जातां ओटीवर उभें

राहून सांगितलें. तें दिगंबरपंतांनीं ऐकलें. त्या दिवशीं कृष्णाजीपंतदादांस ह्मटलें, " डॉक्टर भगवंतराव रात्रीचे मथुराताईच्या घरीं असतात. या मास्तरणी स्त्री-शिक्षण देणार."

कृष्णाजीपंतदादा ह्मणाले, "सुधारणा!"

# प्रकरण १० वें.

## कोठें गेले.



प्रकरण ८ मध्यें सांगितल्याप्रमाणें वसंतरावांकडे आलेला माणूस गेल्यानंतर वसंतराव किती वेळ तरी फार सचिंतपणें त्या बैठकखान्याच्या दारांतच उभा राहिला. आपला गडी व आपला मित्र आपल्याकडे टक लावून पहात उभे राहिले आहेत हेंही त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. शेवटीं त्यांच्या तोंडून उद्गार निघाला तोही त्यांनीं ऐकला–निदान जवळच उभ्या असलेल्या गड्यानें तरी तो ऐकला–हें सुद्धां त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. भेटावयाला आलेल्या गृहस्थाशीं जें काय त्याचें भाषण झालें किंवा आलेल्या गृहस्थानें जें काय सांगितलें तेंच त्याच्या मनांत एकसारखें घोळत होतें. तो कांहीं तरी मोठ्या विचारांत पडला होता हें तर अगदीं उघड होतें. त्याच्यानें आतां वर जाववेना, असेंही झालें असावें. गंगाधर त्याच्याकडे एकसारखा पहात होता हें वर सांगितलेंच आहे. आतां वसंतराव वर जावयाला येईल, क्षणभरानें येईल, तेव्हां त्याचें आपल्याकडे चित्त जाईल असें वाटून तोही वसंतरावाकडे नुसताच पहात उभा राहिला.

तो गडी पुढच्या दाराशीं उभा राहून वसंतरावाकडे पहातो आहे. वसंतराव त्या दाराच्या समोरच असलेल्या बैठकखान्याच्या दारांत शून्य दृष्टीनें कोठें तरी पहात आहे आणि वर जाण्याच्या जिन्याच्या पायऱ्यांपाशीं गंगाधर वसंताकडे पहात उभा आहे. हा देखावा जर कोणीं बाहेरून येणाऱ्या परक्या मनुष्यानें पाहिला असता, तर या लोकांना कांहीं भ्रम झाला आहे कीं यांना कोणीं जादू करून असें उभें केलें आहे, का हे कांहीं नाटकांतल्या देखाव्याची तालीम करीत आहेत, आहे तरी काय असें मनांत येऊन तोही कांहीं वेळ तरी जागच्या जागींच उभा राहून पाळीपाळीनें त्या तिघांपैकीं एकेकाकडे पाहूं लागला असता.

असें किती वेळ आपण उभे रहाणार, असें आपल्या यजमानास एकदां विचारावें असें त्या गड्याच्या मनांत आलें; परंतु आपण लहान तोंडीं मोठा घांस कसा घ्यावा, असा विचार करून तो आपला गप्प उभाच राहिला. परंतु गंगाधरास कांहीं तितका धीर राहिला नाहीं. त्यानें शेवटीं वसंतरावाच्या जवळ येऊन हा प्रकार काय ह्मणून विचारण्याचा निश्चय केला व जि-

त्याच्या त्या शेवटल्या पायरीवरून खालीं उतरून वसंतरावाच्या जवळ जाण्यास पाऊल पुढें घातलें. परंतु तितक्यांत वसंतराव त्या गड्यास ह्मणालेः

" भाग्या, वर जा आणखी गंगाधराला मी खालीं बोलावतों आहें ह्मणून सांग. "

तें ऐकण्याबरोबर " हे पहा ते तुमच्या समोरच उभे आहेत केव्हांचे !" असें भाग्याच्या तोंडून आणखी"बोलवायला कशाला पाहिजे ? मी केव्हांच आलों आहें " असें गंगाधराच्या तोंडून एकदम शब्द बाहेर पडले.

वसंतरावानें त्यास क्षणभर कांहीं उत्तर दिलें नाहीं. नुसती मान हलविली. नंतर तो गंगाधरास म्हणतो, " गंगाधर, एक फार विलक्षण प्रसंग आला आहे बुवा. असा आंत ये. तूं आणखी मी दोघे बसून स्वस्थ विचार करूं. " इतकें बोलून तो बैठकखान्याकडे वळला. गंगाधर आंत शिरला इतक्यांत वसंतरावाच्या मनांत काय आलें, तो गड्याकडे वळून म्हणालाः " भाग्या, तो गृहस्थ मला काय ह्मणत होता, काय नाहीं, हें जर कांहीं ऐकलं असलंस तर कोणाजवळ बोलूं नको बरं का ! "

भाग्या तत्काळ उद्गारला, "हें काय रावसाहेब, असं मी कधीं कांहीं बोलतों ? अन् त्यांतन् आतां तर एक शब्दसुद्धां माझ्या कानीं पडला नाहीं. "

परंतु भाग्याचें हें उत्तर ऐकण्याइतका सुद्धां वसंतरावास धीर नव्हता. त्यानें बैठकखान्याचें दार लागलींच लावून टाकलें. त्यांचें गुप्त भाषण सुमारें अर्धा तास झालें असेल. वर बसलेल्या त्या बायकांना अगदींच बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें. कारण प्रथम वसंतराव खालीं गेला. त्याला फार वेळ लागला ह्मणून गंगाधर काय आहे तें पहाण्यासाठीं ह्मणून त्याच्यामागें गेला. परंतु कितीं वेळ झाला तरी त्याचा कांहीं पत्ता नाहीं तेव्हां अर्थातच त्यांच्या मनाला काळजी वाटूं लागली कीं, कोणाच्याबद्दल कांहीं काळजी वाटण्यासारखें तर नाहीं ? वसंतरावाकडे गृहस्थ आला कोण, आणखी त्याच्याशीं इतका वेळ त्याचें भाषण चाललें असावें तरी काय ? हेंच पहावयाला गंगाधर खालीं गेला तोही गुंतूनच राहिला याचा अर्थ काय ? असे प्रश्न साहजिकच त्या तिघींच्या मनांत आले. शेवटीं पद्मावतीच्यानें राहवेना. तिच्या मनानें घेतलें कीं, कांहीं तरी आपल्याच संबंधाचा प्रसंग आहे. आणि ती ह्मणाली, ' मी जाऊन पाहून येतें कोण आहे न् काय एवढं बोलताहेत तें. ' तिला या वेळीं असें वाटलें कीं आपल्यासंबंधानें कांहीं तरी बातमी त्यां गृहस्थानें येऊन सांगितली, आणि आतां वर येऊन ती मला कशी सांगावी ? ह्मणून वसंतराव होतां होईतों खालच्या खालींच वेळ काढतो आहे. जर का ही आनंदाची वार्ता असती तर तो इतका वेळ खालीं बसला नसता. तेव्हांच आपल्या वहिणीला व आईला सांगायला आला असता. असा संशय तिच्या मनांत आल्याबरोबर तिला वाटलें, कीं आपण खालीं जाऊन वसंतरावास काय आहे तें विचारावें. किंवा निदान कोण बुवा आला आहे, आणखी याच्याशीं काय बोलतो आहे, एवढें तरी ऐकावें. तिच्या मनाची स्थिति आतां अशीच झाली होती कीं, कोठें कांहीं कोणी कुजबुजलें, किंवा एका बाजूस बोललें, किंवा कोणी सचिंत दिसलें कीं हिला वाटावें तें माणूस आपल्याच संबंधानें कुजबुजतें आहे, आपल्याच संबंधानें बोलतें आहे, किंवा आपल्याबद्दलच त्या माणसास कांहीं तरी जास्त कळलें असून

त्यामुळें त्यास चिंता वाटत आहे. असेंच या वेळींही मनांत आलें. तिला लागलीच असेंही वाटलें, कीं आपण विनाकारण येथें आलों. हीं सगळीं माणसें आपल्या आनंदांत मौजेंत असणार आणि आपण मात्र दुर्मुखलेल्या दिसणार; निदान आपण अशा दुःखांत असतांना आपल्या देखत यांना वाटतील तशीं आनंदाचीं व हास्य-विनोदाचीं भाषणें करण्यास संकोच वाटणार, असा विचार तिच्या मनांत येऊन ती जास्तच सचिंत व खिन्नमुख झाली. ती खालीं जाण्यास निघाली तेव्हां मालती तिला ह्मणालीः

" असेल कांहीं त्यांचं. या वसंतरावाचे हजार स्नेहीन् सतराशें कारभार असतात, त्यांतलाच हा एक असेल, कशाला जातेस ? आतां येतील ते दोघे वर. त्या दोघांना एक क्षणभरदेखील कांहीं गुपीत ठेवतां येत नाहीं. त्यांत वसंतराव तर तेव्हांच सारं सांगून टाकील वर आल्याबरोबर. त्यांचा कॉलेजांतला कोणी स्नेही कांहीं तरी गप्पागोष्टी सांगायला आला असेल, बसले असतील खालींच. अगदीं नवखा-कधीं आपल्याला भेटलेला नसला, तर कशाला आपल्याकडे आणतील ! "

परंतु पद्मावतीनें तिचें पुरतें भाषण ऐकलेंसुद्धां नाहीं. ती जिना उतरून गेली सुद्धां. जिन्याच्या शेवटाशीं जाऊन इकडे तिकडे पहाते तों तेथें कोणीच नाहीं. हे गेले तरी कोठें, तें पहाण्यासाठीं ती पुढें आली तोंच वसंतराव दार उघडून एकदम बाहेर आला. त्यानें पद्मावतीस पाहिलें नाहीं. कारण त्याचें तोंड अद्यापि आंतच असलेल्या गंगाधराकडे वळलेलें असून त्याला उद्देशून तो इंग्रजींत पुढील अर्थाचें वाक्य ह्मणाला, " तर मग हें ठरलंच कीं, तिला यांतली गंधवार्तासुद्धां न कळूं देतां आपणच जायचं. चला जाऊं. तूं म्हणतोस तें कांहीं वावगं नाहीं. तुझान् माझा दोघांचे कोट मी घेऊन येतों आणखी आपण तडक जाऊंच. पाहूं तर खरं बरं या लेकाचं काय ह्मणणं आहे तें. "

" जा. तोंपर्यंत माझी मी ही विडी संपवितों. " असें गंगाधराचें उत्तर आलें.

पद्मावतीनें हें संभाषण ऐकलें, हें सांगावयास नकोच. तें ऐकल्याबरोबर ती चपापली आणि थोडी मागें सरली. " ' तिला गंधवार्तासुद्धां कळवायची नाहीं ' ह्मणजे कोणाला कळवायची नाहीं आणि कसली गंधवार्ता कळवायची नाहीं ! " हे प्रश्न तिच्या मनांत आलेच; आणि त्यांपैकीं पहिल्या प्रश्नाचें तर तिनें उत्तर तावडतोब दिलेंच. तिला ह्मणजे आपल्याला-पद्मावतीला-हें उत्तर ठरलेंच. दुसरें कोण असणार ! परंतु गंधवार्ता कसली कळवायची नाहीं ! आपल्यावर आणखी कांहीं संकट येतें आहे काय ! आलें आहे व तें यांना कोणी सांगितलें आहे काय ! आंतून उत्तर आलें, तें गंगाधराचें. तेव्हां तो आलेला गृहस्थ गेला कीं काय ! गेला असावा.

हीं प्रश्नोत्तरें पद्मावतीच्या मनांत एका क्षणा दोन क्षणांत उभीं राहिलीं. इतक्यांत वसंतराव वर जाण्यासाठीं पुढें चालूं लागला तों त्यानें पद्मावतीला पाहिलें. आणि तोही एकदम चपापला. परंतु तसें कांहीं न दाखवितां तिला ह्मणतो, " पद्माताई, तूं खालीं कां आलीस ! "

पद्मावती प्रथम कांहींच बोलली नाहीं. ती कांहीं विचार करिते आहे असें दिसलें, तेव्हां त्यानें तिला पुनः ह्मटलें, " तूं कां आलीस ! आणखी तुझा चेहरा असा कशानें झाला ! " पद्मावती त्यावर त्यास एकदम ह्मणाली, " वसंतराव, माझं मन फार

अधू झालं आहे. मला आतांशा कुठें खुट्ट झालं कीं कसंसंच होतं. धसका बसतो. कोणी कांहीं बोलत असलं किंवा कुजबुजलं तरी मला असं वाटतं, कीं माझ्याचविषयीं त्यांचं बोलणं कुजबुजणं चाललं आहे. तो कोण बोआ तुझ्याकडे आला ह्मणून तूं खालीं आलास. तुला परत यायला उशीर लागला ह्मणून गंगाधरपंत खालीं आले. तेही लवकर परत आले नाहींत, तेव्हां आहे तरी काय तें पहावं असं मनांत येऊन मी खालीं आलें. मला वाटलं कीं कांहीं तरी माझ्याचसंबंधानं असावं."

वसंतरावानें तें तिचें सगळें बोलणें—अगदीं मोकळ्या मनानें केलेलें बोलणें-ऐकून घेतलें. त्याच्या मनांत त्यामुळें काय झालें असेल, तें त्याचें त्याला ठाऊक. परंतु बाहेरून त्यानें कांहीं एक न दाखवितां उलट मोठ्यानें हंसून ह्मटलें: "पद्माताई, हें काय हें ? असं मन जर अगदीं अधू करून घेतलंस तर एक क्षणभर तरी मनाला शांति मिळेल का ? भलतंच एखादं. तुझा काय संबंध आहे त्यांत, तें आपलं दुसरंच कांहीं काम आहे. त्याचा घरांतल्या कशाशींन् कुणाशीं संबंध नाहीं."

"असं कां बरं ह्मणतोस ?" पद्मावतीनें त्याला मध्येंच ह्मटलें, "आंत कोण आहे ? मला वाटतं गंगाधरपंत आहेत. त्यांना तूं आतां काय ह्मणालास, कीं तिला गंधवार्तासुद्धां लागूं द्यायला नको. तिला ह्मणजे कुणाला ? आणखी गंधवार्ता कसली ?"

हें तिचे प्रश्न ऐकण्याबरोबर वसंतराव फारच चकित झाला. एक पाऊलभर मागेंच सरला; परंतु आपली स्थिति झांकावी ह्मणून लागलींच तिला ह्मणतो: "हेंच तें, हेंच तें. मी काय बोललों ? त्याचा संबंध काय ? आह्मी आधीं काय बोलत होतों, तें कांहीं ठाऊक नाहीं, आणखी तूं आपला संबंध काय वेड्यासारखा जोडतेस ? तो एक गृहस्थ आला होता. त्याचं कांहीं काम आहे. तें गंगाधराच्या हातून होण्यासारखं आहे ह्मणून तो मला भीड घालायला आला होता. तुझा त्यांत संबंध नाहीं. मीन् गंगाधर दोघे आतां बाहेर जाणार आहोंत त्या कामाकरितां, तर आतां तुह्मी आपल्या स्वस्थ निजा जाऊन. बायका तरी काय संशयी बोआ ! नाहीं. गंगाधर, येरे बोआ व हें काय लचांड आहे हें पहा."

गंगाधराला वसंतरावानें या ज्या हांका मारल्या, त्या ऐकून गंगाधर बाहेर आला. पद्मावती तेथें उभी आहे हें पहाण्याबरोबर तोही आश्चर्यचकित झाला. परंतु वसंतरावानें त्याचा हात दाबून त्याला मोठ्यानें ह्मटलें: "पहा बुवा या पद्माताईचा काय समज झाला आहे तो ! ती समजते आहे कीं तो जो गृहस्थ आला होता त्यानं तिच्याचसंबंधानं कांहीं सांगितलं. आणि कांहीं तरी तिच्याचवर संकट आलं असून तें आपण तिच्याचपासून लपवून ठेवणार आहोंत. मी तुला आतां दारांतून बोललों कीं नाहीं, तें तिनं आपल्याकडे लावून घेतलं ! आतां काय ह्मणावं ? या मुंबईंत दुसऱ्याच्याच कामाबद्दल आपण बोलत असतांना हिला आपली स्वतःची शंका आली तेव्हां आतां काय ह्मणावं ? तूं तरी तिला आतां सांग, कीं तिचा कांहीं संबंध नाहीं म्हणून. आणखी आपण जाऊं, आपल्याला त्या गृहस्थानं बोलावलं आहे तिकडे. पद्माताई, अगदीं अगदीं तुमचा कांहीं संबंध नाहीं बरं. भलतंच कांहीं मनांत घेऊन आणखी आपल्या मनांत झुरूं नका. चला वर."

असें ह्मणून तो वर जाण्यासाठीं पुढें झाला. गंगाधरही त्याच्या पाठोपाठ चालला. तेव्हां पद्माही त्यांच्या मागून चालली. मंडळी वर गेल्यावर वसंतरावानें आपल्या आईला ह्मटलें: " आई, या पद्मानाईला नीट दोन गोष्टी समजावून सांग. हिचं मन अगदीं ठिकाणावर नाहीं. आह्मी दोघेही थोडे बाहेर जाऊन येतों. " परंतु त्याच्या आईचा डोळा लागला होता तें पाहून तो मालतीस ह्मणाला: "माले, तूं हिला आपल्या बरोबर आणलंस तें तिच्या मनाला विरंगुळा पडावा ह्मणून, का वाटेल तो संशय घेऊन उगीच मनाला धसका बसवून घ्यावा ह्मणून ? तीनू तूं आतां कांहीं तरी मजेचं पुस्तक वाचा, नाहीं तर कांहीं खेळ खेळा. "

गंगाधर व वसंतराव यांनीं झटझट आपले कोट चढवून तेथून पोबारा केला. आपण येथें जास्त वेळ थांबणें योग्य नाहीं, पद्मावतीनें आपल्याला आणखी कांहीं विचारलें तर आपल्याला कांहीं उत्तर देतां यावयाचें नाहीं, असा त्यांनीं विचार केला.

पद्मावती अगदीं स्तब्ध होती. तिला अगदींच बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें. आपण खालीं गेलों काय, ऐकलें काय ? आपल्या मनांत शंका आली काय ? आणि आपण भडाभडा ती बोलून दाखविली काय ? हें सगळें झालें कसें, हेंच तिला समजेना. तितक्यांत मालतीनें तिला काय झालें ह्मणून विचारलें. तेव्हां प्रथम ती कांहीं बोलली नाहीं पण मग तिनें मालतीला व तिच्या आईला स्पष्ट सगळें काय झालें, आपल्या मनांत काय आलें, आणि आपण वसंतरावाचे शब्द ऐकले त्यावरून आपला संशय कसा पक्का झाला, तें सांगितलें; आणि शेवटीं ह्मटलें: " वसंतरावाचे शब्द चमत्कारिक होते कीं नाहीं सांगा. ' तिला याची गंधवार्तासुद्धां कळूं द्यायची नाहीं ' असं कांहीं तो ह्मणाला. तेव्हां तिला ह्मणजे मलाच असं मला वाटलं. आणखी काय असेल तें असो, मला अजून देखील तसंच वाटतं आहे. वसंतराव मला सांगत नाहीं पण मालूताई, माझी अगदीं खात्री आहे कीं, ते ज्या कारणानं गेले आहेत त्यांत माझा कांहीं तरी संबंध आहे. माझे आतांशा ग्रहच तसे आलेले आहेत. "

" पद्मावती, तुझं कीं नाहीं मन अगदीं अधू झालं आहे. असं करून कसं चालेल ? ' तिला ' ह्मणजे तूंच कशावरून ? मी कशावरून नाहीं ? तूं सांगितलेलं तें ऐकल्यापासून माझं मन देखील कसं धाकधुक करायला लागलं आहे कीं, माझ्याच संबंधानं नसेलना कांहीं ? काय सांगावं. पद्मे, मी उगीच कांहीं तरी बोलतें आहे, असं नाहीं. माझ्या मनाला खरोखरीच मोठी हुरहुर लागली आहे. "

पद्मावती तें ऐकून व मालतीची चर्या खरोखरीच काळजीनें व्याप्त अशी पाहून हंसली व ह्मणते, " तुला हुरहुर ? आणि तुला गंधवार्तासुद्धां कळूं द्यायची नाहीं अशी गोष्ट तरी कोणती असायची ? माले, देवाची तुझ्यावर कृपा आहे, ती तशीच असूंदे. तूं सुखांत आहेस तशीच रहा. विनाकारण कांहीं तरी कल्पना करून आपल्या जिवाला हुरहुर कशाला लावून घेतेस ? मला आतां जन्माचीच हुरहुर लागली आहे, ती आणखी किती जरी वाढली तरी हरकत नाहीं. परमेश्वरानं तुला हुरहुरीपासून अगदीं दूर ठेवावं, आणखी तुझ्या वांट्याला जर कांहीं हुरहुर त्यानं घातली असली, तर ती सुद्धां माझ्या वांट्याला यावी. मी ती मोठ्या सुखानें घेईन,

तुला सुखी पाहून मी सुखी होईन. मला माझं निराळं सुख नको. पण तुला अणुरेणूइतकीसुद्धां चिंता किंवा हुरहुर लागूं नये—स्वप्नांतसुद्धां येऊं नये, असंच देवाजवळ मागतें, आणखी नेहमीं मागत राहीन. माले, तुझ्याखेरीज माझं ह्मणायला मला जगांत कोणी नाहीं. ती तूं सुखांत असलीस तरच मला आतां सुख. "

हें सर्व पद्मावती अत्यंत उत्साहाच्या उद्रेकानें व अंतःकरणपूर्वक बोलत होती. तिच्या तोंडून निघणारा प्रत्येक शब्द अगदीं उमाळा येऊन निघत होता. त्यांत कृत्रिमतेचा लवलेशसुद्धां नव्हता हें त्या वेळच्या तिच्या मुद्रेवरून—नव्हे मुद्रेवरल्या प्रत्येक रेषेवरून दिसत होतें.

मालती तें ऐकून स्तब्ध झाली. टक लावून तिच्याकडे पाहूं लागली. पहातां पहातां दोघींच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले व दोघींनीं एकमेकींस मिठी मारून खांद्यावर माना टाकल्या.

# प्रकरण ११ वें.

## कोण भेटलें ?



इकडे गंगाधर व वसंतराव दोघे घरांतून झपाट्यानें बाहेर पडले. ते बराच वेळ नुसते चालत होते. एकमेकांशीं अक्षरही बोलले नाहींत. बऱ्याच अंतरावर गेल्यावर वसंतराव गंगाधरास ह्मणालाः

" पद्मावती कांहीं विलक्षण चाणाक्ष आहे बोवा ! तिनं माझं एक वाक्य ऐकलं आणखी तेवढ्यावरून सगळा तर्क केलान् कीं हें सगळं आपल्यासंबंधाचं आहे. काय पहा पण तिचं दुर्दैव ! हा सगळा चाणाक्षपणा, हें सगळं चातुर्य, आणखी सगळं शिक्षण अगदीं वायां जाणार ! तो मूर्ख करंटा नवरा—त्याला हिची योग्यता कळूं नये आणखी त्यानं हिला टाकून...... "

गंगाधर मध्येंच त्याला ह्मणाला, "मला कीं नाहीं अशा दुर्दैवी बायकांना पाहिलं कीं त्यांच्या नवऱ्यांचा नुसता संताप येतो. पण मला वाटतं जांवईबोवांना एवढे शेफारून ठेवून असे—दगड ह्मणा, फाजिल ह्मणा—बनवायला वडीलच कारण. एक जांवयाचं असो, पण आतां हे चिरंजीव असे बनले. याला कोण कारण ? "

" अरे आबासाहेब फार सरळ माणूस. त्यांच्याकडे काय वांक ? " वसंतरावाचें हे वाक्य ऐकतांच गंगाधरपंत मोठ्यानें हंसलों आणि ह्मणतो:

" तुझी कमाल आहे बोवा ! अरे आबासाहेबांचा कांहीं वांक नाहीं ह्मणतोस ? मुलगे असे निघायला ते कारण. नाहीं तर मुलीसारखेच नसते का झाले ? पण आतां पहा हे आपण चाललों कशाला ते.—अरे आलोंच आपण. हेंच तें घर, त्या गृहस्थानं सांगितलं ह्मणतोस तें. "

वसंतराव त्या घराकडे पाहून ह्मणाला, " हो हेंच वाटतं. चला. "

दोघेही त्या घराच्या पायऱ्या चढून दाराजवळ गेले व दार ठोठावूं लागले.

तें घर अगदीं एका बाजूला होतें. तरी पण ती मुंबई शहरांतली एक बाजू अगदीं भुलेश्वर, मुंबादेवी किंबहुना गिरगांव वगैरे ठिकाणच्या इतकी गर्दीची नव्हती इतकेंच. मुंबईच्या गर्दीचा कोणास कांहीं विधिनिषेध वाटत नसतो. याचें कारण गर्दी असून गर्दी नसल्यासारखाच तेथें प्रकार असतो. गर्दीपासून आपल्या मनाची शांतता बिघडेल असें पहिल्यानें नवख्यास वाटतें, परंतु आठ पंधरा दिवस त्या गर्दींत राहून काम करण्याचें अंगवळणीं पडलें म्हणजे संपलें. मग अगदीं जत्रेच्या किंवा मार्केटाच्या गर्दींतसुद्धां आपलें काम आपण शांतपणें करूं लागतों. हा एक प्रकार झाला. परंतु गर्दी असून नसल्यासारखें वाटण्याचें दुसरें कारण जो तो आपापल्या कामांत गर्क असतो, दुसऱ्याकडे पहाण्यास त्याला अवसरच नसतो. यामुळें पंचवीस माणसांचे डोळे आपणावर असले, तरी आपण अगदीं एकांतांत आपलें काम करीत आहोंत असेंच आपणास वाटत असतें. गजबजीला कान निर्ढावून जाऊन त्या गजबजीचा परिणाम आपल्यावर होत नाहीं आणि आपण काय करतों आहों, काय नाहीं, हें कोणी पहात नाहीं अशी खात्री वाटत असल्यामुळें निर्वेधपणें काम करण्याचीही उमेद राहते. आपण अगदीं एकटे आहों असें समजून जसें माणसानें काम करावें, तसें काम चालतें.

मोठ्या थोरल्या गिरणींत प्रथमच पाऊल घातलें, ह्मणजे तेथल्या एंजिनांचा, चाकांचा, चात्यांचा आणि माणसांचा एकवटलेला प्रचंड आवाज ऐकला कीं या ठिकाणीं अशा खडखडाटांत, भोंभोंट्यांत, घरघराटांत, कचकचींत आणि फाटाफुटींत माणसें काम तरी कशीं करतात याचें आश्चर्य वाटूं लागतें. परंतु गिरणीचें काम कसें चालतें हें पहाण्यास अनुक्रमें सुरुवात करून एखादा भाग पाहिला नाहीं तों सर्व कामें अगदीं बिनबोभाट कशीं चालतात त्याचा अनुभव येऊन आपल्या पहाण्याच्या कामाकडे आपली तंद्री लागून आपणही तेथल्या गडबडीला पार विसरून जातों. एका यंत्राचे निरनिराळे भाग जसे एकमेकांच्या कामांत व्यत्यय न आणतां आपापल्या कक्षांत एकतानतेनें व एकतालतेनें त्यांना नेमून दिलेल्या गतींत चक्राकार, मागें पुढें किंवा खालीं वर फिरून आपलें कर्तव्य करीत असतात त्याप्रमाणेंच मुंबई शहरांतल्या माणसांचें आहे. यंत्राचा एक भाग दुसऱ्या भागाच्या कटकटीस वैतागून किंवा 'हें आपल्या शेजारचें यंत्र आपणाकडे कां पहातें ! ' म्हणून फुरंगटून बसत नाहीं. तशीच मुंबईतल्या लोकांची अवस्था आहे. जो तो आपली कक्षा पाहून तिच्यांत फिरत असतो ! दुसऱ्याच्या कक्षेकडे पहातही नाहीं आणि आपली कक्षा सोडीतही नाहीं. जीवनकलहाच्या भयंकर उत्कटतेमुळें कोणालाही आपलें काम सोडून दुसऱ्याकडे पहाण्यास फुरसतही नाहीं आणि इच्छाही नाहीं. जो तो आपल्या सुरसुरी-हुरहुरींत चूर असतो.

वसंतराव व गंगाधर मागील प्रकरणांत सांगितलेल्या घराजवळ गेले आणि आपल्याला भेटावयाला आलेल्या त्या माणसानें पत्ता सांगितलेलें व वर्णन केलेलें घर हेंच अशी मनाची एकवार इकडे तिकडे व वर खालीं पाहून खात्री करून घेतल्यानंतर त्याचें पुढचें दार ठोठावूं लागले. त्यांची ठोकाठोक सुमारें मिनीटभर चालली,

तरी कोणी दार उघडण्यासही येईना किंवा नुसतें ' कोण आहे ' असेंसुद्धां विचारीना. तेव्हां गंगाधर एकदां त्या दारापासून निघून रस्त्यावर आला. त्यानें एकवार चारही बाजूंस पाहिलें, आणि वसंतरावास ह्मटलें, "इतका वेळ ठोकूनही कोणी येत नाहीं, तेव्हां मला एकदां शंका आली, कीं आपण घर तर चुकत नाहूं ! पण घर तेंच. अगदीं-सुद्धां शंका नाहीं. तूं नवखा, कधींमधीं येणारा, पण मी आज पांच वर्षं मुंबईंत राहून जें काय संपादन केलं, तें हेंच. मुंबईच्या कान्याकोंपऱ्याची माहिती करून घेतली. तुला त्या माणसानं सांगितलेला पत्ता जर चुकत नसला, तर घर अगदीं नेमकं हेंच. तेव्हां आपण आपलं बंगाडोंगेट पुनः सुरू करूं. "

असें बोलून त्यानें पुनः दारावर ठोठावण्यास व मधून मधून " कोण आहे हो आंत ! " असें तारस्वरानें विचारण्यास सुरुवात केली. पुनः एक दोन मिनिटें त्यांची सरचत्ती सुरू झाली. परंतु कांहीं ठावठिकाणच लागेना. हा प्रकार तरी काय ? कीं आपल्याला कोणीं कांहीं सांगून फसविलें ? कोणी ओ देऊन काय आहे, काय नाहीं म्हणून विचारीना इतकेंच नाहीं, तर त्या घरांत कोणी माणूस आहे कीं नाहीं याचीच शंका वाटूं लागली. शेवटीं गंगाधर वसंतरावास ह्मणाला, " तुझें माझें तुझ्या त्या बंगल्यांतल्या दिवाणखान्यांत भाषण झालें तेव्हांच मीं तुला सांगितलें कीं हा माणूस अमुक अमुक दिसतो. मीं त्याला पाहिल्याबरोबरच ओळखलें, आणखी चपापलों.. वाटलें कीं हा लेकाचा वसंतरावाकडे काय म्हणून आला आहे ! परंतु तूं जेव्हां काय कारणांकरितां तो आला होता हें सांगितलेंस, तेव्हां मग तें आश्चर्य पार गेलें. पण मला आतां पुनः कांहीं चमत्कारिक शंका येते. तो जो बहाणा करून आला त्याच्याखेरीज दुसरेंच कांहीं लफडें त्याच्या मनांत करावयाचें असेल. तो माणूस असा आहे कीं भर दोन प्रहरीं सूर्य आपल्या डोक्यावर तळपत असला, आणखी आपले पाय खालीं भाजत असले तरी सुद्धां त्यानें जर सूर्य तळपतो आहे, कडक ऊन पडलें आहे असं ह्मटलें तर तो खरें बोलतो आहे कीं नाहीं याची शंका घ्यावी. तुला ऐकून ठाऊकच होती व्यक्ति म्हणा, तेव्हां आतां कांहीं जास्त सांगायला नको. "

वसंतराव तें ऐकून ह्मणाला: " बरं पण तें सगळं जरी असलं, तरी आपण पुढं काय करायचं ? इथें दाद लागत नाहीं म्हणून स्वस्थ का बसायचं ? का आपल्या जागीं परतायचं. इथें या दाराशीं ठोकठोक करीत किती वेळ राहणार ? पण त्या गुलामाचा हेतु तरी काय असेल ? त्याच्या मनांतून मीं पद्मावतीला घेऊन इथें यावं, असं होतं. तसंच त्यानं सांगितलं. पण माझ्या मनांत तसं करायचं येईना, आणखी तुझं तर निश्चूनच तसं मत पडलं तेव्हां मग आपण दोघे निघालों. आतां तूं ह्मणतोस यावरून मला असं वाटायला लागलं आहे कीं आपल्या घरांतून बाहेर पडल्यानंतर त्यानं आपण काय करतों आहोंत हें पहाण्यासाठीं माणूस ठेविला असेल आणखी आपण दोघे बाहेर पडलों असं पाहून त्यानं निश्चय केलेला दिसतो कीं, यांना द्यायचाच चांगला गुंगारा ! "

" असेल, अगदीं शक्य आहे. पद्मावतीला घेऊन तूं यावेंस याच हेतूनें आला असेल. आणखी पद्मावती मुळींच नाहीं. आपण दोघे उभयसुंभ त्यानें पाहिले तेव्हां

आपला डाव कांहीं साधत नाहीं असें समजून त्यानें दिला असेल गुंगारा. बाकी पहिला डाव कांहीं त्याचा गुंगारा द्यायचा नसावा. "

गंगाधर याप्रमाणें बोलून तेथेंच थोडासा थांबला. नंतर आपल्या मित्रास पुनः ह्मणतो: " मग काय आतां पुढें काय? आतां इथून नुसतंच जायचं? मला तर बोआ आतां जरा जास्तच चेव आला आहे कीं या घरांत कोण रहातात काय करतात याचा पक्का तपास लावायचा. आल्या वाटेनं नुसतं परत जायचं नाहीं. पण पहा, या मुंबईंत कशा प्रकारचे ठक लबाड असतात ते. त्यांतून हा रास्कल ( ठग ) कसा आहे याची थोडीशी माहिती मला आहे. ह्मणून तर काय आहे तें पक्कंच काढायचं असा विचार झाला आहे. तुझा काय विचार आहे? "

" मला नाहीं वाटत या भानगडींत आपण पडावं असं. " वसंतराव त्यास एकदम ह्मणाला: " मी आतां आपला घरीं जातों. तूंही पहिल्या बेताप्रमाणें आमच्याच तिथें नीज. आतां कुठें जातोस एकटाच आपल्या खोलींत? रात्र बरीच होत आली. आणखी आपण असेच इथें उभे राहिलों तर आपल्याबद्दलच कोणी संशय घेऊं लागतील आपल्या पाठीमागं. शिवाय आपण कांहीं तरी बहाणा करून निघालों आहोंत तेव्हां त्या दोघी पोरी आणखी आई काळजीच करीत बसल्या असतील. आपला बहाणा त्यांना खरा वाटून त्या स्वस्थ निजल्या असतील, असं स्वप्नांतसुद्धां आणूं नको हो. त्यांतून पद्मावतीबद्दल तर अगदीं शंकाच घेऊं नको. ती विलक्षण चाणाक्ष व चतुर आहे! त्यांच्या घरांत तीच ह्मणून टिकली. दुसरी एखादी मुलगी असती तर काय तिची अवस्था झाली असती, आणखी काय नाहीं. वडील आणखी मातुःश्रीचा स्वभाव अगदीं छत्तीसाच्या आंकड्या पलीकडे? बापाला वाटतं मुलीनं आपल्या इच्छेप्रमाणें वागावं. आईला वाटतं तिनं आपल्या सांगण्याप्रमाणें वागावं. खऱ्या दृष्टीनं पाहिलं तर मुलीला दोघांचाही स्वभाव आवडत नाहीं, दोघांचेही मार्ग आवडत नाहींत, पण ती दोघांनाही होतां होईतों दुखवीत नाहीं. त्यांत आणखी नवरोजी शेट इथें होते तेव्हां तर तिची अवस्था काय होती ती तिलाच ठाऊक. त्यांचा तृतीय पंथ होता इतकंच नव्हे, तर ते नेहमीं घोड्यावर, नेहमीं रागांत, संतापांत. आणखी राग संताप कोणावरही असला, आणखी कशावरूनही असला, तरी त्याचं पर्यवसान बायकोवर! असा कांहीं विचित्र प्रकार आहे. कशी त्यांतून निभावून चालली आहे, तें तिचं तिलाच माहीत! "

वसंतराव हें बोलत असतां गंगाधराचें चित्त कोणीकडे होतें हें त्यास जर कळतें, तर तो इतकें बोलताच ना. एकदम थांबला असता. जणूं काय जागा झाल्याप्रमाणें गंगाधर वसंतरावास म्हणतो: " आपण तर कांहीं बोआ आतां तुमच्या तिकडे येत नाहीं. तूं जा, त्या काळजी करीत बसल्या असतील तेव्हां तूं गेलास ह्मणजे तें सर्व ठीक होईल. मीं अगदीं निश्चय केला आहे, कीं या वेळीं या घरांत कोणी आहे कीं नाहीं याची चौकशी काढून त्या लुच्चाला गांठायचं. मी सकाळीं लवकर उठून तुमच्याकडे येईन. उद्यांचा दिवस आपल्याला आहे. त्यांत पुष्कळ गोष्टी करायच्या आहेत. सकाळींच येतों, मग परवां तेरवांपर्यंत मुळींच जाणार नाहीं. पण मला अगदीं

विलक्षण उत्सुकता झाली आहे या घरांत कोण राहतें, आणि काय आहे तें पहाण्याची. माझी पक्की समजूत आहे, का तो भामट्या आंत आहे. जें कांहीं साधायचं होतं तें कांहीं त्याला साधलं नाहीं. तेव्हां त्यानं आपल्याला असा हा गुंगारा दिला. मी या घराच्या पिछाडीला जाऊन वेळ पडली तर आंत शिरकाव करून घेईन. पण त्या लुच्चाला त्या मिस्किलाला बाहेर काढीन. या घराची पिछाडी येते कुठें, त्याचा विचार करतों आहें. "

हें त्याचें बोलणें ऐकून वसंतरावास चमत्कारिक झालें व तो गंगाधरास ह्मणतो: "भलत्याच बाबतींत तुझा दुराग्रह असतो. वास्तविक पहातां आतां परतच गेलं पाहिजे. इतका वेळ आपण हांका मारल्या. आणखीं किती वेळ तरी कुजबुजत उभे राहिलों. कोणा पोलिस शिपायाला जर उगीच शंका आली तर तो नेऊन बसवील कुठें तरी नेऊन आपल्याला. मग त्या लुच्चाची लुच्चेगिरी काढण्यासाठीं धडपडणारे आपणच लुच्चे ठरूं ! "

असें या दोघांचें भाषण चाललें आहे तोंच कोणी तरी त्या घराच्या दुसऱ्या मजल्याची एक खिडकी उघडली असा त्यांस भास झाला. ह्मणून ते वर पहातात, तों पटकन त्यांचे अंगावर एक पत्र पडलें आणि एकदम पुनः ती खिडकी लागून गेली. वीज चमकून लोपण्याला जितका वेळ लागतो, तितका वेळ सुद्धां या कृत्याला लागला नाहीं. खिडकी उघडल्याचा भास त्यांना झाला नसता, तर असेंच वाटलें असतें, कीं तें पत्राचें पाकीट आकाशांतून पडलें असावें. पत्र पडलें तें गंगाधराच्याच डोक्यावर पडलें. त्यानें तें घेतलें आणि आतां कोठें तरी वाचलें पाहिजे ह्मणून ते दोघेही विचार करूं लागले. आपल्याकरितांच हें पत्र कोणी तरी त्या खिडकींतून टाकलें आणि त्या मिस्किलाचेंच तें कृत्य असावें याबद्दल त्यांच्या मनाची खात्री होती.

गंगाधरपंताला विडीचें व्यसन असल्यामुळें त्याच्या खिशांत आगपेटी होतीच. "थोडं बाजूला जाऊन आपण एक काडी ओढं आणि तिच्या उजेडांत पत्रांतला मजकूर पाहूं. लांबलचक असलं तर कुठें तरी दिव्याखालीं जाऊं. नाहीं तर काय तें समजेलच. " असें गंगाधरानें ह्मटलें व लागलीच आगपेटी काढून एक काडी पेटवून धरली. वसंतरावानें पाकीट फाडून आंतल्या पत्राची घडी आधींच उलगडून धरली होती. पहातात तों एक आगकाडी ओढून ती जळून जाण्याच्या आंत वाचून होण्याइतकाच मजकूर त्या कागदावर होता.

" अरे, इथें कशाला आरडत ओरडत बसलां ? आपल्या घरीं जाऊन पहा. ज्या कामाकरितां तुह्माला इथें आणलं तें काम आमच्या मनाबरहुकूम झालं सुद्धां. " चिठ्ठी वाचतांच दोघेही नुसते एकमेकांकडे पाहूं लागले. हा प्रकार काय आहे त्यांस कांहींच समजेना ! "आपल्याला ज्यानं इथें बोलाविलं तोच इसम हें लिहितो काय ? आपण त्याच्या सांगण्याप्रमाणें इथें आलों आणखी त्यानं असं कां करावं ? त्याचं काम होतं काय आणि त्याच्या व आपल्या भेटीच्या आधींच त्याच्या मनाबरहुकूम काम झालं काय ? " असे विचार त्यांच्या मनांत एकामागून एक येऊं लागले. शेवटीं गंगाधरपंत ह्मणतो:

" मीं त्याचा तपास केला आहे काय. आहे तो. त्याला जें काय पाहिजे होतं तें कांहीं आपल्या हातून त्याच्या इच्छेप्रमाणें साधलं नाहीं. अर्थात् त्यानं आपल्याला हा

असा गुंगारा दिला. आतां घरीं जाऊन पहा ह्मणून काय त्यानें लिहिलें आहे तें मात्र जाऊन पहा. मला तर्क होतो आहे पण तो बोलून दाखविण्यांत अर्थ नाहीं. "

" कां ? अर्थ कां नाहीं ? काय तुझा कयास आहे तो सांग तर खरा ! "

" कयास एवढाच, कीं त्याच्या ह्मणण्याप्रमाणें तूं आणखी पद्मावती दोघांनींच यायला पाहिजे होतं, पण तिला तुह्मीं आणलं नाहीं. आणखी तिच्याऐवजीं मला आणलं. तेव्हां त्याचा डाव फसला. त्याची खरी इच्छा तूं यावंस अशीसुद्धां नाहीं. पद्मावतीनं यावं. तुझ्यावांचून किंवा दुसऱ्या कोणाला बरोबर घेतल्यावांचून ती येणारच नाहीं असं वाटल्यावरून तूं आलास तर हरकत नाहीं, असं त्यानं सांगितलं. तूं ये ह्मणून सांगितलं. बाकी त्याचा खरा डाव तिला एकटीला गांठावं हाच. आणखी आपण इकडे आलों, तेव्हां आपल्याला इकडे असं गुंतवून ठेवून त्यानं घरीं जाऊन एकट्या पद्मावतीची गांठ घेऊन त्याला काय साधायचं तें त्यानं साधलं असावं किंवा हा इथेंच असला, तर याच्या साथीदारानं साधलं असावं, हा माझा तर्क आहे आणखी तो नव्याण्णव हिश्शांनीं बरोबर आहे. घरीं जाऊन पहा ह्मणण्याचा अर्थ दुसरा कांहीं सुद्धां मला वाटत नाहीं. "

गंगाधराचें असें बोलणें झाल्यानंतर त्या दोघांनीं ठरविलें, कीं आतां आपण येथेंच उभें राहण्यांत कांहीं शहाणपणा नाहीं. आपण आपला घराचा रस्ता सुधारावा तें चांगलें असा ठराव करून ते निघाले. गंगाधरपंताचें पहिलें बेत बाजूला राहिले. त्याला वाटलें, कीं कदाचित् आपली जरूरी घरीं गेल्यावर पुनः लागेल.

दोघेही घरीं आले, तों दारापाहल्या त्या बैठकखान्यांतच पद्मावती अत्यंत सचिंत अशी बसलेली. या दोघांपैकीं वसंतराव त्या दारांत शिरतांना पुढें होता. त्याची दृष्टि पद्मावतीवर एकदम गेली. त्याबरोबर तो फारच चपापून मागें सरला. परंतु क्षणांत आपल्या भानावर येऊन तो एकदम पद्मावतीस ह्मणालाः " पद्मावती, तूं खालीं कां आलीस आणखी इथें बसून काय करिते आहेस ? तुला हा ताप नको, तूं अगदीं निश्चिंत असावंस ह्मणून आह्मी बाहेर गेलों आणखी तुला जो काय उपसर्ग आणखी ताप पोंचायचा तो पोंचलाच ह्मणायचा. काय चमत्कार आहे बोआ ! तूं अशी अगदीं स्तब्ध कां ? काय झालं मला सांग. "

त्याचें तें बोलणें प्रथम पद्मावतीच्या कानीं पडलेंच नाहीं असें त्यास वाटलें. इतकी ती अगदीं स्तब्ध होती. अगदीं अचेतन दिसली. पुढें थोडक्याच वेळांत तिला असें वाटलें असावें; कीं आपल्याला कोणी कांहीं तरी विचारतें आहे म्हणून ती एकदम त्या दोघांकडे चमत्कारिक तऱ्हेनें पाहूं लागली कीं जणूं काय तिनें त्यांना ओळखलेंच नाहीं. अगदीं चमत्कारिक स्वप्नाचा अनुभव घेत असलेल्या झोंपेंतून एकदम जागें झालें म्हणजे मनुष्य जसें कावरें-बावरें होऊन पाहूं लागतें, त्यास आपल्या पुढली मंडळी स्वप्नांतली कीं जागेपणाची हें समजेनासें होतें आणि त्या मंडळीची पक्की ओळखच पटत नाहीं, तशीच या प्रसंगीं पद्मावतीची अवस्था झाली. परंतु असा प्रकार किती वेळ चालणार ? ती थोडक्याच अवकाशांत भानावर आली आणि कपाळाला आंठ्या घालून उठून उभी राहून वसंतरावास ह्मणाली: " मला

सगळं कांहीं समजलं. ज्यानं मला भेटण्यासाठीं घेऊन या म्हणून तुला सांगितलं तो मला इथें येऊन भेटला. माझी भेट कां हवी होती, तें त्यानं मला सांगितलं. माझ्या भेटीकरितां ह्मणून त्याच्या सोबत्यानं तुझी गांठ घेतली, पण तूं तर मला कांहींच न कळवितां—मीं माझा संशय तुला स्पष्ट बोलून दाखविला असतां निघून गेलास. माझा कांहीं संबंध नाहीं असं मला सांगितलंस. तूं गंगाधरपंताला घेऊन गेलास. अगदीं परक्या माणसाच्या देखत त्यांच्या मनांत सगळ्या गोष्टी सांगायच्या नसल्या तर त्यांनीं केलें हेंच बरोबर नव्हे का ? मला तो येऊन भेटला. काय सांगायचं तेंही त्यानं सांगितलं. आतां मला त्याचं कांहीं... पण मी तुला कांहीं सांगणार नाहीं. कोणाला कांहीं सांगणार नाहीं अशी शपथ त्यांनी माझ्याकडून वाहून घेतली आहे ! ”

इतकें बोलून पद्मावती आपले डोळे सर्भोंवार फिरवून अगदीं गप्प बसली.

---

# प्रकरण १२ वें.

## रावसाहेब गिरिधरपंत.



रावसाहेब गिरिधरपंत आपल्या घरीं सकाळीं आठाच्या सुमारास चहापानाच्या तयारींत होते. रावसाहेब चहाचे व सोंगट्याबुद्‌बळांचे मोठे शोकी. ते शाळाखात्यांतले एक अधिकारी होते. परंतु सरकारानें त्यांच्या जागेकडे नेमून दिलेल्या कामास लागणाऱ्या नियमित वेळेबाहेर, ते शिक्षणासंबंधीं काम तर लांबच राहो, परंतु विचारसुद्धां करून आपल्या अंगास किंवा डोक्यास शिणवीत नसत. त्यांची कांहीं चकाटपिटी व पत्तेपिटी मंडळी असत. त्यांच्या संगतींत, चहा पिण्यांत, पत्ते पिसण्यांत, सोंगट्याबुद्‌बळें खेळण्यांत त्यांचा खाजगी वेळ जात असे. रावसाहेबांचें काम असें असे कीं, त्यांस तें करण्यास चार तास पुरत. यामुळें सकाळीं तास दोन तास, आणि संध्याकाळीं पांच वाजल्यापासून नऊ वाजेपर्यंतचे त्यांचे चार तास त्यांच्या या स्नेही मंडळीच्या संगतींत जात असत. सकाळीं पत्तेपीस, सोंगटीपीट किंवा प्यादेंपीट फार क्वचित् होत असे. परंतु चहापिटीच्या वेळीं कोणी आल्यास चकाटपिटीची मात्र रेलचेल उडे. संध्याकाळीं पांच वाजल्यापासून पुनः चहाचें आधण सारखें टटरटत राहून पत्ते, सोंगट्या व बुद्‌बळें यांचा कीस पाडण्यास त्यांचे दहा पंधरा शेलके स्नेही जमून खेळाची, चहाची अगदीं घनचक्कर चाले. हा क्रम रोजचा झाला. परंतु शनिवारीं दोन प्रहरीं चार वाजल्यापासून जी घनचक्कर सुरू व्हावयाची ती ती गोल्डन नाइट उलटून रविवार, जो साखसुरत सुट्टीचा दिवस, त्या दिवशीं संध्याकाळीं आठ वाजल्यानंतर

ओसरूं लागावयाची. तोंपर्यंत पत्ते, फांसा किंवा ग्यादें सप्ताह करणाऱ्या वारकऱ्यांच्या विण्याप्रमाणें खालीं ह्मणून पडावयाचें नाहीं. रावसाहेबांच्या घरीं अध्ययन आणि अध्यापन, शिष्य आणि शासन, पठन आणि पाठन, विद्या आणि व्याख्यान यांखेरीज दुसऱ्या विषयांचें नांव सुद्धां निघत नसावें असें परकी माणूस सहजच समजे व अपेक्षी, परंतु तोच दोन दिवस रावसाहेबांचा दिनक्रम पाहून गेला ह्मणजे त्याची भुरळ पार जाई. कारण या वर सांगितलेल्या गोष्टींचा गंधसुद्धां रावसाहेबांच्या उंबरठ्याच्या आंत पाऊल टाकल्यानंतर आला तर शपथ ! रावसाहेबांशीं शाळामास्तरांचा संबंध फार. तेव्हां अर्थात् त्यांचे यांच्या घरीं हेलपाटेही फार व्हावयाचे. परंतु त्यांपैकीं कोणा मास्तरानें शिक्षणासंबंधानें कांहीं प्रश्न काढला, कीं रावसाहेबांनीं ह्मणावें, " मास्तर, आह्मी आपल्या शाळेंत जेव्हां शाळातपासणीसाठीं येऊं, तेव्हां यासंबंधानें बोला, किंवा सरकारानें ऑफिशियल टाइम जो आह्मांला नेमून दिला आहे त्या टाइमांत आह्मांला भेटून काय तुमची शंकानिवृत्ति करून घ्यायची असेल ती करून घ्या. आह्मी आपला खाजगी वेळ असल्या कामांत खर्चूं इच्छीत नाहीं. तुह्मांला या आमच्या खेळांपैकीं कांहीं येत असेल तर बोला. बिझीक येतें ? निदान सातहाती डाव तरी येतो ? नाहीं तर शिका, आणखी मग या. " रावसाहेबांनीं असें ह्मणावें आणि बाकीच्या त्यांच्या पत्तेपिस्यांनीं रावसाहेबांचें तें मोठें विनोदी भाषण झालें ह्मणून हॉ हॉ हॉ हॉ पासून तों हिः हिः हिः हिः पर्यंत सर्व सुरांत हंसून त्या मास्तराच्या केंविलवाण्या तोंडाकडे पहावें !

रावसाहेब गिरिधरपंतांजवळून मास्तरांस बदलीचें, बढतीचें किंवा रजेचें कांहीं काम करून घ्यावयाचें असलें तर त्यांस सगळ्यांत उत्कृष्ट उपाय ह्मणजे रावसाहेबांच्या घरीं जेव्हां बनेल तेव्हां येऊन या चहाचटी व खेळकुडी मंडळीच्या तैनातींत आपला रिकामा वेळ घालवावा. शनिवारीं तिसऱ्या प्रहरापासून तों सोमवारीं सकाळपर्यंत उडणाऱ्या घनचक्रींत अशा प्रकारें सेवा करणारे कांहीं मास्तर रावसाहेबांच्या घरीं असत. हे मास्तर सरकारी नोकर खरे, परंतु रावसाहेबांच्या घरीं राबण्याचें काम फार उत्सुकतेनें करीत आणि त्याबद्दल त्यांस बक्षिसी ह्मणजे रावसाहेबांच्या कानाशीं लागण्याचा अधिकार व संधि हीं मिळावयाचीं ! कोणा मास्तराला किती शिकवण्या आहेत, कोण मास्तर काय करतो, कोणाचें कोणाकडे जाणें येणें व संधान आहे, यासंबंधाची खडानूखडा माहिती या मास्तरांच्याकडून रावसाहेबांस मिळावयाची व या माहितीवर त्या मास्तरांचें बरें वाईट व्हायचें तें व्हायचें. कोणा मास्तराच्या शाळेंतील प्रत्यक्ष कामावर त्याच्याबद्दलचें रावसाहेबांचें मत बनेल अशी अपेक्षा त्यानें करूं नये. रावसाहेब जिल्ह्याच्या ठिकाणच्या म्युनिसिपालिटींत असल्याकारणानें अर्थातच स्कूल बोर्डाचे चेअरमन होते. त्यामुळें म्युनिसिपालिटीच्या शाळांतील मास्तरांचे सर्व लगाम त्यांच्या हातींच होते. रावसाहेबांच्या घरीं दररोज दर शनिवारीं व रविवारीं आणि कांहीं लग्नकार्य निघालें तर कामकरी मंडळीची वाण ह्मणून नाहीं. रावसाहेबीणबाईस असें होई कीं, इतके आपखुषीचे नोकर न आले तर बरें ! असो. परंतु हें रावसाहेबांचें जनरल पुराण फार झालें असें वाटून वाचक कदाचित् कंटाळतील तेव्हां नुसतें त्यांच्या चरित्रक्रमाचें शब्दचित्र देण्यापेक्षां आतां त्यांच्या

चरित्रांतील एके सकाळचा चालता बोलता देखावाच पुढें ठेवतों.

प्रारंभीं सांगितलेंच आहे कीं, रावसाहेब आपल्या चहाच्या गडबडींत होते. ' रावसाहेबांच्या घरच्यासारखा चहा कोठें सगळ्या गांवांत तर काय परंतु सगळ्या हिंदुस्थानांत होत असेल कीं नाहीं, याची शंकाच आहे, असें तेथें चहा पिऊन चटावलेली मंडळी ह्मणत व यामुळें चहा करण्याचे वेळीं रावसाहेब अगदीं स्वतः बसून, आधण ठेवण्यापासून तों चहा गाळून पेल्यांत ओतून साखरदूध प्रमाणांकित घालीपर्यंत सर्व गोष्टी हातानें करीत किंवा आपल्या नजरेखालीं करवीत; निदान स्वतः चहा घेण्याचे वेळीं तरी सर्व तंत्र स्वतः चालवून चहा तयार करून ते घेत. यावेळीं त्यांची वृत्ति मोठी खुषींत असे' यामुळें त्यांच्यापासून एखादें काम करून घेण्याची इच्छा करणारी मंडळी आपली शिफारस पुढें मांडण्यास ही वेळ साधीत असे.

रावसाहेबांनीं आपल्या एका स्वयंसेवक मास्तराकडून स्वच्छ पाणी आणून आपल्या हातानें स्टोव्हवर ठेविलें होतें व ते स्वतः जवळच एका पाटावर बसले होते. समोर आणखी कांहीं पाट मांडून ठेविले होते. चहाचे पेले, बशा त्यांच्यापुढेंच एका मोठ्या ट्रेमध्यें ( जस्ती रंगी तबकांत ) ठेविल्या होत्या. रावसाहेबांचीं तीन मुलें पलीकडे बसलीं होतीं. रावसाहेब मधून मधून एखादी बशी उचलून नीट न्याहाळून पाहून म्हणत: " कां, मोर मास्तर ! तुह्मी पेले बरोबर पुशीत नाहीं. बशा पुशीत नाहीं. हें पहा बशीला काय लागलें आहे तें ? अरे तुला नुसते बशी पेलेन् चमचे धुवून पुसून ठेवतां येत नाहींत, तर तूं पोरें संभाळतोस कशीं ? " मोर मास्तर तें ऐकून हंसला, जणूं काय रावसाहेबांनीं आपला मोठा मरातब केला असेंच त्याला वाटलें असावें, असा त्यानें चेहरा केला, आणखी ह्मणतो, " हे बाबासाहेब, आणखी या ताराबाई या भांड्यांना वारंवार हात लावितात त्याला काय करावं ? आपण माझ्या ताब्यांत हीं भांडीं द्या. मी फडताळांत टाकून जानव्याला किल्ली घालून ठेवतोंन् आयत्या वेळीं काढून देत जाईन. मग पहा बरें, कशीं भांडीं राहतातन् टिकतात तीं ! इंग्लंडांत कांहीं कांहीं कुटुंबांत शंभर दीड दीडशें वर्षांचीं जुनीं चिनी भांडीं अजून वापरलीं जातात, असं मीं ऐकलं आहे. तसा आपला लौकिक होईल. " रावसाहेबीणबाई ऊर्फ वहिनीबाई तेथें पलीकडेच होत्या. त्या मधेंच म्हणाल्याः " मोर मास्तर, अहो आयती वेळ म्हणजे कोणती हें एकदां सांगाल का ? सकाळीं उजाडल्यापासून तों रात्रीं बारा वाजेपर्यंत मेली सगळी आयती वेळ ! जसा कांहीं चहाचा —भलताच शब्द येत होता आतां तोंडांत, पण नाहीं म्हणत—आपली चहाचं गुन्हाळच ह्मणतं. मग तीं भांडीं टिकावीं कशीं आणखी स्वच्छ रहावीं तरी कशीं ! त्या पोरांचीं कां उगीच नांवं घेतां ? "

रावसाहेबांनीं तें पत्नीचें भाषण ऐकून ह्मटलेंः—" आमचं चहाचं गुऱ्हाळ असो, कीं गुत्ता असो—तूं नाहीं म्हणत तर तो शब्द मी ह्मणतों—तुला कांहीं त्याचा उपसर्ग आहे का ? आह्मी आपला आह्मी करतों, पितों, लोकांना देतों, तुला देतों, तुझ्या मुलांना देतों. कायरे बाब्या, हिला आहेरे कांहीं चहाबद्दल आपला उपसर्ग ? कायरे मोरमास्तर ! बोल लेका. "

बाब्या आपल्या मातुःश्रीकडे पाहून हिः हिः हिः करून हंसला. मोरमास्तर—केवढी आपल्यावर रावसाहेबांची मेहरबानगी ह्म

णून फुगून जाऊन—फिदिफिदला. रावसाहेबांनीं आपल्यास " बोल लेका " ह्मटलेलें ऐकण्यास दुसरे कोणी मास्तर नाहींत याबद्दलच त्याला खेद झाला. तसा एखादा जरी मास्तर असता, तरी आपला कार्यभाग झाला असता. कारण त्यानें तें सर्व इतर मंडळीस निवेदन केलें असतें, हें त्याच्या मनांत आलें.

एवढा वरचा संवाद होतो आहे, तों आधण सळसळूं लागलें. त्याबरोबर रावसाहेबांनीं मोरमास्तरांकडे पाहिलं व ह्मटलें: " मोरमास्तर, अरे नुसता पहातोस काय लेका ! आधण सळसळूं लागलंना ? चहादाणींत थोडं घालून आधीं चहादाणी गरम कर. मग चहादाणी विसळून ते पाणी टाकून दे. आणखी मग आंत सहा चमचे टाक. त्यावर थोडं आधण टाक. आणखी मग दहा सेकंद वाट पाहून मग चहादाणींत सगळं आधण ओत. तुला गुलामा, आज किती दिवस चहा करण्याचं ऑब्जेक्ट लेसन ( वस्तुपाठ ) देतों आहे ! हें जे आतांशा ऑब्जेक्ट लेसनचं खूळ आलं आहे तें हेंच दुसरं काय ? हं चल आटप. मुसलं चहाकॉफीचं दुकान जर काढलं मी तर असा नफा मारीन—पांच सातशें रुपये दरमहा ! आणखी लोकांकडून असं म्हणवीन की, चहा प्यावा असा यांच्याच दुकानीं. "

तें ऐकून वेंडेबाकडें तोंड करून वहिनीबाई ह्मणतात: " हें काय हें असलं बोलावं ? पेन्शन घ्यायचे दिवस आले आणखी चहाचं दुकान काढायच्या कसल्या गोष्टी बोलाव्या ? "

" त्यांत काय झालं रे मोरमास्तर ! " रावसाहेब मोठ्यानें हसून ह्मणतात: " पेन्शन घेतलं कीं, तो धंदा वाईट नाहीं. मोरमास्तर, तुला मी त्या दुकानाचा म्यानेजर करीन बरं का ! अरे उचल, उचल गुलामा तें आधण, आणखी ओत. छे, छे, छे, बिघडला आज चहा. पहिल्या उकळीसरसं आधण उचलून घेतलं पाहिजे. किती तुझाला सांगावं नि शिकवावं ? संपलं, आज कांहीं चहा मनाजोगा होत नाहीं. आतां आपलं कांहीं तरी पाणी-कुळकवणीच तें—घोंटावं लागणार आहे. "

इतक्यांत बाहेरून " काय रावसाहेब ? दोन पाहुण्यांची आपल्या चहापोईवर सोय होईल का ? " असे शब्द आले. वहिनीबाई लेकुरं आणि लेकी आणि दोन व्यक्ति ओळखीच्या मनुष्यांनीं ' या बसा ' ह्मणण्यापूर्वी आणि तें बोलल्यापैकीं दोन पावलें पुढें सरसावल्या. पाहुणे ज्या व्यक्तीचे वर दिलेले शब्द कानीं पडले तीच व्यक्ति आपल्याबरोबर आलेल्या गृहस्थाकडे वळून ह्मणते, ' आतां पुण्याकाळचे लोक अन्नछत्रें, पाणपोया घालीत, आमच्या रावसाहेबांनीं आपली चहापोईच ठेवून पुण्याची जोड चालविली आहे. कृष्णाजीपंतदादा, आह्मी तर कधीं चहाला शिवत नाहीं, पण आपला नेम चालला एवं गडबडतो चोखा. तोंपर्यंत चहा लागला काय होतो ह्मणतां !—त्यांतून सकाळ संध्याकाळच्या चहाच्या वेळीं आलं ह्मणजे तो चहा मिळतो तो तर आहेच आपला ! रावसाहेब, मी आपलं खरं सांगतों बाबा. मला या चहाचा मोठा तिटकारा. हा आपला आमच्या देशांत घुसला आणखी वाला आमचे लोक सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं घरांत ढोंसीत असतात, याबद्दल फार वाईट वाटतं. मी घरीं तर कधीं आणीत नाहींच, पण बाहेरसुद्धां कुठें घेत नाहीं. मात्र आपल्या चहानं मला जिंकलं. कधीं कधीं इच्छा होते, आणखी तशी इच्छा झाली कीं, ही वेळ साधण्यासाठीं धड-

पड करतों. बाकी आपला रोजचा संध्याकाळचा, आणखी शनिवार आदितवारचा चहा कांहीं कमी असतो असं नाहीं, पण खुमास निराळीच!" रावसाहेब तें भाषण ऐकून ह्मणतात, "दिगंबरपंत, तुह्मी पूर्व जन्मीं कोणातरी रजपूत राजाच्या पदरीं भाट होतां नाहीं तर कवि होतां मला वाटतं. त्याशिवाय इतकं कवित्व तुह्मांला सुचायचंच नाहीं. अहो, तुमच्यासारखी चार मंडळी येतात जातात, त्यांना घटकाभर मौज वाटावी म्हणून हें हल्लींचं खूळ आम्हीं ठेवलं आहे. तुमच्या एकंदर मतांचा विचार केला ह्मणजे तुम्ही चहा घेतां याचंच मला आश्चर्य वाटतं!"

दिगंबरपंत "असं तर खरं बोवा" असें ह्मणून आपल्या स्नेह्याकडे डोळे मिचकावून व तोंड रुंदावून मोठ्यानें खोखो हंसले.

रावसाहेब पेल्यांतून दोन दोन चमचे साखर घालून चहादाणींतून चहा ओतूं लागले, तों दिगंबरपंत एकदम मोरमास्तराकडे वळून ह्मणतात, "मोरमास्तर, आमचं नाहीं का तुह्माला ठाऊक? आह्मी या खापरांतून चहा पीत नाहीं. रुप्याचं टंबरेल नाहीं तर पातेली आणा वहिनीबाईपासून मागून. चांगलीं आपलीं जुनीं सोन्यारुप्याचीं भांडीं टाकून हीं भिकारडीं खापरं, अहो गुळगुळीत लखलखीत झालीं आणखी चिनांतून नाहीं स्वर्गांतून आलीं, ह्मणून काय झालं? खापरंच तीं--मग आपलीं कुंभाराचीं कां नाहीं घेत? काय आहे आपल्या खापरांत आणखी या खापरांत अंतर! सांगा. मी आपला उगीच नांवं ठेवतों असं नका समजूं, पण हीं खापरं नाहीं तर काय तें मला सांगा."

रावसाहेब त्यावर कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं मोरमास्तराला "आण बाबा यांच्याकरितां एक रुप्याची पातेली नाहीं तर वाटी. या लोकांशीं वितंडवाद घालीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं." असें ह्मटलें.

मोरमास्तरांनीं झटकन् आंत उडी मारली व वहिनीबाईजवळ रुप्याची वाटी मागितली. वहिनीबाईनीं "या रिकामटेकड्यांच्यासाठीं मी नाहीं वाट्यानूफिट्या काढीत. ह्मणे हीं खापरं! आमच्या इथें खापरांत चहा पितात तर येतोस कशाला ह्मणावं इथें? मास्तर हें फुलपात्र न्या हवं असलं तर. वाटलं तर पिईल त्यांत" असें म्हणून त्यांनीं पितळी फुलपात्र दिलें. फुलपात्रांत चहा भरून पुढें ठेवणाऱ्या मोरमास्तराकडे दिगंबरपंतांनीं डोळे तांबारून पाहिलें. नंतर चहा घेत घेत दिगंबरपंत रावसाहेबांस ह्मणतात, "रावसाहेब, आज मी आतां जो आलों आहें तो आपल्याजवळ कांहीं विशेष बोलण्यासाठीं आलों आहें." "मग बोला. नको कुणीं ह्मटलं आहे? आज बोलायला आला आहां आणखी रोज काय करतां! काय कृष्णाजीपंतदादा! आपण नाहींच घेतना चहा? एकदां तरी घ्या." असें रावसाहेबांनीं विचारिलें.

कृष्णाजीपंतदादा जरा हंसून म्हणतातः "कशाला रावसाहेब? न जाणों कदाचित् या दिगंबरपंतासारखी आह्मांलाही चटक लागायची, आणखी मग आमच्या घरांत तरी हें शिरायचं भूत नाहीं तर आह्मांला तरी रोज आपल्या घरीं आणायचं ओढून! त्यांत सध्यां आह्मी आहोंत विवंचनेंत. कुटुंब फार अस्यवस्थ आहे. पण या दिगंबरपंतानं आग्रह करून ओढून आणलं. त्याला कांहीं नाजूक बोलायचं आहे आपल्याशीं."

"नाजूक! बोलूं द्या कीं काय नाजूक साजूक काय ते बोलायला आले असतील

तें. आपल्याजवळ काय कुणी वाटेल तें बोलावं. " रावसाहेब सुपारी कातरून तोंडांत टाकतांना ह्मणाले.

आंत मोरमास्तर भांडीं ठेवावयाला गेला त्यास वहिनीबाई म्हणतातः " हे सगळ्या मुलखाचे कुटाळ कशाला आले आहेत सकाळींच उठून ? इतकीं माणसं येतात इथें पण ही जोडी आली कीं, माझ्या तळपायांची तिडीक मस्तकाला जाते ! "

इकडे रावसाहेब वर सांगितल्याप्रमाणें बोलल्यावर दिगंबरपंत ह्मणतातः " रावसाहेब, आपण या ज्या मास्तरणी नेमतां त्या नेमतां तरी काय पाहून ? "

रावसाहेब कांहीं बोलले नाहींत.

दिगंबरपंतास त्यामुळें उत्तेजन येऊन तो आणखी पुढें ह्मणतोः "आमच्या घरांत एक तुमची मास्तरीण रहात असते. नुकतीच वर्ष सहा महिन्यांत तुमच्या इकडे लागली आहे. तिचं रूप पाहून तिला नेमलीत का काय ? "

असें बोलून स्वारी खो खः खः करून हंसली.

कृष्णाजीपंतदादा त्यांस हळूच चिमटा घेतल्याप्रमाणें ह्मणतात, " अहो, कुणी कसाही तपोनिष्ठ असला, तरी रूपाचा परिणाम व्हायचाच." दिगंबरपंत पुढें ह्मणतात, " तें काय वाटेल तें असो, आमचं आपलं पहाणं लोकमताच्या दृष्टीचं आहे. म्हणून आम्ही आपले तुह्मांला सांगायला आलों आहों. संध्याकाळीं कधीं कधीं येतों, तेव्हांच हें सांगायचं माझ्या मनांत येतं, परंतु तेव्हां मंडळी फार असते. ती वेळ बरी नाहीं, म्हणून आज मुद्दाम आतां आलों. आम्हांला तुमचं हें आचरट स्त्रीशिक्षण मुळींच नको. परंतु त्यांत आणखी अशा बायका तें शिक्षण द्यायला असल्या ह्मणजे मग काय विचारतां ! निदान मीं तर बोवा यासंबंधानं वर्तमानपत्रांत लिहिण्याचा कृतनिश्चय केला आहे, पण आपण पडलां त्यांतले अधिकारी. आपल्या घरीं आह्मी नेहमीं येणार. तेव्हां आपल्यावर दूषण येईल असा लेख लिहिण्याच्या आधीं आपल्याला कळवावं ह्मणून आलों. काय कृष्णाजीपंतदादा, असाच आपण केला कीं नाहीं विचार ? "

" तुह्मीं केलात. मीं नाहीं. " कृष्णाजीपंतदादा ह्मणतातः " माझं तर ह्मणणं असं आहे, कीं या बाबतींत आपण पडूं नये. अहो, हें असंच चालायचं. हा स्त्रीशिक्षणाचा प्रकाश असाच पडायचा. एखादी मास्तरीणबाई एकाएकीं रजा मागते तर ही कां मागते, काय नवल विशेष आहे, याबद्दल चौकशी करावी असं यांच्या मनांत येत का नाहीं ? येतच असलं पाहिजे. पण तिकडे लक्ष द्यायचं नाहीं, असा त्यांचा पक्का विचार ठरलेला. कानाडोळा करायचा, असा आपला ठरावच. अन् मी ह्मणतों एका दृष्टीनें हें वाजवीच नाहीं का ? उद्यां हे जर अशा चौकशा करूं लागले तर कामाला मास्तरीण रहाणार नाहीं एक. तें कांहीं नाहीं हो रावसाहेब, आपण याचं या बाबतींत कांहीं ऐकूं नये. आपल्याकडे उद्यं यांच्या घरांतली ती मास्तरीण रजा मागायला आली, तर ती कांहीं योग्य सबबीवांचून कां येईल ? आणखी ती स्वतः रावसाहेबांच्या पुढें येऊन रजा मागूं लागली तर रावसाहेब निक्षून 'नाहीं' ह्मणून तिला उत्तर देऊं शकतील का ? "

हें शेवटलें वाक्य त्यांनीं हळूच दिगंबरपंताकडे डोळे मिचकावून उच्चारलें. नंतर ते जरा थांबले आणि पुनः ह्मणतात, " रावसाहेब, मला तरी ती मास्तरीण काय

माहीत ? पण डॉ. भगवंतरावांचं औषध चाललं आहे आमच्या कुटुंबाला. तेव्हां त्यांना एकदां दोनदां सकाळींच एथून बोलावून न्यावं लागलं. त्यामुळें आपली ती दिसली, अगदीं बिचारी पंकांत रुतलेली गाय हो लहान पाडी आहे. या तुमच्या सुधारकांपैकीं कुणी तिचा उद्धार करील तर फार उपकार होतील........ "

हें भाषण ऐकतांच दिगंबरपंत एकदम मध्येंच ह्मणतो, " अहो असे उपकार करणारे काय थोडे आहेत ! डॉ. भगवंतरावांनीं तिला तर आश्रय देण्याचं कबूल केलं आहे. हे तुमचे मोर मास्तर कसे हंसताहेत पहा. ! "

रावसाहेबांनीं इतका वेळ स्वस्थपणानें यांचें बोलणें ऐकून घेतलें. नंतर ते मोरमास्तराकडे वळून विचारतातः " कोणरे ही मास्तरीण मोरमास्तर ? "

मोरमास्तरास तेवढ्या प्रश्नानेंच फार मोठेपणा आला व तो एकदम ह्मणतो, " रावसाहेब, तिला नाहीं का कुणाच्याशा शिफारशीनं आपण लाविली ? मथी मथी तिचं नांव. "

दिगंबरपंत मध्येंच ह्मणतोः " डॉ. भगवंतरावांचीच शिफारस असेल बहुतकरून."

हें सर्व भाषण चाललें असतां वहिनीबाई लक्ष्य लावून ऐकत होत्या. त्यांना त्या सर्व भाषणाचा अतोनात वीट आला व त्यांच्यानें पुढें अगदीं ऐकवेना. तेव्हां त्या आंतूनच मोठ्यानें ह्मणतातः " मोरमास्तर, आतां आंघोळीची वेळ झाली ह्मणावं. "

वहिनीबाई इतकें आंतून ओरडूनच थांबल्या नाहींत. दिगंबरपंत व कृष्णाजीपंतदादा बसले होते तेवढे पाट वगळून बाकीचे पाट त्यांनीं भराभर उचलून भिंतीशीं ठेवून दिले. त्यांच्या चर्येवरूनच त्यांना या दोघांच्यासंबंधानें किती आदर होता, हें दिसत होतें.

ते दोघेही तिची ती चर्या व तो उद्धामपणा पाहून अगदीं आश्चर्यचकित व क्रुद्ध झाले आणि तशाच मुद्रेनें तिच्याकडे पाहूं लागले. रावसाहेबही आपल्या पाटावरून उठले आणि " खरंच स्नानाची वेळ झाली, आतां आणखी कांहीं तुह्मांला सांगायचं नाहींना ? " असें दिगंबरपंताकडे वळून ह्मणाले.

दिगंबरपंताला त्या विचारण्याचा थोडासा राग आला. कृष्णाजीपंतालाही त्याचप्रमाणें. परंतु दिगंबरपंत उगीच बसला. कृष्णाजीपंतदादा मात्र डोळे मिचकावीत मोठ्यानें म्हणालाः

" आपल्यासारख्या सुज्ञांना काय सांगायचं आहे. हा दिगंबरपंत वेडा ! आपल कांहीं तरी मनांत आणतो आणखी कोणाकडे जावं कोणाकडे नाहीं याचा विचार न करितां बेलाशक जाऊन बोलत सुटतो. याला कांहीं हा उद्योग कुणीं सांगितला होता का ? आपलीं कामं आपल्याला का समजत नाहींत. जातों आह्मी आतां. आमच्याही कुटुंबाची प्रकृति फार बिघडली आहे. त्यांच्या घरांत त्या मास्तरणीकडे डॉ. भगवंतराव आहेत का पाहून त्यांना घेऊन जातों. भगवंतराव माणूस कसाही असो, कुठेंही जावो, डॉक्टर चांगला आहे. त्याचीं मतं कशीं असोत, वागणूकही कशी असो, आम्हांला त्याच्या ज्ञानाचा उपयोग करून घ्यायला पाहिजे. तसंच आपलंही आहे. बाई कशीका असेना ! मास्तरणीचं काम करते आहे. मग बाकी कांहीं पहाण्याची जरूरी काय ? "

असें ह्मणून आपल्या त्या दुष्टपणाच्या भाषणावर हास्याचें जणूं काय पांघरूण

घालून तो दिगंबरपंतास घेऊन बाहेर पडला. बाहेर पडल्यावर दिगंबरपंत एकदम कृष्णाजीपंतदादास ह्मणतोः " काय हो, हा जितका आपल्याला उथळ वाटला तितका नाहीं बरं का ! गुलामाचा खोल दिसतो आहे. इतकं आपण नाना प्रकारांनीं बोललों, पण त्यानं एक शब्द तरी काढला का ? " कृष्णाजीपंतदादा आपल्याशींच डोळे मिचकावून त्याला म्हणतात, " अरे दिगंबरपंत, हे लोक सगळे सारखेच. पण हें बघ तूं आपल्या बोलण्यानं बीं पेरून ठेवलं आहेस, त्याला अंकुर फुटल्याखेरीज रहायचे नाहींत. "

दिगंबरपंत त्यांस उलट ह्मणालेः " आपणही खत चांगलं घातलंत. पाहूं आतां. पण मी एवढ्यावरच स्वस्थ बसणार नाहीं. रावसाहेबांच्या कुटुंबाला आपला कांहीं राग आला काहो ? काय उद्दाम बायको हो ! जसा पठाणच ! कांहीं या बायकांना लाज मर्यादा नाहींच. नाहीं तर आपलं कुटुंब पांचवं असून किती मर्यादा ! किती!"

तें ऐकून कृष्णाजीपंतदादांनीं दीर्घ सुस्कारा टाकला व म्हणतातः " अरे या सुधारकांच्या बायका अशाच. पण आमची काय करते आहे आतां कुणाला ठाऊक ! काय व्हायचं असेल तें एकदां लवकर होऊन गेलं तरी बरं. "

दिगंबरपंत त्यावर लागलींच प्रत्युत्तर करतातः

" लग्नाचा मोसम चाललाच आहे. त्याच्या आंत व्हावं एवढंच देवाजवळ आपलं मागणं ना ? "

---

# प्रकरण १३ वें.

## त्रिकूट.



मुंबई शहर अतिशय अफाट, अतिशय गर्द, अतिबकाली, परंतु त्यांतही अद्यापि असे कांहीं भाग आहेत कीं जेथें वस्ती फार थोडी. अद्यापि एका बाजूस वस्तीपासून बऱ्याच अंतरावर असणारे बंगले आहेत. वाड्या आहेत अशा कीं त्या वाड्यांतल्या बंगल्यांत कांहीं प्रकार होत असले, तर बाहेरच्या जगास सहसा समजून येणार नाहीत. या वाड्या आतां मुंबईच्या ऐन गर्भांत नाहींत हें उघडच आहे. परंतु, ज्यांना मुंबईच्या सबर्ब्स ( वाड्या ) ह्मणतात त्यांत वर सांगितल्याप्रकारचे भाग आहेत. या वाड्यांतून लहान लहान बागा आणि त्या बागांत लहान टुमदार बंगले असतात. या बागांतल्या बंगल्यांत कायमचें असें कोणी रहात नाहीं. यांचे मालक व्यापारा--व्यवहाराचे कारणान खुद्द मुंबईंत रहातात परंतु तो स्वतः चैनी असल्यास शनिवारीं रात्रीं आपल्या कांहीं मित्रमंडळीस घेऊन या असल्या बंगल्यांतून चैन करण्यास, गाणीं--बजावणीं करून

करमणूक करून घेण्यास किंवा असलेच कांहीं प्रकार करून आपला सात दिवसाच्या श्रमाचा थकवा काढण्यास येतो. नाहीं तर आपल्यासारख्याच आपल्या मित्रमंडळीच्या क्रुचास अशाच प्रकारच्या मौजा मारण्यासाठीं त्याचा उपयोग करूं देतो. हे असले बंगले व असल्या बागा हीं अशाच प्रकारच्या कामासाठीं मुद्दाम राखून ठेविलीं असल्यामुळें त्यांत शनिवारीं रात्रीं नाटकगृहांतल्यासारखी रोषणाई व आरास केलेली दिसते व त्यांतील बैठकखाना किंबहुना सबंध बगीचाच चैनी मंडळीच्या हंशानें, गाण्यानें व गोंगाटानें दुमदुमून जातो. ती गोल्डन नाईट [ शनिवारची रात्र ] संपली, पहांटे किंवा रविवारीं सकाळीं मंडळी भराभरा तेथून लोकल ट्रेननीं निघून जाऊं लागली कीं नाटक संपून रिकाम्या होत चाललेल्या नाटकघराप्रमाणें त्या ठिकाणची कळा होऊं लागते. गोंगाट नाहींसा होतो. माणसें चालतीं होतात. कोमेजलेलीं फुलें इकडे तिकडे पडलेलीं दिसतात. दिवे निस्तेज, प्रकाशरहित असे नुसतेच लटकलेले दिसतात. फुटलेल्या बाटल्या आणि खाण्यापिण्याच्या जिनसांचे अवशेष पडलेले असतात; व बगीच्यांतले माळी अगर भंडारी त्यांतल्या त्यांत कांहीं सांपडलें तर पहाण्यास शोधतात! ही स्थिति शनिवारीं रात्रीं व रविवारीं सकाळपर्यंतची झाली. परंतु बाकीच्या पांच सात दिवसांत हे बंगले अगदीं लागलेले. आंत कोणी ढुंकूनसुद्धां पहात नाहीं. बंगल्यावर नजर ठेवणाऱ्या रखवालदाराची केरसुणी कधीं फिरली तर शुक्रवारीं किंवा शनिवारीं दुपारीं फिरावयाची.

ही सर्व साधारण स्थिति खरी, परंतु कांहीं बंगल्यांची स्थिति मात्र याहून फार निराळी. कांहीं बंगल्यांत दिवसां जरी कांहीं नसलें, तरी रात्रीं—रोज रात्रीं—दिवे लागून दहा वीस पंचवीसपर्यंतसुद्धां माणसें असावयाचीं; मात्र त्यांचा गोंगाट फारसा व्हावयाचा नाहीं, केलाच एखाद वेळ कांहींनीं तर त्यांना बाकीच्यांनीं दाबावयाचें असा प्रकार चालतो. या वेळीं या बंगल्यांत येण्याच्या दारांत व चारी बाजूंच्या कोंपऱ्याकोंपऱ्यावरही पुरभय्ये टेहळणीवर असावयाचे, कोणी सहज आंत येईन ह्मणेल, तर त्याचा शिरकाव सहसा व्हावयाचा नाहीं. अगदीं शेलकी गट्टींतली रोज मेळांतली मंडळी तेवढीच नेमक्या वेळीं यावयाची. आणि त्यांचा गुप्त उद्योग जो काय चालावयाचा तो चालावयाचा. परंतु या किंवा वर सांगितलेल्या शनैश्वर मंडळीशीं आतां आपल्याला कांहीं करावयाचें नाहीं. मात्र वर सांगितल्या प्रकारच्या एका बगीच्यांतल्या बंगल्यांत वर सांगितलेला पहिला किंवा दुसराही प्रकार चालला नव्हता अशा वेळीं कांहीं खलबत करीत किंवा सहज बोलत बसलेल्या मंडळीशीं आपलें थोडें काम आहे, त्याकरितां तिकडे पहावयाचें आहे. हा बगीचा ऊर्फ वाडी मुंबईपासून सुमारें आठ मैलांवर माहीम येथें होता. याचें जास्त वर्णन देत नाहीं. कारण न जाणों तसें दिलें, तर हा अमुकच बंगला—अमक्याच्या वाडींतलें हें वर्णन आहे असें ह्मणून कोणी गोंधळ करील. तेव्हां मोघम अशाच गोष्टी सांगितल्या ह्मणजे झालें. इतर कित्येक सबर्बमधून वाड्या आहेत, त्यांसारख्याच किंबहुना थोड्या जास्त सुंदर अशा वाड्या माहीम येथें आहेत. सबंध माहीम जणूं काय माडांच्या राईतच असल्याप्रमाणें आहे; परंतु त्यांतल्यात्यांत आह्मी वर्णिलेला हा बंगला अगदीं माडांच्या राईंत आहे. खुपशा हिरव्या पानांत घालून ठेविलेलें गुला-

बाचें छबकडें फूल जसें त्या पानांतून लुकलुकतें तसेंच त्या बंगल्याचें होतें. त्या गर्द छायेंत तो बैठा बंगला दुरून तर दिसतच नसे आणि जवळूनही त्याच्या दर्शनानें मनावर मोठासा परिणाम होत असे असें नाहीं; परंतु बंगला होता फार टुमदार आणि एकांतवासप्रिय माणसांस फार प्रिय होण्याजोगा. असे बंगले एकाच तऱ्हेच्या एकांतवासप्रिय माणसांस प्रिय वाटत नाहींत. त्यांचा उपयोग करून घेण्याची इच्छा अनेक प्रकारच्या एकांतवासप्रिय माणसांस असते. योगाभ्यासी, ईश्वरभक्तिनिरत अशा माणसास दुसऱ्याच्या उपसर्गानें आपल्या सत्कार्यास व्यत्यय येऊं नये असें वाटून ते या अशा बंगल्यांचा उपयोग करून घेतात. विद्याव्यासंगनिरत कित्येक असतात, त्यांनाही आपला व्यासंग कशाचाही उपसर्ग न लागतां सुंदरपणें एकतानतेनें व तल्लीनपणें व्हावा ही इच्छा असल्याकारणानें अशा बंगल्यांत वास करण्यास मिळावा अशी लालसा असते. अशाच प्रकारचे आणखीही कित्येक सत्कार्यनिरत सज्जन आपल्या कार्याच्या निर्विघ्नसिद्धीकरितां या स्थानाची अपेक्षा करितात, पण या स्थानाची अपेक्षा करणारे एवढेच असतात असें नाहीं; आणखीही दुसरे कांहीं लोक असतात, त्यांना आपलीं सत्कार्यें (?) निर्विघ्नपणें पार पाडण्यास हींच स्थळें फार उपयोगी वाटतात. यामुळें तेही या स्थळांची अपेक्षा करतात आणि दुर्दैवाची गति अशी कीं, पहिल्या प्रकारच्या लोकांना या स्थानांचा उपयोग क्वचित् होतो. दुसऱ्या प्रकारच्या माणसांस मात्र त्यांचा उपयोग यथेच्छ करून घेण्यास सांपडतो.

वर सांगितलेल्या बंगल्यांत आज दिवेबत्ती फार नव्हती. गुरुवारचा दिवस होता. यामुळें बंगल्यांत गायनवादनसमारंभ होण्याचा संभव नव्हता. परंतु कोणी तरी दोन चार मंडळी आंत होती. ही येथें कां आली होती हें आपण पाहूं.

बैठकखान्यांत मध्यें एक राउंड टेबल होतें. त्याचेजवळ तीन माणसें खुर्चीवर बसलीं होतीं आणि एक माणूस पलीकडे एका कोंचावर पडला होता. टेबलावर एक बाटली व चार ग्लास होते. एक चिरूट पेटी व आगपेटी इतकें सामान होतें. टेबलाजवळ बसलेला एक गृहस्थ युरोपियन पद्धतीचा पोषाख केलेला व दाढी वाढविलेला होता. तो चिरूट ओढीत होता आणि खुर्चीच्या पाठीवर आपली मान टाकून धूर सोडून जांभया देत होता. नंतर मध्येंच झट्कन ताठ बसून आपल्यासमोर बसलेल्या इसमास उद्देशून व कोंचावरल्या इसमाकडे बोट करून ह्मणतोः

"याला तर अगदीं घोर लागला. छे, छे ! कालची त्या दोघांची ती धांदल मनांत येऊन मला राहून राहून हंसूं येतं. ए बाब्या, त्यांनीं आपल्याकडून मोठी हुशारी केली बरं का. तिला बरोबर आणलं नाहीं, आणखी त्या गंग्याला बरोबर आणलं. मला कांहीं धोरण का नाहीं ? मीं तें धोरण बांधलंच होतं, कीं असं कांहीं जर झालं, तर आपण काय करायचं ? त्याप्रमाणें बरोबर काय करायचं तें करून या शुंभाचीन् तिची भेट करवून साधायचं तें साधलं. आतां ती परत गेली ह्मणजे आपल्याला जें काय साधायचं तें बरोबर साधेल. पुनः मजा अशी केली आहे, कीं तिच्याकडून शपथ घेवविली आहे कीं, त्या वसंत्याजवळ किंवा गंग्याजवळ किंवा दुसऱ्या कोणाजवळ यांपैकीं एक अक्षरसुद्धां बोलायचं नाहीं. त्याप्रमाणें त्या भोळीनं

शपथ घेतली. आणखी जें यानं मागितलं तेंही शेवटीं दिलं. मला वाटतं हें एक कूळ आतां आपल्याला बरं सांपडलं आहे. चांगली करूं याची व्यवस्था. आणखी ती पोरगी मोठी प्रेमळ, भोळी, साधी अशी आहे. तेव्हां जें तिला सांगावं तें तिला अगदीं खरं वाटणार. त्यांत कांहीं शंका नाहीं."

"पण तिची शपथ फार वेळ टिकायची नाहीं असं मला वाटतं बोआ" त्या गृहस्थाचा सोबती ज्याचेकडे पाहून वरील भाषण झालें तो मध्येंच ह्मणालाः "तो वसंत्या झाला, गंग्या झाला, त्यांनीं तिच्यापासून सगळं कांहीं काढून घेतलं असेल. किंवा एक दोन दिवसांत घेतीलही. मला कांहीं तसा भरंवसा येत नाहीं. अरे हे दोघे कांहीं कमी आहेत ? अन् त्यांत तुझा संबंध आहे हें त्यांना कळलेलं आहे. तेव्हां काय होणार ? काय तुला ते ओळखून नाहींत ?"

"अरे बाबा, माझी काळजी तुला नको. ते मला ओळखून आहेत, सगळं जग मला ओळखून आहे, पण मी सगळ्यांच्या वर आहें. या पोराला हातीं धरलं आहे. याच्याकडून जर मी आपलं काम पुरं करून घेतलं नाहीं तर नांव बदलून टाकीन."

"हें पहा नांव बदलण्याची गोष्ट तूं मला सांगूं नको. आतांपर्यंत तूं किती तरी नांवं बदललीं आहेस, आणखी मींही पण बदललीं आहेत. आणखी केव्हां केव्हां कशीं कशीं बदलूं याचा नेम नाहीं. या पोराला हातीं धरून तूं पुढें काय काय करणार तें मला सांग. मला वगळून तूं कांहीं करूं ह्मणशील तर मात्र मी गप्प बसणार नाहीं." तें त्या साथीदाराचें भाषण ऐकून एक वेळ चिरूटाचा झुरका घेऊन आमचे दाढीवाले आपलें डोकें चोळूं लागले. नंतर भिंवया वर चढवून व तोंडावरून आणि दाढीवरून हात फिरवून मान हालवीत ह्मणतातः "अहो महाराज, आपल्यावांचून आमचं चालणार कसं ? आपल्याला मी आतां या जन्मांत कांहीं वगळूं इच्छिणार नाहीं, वगळूं शकणार नाहीं, अर्थातच वगळणारही नाहीं. वेळ पडली तर आपली इच्छा नसलीं तरी आपल्याला पुढें करीन, असं या घटकेला अभिवचन देतों, मग तर झालं ? हें पहा. आपल्याला त्याच्याबद्दल यत्किंचित्सुद्धां शंका किंवा काळजी नको. तुह्मी आह्मी आतां अगदीं जावश्चकंठश्च झालों आहोंत. अगदीं गळ्याला गळा बांधलीं आहे ह्मणतात तो तसा गळा बांधला आहे समजलांत. अन् आणखी गळा बांधायची वेळ आली तरी आपल्यालाच मी पुढें करून पहिला मान आपल्याला देईन."

"हें पहा, तो मान आपण मलाच पहिल्यानं द्याल याच्याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. किंबहुना आपण तसे इतके स्वार्थत्यागी आहां, कीं आपण तो मान घेण्याला मुळींच योग्य नाहीं असं सुद्धां सिद्ध करून दाखवाल. पण आह्मी तसा स्वार्थत्याग आपल्याला करूं देणार नाहीं. तो सगळा आपल्याला एकट्याला मिळेल. त्या लाभाचा वांटा कोणी मागायला येणार नाहीं अशी तजवीज करूं. तें सगळं कांहीं होईल. त्याची बिलकुल आपल्याला शंका नाहीं. हे जे या असल्या मूर्खांना धरून आपण लाभ करून घेतां कीं नाहीं त्यांतला आमच्या योग्यतेइतका वांटा आम्हाला मिळाला म्हणजे आम्हांला कांहीं दुसरं नको. मोठमोठाले सगळे मान आपले. कुठून जरूरीचीं बोलावणीं आलीं आपलीं, सर्व काहीं आपलं. आह्मी पायरीला पाय

लावूं इच्छित नाहीं. सध्यां ज्याच्याबद्दल आपण बोलत होतों तें आतां काय तें काढा. "

इतका वेळ टेबलाजवळ बसलेल्यांपैकीं तिसरा इसम मुळींच बोलत नव्हता. अगदीं घुम्यासारखा स्वस्थ बसला होता, तो मध्येंच गुंगींतून जागा झाल्याप्रमाणें ह्मणालाः "हं, तें काय तें काढा."

"तूंच लेका याला मिळालास का?" आमच्या दाढीवाल्यानें हंसून त्यास विचारलें. परंतु त्या हंसण्यास त्यानें प्रतिहास्य दिलें नाहीं. नुसतें स्मितसुद्धां नाहीं. अगदीं स्तिमित-दगडी मूर्तीसारखा स्तिमित चेहरा करून पुनः अगदीं पूर्वींच्याच स्वरांत "हं, तें काय तें काढा." एवढेंच वाक्य पुनः उच्चारलें.

त्यावर दाढीवाले ह्मणतातः "तें काय तें काढल्याखेरीज का तुझ्यापुढें मांडलं आहे, आणखी तूं चापतो आहेस तें. आपल्या रोजच्या धिम्मेपणाच्या या रंगांत आला आहेस तो उगीच का आला आहेस? काय एकेक खुळं जीं मला मिळताहेत तीं भयंकरच." "हं तें काय तें काढा." "हं तें काय तें काढा." "काय काढा तुझं डोचकं?" तो गृहस्थ हलला नाहीं, हंसला नाहीं, त्यानें डोळा फिरविला नाहीं कीं मान वळविली नाहीं. पुनः आपलें "हं तें काय तें काढा." एवढेंच ह्मटलें. इतकेंच नव्हे तर त्यानें आपलें तें वाक्य दर मिनिटानें सारख्या आवाजांत सारख्या ठेक्यांत सुरू ठेविलें. "हं, तें काय तें काढा." जसें एखादें किल्लीचें चित्र किल्ली दिली ह्मणजे नियमित वेळेपर्यंत ठेक्यावर नियमित हालचाल करतें किंवा शब्द काढतें, तशीच त्याची अवस्था झाली होती. "हं, तें काय तें काढा" या शब्दाचा अर्थ जाणून तरी तो बोलत आहे कीं नाहीं याची एखाद्या ऐकणारास शंका आली असती. तें पाहून त्याचे दोघेही सोबती हंसून एकमेकांकडे हंसून पाहूं लागले. व मग तो दुसरा ह्मणालाः "आतां याचं चक्र झालंरे सुरू. आतां हा महामंत्र जपीत बसणार. आपण इथें आलों कशाला आणखी हें होतं आहे काय? आतां आपल्या विचाराच्या कामाला हा झाला निरुपयोगी. काय विचार करायचा तो आपला आपल्यालाच केला पाहिजे. कायरे कांहीं समजतं आहे का, आह्मी काय बोलतों आहोंत तें?"

"हं, तें काय तें काढा" एवढेंच त्यानें या वरच्या प्रश्नास उत्तर दिलें.

"ठीक आहे. काढतों, वाट बघत बस" असें दाढीवाल्यानें उत्तर दिलें.

दुसरा पुनः नुसतें "झालं. आतां झालं त्याचं चक्र सुरू, आतां थांबायचं नाहीं. काय करायचं ठरवायचं तें आतां आपलं आपणच. एवढ्याकरितां मी अगदीं बेतानं असतों. जरा जास्त कमी झालं, कीं हें याच्यासारखं तर नाहीं, तो घोर लागून पडला आहे त्याच्यासारखं व्हायचं. पण कायरे शंभुराव, याला धरून आपण उद्योग चालविला आहे, तर कांहीं प्राप्ति खरोखरच होईल का? का आपलं उगीच त्यांत आपल्याला वाटतं आहे? नाहींतर एखादं चांगलंसं कूळ तरी गांठ." इतकेंच ह्मणाला.

"अरे बाब्या, तसं कूळ गांठायला मला का तूं सांगायला पाहिजेस? गांठीन तेव्हां तुला दिसेलच. पण लाडू-जिलब्या मिळेपर्यंत या भाकरीवर तर ताव मारायला हरकत नाहीं. त्या प्राणदास जीवनजीच्या पोरीची शिकार साधीपर्यंत ही मंडळी वावगी नाहीं. अरे ज्या मार्गानं आपण काल गेलों, त्या मार्गानं कांहींना

कांहीं तरी नेहमीं आपली डाळ शिजत राहणार. याबद्दल कांहीं शंका नको. मग तो व शंभ्या आणखी गंग्या काय वाटेल तें का करीनात, चला आटपा, याबद्दल जास्त वाटाघाट नको. आतां पुढला विचार. आपण तिला भेटून आल्यानंतर- नव्हे याला भेटवून आणल्यानंतर आतां पुढें काय व्यवस्था होते त्याबद्दल नजर कोण ठेवणार ? तूं का मीं ? हा टोम्या नीट असला तर हा उपयोगी पडणार, नाहीं तर काय होतं आहे याच्या हातून ? "

परंतु तो दुसरा टोम्या आपल्या त्या पूर्वमंत्राखेरीज कांहीं बोलला नाहीं. पुनः एकदां ग्लास भरून घेऊन त्यानें ताव मात्र मारला.

आमचा दाढीवाला पुढें ह्मणतोः " बरं, शनिवारीं काय व्यवस्था ? आपल्याला तर पुण्याला जायचं. स्पेशलनं आपण जाणार. प्राणदासचा पोरगा जाणार त्याला मीं कबूल केलं आहे. आणखी आपली मनो- देवता तर अशी धांवते, कीं आजच्या खेपेला आपला मागला सगळा वचपा निघ- णार. एक्स्ट्रा मीटिंग आहे. प्राणदासच्या पोराला टर्फ क्लबचा मेंबर होण्याची फार इच्छा आहे. मीं तुझं काम करून देतों ह्मणून थाप मारली आहे. तेव्हां आतां पुढें काय तजवीज करावी, या विचारांत मी आहें. "

" तुझा हा नाद विशेष बोवा. इतकी कमाई होते पण तुझ्याजवळ एक रुपया शिल्लक राहत नाहीं याला कारण तुझा हा नाद, हें कसं तुझ्या ध्यानांत येत नाहीं ? आमच्या वांट्याला जें काय येईल तेंही त्यांत घालून आह्मांलाही बुडवितोस. "

" अन् आह्मी नाहीं रेसेसमध्यें गेलों ह्मणून काय होणार आहे ? तुझो पैसा लेका या जुव्यांत किती जातो. हा जुवा आ- पण खेळतों, तसाच रेसेस् ह्मणजे जुवाच आहे. ह्मणायचं नाहीं तोंडानं इतकंच. कारण मोठीं माणसं त्यांत असतात. पर लेका एकदम डबोलं सांपडलं ह्मणजे मग ? येशील कीं आपला वांटा मागायला ! "

" शंभ्या, हा आपला जुवा निराळा, तो निराळा. यांत आपली अक्कल चालवितां येते, हातचलाखी करतां येते. होतांहोईतों घस- रत नाहीं, घसरलं तर सांवरतां येतं. आणखी त्या तुझ्या रेसेसमध्यें आपल्या हातीं कांहीं नाहीं. कोणाचा घोडा कोण पळवणार. कोण पैसे लावणार. आणखी कोण त्याच्या दस- पटन् वीसपट देणार. सगळीच आंधळेशाही!"

" तुला काय गुलामा त्यांतली माहिती आहे. एकदां दोनदां माझ्याबरोबर चल ह्मणजे देतों करून तुला माहिती. मग असे उद्गार नाहीं तूं काढणार. दर रेसेसला उड्या टाकीत जाशील. एकदां पांच रुपये खर्चून तूं चल तर खरा माझ्याबरोबर ति- थली ती मजा पहायला. अरे बाबा, तें असं तसं काम नाहीं. "

" बरं चल " त्याचा तो बोलत अस- लेला साथीदार त्यास ह्मणतोः " हें सगळं ठीक झालं. पण आतां इथें किती वेळ बस- णार ? आणखी याला घोर लागला आहे याचं काय करणार ? मला वाटतं देऊं याला इथेंच ठेवून. सकाळीं जागा झाला ह्मणजे पुरभय्याला सांग, दे बाहेर घालवून. नाहीं तर आतांच बाहेर व्हरांड्यांत नेऊन टाकूं एका रकट्यावर. आला शुद्धीवर ह्मणजे येईल धडपड करीत. बरं त्याला आपल्या चापांत धरलं आहेस. आली पाळी कीं कांहीं त्याच्याकडून करून घ्यावं. नाहीं करीत ह्मटलं कीं पोलीसची भीति आहेच.

असे अजागळ आहेत ह्मणून तर आपलं चाललं आहे. "

" पुरे रे. तेंच तेंच तेंच पुनः बोलण्यांत काय अर्थ आहे ! अरे कोणत्याही कामांत काय दुबळ्यावर सबळाचा जोरा चालायचाच. आमच्याहून सबळ आहेत ते नाहीं आमच्यावर कुरघोडी करीत ? तोच प्रकार आपला. तूं ह्मणतोस तसा याला टाकून उपयोग नाहीं. आपल्या हातचा सुटतां कामा नये. सुटला कीं मग काय आपण करणार ? त्याला कोणी गुरु भेटला कीं संपला सगळा कारभार, पुनः ह्मणून हातीं लागायचा नाहीं. नवी चांगली शिकार हातीं लागेपर्यंत आपण याला वगळूनच ठेविलं पाहिजे. आतां आपल्याला तरी काय कुठें जाऊन करायचंय. इथेंच पडले. याच्यापुढें मुंबईंत जाऊन आपल्या जागीं— तें कांहीं नाहीं, सकाळपर्यंत इथेंच काढूं. त्या भोळवट पोरीला याच्याकडून सांगवलं आहे त्याची पुरी बतावणी करण्याकरितां माझ्या मनांत तिला त्याच्या हातून एक पत्र लिहावं असं आलं आहे. तेव्हां त्या पत्राचा मी ड्रॅफ्ट ( मसुदा ) तयार करतों. याचा त्या दोघांना बिलकुल पत्ता लागूं देतां उपयोगी नाहीं, म्हणून याला नेहमीं फिरतीवर ठेविलं पाहिजे. "

" तें काय वाटेल तें असो. आतां सकाळीं उठेपर्यंत आपल्याला इथेंच रहायचं ना ? मग आपल्याला आली झोंप. मी कोंचावर पडतों, तूं त्या कोंपऱ्यांतल्या टेबलावर लिहीत बस, वाटेल तें कर. हा तर लेकाचा टोम्या ही बाटली पार संपेपर्यंत इथून उठत नाहीं. "

असें ह्मणून तो उठून दुसऱ्या एका कोंचावर पडला. टोम्या नांवानें ज्यास ते दोघे संबोधीत, त्यानें हूं कीं चूं केलें नाहीं. " शंभूराव, पत्र एखाद्या कादंबरींतल्यासारखं बनलं पाहिजे. " " पहा ऐसं बनवितों " असें ह्मणून तो कोंपऱ्यांतल्या टेबलाजवळ जाऊन बसला.

# प्रकरण १४ वें.

## जांवयांचें स्वागत.



त्याच गुरुवारच्या रात्रीं पद्मावती वगैरे मंडळी उतरली होती, तेथें अगदीं गडबड उडून गेली होती. रात्रीचशी काय, परंतु संबंध दिवसांत गडबडीखेरीज कांहींच नव्हतें. वसंतरावाच्या व विलायतेहून परत येऊं घातलेल्या जांवईबोवांच्या मित्रमंडळीची त्या बंगल्याकडे अगदीं रहदारी चालली होती. आपला मित्र सर्वस्वी विजयी होऊन परत येणार, त्याचें स्वागत कोणत्या थाटानें करावयाचें याचा खल सुरू होता. सरासरी पंचवीस तीस मंडळी होती, त्यांत कांहीं गंभीर विचाराचे, कांहीं विनोदी, कांहीं उत्सवप्रिय व कांहीं उत्साही असे होते. एक दोघे कविही होते.

गंभीर व नेमस्त होते, त्यांनीं असें सुचविलें कीं, "आपण बंदरावर कांहीं मोठासा समारंभ करूं नये, इथें आल्यानंतर काय करायचं तें करावं." उत्सवप्रिय होते व उत्साही होते त्यांनीं "तें कांहीं नाहीं. बंदरावरून उतरल्याबरोबर त्यांच्या गळ्यांत पांचपंचवीस हार पडले पाहिजेत. मग खरं स्वागत तें काय!" असा अट्टाहास चालविला.

विनोदी होते, त्यांनीं "तें काय तुमचं करायचं तें करा, पण त्यानं जमिनीवर पाऊल टाकण्याबरोबर मोठा हंशा पिकला पाहिजे अशी आम्ही कांहीं कृप्ति करणार" असा धाक घातला. त्यामुळें एकमेकांकडे पाहून मंडळी त्याबद्दल तर्क करूं लागली.

कवि होते त्यांनीं स्वागतपर कविता केल्या. त्यांतही एक गंभीर स्वभावाचा होता, त्यानें फारसे आढेवेढे न घेतां आपल्या कविता आपणच मोठ्या उत्साहानें वाचून दाखविल्या. लागलींच त्या कवितांच्या शंभर प्रती काढण्याचें ठरून त्या ताबडतोब छापण्यास एकदोघांनीं एका छापखान्याकडे धांव घेतली.

दुसरा कवि मोठा विनोदी होता. तो आपली कविता दाखवीना. त्यानें "आपण कविता केली आहे, परंतु ती आयत्या वेळीं पुढें येईल. आधींपासून ती उघडी करून तिची वाफ दवडायची नाहीं. पक्के चोवीस तासपर्यंत अगदीं गरमागरम राहण्यासाठीं 'थर्मास' बाटलींत भरून ठेविली आहे. इतक्या लांबून प्रवास करून येणाऱ्या आपल्या मित्रास चहाच्या पेल्याबरोबर बिस्किटासारखी द्यायची. आधींपासून वाटल्यास तिचा कुरकुरितपणा, खुसखुशीतपणा, आणखी खमंगपणा तीनही पार नाहींशीं होतील." असें आपल्या विश्वासांतल्या एका मित्राकडे डोळे मिचकावून ह्मटलें.

अर्थातच त्या सर्व मित्रांची जिज्ञासा अधिकच वाढून ते त्यास ती कविता अगपणास आधीं दाखविली पाहिजे, असा आग्रह करूं लागले, तो ह्मणे, "मी जुन्या

रीतीभातींचा अभिमानी आहे. ज्या देवा-करितां नैवेद्य केला आहे, त्याला तो दाखविल्याखेरीज उष्टावयाचा नाहीं. शिवाय आमच्या संगीत स्वागताची रंगी किंवा बेरंगी कोणतीच तालीम आह्मी कोणास दाखवूं इच्छित नाहीं. ज्या कोणास लालसा असेल, त्यानं फार तर थिएटरांत पुढल्या जागा विसार देऊन गुंतवून ठेवाव्या. ”

असा कांहीं प्रकार त्या गुरुवारीं सबंध दिवसभर चालून मोठी मौज उडून राहिली होती. संध्याकाळीं मात्र या मंडळीच्या हंशापिकीस थोडा आळा पडला. कारण मालतीचे वडील व त्यांचेबरोबर पद्मावतीचे वडीलही आले. तेव्हां वसंतरावानें आपली बैठक—तळमजल्यावरील बैठकखान्यांत—किंवा मधल्या हॉलांत आणिली. वर बसून या तरुण मंडळीचें निभेना. त्यांच्या विनोदी भाषणावर व हंशापिकीवर त्या वेळीं कोणाचाही दाब नको होता. वर जी मंडळी होती ती अर्थातच अशी कीं, त्यांच्या देखत यांना मनसोक्त बोलण्याचालण्यास मोकळीक वाटेना. खालीं आल्यानंतर तो धरबंद कांहीं राहिला नाहीं. गंगाधर व त्याच्यासारखे वसंतरावाचे अगदीं घरच्याप्रमाणें असलेले स्नेही होते, तोंपर्यंत मालती व पद्मावती त्यांच्यांत बसून ते गप्पा गोष्टी सांगत, परंतु पुष्कळच नवखे मित्र येऊं लागले, तेव्हां त्या दोघींना संकोच वाटूं लागला. वसंतरावानें त्या दोघींचीही थट्टा केलीच कीं “ तुमचे दोघींचेही नवरे साहेब बनून येताहेत, तेव्हां तुह्मां दोघींना आतां मडमा बनावं लागणार. मग असा संकोच कां ! तुह्मांला मडमांसारखं इंग्रजी येतं आहे. मग बोलायचालायला काय हरकत आहे ! तुमचे साहेब आल्यानंतर तर तुह्माला खऱ्या साहेबमडमांत हिंडावं फिरावं, बसावं उठावं लागणार. मग आमच्यासारख्या गांवठी लोकांत काय लाजायचं आहे ! ”

हा वर सांगितल्या प्रकारचा धुमाकूळ गुरुवारीं दिवसां व रात्रींही चालला होता खरा. परंतु पद्मावतीचें चित्त कांहीं त्या धुमाकुळांत नव्हतें. कोणी हंसण्याजोगें बोललें तर ती हंसे. मालतीचा नवरा आला ह्मणजे अमुक एक गोष्ट करावी अशी सूचना कोणी केली व तिच्या योग्यायोग्यतेबद्दल तिला कांहीं विचारलें तर ती तिला काय वाटेल तें सांगे. “ बायकांनीं बंदरावर दुसरे दिवशीं सकाळीं जावं कीं नाहीं ! ” असा प्रश्न निघाला असतां मालती व तिची आई यांनीं असें ठरविलें कीं “जाऊं नये.” परंतु पद्मावतीनें त्यांस ह्मटलें कीं, “तें कांहीं नाहीं. मुंबईस जर आपण आलों आहों तर बंदरावर गेलं पाहिजे; इतकंच नव्हे, तर शक्य असलं तर बोटीवर सुद्धां गेलं पाहिजे. मग मुंबईस एवढं येण्याचा हेतु काय ! ” तें तिचें ह्मणणेंच शेवटीं अमलांत आणण्याचा ठराव झाला. आणि बायका मंडळीसुद्धां बंदरावर जाऊन मालतीनेंच पहिल्यानें आपल्या नवऱ्याचें स्वागत केलें पाहिजे असा विचार कायम झाला. वसंतरावानें लागलीच मालतीस ह्मटलें: “ मालूताई, झालं बोवा, पद्माताईला इतक्या आग्रहानं आणल्याचं सार्थक झालं. ती जर न येती, तर कांहीं तुझा पक्ष इतक्या जोरानं मांडला गेला नसता. आह्मीं तर सगळ्यांनीं असा एकमतानं ठराव केला असता कीं बायकांनीं बंदरावर येण्याचं कांहीं कारण नाहीं. वास्तविक मुंबईस येण्याचं सुद्धां कांहीं कारण नाहीं. परंतु येतें म्हणून पाठीसच लागलीस म्हणून आपलं आणलं झालं. पण आतां पद्माताईपुढें आमचं कांहीं

चालत नाहीं ह्मणून गप्प बसतों. बाकी वास्तविक आह्मी आधीं पुढें जाऊन काय आहे रंग साहेबांचा, काय नाहीं, तिकडून एखादी मडम आणली आहे का काय ? घरीं येण्याचा विचार आहे कीं परस्पर हॉटेलांत उतरणार ? याचा खुलासा काढणार होतों. आणखी रागरंग ठीक असला, तर पुढें जायचं, नाहीं तर आपले मागल्या पायींच परतले आपल्या बहिणीला घेऊन ! बरं चला असो. पद्माताईनं आतां ठरविलं आहे, तेव्हां जर का वेडावांकडा रागरंग दिसला तर त्याची जबाबदारी तिच्यावर."

वसंतराव वर सांगितल्याप्रमाणें बोलला. आणखी मग एकदम चपापला ! आपण आपल्या बहिणीची चेष्टा करण्याच्या भरांत काय बोलतों आहोंत याचें भान न राहून असें बोललों कीं जें पद्माताईला सहजगत्या लागेल. आणि कांहीं हेतु नसतांना तिच्या मनाला फार वाईट वाटेल. हें त्याच्या लक्षांत मग आलें, तों लागलीच त्याचा परिणाम होऊं नये ह्मणून विषयांतर करण्याचे हेतूनें तो ह्मणालाः

"बरं चला, या असल्या थट्टेंत काय अर्थ आहे ! तुझ्या मनांत जर यायचं असलं तर आपण आपली गाड्याघोड्यांची तयारी करणार. पद्माताई, तूं आमच्याबरोबर आल्यानं आह्मांला खरोखर मोठा आनंद झाला. आली नसतीस तर अगदींच सुनं सुनं झालं असतं. मालीला तर अगदींच करमलं नसतं. निदान विलायतचे साहेब येईपर्यंत हो ! ते साहेब एकदां येऊन दृष्टादृष्ट आणखी भेटाभेट झाली कीं बाकी सगळ्या माणसांची आठवणसुद्धां पार विसरून नाहींशी होईल. पहाते आहे पहा माझ्याकडे कशी टवकारून ! मी कांहीं डोळ्यांत मावणार आहे का काय ? "

वसंतरावानें आपलें बोलणें मुद्दाम बदललें हें जाणून व पहिल्या बोलण्याबद्दल त्याच्या मनाला कांहीं वाटूं नये ह्मणून पद्माताई त्यास ह्मणतेः "वसंतराव, तुला थट्टेखेरीज कांहींसुद्धां सुचत नाहीं ना ? तुझ्याकडे टवकारून पहात आहे का ? ती बिचारी एक अक्षरदेखील बोलत नाहीं. तुझं तूंच बोलतो आहेस. आणखी तिला चिडवायला पहातो आहेस. पण ती एक अक्षरसुद्धां बोलायची नाहीं."

"पद्माताई, माणसाला बोलायला कांहीं सुचलं, तर माणूस बोलेलना ? अन् बोलायला त्याचं चित्त स्थिर असेल तर कांहीं सुचेल ना ? हिचं चित्त गेलं आहे समुद्रांत त्या आगबोटीवर. आपण जाण्यापूर्वी तिनं आपलं चित्त कधींच पाठवून दिलं आहे. त्याबद्दल कांहीं कोणाची परवानगी घ्यावी लागत नाहीं, कांहीं भाडं खर्च होत नाहीं. वास्तविक ती एडनलाच जाऊन बसणार होती, पण अगदींच अधीरपणा दिसेल ह्मणून गेली नाहीं. मला एकदां विचारलं होतंन् ' एडनपर्यंत काय पडतं ? केव्हां निघावं लागतं ? ' मला वाटतं टॉमस कुकला तिनं पत्रसुद्धां लिहिलं होतं. काय उत्तर आलं कांहीं कळलं नाहीं......"

"पुरे रे दादा, आतां मात्र शिकस्त झाली तुझ्या कल्पनांचीन् भाषणाची. हो लिहिलीं पत्रं. पन्नास पत्रं लिहिलीं." मालती किंचित् रागानें किंचित् प्रेमानें ह्मणते, "तुझी थट्टा कधीं कधीं जास्त होते. हो एडनचं भाडं विचारलं. तूं माझा भाऊ, मग तुला नको विचारूं तर कुणाला विचारूं ? "

तें ऐकून सर्वच मंडळी हंसली.

असे त्यांचे विनोदसंलाप व प्रेमसंभाषणें चालली होतीं. रात्र तेव्हांच निघून गेली. सकाळच्या प्रहरीं गाड्या आल्या. रात्रीं

इतकें जाग्रण झालें होतें तरी मंडळी लौकर उठून तयार झाली. बोट बंदरांत आल्याची -किंबहुना दूर जागीं जेथें येऊन उभी राहते तेथें आल्याची-खूण होण्याच्या आधींच कांहीं मंडळी धक्क्यावर जाऊन उभी होती. आमच्या मंडळींनीं एक स्टीम लॉंच करून आंत समुद्रांत जाण्याची व्यवस्था केली होती. त्याप्रमाणें ते दोघे वृद्ध गृहस्थ, पद्माताई, मालुताई, वसंत, गंगाधर व कविवर्य स्नेही इतकी मंडळी त्या लॉंचमध्यें बसून बोटीजवळ जाण्यास निघाली. बोटीजवळ जातात तों डेकूवरच जांवईबोवा उभे होते! त्यांची व या मंडळींची दृष्टादृष्ट झाली. जांवईबोवांनीं नमस्कार केला. सासऱ्यांनीं व त्यांचे स्नेही यांनीं तो स्वीकारून आपल्या चर्येनें संतोष दाखविला. वसंतराव व कविवर्य स्नेही यांनीं अनुक्रमें आपले हातरुमाल व कवितायुक्त कागद हीं वर हवेंत उडवून त्यांचें स्वागत केलें. मालती व पद्माताई यांनीं अनुक्रमें पूर्ण आनंद व सखेदानंद यांनीं युक्त अशीं मुखें वर करून केवळ दृष्टिक्षेपांनीं त्यांचें स्वागत केलें.

थोड्याच वेळांत जांवईबोवा खालीं उतरून या मंडळींच्या बोटींत आले. सासरे व त्यांचे स्नेही यांनीं हस्तांदोलन करून त्यांचें स्वागत केलें. मालती व पद्मावती उभ्या होत्या तिकडे जांवईबोवांनीं एकवार स्मितयुक्त चर्येनें पाहिलें. मंडळीशीं भाषण सुरू झालें. इकडे वसंतरावानें आपल्या बहिणीच्याजवळ जाऊन ह्मटलें: "तूं पहिला हार घालण्यासाठीं इथें आलीसना! तुझा हार घालीपर्यंत कोणी हार घालणार नाहींत. तेव्हां ज्या कार्याकरितां तूं आलीस तें कार्य करून टाक. आह्मी लग्नाचे वेळीं गर्दींत होतों तेव्हां माळ घालतांना पाहिलं नाहीं. परंतु आतां तरी आम्हांला पाहण्याला सांपडूं दे. कवीश्वरांनीं आपला कविताहारसुद्धां तुझ्या हाराच्या आधीं समर्पण करायचा नाहीं म्हणून गुलदस्तांत ठेविला आहे! आणि मीं तर त्यांना स्पष्ट असं सांगितलं आहे कीं आपली मंडळी जमून बसल्यानंतर स्वागतपर भाषणं होण्याच्या वेळीं तो गुलदस्त उघडायचा. तेव्हां आतां आपण पुढें होऊन हार समर्पण करावा. आतां लाजूं नये. मडमा कधीं आपल्या नवऱ्याचं स्वागत करण्याचे बाबतींत लाजत नाहींत. का पद्माताई, आपण तर अगदीं मुग्ध होऊन बसलां! आपण हिला आणलं तें हार घालण्यासाठीं-पहिला हार घालण्यासाठीं ना? चला तर मग, आपल्या जबाबदारींतून मोकळ्या व्हा."

इतकें बोलून त्यानें पद्माताईकडे नीट निरखून पाहिलें तों पद्माताईची चर्या त्याला खेदव्याप्त दिसली. मनाला होणारा खेद बाहेर न दाखवितां आनंदयुक्त चर्या करावयाची ह्मणजे केवढें कठिण काम आहे! तें साधण्यासाठीं यत्न सुरू झाला ह्मणजे किती त्रास पडतो, याचा अनुभव ज्यांना आला असेल त्यांनाच पद्माताईच्या त्या वेळच्या स्थितीची कल्पना होईल. वसंतरावास तिचा हा यत्न चालला आहे, हें स्पष्ट दिसलें. ह्मणून त्यानें आपलें बोलणें तितकेंच ठेविलें. पद्मावती आपल्या मैत्रिणीकडे वळून हंसून ह्मणते: "वसंतराव ह्मणतो तें खरं आहे. आणलेला हार निदान पुढें तरी कर. ह्मणजे तेच आपली मान त्यांत घालतील."

मालती तें ऐकून हंसली. पद्मावतीचें बोलणें जांवईबोवांच्या कानीं पडलें. तेही तें ऐकून हंसले आणि त्या दोघींकडे आनंदयुक्त दृष्टीनें पाहूं लागले. वसंतानें मालतीच्या हातांत हार देऊन "हं, आतां

लज्जाबिज्जा कांहीं उपयोगी नाहीं हो. ' आलीया भोगासी असावें सादर । पति-कंठीं हार घालावया ॥' असं तुकारामबोवांचं वचन आहे, त्याप्रमाणें केलं पाहिजे. साखर पुढें आली तिला तोंड दिलं पाहिजे." असें ह्मणून त्यानें जांवईबोवांस धरून तिच्यापुढें उभें केलें! आपण कोठें आहोंत, काय करतों आहोंत याचा वसंतरावास सुमार राहिला नाहीं. विनोदाच्या भरांत तो वाहवला. शेवटीं आतां हार घातल्या-खेरीज गत्यंतर नाहीं, सुटका नाहीं, हें जाणून मालतीनें हार आपल्या पतीच्या पुढें केला व त्यानें तिची ती लज्जित व आनंदित मुद्रा पाहून खरोखरीच त्या हारांत आपली मान घातली. सर्वांनीं टाळ्या वाजविल्या. दोघां वृद्धांस फार आनंद झाला; परंतु पद्मावतीच्या डोळ्यांतून अश्रु व तिच्या वडिलांच्या तोंडून सुस्कारा बाहेर पडला. मंडळीची बोट थोड्याच वेळांत धक्क्याजवळ आली. मंडळी खालीं उतरली. तेथें जमलेल्या मंडळींनीं एकदम टाळ्या वाजविल्या. सर्वांच्या शेखांड्या झाल्या आणि मंडळी गाड्यांत बसून बंगल्यावर जाण्यास निघाली. कवीश्वरांनीं केलेल्या कवितांचें छापील पुडकें अजून तसेंच गुल-दस्तांत राहिलें. बंगल्यावर गेल्यावर मंडळी बसली ह्मणजे मग तें मानपत्रादाखल वाचून दाखवून जांवईबोवांस द्यावयाचें असें ठरलें.

एका गाडींत मालती, पद्मा, वसंतराव व जांवईबोवा अशी मंडळी होती. एकींत ते दोघे वृद्ध गृहस्थ होते. दोनतीन गाड्यांत इतर कांहीं तरुण स्नेही होते, व कांहीं ट्राममधून येतों ह्मणून ट्राममध्यें बसण्यास गेले. वृद्ध गृहस्थ बसलेली गाडी सगळ्यांत पुढें होती. तिचे मागोमाग पद्मा व मालती आणि वसंतराव व जांवईबोवा बसलेली गाडी चालली होती. पद्मा व मालती यांस मुख्य बैठकीवर बसविलें होतें. जांवईबोवा व वसंतराव घोड्याकडे पाठ करून बस-ण्याच्या बैठकीवर बसले होते.

पद्मेचें चित्त कोणीकडे तरी गुंतलें होतें. परंतु तिची दृष्टि पुढच्या गाडीकडे--जींत तिचा बाप होता त्या गाडीकडे--होती. ती तिकडे कां पहात होती? तिच्या बापा-संबंधानें कांहीं विचार त्या वेळीं तिच्या मनांत येऊन कीं काय कोण जाणे, पण ती अगदीं सूक्ष्म दृष्टीनें तिकडे पहात होती एवढें खरें. ती अगदीं गप्प होती. मालती लाजेनें खालीं मान घालून मधून मधून चोरदृष्टीनें आपल्या पतीकडे पहात होती. आपण काय बोलावें हें न सुचून तिचा पति स्वस्थ बसून आपल्याशींच हंसत व मधून मधून तिच्याकडे पहात होता. वसंत-रावाच्या ओंठाशीं पुष्कळ विनोदाचे शब्द आलेले असून तो पद्मेची तशी ती बाह्यतः शून्य व खिन्न दृष्टि पाहून मोठ्या कष्टानें आत्मसंयमन करीत होता, इतक्यांत कांहीं चमत्कारिक गोष्ट पद्मेच्या दृष्टीस पडली. कोणा एका माणसानें कांहीं तरी वस्तु--कागदासारखी वस्तु--आपल्या पुढल्या गा-डींत झुगारून दिली. हा माणूस कोण आणि यानें त्या गाडींत काय झुगारलें असावें याचा विचार ती करणार, तों तोच माणूस तिच्या गाडीशीं येतांच--किंबहुना तो उभा होता तेथें तिची गाडी जातांच त्यानें एक लखोटा--लाखेचीं सिलें केलेला लखोटा--नेमका तिच्या मांडीवर टाकला. गाडींत कोणीं काय टाकलें म्हणून पहाण्यासाठीं वसंत-राव बाहेर येऊन पहातो तों तो माणूस पार नाहींसा झाला. निदान तो तेथेंच कोठें असला तर अमुकच तो असावा असा संशय घेण्यास कारण कोणालाही दिसेना.

मग त्यानें त्या माणसानें टाकलेलें आहे तरी काय हें पहावें ह्मणून आंत पाहिलें तों पद्मावती आपल्या मांडीवरला लखोटा हातांत घेऊन त्याच्या वरच्या पत्त्याकडे फार निरखून पहाते आहे असें दिसलें. पद्मावतीनें पत्ता निरखून पाहिल्याबरोबर कोणाचें अक्षर आहे तें ओळखलें असावें असें दिसलें. तें ओळखतांच तिनें एक दीर्घ उसासा टाकला आणि मुकाट्यानें तो लखोटा फोडून आंतील कागदावरून डोळे फिरवून पुनः पाकिटांत घालून तें पाकीट ती आपल्या अंगांतल्या पोलक्याच्या खिशांत घालूं लागली. जांवईबोवा अगदींच अजाणपणानें सर्वांकडे पाहूं लागले. मालतीला कांहीं शंका आली व त्यामुळें तिला भीति वाटूं लागली. परंतु तिला काय बोलावें तें सुचेना. बुधवारच्या रात्रीच्या प्रसंगाशीं व या इसमाशीं या लखोट्याचा संबंध असावा अशी खात्री वसंतरावास वाटली व पद्मावतीस तें पत्र कोणाचें, काय भानगड आहे, मला पाहूं दे असें ह्मणावें असें त्याच्या मनांतही आलें, परंतु त्याच्यानें तसें ह्मणवेना. ती आपण होऊनच आपल्याला तो लखोटा दाखवील, आतां नाहीं मग दाखवील, अशी मनाची समजूत करून तोही स्वस्थ बसला. ‘ रस्त्यानं जातांना गाडींत कोणी तरी माणूस पद्मावतीच्या अंगावर लखोटा टाकतो काय आणि ती तो फोडून वरवर पाहून मुकाट्यानं खिशांत घालते काय, असं जांवईबोवांच्या मनांत आल्याखेरीज राहणार नाहीं आणि त्यावरून आपल्याविषयीं त्यांच्या मनांत काय येईल, आणि काय नाहीं, याचा नेम नाहीं. असा विचार पद्मावतीच्या मनांत आला नाहीं असें नाहीं. परंतु जें काय त्यांच्या मनांत येईल, तें आपल्या मैत्रिणीच्या द्वारें दूर करूं असें मनांत योजून तिला त्या वेळीं स्वस्थ बसावें लागलें.

हा वर सांगितलेला प्रसंग घडल्यानंतर घरीं जाईपर्यंत कोणी कोणापाशीं एक शब्द सुद्धां बोललें नाहीं.

---

# प्रकरण १५ वें.

## कविवर्यांची कविता.



पद्मावतीनें वरकरणी असें दाखविलें कीं जणूं काय वाटेंत जें पत्र कोणीं आपल्या अंगावर टाकिलें, त्यांत कांहींच अर्थ नव्हता. गाडींत बसून चाललें असतां नाटक, जादू, कंदील किंवा अशाच प्रकारच्या खेळातमाशांच्या जाहिराती वांटणारे लोक भरकन् आपल्या जाहिरातींच्या चार पांच प्रती गाडींत फेंकून देतात. त्या गाडींत बसणारा हातांत घेऊन वाचून पहातो, परंतु लागलीच त्यांत कांहीं अर्थ नाहीं ह्मणून खालीं टाकून देतो, अगर तशाच इकडे तिकडे पडूं देतो, तशांतलाच हा या पत्राचा प्रकार झाला, त्यांत विशेष विचार करण्याजोगें कांहीं नाहीं असें इतर मंडळींस दाखविण्याचा तिनें आपल्याकडून प्रयत्न केला. प्रथम तें पत्र वाचून खिशांत घालीपर्यंत तिची चर्या अगदीं विलक्षण झाली होती, परंतु सरासरी पांच मिनिटें तशींच गेल्यानंतर तिनें आपल्या मनांतील विचारांचा परिणाम चर्येवरही होऊं देऊं नये याकरितां प्रयत्न चालविला व त्या प्रयत्नांत बरीच सिद्धिही मिळविली.

वसंतरावाचा पहिला झटका असा होता कीं, आपण पद्मावतीस त्यासंबंधीं कांहीं तरी विचारावें, परंतु तिनें तें पत्र वरवर वाचून अगदीं शांतपणें आपल्या पोलक्याच्य खिशांत घातलें व त्यासंबंधीं कांहीं उद्गारही काढला नाहीं, तेव्हां आपण आपली जिज्ञासा दाबूनच ठेविली पाहिजे असें त्याच्याही मनांत आलें. आणि त्यानें तसें केलें. या मधल्या प्रसंगानें सर्वांचीच अवस्था चमत्कारिक होऊन सर्वच अगदीं स्तब्ध बसले, हें बरें नव्हे असें त्यास वाटून तो एकदम मग जणूं काय विशेष कांहींच झालें नाहीं असें दाखवून ह्मणतो:

" पद्माताई, एक माणूस घरीं काय बडबड करून आपल्याला सांगत होतं, कीं आपण आतां अशा वागणारन् आणखी अशा गोष्टी विचारणार. नवराबायकोंनीं परस्पर एकमेकांशीं भर मंडळींत बोलण्याला काय हरकत आहे! अन् आपण अगदी खुशाल कुणाची मुरवत न ठेवतां बोलणार. या ज्या आज चार दिवस एका माणसाच्या गप्पा चालल्या होत्या त्या आतां कुठें गेल्या हो ! असं काय एकदम झालं ! दिपलं वाटतं तें माणूस विलायती पोषाखाच्या तेजानं ! "

वसंतरावाचें हें बोलणें पद्मावतीस फार हितावह झालें. आपला जो मधला प्रसंग झाला, त्यांतून बाहेर निघून कांहीं तरी भाषणास सुरुवात व्हावयालाच पाहिजे होती. त्याप्रमाणें ती झाली, तेव्हां लागलीच ती वसंतरावास उत्तरादाखल ह्मणते, " वसंतरावदादा, तुह्मांला आधींच कांहीं

थट्टा करायला नको, आणखी त्यांत असला प्रसंग, मग काय विचारतां ? तुमचं ठीक असतं. आह्मी बायका आपण होऊन कांहीं बोललों, तरी आमची चेष्टा करायला हरकत नाहीं; बरं नाहीं बोललों, तरी चेष्टेला वाव आहेच. बोललों तरी आह्मी आचरट, नाहीं बोललों तरी आचरटच! एक केलं लाज नाहीं ह्मणून ह्मणायला तुह्मी तयारच. दुसरं केलं फाजील, लाजाळू ह्मणून ह्मणायला तयारच. तेव्हां आह्मीं वागावं तरी कसं, सांगा आम्हांला, ह्मणजे आपल्या तशा वागूं. "

वसंतराव त्यावर एकदम म्हणतो, "आतां आह्मी सांगायला पाहिजे कशाला ? अन् आह्मी सांगणार काय ? आह्मी पडलों गांवढी लोक. साहेबांच्या चालीरीती अन् साहेबांच्या देखत आह्मी सांगायला लागलों म्हणजे मग काय विचारतां–आतां, तूं म्हणालीस त्या आचरटांतच आमची गणना व्हायची. " इतकें बोलून तो आपल्या मेहुण्याकडे वळला व हंसून म्हणालाः " काय हो साहेब, आपण कांहीं एखादी मार्गोपदेशिका तयार कराल का आमच्या गरीब बहिणीसाठीं ? नाहीं तर आमची बहीण आपली आहे अजाण. तिला कांहीं सुचायचं नाहीं. हजारों चुका होतील. तेव्हां जर कांहीं मार्गोपदेशिका एखादी आपण तयार केली तर फार चांगलं होईल. आमच्या बहिणीनं संस्कृत मार्गोपदेशिकेचा चांगला अभ्यास केला आहे. तिची मंदिरांतःप्रवेशिकासुद्धां झाली आहे, त्यामुळं तिला असलीं पुस्तकं वाचून अभ्यासाला कांहीं अडचण पडणार नाहीं. आमच्या बहिणीची अगदींच फजिती होऊं नये म्हणून आपली ही माझी आपल्याला विज्ञप्ति आहे इतकंच. "

मालतीस हें आपल्या भावाचें भाषण अगदीं आवडत नव्हतें, निदान याची थट्टा फार फाजील असते, याला थट्टा कोठें करावी, कोणाची करावी, किती करावी, याचा कांहींच विचार रहात नाहीं, असें तिच्या मनांत वारंवार येत होतें.

जांवईबोवा वसंतरावाचें भाषण आपलें नुसतें ऐकून घेत होते. फार सुंदर असें स्मित त्यांच्या चर्येवर दिसत होतें. मधून मधून ते आपल्या लज्जित व त्यामुळें अधोवदन झालेल्या पत्नीकडे पहात असत. एक अक्षरही बोलले नाहींत.

अशा स्थितींत मंडळी आपल्या बंगल्यास जाऊन पोंचली. आपणांस संकोच होऊं नये म्हणून मंडळींनीं आपला बैठकखाना खालच्याच मजल्यावर केला होता. वृद्ध मंडळीची व्यवस्था वर होती, हें वाचकांस माहीतच आहे. मंडळी बंगल्यांत जाण्याबरोबर वसंतरावानें जांवईबोवांस आधीं वर नेऊन त्यांचेकरितां तयार केलेल्या खोलीकडे नेलें व सांगितलें कीं, मित्रमंडळी येईपर्यंत व चहा तयार होईपर्यंत आपण आपला प्रवासाचा वेष उतरून हा पानसमयाचा वेष चढवावा. आपला प्रवासवेष उतरण्यास कोणी मंडळी पाहिजे असल्यास पाठवून देतों. " मंडळी " हा शब्द उच्चारतांना त्यानें मुद्दाम डोळे मिचकावून हंसून जांवईबोवांकडे पाहिलें. तेव्हां मात्र जांवईबोवा वसंतरावास ह्मणालेः " वसंतराव, तुमची वृत्ति आपली तीन वर्षांपूर्वीं जशी होती तशी आहे. तींत कांहीं फरक नाहीं. विनोदाखेरीज या जगांत कांहीं नाहींना ? "

"पाहूं आतां " वसंतरावानें उत्तर दिलें, " आपण काय आतां विनोदाखेरीज आणलं असेल तें पाहून तें आपल्याला पुरून

दुसऱ्याला देण्याइतकं असलं तर आपल्यापासून मागून घेऊं. मग तर झालं कीं नाहीं? आपण किती आणलं असेल त्यावर आतां अवलंबून राहील! विलायती सीरिअसनेस काय असतो तो तरी आतां आम्ही पाहूं. सध्यां आपली गरम ग्रॅव्हिटी आह्मांला मिळेपर्यंत आमचा आपला बास विनोदच आपण घ्यावा! मात्र आतां आपला ड्रेस लवकर होऊं द्या. आमची मंडळी येईपर्यंत मी खालची व्यवस्था पाहतों. आपली सर्व व्यवस्था इथें केली आहे."

इतकें बोलून वसंतराव निघून गेला. खालीं मंडळी तितक्यांत आलीच. नंतर जांवईबोवा येईपर्यंत काय व्यवस्था करावयाची, ते आल्याबरोबर त्यांचें मंडळींनीं स्वागत कसें करावयाचें, जो हंशा बंदरावर पिकावा अशी इच्छा होती, परंतु तेथल्या एकंदर धांदलींत पिकणें शक्य झालें नाहीं तो आतां येथें कसा पिकवावयाचा याबद्दल विचार तर ठाम ठरलाच. तेव्हां स्वारी वरून खालीं येतांच टाळ्या वाजवून त्यांस अमक्यानें हात धरून मध्यस्थानीं आणून बसवावयाचें, अमक्यानें लागलीच उठून भाषणास सुरुवात करावयाची, अमक्यानें मग आपली कविता वाचावयाची, अशा योजना चालल्या होत्या. वसंतराव कांहीं चहाची तजवीज करीत होता, कांहीं मधून मधून मंडळींत येऊन व्यवस्था सुचवीत होता. पद्मावती, मालती व तिची आई ही मंडळी वर जाऊन आपल्या आपल्या कामाला लागल्या होत्या.

थोड्याच वेळांत सर्व व्यवस्था झाली. चहाची तयारी झाली, तेव्हां वसंतरावानें जांवईबोवांस हांका मारण्याचा अगदीं सपाटा चालविला. जांवईबोवाही धांदलीनें आपला पोषाख काढून व धोतर नेसून शर्ट घालून खालीं आले. ते दारांत येतांच सर्व मंडळींनीं त्यास खडी ताजीम देऊन खूप खडकून टाळ्या वाजवून कडकडाटांत त्यांचें स्वागत केलें. गंगाधरानें पुढें येऊन त्यांचा हात धरून त्यांस अगदीं अग्रासनीं नेऊन बसविण्यास ओढाताण चालविली. तो गृहस्थ कांहीं बसेना. तरी पण मंडळींनीं अत्याग्रहानें ओढून नेऊन बळेंच बसविलें. तेव्हां "काय बोवा तुह्मी मंडळी वाजवीपेक्षां फाजील चेष्टा करतां. हा प्रकार तुमचा काय चालला आहे हा!" असा उद्गार त्यानें काढला. तो मंडळीच्या कानीं पडतांच कविवर्य उठले व एकदम पुढें सरसावून ह्मणतातः

"मित्रहो, मी आतांपर्यंत नुसता महाकवि आहें एवढीच माझी भावना झाली होती. परंतु मोठी अभिमानाची गोष्ट मला वाटते ती ही कीं, मी महाकवि असून शिवाय महाभविष्यवादीही आहें. आपल्या मित्रांनीं —आपल्या इंग्लंडाहून परत आलेल्या मित्रांनीं —आतां जो आपल्यापुढें उद्गार काढला तो मी भविष्यवादी असल्याकारणानें मनांत पूर्णपणें आणूनच त्याचें उत्तर दिलेलें आहे. तें उत्तर ह्मणजे माझें

"पतितपरावर्तन ऊर्फ बहिष्कृतस्वीकृति" हें माझ्या मित्राच्या स्वागताप्रीत्यर्थ स्फूर्ति होऊन रचिलेलें काव्य होय. तेव्हां तें वाचून दाखविण्याची परवानगी आपल्यापासून मागून घेतों."

काव्याचें नांव ऐकतांच जो हंशा पिकला तो त्या बंगल्याचे सर्व मजले भेदून पलीकडे गेला!

हां हो काय पातला प्रसंगू।
निःसंगाशीं जाहला संगू।
ऐका सज्जन श्रोते अव्यंगू।
कर्ण देउनी आपुले ॥ १ ॥

श्रोतियांचे कर्ण मोठे ।
माझी पामरवाणी थोटे ।
तरी मी नेटें बोटें ।
कथा ऐकवीन तयांसी ।। २ ।।

कोणी एक कुलीन नरू ।
विद्यानगरींचा किन्नरू ।
श्वेतद्वीपासि साचारू ।
चालता झाला ।। ३ ।।

तधीं एकवटले द्विजवर ।
ह्मणती जाहला आजि कहर ।
ओलांडी हा समुद्रनीर ।
पतित कैसा न जाहला ।। ४ ।।

तेथ तयानें काय केलें ।
कोणासही येथ न कळे ।
जाज्वल्य झाला विद्यानलें ।
ऐशी वार्ता पाठवी ।। ५ ।।

येथील लोकीं बहिष्कृति ।
घातली असे तया पतितीं ।
परी होती तयाची मित्रतती ।
तियें स्वीकृती केली जे ।। ६ ।।

अहो काळमहिमा अपारू ।
पतिताचा मांडिला बडिवारू ।
ह्मणती घाला तयासि हारू ।
परावर्तनाच्या पुष्पांचा ।। ७ ।।

जरी लोकीं बहिष्कारिला ।
तरी आपणा काय पारखा झाला ।
पाहिजे आपण स्वीकारिला ।
पारखोनियां ।। ८ ।।

पारखावयाचे समर्थीं ।
कर्णयुग्माची लंबाई ।
मानसांतोनि न जाई ।
ऐसें अवधान ठेविजे ।। ९ ।।

कां कीं तोचि आपुलेपणाचा ठसा ।
मा विसराल तुह्मी सहसा ।
धरोनि हेचि धिवसा ।
कथितसें कीं आक्रोशें ।। १० ।।

सज्जनश्रोते आपणा ।
करितों या काव्यसमर्पणा ।
पतिताच्या परावर्तना ।
तुह्मीच सजलां आहाती ।। ११ ।।

तुमचिये रुपेचा दावानळू ।
याचिया पापराशि होरपाळू ।
पतित परावर्तना कळवळू ।
चित्त नित्य आपुलें ।। १२ ।।

हा विद्यावनींचा मधुकरू ।
श्वेतद्वीपोपवनीं संचारू ।
करोनि परते साचारू ।
मधु लुटोनि आणिला ।। १३ ।।

तर्‍ही या मित्रमंडळ तेजें ।
प्रमुदित वसंतें पाहिजे ।
मालतीमाला अर्पिली जे ।
पद्मावतीसन्निध ।। १४ ।।

कविवर्यांच्या या कवितेची किंमत काय करावयाची त्याचा विचार एकाच्याही मनास शिवला नाहीं. मधून मधून हास्यरसाचा मात्र पूर वाहिला; आणि शेवटीं टाळ्यांचा कडकडाट व हंशाचा हसहसाट उडाला.

---

# प्रकरण १६ वें.

## पद्मेचा प्रश्न.



मंडळी घरीं पोंचल्यानंतर वर सांगितल्याखेरीज आणखी अनेक प्रकारांनीं विनोद, स्वागत व अभिनंदन झालें. दोन प्रहरीं दोन ह्मातारे तेवढे एके बाजूस जेवले. बाकी सर्व मंडळी एकत्र बसून मोठ्या मौजेनें जेवली. पद्मावतीनें आपल्या मनांतील दुःखद विचार छायेनें सुद्धां आपल्या मुखावर दिसूं दिले नाहींत. ती इतरांप्रमाणेंच सर्व विनोदांत व हास्यांत गर्क होऊन गेल्याप्रमाणें दिसली. तें पाहून मालतीला फार आनंद झाला. आपण आपल्या मैत्रिणीला आग्रह करून आणल्याप्रमाणें तिला तिच्या दुःखाचा विसर पडला हें पाहून तिला कां समाधान होऊं नये ?

परंतु आंतली स्थिति फार निराळी होती. पद्मावती जितकी वरून निश्चित होती, तितकी आंतून सचिंत होती. जितका आनंद तिच्या चर्येवर दिसत होता, त्याच्या किती पट तरी दुःख तिच्या अंतःकरणांत होत होतें. तिला आपल्या मैत्रिणीचें सुख पाहून सुख झालें खरें, परंतु आपण अशा दुर्दैवी कां ? असें मनांत येऊन दुःख झाल्याखेरीज राहिलें नाहीं. त्यांतही तिनें मध्येंच एकदां इतर मंडळीस टाळून एका बाजूस जाऊन तें वाटेंत कोणी तरी गाडींत फेंकून दिलेलें शिक्केमोर्तबाचें पत्र फोडून वाचून पाहिलें. तें वाचीत असतां तिच्या मनास केवढा धक्का बसला, व त्यामुळें तिची चर्या भयंकर झाली होती हें जर मालतीच्या दृष्टीस पडतें, तर तिनें पद्मावतीच्या वर्तनावरून तिला आपल्या दुःखाचा विसर पडला असें कधींही वाटून घेतलें नसतें आणि मग तिच्या मनाला समाधानही वाटलें नसतें. परंतु पद्मावतीनें आपलें मन त्या पत्रानें विशेष विव्हळ व भयभीत झालें असतांही आपल्या चर्येवर तो विव्हळपणा किंवा ती भीति मुळींच दिसूं दिली नाहीं. मात्र राहून राहून तिला एक इच्छा होई. आपल्या गाडींत जशा प्रकारचा लखोटा कोणीं तरी टाकला, त्याच प्रकारचा लखोटा आपल्या पुढल्या ह्मणजे आपले वडील दादासाहेब ज्या गाडींत बसले होते त्यांत त्यानें टाकला होता. त्या लखोट्यांत काय मजकूर होता हें कळण्याची तिला उत्कट इच्छा होती; परंतु वडील आपण होऊन बोलले तर ती इच्छा तृप्त होणार; नाहीं तर होणार नाहीं. आपण होऊन त्यांना विचारण्याची कांहीं तिला प्राज्ञा नव्हती. यामुळें तिनें तीही इच्छा अगदीं दाबून टाकली. आपल्या पत्राचें काय करावें ? त्यांतील मजकूर आपल्या वडिलांस सांगावा किंवा नाहीं याचीच तिला मोठी पंचाईत पडली. हे सर्व विचार मनांत चालले होते तरी तिची अंतःस्थ वृत्ति तिनें मालतीससुद्धां दिसूं दिली नाहीं. होतां होतां संध्या-

काळच्या सुमारास तिच्या मनाचा कांहीं निश्चय झाला व तिनें मालतीस एके बाजूस गांठून ह्मटलें: "मालुताई, आबासाहेब बहुतकरून रात्रींच्या गाडीनें परत जातील तेव्हां मीही त्यांच्याबरोबर जाईन. ज्या कामाकरितां मला तूं आणलंस तें झालं. चार दिवस झाले, आज मधुकरराव आले, त्यांचं स्वागत झालं, सगळं कांहीं झालं. आतां आबा जायला निघाले; आणखी तूं जर आग्रह करायला लागलीस रहाण्याबद्दल, तर तें कांहीं बरं दिसायचं नाहीं. मी आलें ह्मणून ते माझ्या मागोमाग आले, नाहीं तर आले नसते. मी घरांत नसलें तर त्यांना बोलायचालायला कोणी नसतें. त्यांना घरांत अगदीं चैन पडेनासं होतं, हें तुला माहीतच आहे. तेव्हां उगीच आग्रह करूं नको, आणखी आतां माझं रहाण्याचं कांहीं कारणही नाहीं."

मालती तें ऐकून स्तब्ध झाली. नंतर हळूच पद्मावतीस ह्मणते: "पद्माताई, सकाळपासून मी तुला विचारीन विचारीन ह्मणून ह्मणत आहें. पण माझा धीर होईना. कोणीसा आपल्या गाडींत एक लखोटा सकाळीं टाकला आणखी तो तूं पाहून आपल्या पोलक्याच्या खिशांत घातलास, तो लखोटा कुठला काय ? त्यांत कांहीं..."

"मालुताई, तूं परत आल्यावर मग मला विचार. आतां विचारूं नको. मग मी तुला सगळं कांहीं सांगेन. मला तरी कोणत्याही गोष्टींत विचार घेण्याला तुझ्या खेरीज दुसरं आहे कोण ? आतांपर्यंत मीं आपली शपथ पाळली, पण कोणतीही गोष्ट करायची, तर ती करण्यापूर्वी कोणाला तरी विचारून करावी, त्याच्याखेरीज कसं चालणार ? पण मला आतां कांहीं विचारूं नको. मी तुला सगळं सांगेनच. पण इथें नाहीं. माझ्यावर संकटं येताहेत तीं कांहीं एका तऱ्हेचीं आहेत ? त्यांत आबा काय करताहेत कुणाला ठाऊक. त्यांचं मन अशा बाबतींत मोठं निष्ठुर आहे. ते क्षणभरसुद्धां ऐकायचे नाहींत......"

या शेवटल्या बोलण्यानें मालतीचें मन पुनः बुचकळ्यांत पडलें, आणि त्यावरून ती कांहीं तिला पुढें विचारणार तों अचानक तिला वसंतरावानें हांका मारण्याचा सपाटा चालविला. अर्थातच तिला तें बोलणें तितकेंच टाकून जावें लागलें.

पद्मावतीनें ह्मटल्याप्रमाणें खरोखरीच तिच्या वडिलांनीं रात्रींच्याच गाडीनें परत जाण्याबद्दलचा आपला विचार सांगितला. आबासाहेबांस आग्रह करून ठेवून घेऊं नये आणि आपणही आतां राहूं नये. दोन दिवस मुलांस मोकळें सोडावें असा विचार करून दादासाहेबांनीं त्यांस म्हटलें: "आपण दोघे बरोबर आलों, बरोबरच जाऊं. मी देखील राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तरुण मंडळींना चार दिवस मोकळं सोडावं. आपण त्यांच्या सुखांत कमीपणा आणायला कारण होतों. कारण त्यांना संकोच होतो. जांवईबोवा आले, त्यांचं स्वागत करायचं तें आपलं काम झालं, आतां दोन दिवस धुमाकूळ घालायचा तो त्यांचा त्यांनीं घालावा."

आबासाहेबांस अर्थातच एक तऱ्हेनें समाधान झालें. कारण जसे आपण दोघे आलों तसे दोघे जाऊं असा विचार दादासाहेबांनीं केला. हें आपल्याबद्दलच्या त्यांच्या पूज्यबुद्धीचें दर्शक आहे. हें त्यांनीं जाणलें व त्यांस ह्मटलें, "नको, नको. आपण कां उगीच लवकर येतां ? आपण रहा. मला या मुंबईत कांहीं चैन पडत नाहीं. डोकं उठतं ह्मणून मी आपला जायची गर्दी करतों.

आपल्याला काय ह्मणून गर्दी. आपण रहा. मात्र पद्मेलाही मी घेऊन जातों. घरांत अडचण होते. आणखी आल्यासारखे चार दिवस झाले. आतां कांहीं रहाण्याचं कारण नाहीं."

दादासाहेबांस आबासाहेबांचा एकंदर स्वभाव माहीत होता. तेव्हां पद्मेला त्यांनीं प्रथम पाठविलें त्याचेंच त्यांस आश्चर्य वाटत होतें. आतां तिला आणखी ठेवून घेण्याबद्दल आग्रह करूं नये असा त्यांच्याही मनांत विचार आला व आपण मालतीला त्याप्रमाणें सांगूं असा त्यांनीं निश्चय केला. परंतु मालतीचें व पद्मेचें आधींच भाषण झालें होतें यामुळें मालतीनें मुळींच आग्रह धरला नाहीं. वसंतराव मात्र आबासाहेबांस ह्मणाला कीं "तुह्मी पद्माताईला नेऊं नका." परंतु त्यांनीं त्याला मोडून काढून नेण्याचेंच ठरविलें. त्या रात्रीं आबासाहेब, दादासाहेब व पद्मा अशी तीन मंडळी मुंबईहून परत आपल्या गांवीं गेली.

पद्मा व आबासाहेब आपल्या घरीं गेलीं. पद्मेची आई अद्यापि पंढरपुराहून परत आली नव्हती. यामुळें पद्मेस घरांत सर्व पहावें लागे. त्यामुळें परत आल्या दिवशीं सगळा वेळ घरकृत्यांतच गेला. परंतु ती राहून राहून आपल्या बापाच्या खोलीशीं जाई. तिच्या मनांत त्यांना कांहीं तरी सांगावयाचें होतें असें दिसलें. पण ती त्यांच्या खोलीच्या दाराशीं जाई, आंत डोकावी, आपले वडील कांहीं तरी पुस्तक वाचण्यांत अगदीं गर्क होऊन गेले आहेत असें पाहिलें ह्मणजे पुनः आपल्या कामाला जाई असें संबंध दिवसांत पांच सहा वेळ झालें. तिला त्यांचे जवळ बोलण्यास योग्य अशी वेळच मिळेना. परंतु कांहीं तरी बोलण्यासाठीं ती फार फार उत्कंठित असावी असें स्पष्ट दिसलें. दुपारचीं जेवणें झालीं. तेव्हां आतां ते घटकाभर स्वस्थ पडतील, आपण आपलें जेवण लवकर उरकून त्यांचेकडे जावें असा तिनें विचार केला व त्यांचें जेवण होतांच आपलें जेवण कसें तरी घाईनें उरकून ती त्यांच्या खोलीशीं गेली. तों ते टेबलाजवळ बसून कांहीं तरी लिहीत आहेत असें दिसलें. ती परतली. पुढें दोन चार वेळां तसेंच कांहीं तरी झालें. शेवटीं तिसऱ्या प्रहरच्या चहाचे वेळीं आपण स्वतः चहा तयार करून घेऊन जाऊन त्यांच्या समोर बसावयाचें व काय विचारावयाचें तें विचारावयाचें असा तिनें दृढनिश्चय केला. आणि त्याप्रमाणें दुपारीं ४॥ वाजतां चहा तयार करून तो त्यांचेकडे घेऊन जाऊन ती त्यांस ह्मणाली: "आपण चहा घेतां आहां तोंपर्यंत मला कांहीं आपल्याला विचारायचं आहे. आपण जर रागवणार नाहीं, तर विचारते."

"पोरी, तुझ्यावर आणखी मी रागावणार? स्वप्नांत सुद्धां तूं कधीं कांहीं चुकली आहेस, माझ्या मनाविरुद्ध कांहीं केलं आहेस, असं जर मला कधीं दिसलं नाहीं तर मी तुझ्यावर कधीं रागावेन हें शक्य तरी आहे का? काय सांगायचं असेल तें सांग. विचारायचं असेल तें विचार. इतका संकोच कां? तूं आणखी माझ्याशीं बोलायला संकोच करतेसना! तुला मी रागावेन असं भय वाटतं? वेडे पोरी, तूं ह्मणतेस तरी काय हें? विचार काय विचारायचं आहे तुझ्या मनांत तें. आतां या जगांत मला तूं, आणखी तुला मी, तेव्हां तुझ्यावर मी रागावेन कां? आणखी माझ्या रागाला कारण तरी काय असणार? एवढं तुला काय विचारायचं आहे?

माझी तर उलटी अशी तक्रार आहे कीं, तूं माझ्याशीं जितक्या मोकळ्या मनानं वागायला पाहिजेस तितकी वागत नाहींस. बोल. आतां आणखी किती प्रकारांनीं सांगूं कीं तूं काय पाहिजे तें विचार. तुझ्यावर मी कधीं ह्मणून रागावणार नाहीं."

आबासाहेबांचें हें बोलणें ऐकून पद्मा अतिशय अचंबली. आजपर्यंत अशा प्रकारानें ते बोलल्याचं तिला कधीं स्मरत नव्हतें. त्यांच्याजवळ जाईल कोण? त्यांच्याशीं बोलेल कोण? असा त्यांचा दरारा ज्यास त्यास वाटे. परंतु आजचें त्यांचें बोलणें फार निराळ्या प्रकारचें. तेव्हां 'ही वेळ आतां आपण गमावूं नये' असें मनांत ह्मणून ती लागलीच त्यांस ह्मणाली: "बाबा, काल आपण बंदरावरून गाड्यांत बसून परत येत असतांना रस्त्यांत तुमच्या गाडींत एका माणसानं लखोट्यासारखं कांहीं टाकलं तें काय होतं?"

तो प्रश्न ऐकतांच स्वारीची मुद्रा एकदम कठोर झाली. आतांपर्यंत जें एक प्रकारचें मार्दव त्यांच्या चर्येवर दिसत होतें, तें पार नाहींसें झालें आणि ते लागलीच कपाळाला आंठ्या घालून थोड्या निष्ठुर आवाजानें तिला ह्मणाले: "कां? तुला काय माहीत माझ्या गाडींत कोणीं तरी कांहीं टाकलं ह्मणून? तुला तें समजण्याला कांहीं कारण नाहीं."

"मी त्या वेळीं आपल्या गाडीकडे पहात होतें. त्या बोवानं कांहीं लखोट्यासारखं टाकलं हें मला स्पष्ट दिसलं." पद्मेनें शांतपणें उत्तर दिलें.

आबासाहेब स्तब्ध बसले. नंतर ह्मणाले: "जें काय होतं तें मीं उघडून पाहून तेव्हांच फाडून टाकलं. तुला काय त्याच्याशीं करायचं आहे?"

"आबा, तसलं पत्र नुसतं फाडून टाकून कसं चालणार? आपण त्यांतल्या मजकुराचा विचार नाहीं करणार? अशा वेळीं सुद्धां आपण निष्ठुरपणाच धरणार काय?"

पद्मेचे प्रश्न ऐकून आबासाहेब फारच चिडल्याप्रमाणें झाले, आणि थोडेसे तिरस्टपणानें तिला म्हणतात, "तुला काय ठाऊक त्या पत्रांत काय मजकूर होता आणखी काय नाहीं? तुला काय ठाऊक? तें पत्र तर अगदीं सिलेंमोर्तबें करून गाडींत टाकलं होतं. तें माझ्या नांवचं आहे. मीं पाहिलं तेव्हांच मला समजलं. मीं तें वाचून टाकलींच त्याच्या चिंधड्या करून रस्त्यांत फेंकून दिल्या. असं असून त्यांत काय होतं याबद्दल तुला काय माहीत? सांग आतां. माझ्यापासून कांहीं चोरून ठेवूं नको. तुझा त्याला पाठिंबा असेल, तुझ्या सल्ल्यानं हें तो करीत असेल, अशी माझी मुळींसुद्धां कल्पना नाहीं. बोल, बोल पोरी, तुला काय ठाऊक! तोच तुला भेटला असेल. गोड गोड बोलून तुला भोळीला त्यानं फसविलं असेल. त्याखेरीज तुला त्या पत्रांतला मजकूर काय असेल हें कळलं कसं? आतां कां बोलत नाहींस?"

आबासाहेबांचें त्या वेळचें स्वरूप पाहून पद्मा अगदीं क्षुब्ध झाली. परंतु ज्या गोष्टींत आजपर्यंत कधीं आपण पडलों नाहीं त्यांत आज पडलों, तेव्हां आतां माघार घेऊन उपयोग नाहीं. आतां स्पष्टपणें शेवटपर्यंत धैर्य धरून काय बोलायचें संवरायचें तें बोललें संवरलें पाहिजे, असा मनाचा निश्चय करून ती त्यांस म्हणाली:

"आपल्या गाडींत जसा आपल्या नांवचा लखोटा टाकला तसाच त्या इसमानं माझ्याही गाडींत माझ्या नांवचा एक तसाच लखोटा टाकला तो मीं फोडून वाचला.

आणखी त्यांच्या आधीं तसाच लखोटा त्याच माणसानं तुमच्या गाडींत टाकतांना पाहिलं होतं, त्यावरून तर्क केला कीं त्याच मजकुराचा तो असून तो तुमच्या हातीं जावा म्हणून त्या गाडींत टाकला असावा. मी मुंबईसच आपल्याला विचारणार होतें, पण नको म्हटलं."

आबासाहेबांनीं तें तिचें बोलणें ऐकून घेतलें व ते बराच वेळ स्वस्थ बसले. नंतर तिला म्हणाले: "एकूण त्या भामट्यांनीं आतां तुझ्यामार्फत आपलें काम साधण्याचा खटाटोप आरंभला आहे काय? पोरी, तूं अतिशय शुद्ध, निष्पाप, निष्कलंक अशी आहेस. त्यामुळेंच तूं माझी जीव कीं प्राण आहेस, पण तुझा त्यांना असा उपयोग करूं देणार नाहीं. तुझ्याकरितां मी आपले प्राणसुद्धां खर्ची घालीन. पण तूं पाजी पोरांच्या तावडींत सांपडूं नकोस. तुझं ते अगदीं वाटोळं करून टाकतील. माझा त्यांच्यावर राग आहे तो उगीच नाहीं. तूं त्यांची कींव करायला जाशील, परंतु तेच तुझा उलटा सत्यनाश करतील. एकूण त्यांनीं तुलासुद्धां पत्र लिहून फसवायचा बेत केला अं?"

"आबा, तुम्ही इतका निष्ठुरपणा त्यांच्याशीं कां करतां? ते दोघेही इतके वाईट नाहींत, पण जरी असले, तरी काय? तुमच्या निष्ठुरपणानं ते सुधारतील का अधिक वाईट होतील? तुम्ही त्यांच्याशीं नका इतका निष्ठुरपणा करूं. त्यांना आपल्याजवळ बोलवा. तुम्ही जर चार मायेचे शब्द बोलाल, नीट समजुतीच्या गोष्टी सांगाल, तर ते तुमच्या बाहेर कधीं जाणार नाहींत."

"पोरी, आज तूं बरीच मन मोकळं करून बोलूं लागलीस. पण भलत्याच कामांत बोलते आहेस, एवढंच वाईट वाटतं. माझा निष्ठुरपणा तुला दिसतो पण त्यांचीं दुष्कृत्यं नाहीं तुला दिसत, त्याला काय म्हणावं! अगदीं वेडी आहेस. त्यांना पुनः घरांत पाऊल घालूं देण्याच्या लायकीचे ते नाहींत. तुला त्यांची कांहीं माहिती नाहीं. त्यांना इथून घालवून दिल्यापासून त्यांनीं काय काय कृत्यं केलीं आहेत, तुला कांहीं कल्पना तरी आहे का?"

"आबा, तें कांहीं असो, परंतु तुम्ही त्यांना इतक्या निष्ठुरपणानं वागवूं नका. त्यांची स्थिति फार भयंकर आहे. ते मला भेटले, त्यांना तुम्ही......"

"ते तुला भेटले! तुला भेटण्याइतका पाजीपणा त्यांनीं केला!"

परंतु संतापानें त्यांना पुढें बोलवेना. त्यांचें अंग थर थर कांपूं लागलें, आणि त्यामुळें पद्मावतीही फार घाबरली.

---

# प्रकरण १७ वें.

## वसंतरावाचा निश्चय.



मालतीचे वडील आपल्या घरीं स्वस्थ बसले होते. त्यांची पत्नी त्यांच्या समोर एका आरामखुर्चीवर पडली होती. दोघांचेंही चित्त आनंदमय तर खरें, परंतु त्यांतल्या त्यांत थोडें अस्वस्थ दिसलें. मालतीचे वडील कांहीं तरी नुकतेच बोलले असून आपल्या पत्नीकडून त्यावर उत्तर अपेक्षित तिजकडे पहात होते. परंतु बराच वेळ झाला तरी उत्तर कांहीं आलें नाहीं, आणि येण्याचें लक्षणही दिसेना. तेव्हां ते पुनः ह्मणतातः

"काय ? झोंप लागली का काय ? मला त्यांना उत्तर दिलं पाहिजे. तुह्मीं वसंतरावाला विचारलं नाहीं का ? माझ्याशीं तो स्पष्टपणानं बोलणार नाहीं ह्मणून तर मीं आपल्याकडे ही कामगिरी सोंपविली. काय मौज असेल ती असो, मुलं किती मोठीं होवोत, आणखी बाप कितीही मोकळ्या मनानं त्यांच्याशीं वागो, तीं तितक्या मोकळ्या मनानं बापाशीं वागत नाहींत. लहानपणीं एक मुलांचा आईशींच संबंध जास्त असतो, परंतु मोठेपणीं--निदान वसंत ज्या वयाचा झाला आहे त्या वयांत तरी--आईपेक्षां बापाचाच संबंध जास्त असतो. पण कांहीं महत्वाची, मोकळ्या मनानं बोलण्याची बाब आली, कीं मुलं मुग्ध घुम्यासारखीं बसतात. मग आयांकडूनच त्यांच्या मनांत काय आहे तें समजावून घ्यावं लागतं. आतां या वसंताला माझ्याजवळ काय झालं स्पष्ट काय तें बोलायला ! बरं मी कांहीं जुन्या तऱ्हेचा मोठा ताठ्यानं वागणारा असा बाप आहें, तर एक असो......" "या बाबतींत स्पष्ट बोलायची त्याला लाज वाटते असं दिसतं." तो माझ्याजवळ देखील अगदीं स्पष्ट बोलत नाहीं. "स्पष्ट बोलत नाहीं, असं ह्मणून कसं चालेल ! त्याला स्पष्ट बोलायला लाविलं पाहिजे. मालीला सांग त्याला विचारायला." "मालीला ? अहाहा ! तिच्याशीं तो धड बोलणार ? तिच्याशीं तो थट्टेखेरीज कांहींच बोलत नाहीं. मीच एकदां निक्षून विचारीन तेव्हां तें होईल."

"मग तसं विचारायला कांहीं मुहूर्त वगैरे पहायला ज्योतिषी आणवूं का काय ? मला तो गृहस्थ भेटलारे भेटला कीं असं वाटतं कीं, याला आतां काय उत्तर द्यावं ?"

"आपल्याला जितकी उत्कंठा आहे, त्याच्यापेक्षां कांकणभर जास्तच उत्कंठा मला नाहीं का ? पण मला थोडं भय वाटतं."

"भय ? भय कसलं ?"

" भय असं वाटतं, कीं पोराचं उत्तर कांहीं तरी चमत्कारिक येईल. "

" चमत्कारिक तें काय यायचं ! होय. नाहीं तर नाहीं. ती मुलगी त्याला नसली पसंत, तर त्याच्या मनाविरुद्ध कांहीं आह्मी त्याच्या गळ्यांत नाहीं बांधणार, एवढी नाहीं का खात्री त्याची ! "

" मुलगी पसंत किंवा नापसंत हा नाहीं प्रश्न. मुलगी नापसंत ह्मणायला जागाच नाहीं. अशा मुलीला नापसंत ह्मणेल कोण ? पण भय वाटतं आहे तें निराळंच. "

" मग तें काय, तें सांगायला एवढे आढेवेढे कां ? "

" आढेवेढे कसले आले आहेत ? पण माझ्या मनाची खात्री झाली नाहीं तोंच उगीच कशाला सांगावं ह्मणून नाहीं सांगितलं. "

" वा ! हें तर मोठं अधिकाधिकच गूढ होत चाललं आहे. "

" गूढ कसलं आलं आहे ! गूढ कांहीं नाहीं त्यांत. "

" गूढ नाहीं. मुलगी नापसंत नाहीं. मग भय वाटतं ह्मणजे काय ! "

" आपल्याला राग नाहींना येणार ? आजपर्यंत आपल्या सगळ्या आयुष्यांत आपल्या मनाविरुद्ध वागणूक कधीं कोणीं केली नाहीं. यामुळें असं मनांत येतं कीं, आतां हें जसं मला वाटतं आहे, तसं जर झालं, तर आपल्याला राग येऊन काय होईल, कोणास कळे ! "

आपल्या कुटुंबाचें तें भाषण ऐकून दादासाहेब हंसले, आणि म्हणाले: " माझ्या रागाची कोणीं पर्वा केलेली आजन्मांत मी ही पहिल्यानंच पहातों आहें. आधीं मला राग आला आहे, आणखी मीं तो कोणाला दिसूं दिला आहे हेंच मला कधीं आठवत नाहीं; आणखी आज ही नवीनच काय गोष्ट काढली आहे ? अशीं इकडून तिकडे न् तिकडून इकडे बोलणीं बोलण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. काय तुला भय वाटतं आहे, आणखी काय खरा प्रकार आहे, तें सारं मला समजलं पाहिजे. त्या गृहस्थाला मी किती चाळवण्या दाखवूं ? त्यानं तरी आमच्या उत्तराची किती दिवस वाट पहावी ? इतरांप्रमाणें आपल्या इथें होणार नाहीं म्हणून तर त्यानं अगदीं एकदम आपलं काय म्हणणंसंवरणं आहे तें सांगितलंन्. तेव्हां तूं आतां असं कांहीं करूं नको. वसंताला एकदां नीट जवळ बोलावून बसवून स्पष्टपणानं विचार. "

" मीं विचारलं. "

" मग तो काय म्हणाला ? "

" तेंच तर सांगणं मोठं कठिण आहे. "

" तो कांहीं विचित्र भाषेंत बोलला का काय ? म्हणजे मराठींतच बोलला ना ? "

" तो ह्मणाला, ' आपल्याला आजन्म लग्नच करायचं नाहीं !' मीं तें ऐकल्याबरोबर अगदीं चकित झालें. पहिल्या प्रथम जेव्हां आपला निरोप सांगितला, मुलगी कोणाची तें सांगितलं, तेव्हां कांहींच बोलला नाहीं. नंतर जेव्हां पुनः पुनः विचारूं लागलें तेव्हां ' आतांच काय त्याचं ! ' ' आतांच काय त्याचं ? ' ' इतक्यांत काय घाई ? ' अशीं उत्तरं द्यायला लागला. शेवटीं जेव्हां ' तें कांहीं नाहीं, त्या तात्यासाबांना ताबडतोब काय तें सांगितलं पाहिजे' असं सांगितलं, तेव्हां म्हणाला: ' माझ्या मनांत आजन्म अविवाहित राहायचं आहे. तेव्हां या लग्नाच्या बाबतींत मला कांहीं कोणीं पुनः विचारूं नये. ' हें ऐकल्याबरोबर मीं अगदीं थिजलें. वसंतासारखा

विनोदी, गमत्या आणखी प्रेमळ मुलगा 'आजन्म लग्न करायचं नाहीं' असं मला उत्तर देईल हें स्वप्नांत सुद्धां आलं नाहीं. 'आणखी आज तीन दिवस झाले, ही गोष्ट आपल्याजवळ सांगावी कशी' ह्मणून आपली मनांत चूर होऊन राहिलें आहे. आपलं असं वाटायला लागलं कीं आपले सुखाचे दिवस संपून आतां दुसरे दिवस लागले कीं काय ? "

दादासाहेब तें ऐकून बराच वेळ अगदीं स्वस्थ बसले. नंतर हळूच आपल्या कुटुंबास ह्मणतातः " मग तात्यासाहेबांना काय सांगायचं ? आमचा मुलगा लग्नच करूं इच्छीत नाहीं म्हणून सांगायचं ? "

"आतां मीं तरी तें काय सांगूं ? जें काय झालं तें मॉं आपलं सांगितलं. मला वाटतं आहे कीं, एकदां आपण दोघांनीं त्याला स्पष्ट त्याच्या मनांत काय आहे हें विचारावं, आणखी आपली इच्छा काय आहे तेंही सांगून टाकावं. माझ्याजवळ तो मन मोकळं करून बोलला खरं, पण अशा प्रकारचं बोलला. मी आपलं त्याच्याजवळ अधिक कांहीं बोललें नाहीं. वाटलं कीं, इतक्या तडकाफडकीं कांहीं बोलूं नये. " " मीं बोलावून आणून विचारलं, तर काय ह्मणतेस तो निराळं उत्तर देईल ? "

" हो. असं मला वाटतं. माझं विचारणं निराळं, आपलं निराळं. आपण एकदां त्याला निक्षून विचारावं. "

" मला वाटतं मग त्याला आतांच बोलावून आणून विचारावं. तूं ह्मणतेस असाच जर त्याचा विचार असला तर तो एकदां स्पष्टपणानं कळलेला बरा. शेंकडों लोक उगीच चौकशीला येतात, आणखी मुलींचे फोटोग्राफ, अक्षर वगैरे पहाण्यासाठीं ठेवून जातात, ती सगळी दगदग नाहींशी होईल. त्याला सांग कोणाला तरी हांका मारायला. "

" आतां अगदीं तापल्या तव्यावरच कशाला ? "

" नाहीं, नाहीं. तूं म्हणतेस तसाच जर त्याचा पक्का निश्चय झालेला असला तर वेळ दवडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जन्मपर्यंत अविवाहित रहाणार आणखी हा करणार काय ? तें तरी त्याला विचारूं. "

" विचारा, पण त्याचा मला अगदीं पक्का निश्चय दिसतो. असा त्यानं कां निश्चय करावा, हें मात्र समजत नाहीं. "

" त्याच्या मनाजोगी बायको मिळेपर्यंत लग्न करायचं नाहीं असा त्याचा निश्चय आहे कीं........"

" छे हो. त्यानं मला सांगितलंन् कीं आपल्या मनांत मुळींच लग्न करायचं नाहीं. आजन्मांत लग्न करायचं नाहीं ! "

दादासाहेब पुनः आपल्याशींच कांहीं विचार करीत स्वस्थ बसले. नंतर बऱ्याच वेळानें उसासा टाकून आपल्या कुटुंबास म्हणतातः " पण एकदां तूं त्याला इकडे बोलावच. माझ्या मनाचं मला समाधान करून घेऊं दे. हो, म्हणजे पुढें आतां कोणी जरी आला तुमच्या मुलाचं लग्न व्हायचं आहे तेव्हां आमची मुलगी पहा ह्मणायला तरी त्याला सांगायला बरं, कीं बोवा आमचा मुलगा लग्न करीत नाहीं म्हणून. बोलाव त्याला. "

" बोलावतें, पण त्याच्यावर संतापूं नये. सौम्यपणानं त्याला काय तें विचारून घ्यावं इतकंच. त्याच्या मनांत जर कांहीं विशेष गुपित गोष्ट असली, तर आज नाहीं उद्यां मी काढीन. "

" संतापणंन् रागावणं ! आजपर्यंत कधींच मला माहीत नाहीं, आणखी मी

आपल्या मुलावर रागावेनन् संतापेन का? अशी का त्याची समजूत आहे माझ्या-बद्दल कीं मी फार रागीटन् संतापी माणूस आहें ह्मणून?"

"छे, तसं नाहीं. पण मुलांनीं ऐकलं नाहीं, आपल्या मर्जीविरुद्ध भलतंच कांहीं केलं कीं थोडासा राग येतो. त्यांत 'हा मुलगा आपला लग्नच करीत नाहीं ह्मणून आग्रह धरून बसला, तर......"

"तर नाहींन् बीर नाहीं. त्याला बोलाव अगोदर. त्याला स्पष्टपणानं सगळं विचारणं आपलं काम आहे. ब्रह्मचर्य—आजन्म ब्रह्मचर्य—पाळण्याचा निश्चय करणं कांहीं वाईट नाहीं; पण तसं कांहीं विशेष कार्य तरी करण्याचं मनांत पाहिजे. नुसतं आपलं ब्रह्मचर्य पाळणं यांत कांहीं मोक्ष नाहीं."

"तें मला कांहीं समजत नाहीं. मला आपलं वाटतं आहे, कीं त्याच्या चार परीक्षा झाल्या आहेत, आणखी काय शिकायचं असेल, तें शिकावं; वकील, डॉक्टर काय व्हायचं असेल तें व्हावं. आपल्याला पाहिजे तशी बायको करावी. आणखी आमच्या देखत संसार करावा. चार मुलंबाळं झालीं, आणखी आह्मीं जसं त्याचं केलं, तसं तीं आपल्या मुलांचं करूं लागलीं असं आह्मांला दिसलं ह्मणजे झालं. आम्हांला दुसरं काय हवं आहे? पण 'लग्नच मला करायचं नाहीं' असं यानं ह्मटलं ह्मणजे आम्ही काय करणार? मी आणतें त्याला बोलावून..."

"आणा, आणा. आज आतां मला असं वाटतं आहे कीं एकदां त्याच्याशीं या बाबतींत स्पष्ट बोलून टाकावंच."

वहिनीबाईंनीं लागलीच बाहेर जाऊन वसंतास हांका मारून आणण्यास एका गड्यास सांगितलें. गड्यानें निरोप सांगतांच वसंतराव चटकन् उठून आई उभी होती तेथें आला. तेव्हां वहिनीबाई त्याचे पाठीवर हात ठेवून ह्मणतात: "लग्नाच्या बाबतींत तुला स्वतःच विचारायचं ह्मणून मला तुला बोलवायला सांगितलं, तर चल. आणखी काय विचारतील, त्याबद्दल नीट उत्तर दे हो. वेड्यासारखीं उत्तरें देऊं नको. उगीच वाईट वाटेल, राग येईल, असं कांहीं बोलूं नकोस."

"आई, मी असं कसं बोलेन? पण तूं मला विचारलंस, तेव्हां जें तुला सांगितलं, तें नाहीं का सांगितलंस?"

"सांगितलंरे बाबा, पण तें कोणीं? तुझं खरं का मानूं आह्मी? ह्मणे मी लग्नच करणार नाहीं! कां ह्मणून नाहीं? आह्मी आपली मुलगी लोकाला देऊन टाकली, तेव्हां कोणाची तरी एक आमच्या घरीं आणायला नको वाटतं?"

आपल्या आईचें हें शेवटलें भाषण ऐकून वसंतरावाच्या विचारव्याापृत चर्येवर स्मित दिसूं लागलें. तो बोलला मात्र नाहीं. आईबरोबर आपल्या वडिलांच्या पुढें जाऊन उभा राहिला. वडील त्याची वाटच पहात होते. तो आपल्यापुढें येऊन उभा राहिला आहे असें पहाण्याबरोबर दादासाहेब मुद्रेवर व स्वरांत किंचित् कठोरपणा आणून ह्मणाले:

"कायरे बोवा, ते तात्यासाहेब आजही पुनः मला भेटले होते. त्यांची मनीषा फार कीं आपली मलगी तुला द्यावी. मुलगी सुंदर आहे. निकोप आहे. पंधरावं वर्ष लागलं आहे. मराठी पूर्ण शिकून इंग्रजी पांच यत्तांपर्यंत शिकलेली आहे. माणसं फार चांगलीं आहेत. आमच्या दृष्टीनं सगळं ठीक आहे. तूं मुलगी पाहिलेली आहेसच.

त्यांतून आणखी पुनः पहायची असली तरी पहा. पण काय तें आम्हांला नक्की सांग."

"मीं आईला सांगितलं आहे." वसंत अत्यंत नम्रपणानें ह्मणाला.

"आईला सांगितलंस, तें तिनं मला सांगितलं. पण तेवढ्यानं तिचंही समाधान झालं नाहीं, आणखी माझंही होत नाहीं. तेव्हां मलाच सांग आतां काय तुला सांगा-यचं असेल तें."

"मला विशेष कांहीं सांगायचं नाहीं. मात्र..."

"विशेष नाहीं. सामान्य काय सांगायचं तें सांग. मात्र काय?"

"सांगायचं इतकंच कीं माझ्या मनां-तून मुळीं लग्नच करूं नये असं आहे."

"मुळीं, लग्नच करूं नये असं आहे ह्मणजे काय? असा निश्चय झाला आहे, प्रतिज्ञा केली आहे, का शपथ वाहिली आहे, कीं आपलं सध्यां असं वाटतं इतकंच?"

वडिलांचे ते प्रश्न ऐकून वसंतराव कांहीं बोलेना. तेव्हां वडील त्याला पुढें ह्मणतात.

"इकडे बघ, तूं स्पष्ट काय तें बोलायला मुळीं सुद्धां संकोचूं नकोस. जें काय तुझ्या मनांत असेल, तें स्पष्टपणानं मला सांग. मला त्याबद्दल कांहीं सुद्धां वाटायचं नाहीं. मी तुझा एक वृद्ध स्नेही आहें, तुझ्यापेक्षां मला जास्त अनुभव आहे, आणखी विचा-रही आहे असं मनांत समज. जुन्या चालीप्रमाणें वडिलांबद्दल भीति बाळगा-यची, तशी बाळगूं नकोस. अगदीं खुल्या मनानं मला सांग काय तें. त्यांत कांहीं बाबतींत तुझा विचार पुरा झाला नसला, किंवा चुकला असला तर मी तुला सांगेन मला काय वाटतं तें. मी रागावेन, संता-पेन, असं मनांत सुद्धां आणूं नको बरं. बोल आतां मीं काय विचारलं तुला तें. जर आणखी कांहीं दिवसपर्यंत लग्न करूं नये असं वाटत असलं तर तसं सांग. आपण कांहीं दिवसांनीं या गोष्टीचा विचार करूं, पण मुळींच लग्न करूं नये असं वाटत असलं तर तसं कां वाटतं तें पाहिलं पाहिजे. बरं प्रतिज्ञा किंवा शपथच वाहिली असली तर तिला कांहीं अट किंवा मर्यादा आहे का आमरणांत चालायची? या सगळ्या गोष्टी नको का आह्मांला कळायला? जसं तुम-च्या लहानपणीं तुमच्या शरीराची काळजी घेऊन तुम्हांला नसेल तें आह्मीं पुरवायचं, तसंच तारुण्यांतही आहे. तुम्हांला वाटतं कीं आपलं शरीर जसं बळकट झालं, तसंच आपलं मनही बळकट झालं, पण ती तुमची समजूत चुकीची आहे. शरीर बळकट व्हायला सर्व अवयवांचा लहान-पणापासून सारखा उपयोग होत असतो. चुकाल तिथें आह्मी लहानपणीं संभाळतों. मुलं लहानपणीं आह्मांला येतं चालतां, येतं बोलतां, असं म्हणून पडतच असतात, चुकतच असतात. मोठीं माणसं त्यांना सां-वरतात, मदत करतात, आणखी असं पुष्कळदां झालं ह्मणजे मग त्या मुलांच्या ताब्यांत त्यांचं शरीर येतं. मग त्यांना कोणाची मदत लागत नाहीं. सहाय्य लागत नाहीं. तरुणपणीं मनाचं तसंच आहे. अगदीं लहानपणीं मुलांच्या ताब्यांत त्यांचं शरीर जसं नसतं, तसंच तरुणपणाच्या प्रारंभीं मन तरुणांच्या ताब्यांत नसतं, वृद्धांचा अनुभव घेऊन त्या मनाला आक-ळून घ्यावं लागतं. म्हातारीं माणसं फार बडबडीं होतात, त्यांतलीच माझी ही लांब-लचक बडबड आहे असं तुला वाटून माझ्या बोलण्याचा कंटाळासुद्धां आला असेल. पण माझ्या या पुष्कळ बोलण्याचा कंटाळत कंटाळत जरी विचार केलास तरी

तुला थोडं तरी घेण्याजोगं सार मिळेल. तेव्हां मला सांग मी काय विचारतों तें. अगदीं मोकळ्या मनानं सांग. मनांत कांहीं किंतु आणूं नकोस."

"आजन्मांत लग्न करायचं नाहीं असा निश्चय झाला आहे. प्रतिज्ञा नाहीं किंवा शपथही नाहीं."

"पण असा निश्चय करण्याचं कांहीं विशेष कारण?"

"कारण आहे, पण तें मला सांगतां येत नाहीं."

"माझ्याजवळसुद्धां सांगतां येत नाहीं!"

"होय. आपल्याजवळ सुद्धां मला सांगतां यायचं नाहीं."

"असं काय बोलतोस वसंता, आमच्यापासून चोरून ठेवायला पाहिजे असं काय आहे? काय असेल तें मोकळ्या मनानं सांग ह्मणून सांगितल्यावर देखील सांगतां येत नाहीं?"

वहिनीबाईंनीं हें बोलतांना वसंतरावाकडे अत्यंत प्रेमयुक्त दृष्टीनें अगदीं निरखून पाहिलें आणि त्याच्या जवळ जाऊन त्याच्या पाठीवरून हात फिरविला.

परंतु वसंतानें, एक नाहीं दोन नाहीं, कांहींच प्रत्युत्तर दिलें नाहीं. तेव्हां पुनः दादासाहेब ह्मणतात: "तूं आपलें कारण जर मला सांगितलें नाहींस, तर त्यांत चूक कुठें आहे, हें तरी तुला कसं सांगावं आह्मीं? बोल. तुझ्या निश्चयाला कारण काय तें सांग."

"मला आपण आग्रह करूं नका. मला कारण कांहीं सांगायला येत नाहीं, पण माझा निश्चय पक्का आहे."

"हा असाच किती वर्षं निश्चय राहायचा? त्याला कांहीं अवधि आहे?"

"तें कांहीं मला सांगायला येत नाहीं."

"सांगायला येत नाहीं, सांगायला येत नाहीं, याचा अर्थ काय?" वसंतराव कांहीं बोलेना. तेव्हां त्यांचे वडील पुढें त्याला ह्मणतात: "सांगायला येत नाहीं ह्मणजे काय? तूं जें सांगशील, त्याचं महत्व आह्मांला कळणार नाहीं म्हणून सांगायला येत नाहीं, का त्यांत तिसऱ्या कोणाचा संबंध येतो, त्याचं नांव घेऊं नये ह्मणून सांगायला येत नाहीं? का तुला कांहीं तरी फार मोठं कार्य आरंभायचं आहे, आणखी लग्न केलं तर त्या तुझ्या कार्यांत तुला अडचणी उत्पन्न होणार आहेत म्हणून तूं लग्न करूं इच्छीत नाहींस? काय सांगायला येत नाहीं? आम्हांला जर कांहीं कळलं नाहीं, तर आह्मीं तरी काय समजावं? असं काय गुप्त आहे कीं जें तुला तुझ्या आईबापांपासून गुप्त ठेवावंसं वाटतं?"

"काय तें मला कांहीं सांगतां येत नाहीं. पण आजन्मांत लग्न करायचं नाहीं, असा माझा निश्चय झाला आहे खरा; आणि तो माझा निश्चय आपण कांहीं मोडायला सांगूं नये. मी कधीं मोडणार नाहीं."

'मी कधीं मोडणार नाहीं.' या वाक्यानें त्याच्या वडिलांस थोडा राग आला व तो राग त्यांच्या चर्येवर दिसूंही लागला. त्याच्या आईस तीं लक्षणें दिसूं लागलीं म्हणून ती मध्येंच त्यास ह्मणाली:

"वसंता, तुझा निश्चय मोडायला तुला कोण सांगेल? पण तूं केला आहेस तो निश्चय चांगला आहे का वाईट आहे, हें आम्हांला समजायला नको का? आह्मी जें काय करतों, तें तुमचं बरं व्हावं ह्मणूनच करतों? तुमचं तुम्हांला किती जरी बरं वाईट समजत असलं, तरी आह्मांला तुह्मी अजून लहानच वाटतांना? आतांच

तुला सांगायचं झालंना, कीं मुलं चांगलीं चालतींबोलतीं झालीं ह्मणजे कांहीं त्यांना कोणी बोट धरून चालायला शिकवीत नाहीं; किंवा शब्द घोकवून बोलायला शिकवीत नाहीं. पण तुमच्या या वयांत तुह्मी कांहीं बाबतींत लहानच आहां. त्या बाबतींत नको का तुम्हांला आह्मी शिकवायसंवरायला? कारण व्यवहारांतली, संसारांतली तुम्हांला अजून माहिती नाहीं."

दादासाहेब मध्येंच त्यास ह्मणाले: "निदान अशी आमची समजूत आहे कीं, तुम्हाला त्यांतली माहिती नाहीं. ती माहिती आहे, तुह्मी कांहीं फसायचे नाहीं, अशी एकदां आमची खात्री झाली ह्मणजे मग कांहीं आह्मी तुम्हांला शिकवायला येणार नाहीं. पण चार लोक जी गोष्ट करतात, आणखी जी गोष्ट तुम्हीं करावी असं आम्हांला वाटतं, ती करायची नाहीं असा निश्चय करायला तुम्हांला कारण काय हें आम्हांला नको का समजायला? जगांत जर कोणी तुमच्या पूर्ण विश्वासाला पात्र अशा व्यक्ति असतील, तर त्या आह्मी दोघं. मी आणखी तुझी आई. पण त्या आम्हांला तुह्मी कांहीं सांगत नाहीं, तेव्हां काय ह्मणावं?"

वसंतराव अगदींच मुखस्तंभासारखा उभा राहिला; कांहीं बोलेचना. पुनः दादासाहेब त्याला म्हणाले: "निदान आतां मी तुला एक एक प्रश्न विचारीत जातों, त्याला तरी सरळ उत्तरं देशील?"

वसंतराव एक नाहीं दोन नाहीं!

तथापि त्याच्या या मौनाकडे दुर्लक्ष्य करून त्याचे वडील म्हणतात:

"तुला मुलगी पसंत नाहीं का?"

वसंतरावानें त्यावर चटूकन् उत्तर दिलें: "तसं नाहीं."

"मुलीची मंडळी पसंत नाहीं का?"

"तसं कांहीं नाहीं."

"लग्न करण्याबद्दल कांहीं अटी घालाव्याशा का वाटताहेत?"

"नाहीं."

"लग्न झाल्याबरोबर आमच्यापासून दूर राहिलं तरच आपल्याला सुख लागेल, नाहीं तर लागणार नाहीं, असं का वाटतं?"

"असं कां विचारतां? तसं मुळींसुद्धां नाहीं."

"तसं असलं यदाकदाचित् तरी आमची मुळींच हरकत नाहीं. तुह्मी तशी व्यवस्था करून देऊं."

"तसं मुळींच नाहीं."

"मग कांहीं तरी महत्कार्य अंगावर घ्यायचं आहे आणखी तें घेतलं म्हणजे बायकोची अडचण होईल, असं का वाटतं?"

"हो."

'कोणतं महत्कार्य अंगावर घ्यायचं आहे?'

"तें आतांच आपल्याला मला सांगतां येत नाहीं."

त्याची आई मध्येंच त्यास म्हणाली: 'आलं का सांगतां येत नाहीं या मूळपदावर!'

वसंतराव कांहीं बोलेना. दादासाहेब त्यास शांतपणें पुढें विचारतात:

"तें आतांच आम्हाला तुला सांगतां येत नाहीं. पण जेव्हां तूं तें आपल्या अंगावर घेशील, तेव्हां आधीं आम्हांला सांगून आमचा विचार घेशील ना?"

"आधीं आपल्याला सांगेन."

दादासाहेब कांहीं वेळ त्याच्याकडे पहात राहिले. त्यानें मान खालींच घातली होती ती वर कांहीं केली नाहीं. नंतर ते त्यास ह्मणाले: "बरं तर जा."

वसंतराव चटूकन् तेथून निघून गेला.

# प्रकरण १८ वें.

## नंतर.



आपल्या मुलानें अशा प्रकारचें उत्तर आपणांस दिलें हें पाहून दादासाहेब व त्यांच्या पत्नी यांस फार आश्चर्य वाटलें व खेद झाला. दादासाहेबांस आजपर्यंत असें वाटत होतें कीं, आपलें आपल्या मुलांशीं जें वर्तन आहे, त्यामुळें आपले ठिकाणीं त्यांचें पूर्ण प्रेम आहे इतकेंच नाहीं, तर त्यांचा आपल्यावर पूर्ण विश्वासही आहे. आपल्याला न कळूं देतां कोणतीही गोष्ट ते करणार नाहींत किंवा 'अमुक गोष्ट अशी कां ? ' असें विचारलें असतां उडवाउडवीचीं उत्तरें कधीं देणार नाहींत, काय असेल तें सरळपणें सांगतील. परंतु आज प्रत्यक्ष अनुभव फारच निराळा आला. आपल्या इच्छेप्रमाणें आपला वडील मुलगा लग्न करण्याला तयार नाहीं तर नाहींच, परंतु 'असें कां' ह्मटलें तर त्याचें खरें कारणही आपल्यास सांगण्यास तयार नाहीं. त्याच्या असें करण्यास काय कारणें असतील याचा त्या दोघांनीं नानाप्रकारांनीं विचार केला.

' आपण जी मुलगी पसंत केली आहे, ती त्याला पसंत नाहीं, आणि दुसऱ्या कोणाची तरी मुलगी पसंत आहे कीं काय ? ती मुलगी आपण कांहीं कारणांनीं पसंत करणार नाहीं असें त्याला वाटतें आहे कीं काय ? कीं मुलगा सुधारणेच्या नादीं लागून दुसऱ्याच कोणच्या जातीच्या गृहस्थाची मुलगी त्यास पसंत पडली असून तसें लग्न करणें अशक्य असें वाटून त्यानें लग्नच करावयाचें नाहीं असा निश्चय केला आहे कीं काय ? ' हे विचार त्यांच्या मनात आले. धर्मकर्म, सोंवळें ओंवळें ते स्वतः मुळींच मानीत नसत, आणि बायकोलाही मधून मधून अमुक वेडगळपणा आहे, तमुक अजागळपणा आहे असें ह्मणून तिच्या सोंवळेपणाच्या करडेबद्दल तिची चेष्टा करीत असत. यामुळें, ती जरी त्यांच्या बरोबरीनें वृद्ध होती, तरी आपलें सोंवळें-ओवळें आपल्या पुरतें ठेवून लोकांवर त्यासंबंधाची सक्ति होऊं देत नसे. यामुळें सोंवळ्याओंवळ्याचा किंवा जाती वगैरे संबंधाचाही विटाळ त्यांच्या घरांत मानलाच जात नसे. दादासाहेबांस स्वतःस जातीसंबंधाचा अभिमान नसे. शेणवी, परभू वगैरे मंडळींत त्यांचे पुष्कळ स्नेही असत व ते यांचे घरीं आले, ह्मणजे जेवणखाणाच्यासंबंधांत पंक्तिभेद वगैरे कांहीं एक मानला जात नसे ! मालतीच्या शाळेंतील मैत्रिणींपैकीं इतर जातीच्या मैत्रिणीही वारंवार हिच्याकडे बसावयाला बोलावयाला व कित्येक तर राहण्यालाही येत असत. परंतु त्यांना कधीं कोणी 'इकडे शिवूं नका, तिकडे जाऊं नका' असें केलें नाहीं. त्यासंबंधांत कडकपणा नसे इतकेंच नव्हे, तर

अगदीं सढळपणा असे, तेव्हां दादासाहेबांच्या मनांत असें सुद्धां आलें, कीं आपल्या पोराची इच्छा असा मिश्र विवाह करण्याची असून तें जुळायचें नाहीं असें वाटून तर यानें ' त्यापेक्षां लग्नच करूं नये तें चांगलें, ' असा निश्चय नाहींना केला ! त्यांना कांहीं तर्कच होईना कीं काय करावें ? त्या गृहस्थाच्या मुलीशीं लग्न करावयाचें ह्मणून आपण ठरवून नुसतें मुलाला विचारावयाचें आणि त्याला रुकार भरावयाचा एवढेंच उरलें असें समजत होतों, तें त्याच्यापेक्षां फारच विचित्र निघालें ! आतां त्या गृहस्थास सांगावें तरी काय ? गृहस्थ चांगला. मुलगी फार चांगली, शिकलेली असें असून आतां त्याला आपण काय सांगावें कीं आपल्याकडे वाईटपणा न येतां हें सर्व टळेल ?

त्यांस सगळ्यांत मोठें कूट पडलें तें हें ा, आपल्या मुलाच्या मनांत काय आहे खरें खरें कसें कळावें ? आपल्या बायकोस थोडेंसें चिडवण्याच्या उद्देशानें ते ह्मणतातः "आमचं एक असो, परंतु तुमचे चिरंजीव तुमच्यावर विश्वास ठेवीत नाहींत याला काय ह्मणाल ? आम्हांला नाहीं तर नाहीं, पण तुह्मांला तर त्यांनीं आपलं खरं कारण सांगावं कीं नाहीं ! त्यानं दोघांनाही ' मला कांहीं सांगतां येत नाहीं ' एवढं उत्तर देऊन गप्प बसवलं. "

त्यांची पत्नी कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसली व पुढें ह्मणालीः "कांहीं जरी ह्मटलं तरी एवढी गोष्ट खरी, कीं आपण त्याला विचारून त्यानं निक्षून सांगितलंन् कीं आपल्याला लग्न करायचं नाहीं; आपण आजन्म अविवाहित रहाणार. तेव्हां त्याचा कांहीं तरी पक्का निश्चय झाला आहे. तो कां झाला हें मला तर फारच चमत्कारिक वाटतं आहे. पण नुसतं असं ह्मणून कायन् कसं चालणार ? तें कांहीं नाहीं, माझ्या एकटीवर उगीच कांहीं ढकलून देऊन चालायचं नाहीं, किंवा ' जाऊं द्या कीं ' असं ह्मणून स्वस्थ बसूनही चालायचं नाहीं. त्याच्या मनांत काय आहे तें काढून घेतलंच पाहिजे, आणखी तें आपण कांहीं तरी युक्ति करून काढलं पाहिजे. नुसतं असं मला बोलून काय उपयोग ? "

पत्नीचें हें बोलणें चाललें असतां दादासाहेबांचें लक्ष त्याचसंबंधीं विचार करण्यांत गुंतलें होतें. त्यांना असें वाटलें, कीं आपल्या मुलानें आपणास अगदीं निक्षून असें उत्तर दिलें, तेव्हां तें उत्तर उगीच कांहीं तरी लहरीनें दिलें असेल हें कांहीं संभवनीय नाहीं. आपला मुलगा कांहीं असा उगीच लहरी नाहीं. आजपर्यंत तो असा लहरींच्या स्वाधीन होऊन कांहीं तरी उत्तरें देतांना किंवा कांहीं तरी करतांना कधीं आढळला नाहीं. मग आजच आणखी अशा बाबतींत कां आढळावा ? कांहीं नाहीं, त्यांनीं आपल्याकडून अगदीं शिकस्त केली तर्क करण्याची. परंतु मुलानें असा निश्चय करून त्यांना असें उत्तर देण्याचें कारण त्यांच्या कांहीं केल्या लक्ष्यांत येईना. पोराला विलायतेला जाण्याची अपेक्षा असली, तरी तेंही आपल्याला अनुकूल आहे. तीही त्याची अपेक्षा आपण पुरवूं. दुसरें कांहीं सयुक्तिक कारण असलें तर तेंही आपण ऐकून घेऊन त्याला योग्य ती सल्ला देऊं अशी त्याची खात्री असावयाला पाहिजे. पण तशी खात्री नाहीं ह्मणून ह्मणा किंवा दुसरें कांहीं कारण असेल ह्मणून ह्मणा त्यानें जास्त कांहीं सांगण्याचेंच नाकारलें. आपल्या जवळ न सांगण्याइतकें असें काय कारण असणार ?

तथापि असा नुसता विचार करून काय उपयोग ? त्यांनीं आपल्या पत्नीला लागलीच ह्मटलें:–" तूं ह्मणतेस तेंच खरं, त्याच्या मागें लागून त्याच्या जवळून कारण काढून घेतलं पाहिजे. मी त्या उद्योगालाच आतां लागतों. तूंही थोडी जागृत रहा. केव्हां प्रसंग आला तर जरा प्रेमानं जवळ बसवून त्याला विचारून तरी घे. अगदीं स्पष्टपणानं जरी नाहीं सांगितलंन् तरी सहज एखाद्या शब्दावरून आपल्याला तर्क करतां येईल."

त्यांची पत्नी त्यांस म्हणाली:–" मी तर त्याला आतां विचारीनच. पण आपण त्याच्या स्नेह्यांसोबत्यांना गांठून त्यांच्याकडून कांहीं निघालं तर बघा. आनंदांत कांहींना कांहीं तरी कमीपणा व्हावा लागतो. नाहीं तर आज आपल्या सुखाला तोड नव्हती; किती आनंदांत होतों ! मुंबईस गेलों काय, आलों काय, सगळं ठीक झालं; जांवईबोवा येईपर्यंत याचं लग्न करायचं नाहीं म्हणून थांबलों, तेही आले, आणखी आतां त्याचा विचार काढला, तर हें भलतंच उपस्थित झालं. आणखी चार वर्षांनीं करतों म्हटलं असतं त्यानं तरी आम्हीं आग्रह धरला नसता, पण लग्न करीतच नाहीं म्हणून निश्चय केला आहेन् हें काय!"

"पहा आतां काय तें. नुसतं हें काय म्हणून विचारून काय उपयोग ?"

"पहायचं ह्मणजे काय ? कोणा तरी त्याच्या जिवलग स्नेह्यालाच गांठून निकाल करून घेतला पाहिजे."

"मला नाहीं वाटत तो कोणा स्नेह्यांजवळ तरी यांतलं कांहीं बोलला असेल असं, त्याच्या–त्याच्यापासूनच निघालं पाहिजे, आणखी तें तर कांहीं शक्य आहेसं मला वाटत नाहीं. गंगाधराला गांठून विचारलंत तर कदाचित् कांहीं सुगावा लागेल. बाकी गंगाधराला तरी त्यानं 'कुणाला कांहीं सांगूं नको' म्हणून सांगितलं नसेल म्हणून कशावरून ?"

"यत्न तर करून पाहूं. नाहीं तर नाद सोडला. पोरगा अफाट निघाल्यामुळें त्याचा असा निश्चय झाला असेल, हें तर कांहीं संभवत नाहीं."

"अफाट ? छे, छे, छे. माझा वसंत अफाट बिफाट कधीं नाहींहो वागायचा, उगीच भलतेन् सलते संशय नकाहो काढूं. असेल कांहीं तरी त्याच्या मनांत आलंन् वाटलं असेल नये लग्न करूं, तसंच रहावं. त्यांत काय मोठंसं! चार दिवसांनीं जाईलय् त्याच्या मस्तकांतलं वेड !"

"हं! आपल्या पोराचं तें तसंच असतं, आणखी दुसऱ्याच्या पोराचा अफाटपणा ! बाकी अफाटपणा आणखी वेड यांत अंतर काय, तें मात्र कळणं मोठं कठिण आहे."

इतकें बोलून तीं दोघेंही आपापल्याशीं विचार करीत बऱ्याच वेळानें झोंपीं गेलीं. चित्त इतकें अस्वस्थ झालेलें, तेव्हां स्वस्थ झोंप कोठली यावयाला ? परंतु विचार कर कर करून अस्वस्थ झालेला मेंदू केवळ थकून कंटाळून स्वस्थ होतो. त्याप्रमाणेंच त्या दोघांची अवस्था झाली.

दुसरे दिवशीं सकाळीं उठल्यावर दादासाहेबांच्यापुढें जो पहिला विचार उभा राहिला तो हा, ज्या गृहस्थाची मुलगी वसंतरावास सांगून आली होती आणि जी बहुतकरून ठरवल्याप्रमाणेंच त्यांच्या मनानें झालें होतें, त्या गृहस्थास पत्र काय ल्याहावें ! जेमतेम काय ल्याहावयाचें तें त्यांनीं ठरवून पत्र तयार केलें व आपल्या पत्नीस बोलावून आणून त्यांतला आशय सांगितला. तो ऐकून तिला फार वाईट वाटलें

परंतु तसें लिहिण्याखेरीज दुसरा मार्गच नव्हता. यामुळें तिनेंही त्यावर कांहीं आक्षेप घेतला नाहीं, मुलगा लग्न करतोंच ह्मणाला तर पुढें पहातां येईल दुसरी मुलगी. परंतु आतां या गृहस्थाला तरंगत ठेवण्यांत तात्पर्य नाहीं, अशाच विचारानें पत्र लिहिलें. पत्रांत असें स्पष्टपणें लिहिलें होतें कीं, " मुलाचे मनांत सध्यां लग्न कर्तव्य नाहीं आणि त्याच्या मनाविरुद्ध लग्न करण्यांत तात्पर्य नाहीं. तेव्हां आपण दुसरीकडे स्थळें पहाण्याच्या कार्याकडे लागावें तें ठीक. "

याप्रमाणें पत्र वगैरे लिहिलें आणि तें टाकणार तों त्यांच्या मनांत पुनः काय आलें त्यांनीं एकदां पुनः वसंताला बोलावून आणलें आणि त्याला ह्मटलें: " काल तूं आह्मांला स्पष्ट उत्तर दिलं आहेसच. परंतु आतां दुसऱ्याला आह्मांला पत्र लिहून नकार भरायचा आहे, तेव्हां तो तुला स्पष्टपणानं दाखवून भरावा हें बरं असं वाटल्यावरून तुला हें पत्र वाचून पहाण्यासाठीं बोलावलं. हें वाच, वाचलंस कीं मी टपालांत टाकीन. तुला अगदीं शेवटपर्यंत सांगूनसवरून काय तें करायचं. हें चांगलं पहा वाचून." असें ह्मणून दादासाहेबांनीं त्यांना तें पत्र दिलें. त्यानें त्यांच्या हातून तें घेऊन वाचण्यास सुरवात केली. पत्र कांहीं मोठें नव्हतें, तेव्हां त्यानें भरकन् पाहिलें आणि पुनः अगदीं मुकाट्यानें घडी करून त्यांचेजवळ दिलें. देतांना त्यानें कांहीं उद्गार काढले नाहींत. जशी एखादी कळसूत्री बाहुली तिच्या सूत्राच्या हालचालीप्रमाणें हालते तसे त्यानें आपले हात हालवून तें पत्र घेतलें, डोळे त्यावरून फिरवून तें वाचलें आणि घडी करून तें परत दिलें. भाषणंचिषण कांहींएक केलें नाहीं. तेव्हां वडिलांनीं पुनः विचारिलें, " मी हे पत्र आतां पाठवूंना ! "

वसंतरावानें अनुमतिदर्शक मान हलविली, आणि तेथून निघून जाण्यासाठीं चुळबूळ करूं लागला. इतकेंच नव्हे, तर शेवटीं जाण्यास निघाला. तों त्याच्या वडिलांनीं त्यास ह्मटलें: " तूं या बाबतींत आपल्या मनाप्रमाणें वागण्याचा निश्चय केला आहेस तें ठीक आहे. पण त्या निश्चयाचीं कारणं जर आह्मांला कळवलीं असतीस तर बरं झालं असतं. आमचा बोज राहिला असता. पण तुझ्या नाहीं मनांत येत तर ठीक आहे. तुला तरी काय ह्मणून विनाकारण त्रास द्यावा. जा तूं. अजून तुला जर कांहीं विचार करून सांगावं असं वाटत असेल, तर तसं सांग. कारण एकदां हें पत्र निघून गेलं ह्मणजे मग कांहीं पुनः आतां आमचा विचार फिरला असं कोणाला लिहितां यायचं नाहीं. तुला पाहिजे तर विचार करायला वेळ घे. "

" नको. विचार जो झाला तो मीं आपल्याला स्पष्ट कळवलाच. आणखी कांहीं विचार कळवण्याजोगा नाहीं. "

दादासाहेबांची आतां अगदीं निराशा झाली. आपण लिहिलेलें पत्र वाचून असें पत्र लिहिण्याची पाळी आपणावर यावी याबद्दल आपल्या चिरंजीवांस वाईट वाटल्याखेरीज रहाणार नाहीं असें त्यांस वाटत होतें. परंतु तें भुरळ आतां पार गेलें; आणि फार फार वाईट वाटलें. मुलगा त्यांच्या समोरून जाऊं लागला, तेव्हां त्यांनीं त्यास हातांनीं खूण करून थांबविला. नंतर त्यास ह्मटलें:—

" वसंत, तुला मी कालपासून या बाबतींत प्रश्न विचारतों आहें. तूंही आपला विचार काय तो सांगतो आहेस. तुझा निश्चय झाला आहे तो बरा नाहीं, असं वाटून मला इतकं नाहीं वाईट वाटत. पण

तुझ्या विश्वासाला आह्मी पात्र नाहीं असा तुझा आमच्याविषयीं समज झाला आहे, याबद्दल आह्मांला फार वाईट वाटतं आहे. काल जें सांगितलं, तेंच आज तुला पुनः सांगतों आहे यामुळं तुला कंटाळा येत असेल, रागही येईल. पण तुझा विश्वास आमच्यावर नाहीं हा विचार आह्मांला किती दुःख देतो हें तुला कळलं तर कांहीं वावगं नाहीं. कळावंच ह्मणून मी हें तुला सांगतों आहे. "

वसंतानें तें ऐकून आपलें तोंड वाईट केलें. त्याच्या अंतःकरणास फार फार वाईट वाटलें असें दिसलें. परंतु तो कांहीं बोलेना.

शेवटीं आतां अगदीं निक्षून या पोराला काय तें विचारावयाचें आणि मग पुनः त्याचा नाद सोडावयाचा असा पक्का निश्चय करून दादासाहेब त्यास म्हणाले:

" कां बोलत नाहींस ? बोलून काय तें स्पष्ट सांग आह्माला. "

" मला कांहीं बोलतां येत नाहीं. मला जास्त कांहीं सांगायचं नाहीं ! " इतकें अगदीं सद्गद कंठानें वसंतरावानें ह्मटलें आणि आपले वडील त्यावर काय म्हणतात वगैरे कांहीं वाट न पहातां तेथून तो निघून गेला.

मुलाचा निश्चय फार दृढ आहे असें दादासाहेबांस पूर्णपणें आतां कळलेंच; परंतु तो इतका सद्गद कां झाला ? केलेल्या निश्चयाबद्दल त्यास फार वाईट वाटतें आहे कीं काय ? वाईट वाटत असलें तर तो आपला निश्चय सोडून कां देत नाहीं ? असे नानाप्रकारचे विचार त्यांच्या मनांत आले. नंतर त्यांस पुनः वाटलें "त्याला आपल्या मनाविरुद्ध तर असा निश्चय करावा लागला असून आतां तो निश्चय बदलतां येत नाहीं अशी स्थिति झाली नाहीं ना ? जर अशी असली तर त्यांचं काय बरं कारण असेल ? त्याच्या मनाविरुद्ध याला असा निश्चय करायला कोणीं लावलं असेल! तो बोलतच नाहीं, 'बोलायचं सांगायचं कांहीं नाहींच ' असं कां सांगतो आणखी तो सांगतो त्याचं इंगित कोणाकडून आतां काढावं ? "

दादासाहेबांस कांहीं विचार होईना; आणि त्यासंबंधीं विचार मनांत आल्याखेरीज तर राहीना. दुःखाचें कांहीं कारण नसतां अचानक त्यांच्या अंतःकरणांत दुःख उभें राहिलें.

परंतु ते तसे स्वस्थ बसणारे गृहस्थ नव्हते. त्यांनीं वसंतरावांच्या फार मोठ्या मित्रांचीं नांवें मिळवून त्यांस गांठून त्यांचेकडून काय खरा प्रकार आहे तो काढावयाचा असा निश्चय केला आणि त्यांनीं गंगाधराला आपल्याकडे प्रथम बोलावून आणलें. मुंबईस त्याला पत्र पाठवून मुद्दाम येऊन आपल्याला भेटण्याविषयीं लिहिलें. आणि तो आल्यानंतर त्यास आपण बोलावण्याचें कारण काय तें सांगितलें. परंतु आश्चर्यांतलें आश्चर्य कीं, गंगाधराला तें सर्व ऐकून फार आश्चर्यच वाटलें ! ' वसंतरावानें लग्न करावयाचें नाहीं असा निश्चय केला आहे हें आपल्याला बिलकूल कधीं सांगितलें नाहीं आणि त्याचा असा निश्चय असेल हें आपल्याला कधीं स्वप्नांत सुद्धां वाटलें नाहीं ' असें उलटें त्यानें ह्मणून दाखविलें. गंगाधर हें खरें बोलतो आहे कीं खोटें बोलतो आहे, याचाच त्यांना तर्क होईना. परंतु गंगाधराच्या चर्येवर खोटेपणाची अणुमात्र छाया दिसली नाहीं. तेव्हां दादासाहेबांस असें वाटलें कीं, त्याला ही वसंताच्या मनाची

स्थिति माहिती नाहीं. यानंतर पुढचा मार्ग ह्मणजे गंगाधराकडून त्याचे दुसरे अत्यंत स्नेही कोण तें काढावयाचें. परंतु त्या चौकशीवरूनही एवढेंच कळून आलें कीं, गंगाधराच्या मतें त्याच्या स्वतःच्या इतका कोणीच वसंताचा जिवलग व विश्वासाचा स्नेही नसावा. मग आतां त्याच्या पुढला मार्ग त्याला 'वसंतरावापासून सर्व गोष्टी समजावून घेऊन आह्मांला सांग.' असें विनवावयाचें, एवढाच काय तो उरला. परंतु 'तो तें काम पतकरील किंवा नाहीं कोण जाणे!' असाही विचार त्यांच्या मनांत उभा राहिलाच. तरी पण बापाचें—त्यांतून प्रेमळ बापाचें अंतःकरण तें! तें काय तसें थांबतें! त्यांनीं लागलीच गंगाधरास म्हटलें: "गंगाधरपंत, वसंताचा हा असा कां निश्चय झाला आहे हें कळेपर्यंत आमच्या दोघांच्याही मनाला स्वस्थता ह्मणून यायची नाहीं. आजपर्यंत आह्मीं आपले दिवस अगदीं सुखांत आणखी सरळपणांत काढले. परंतु चार दिवसांपासून हा हृद्रोग आम्हांला लागला आहे. तो हृद्रोग काढून टाकणं तुमच्यासारख्यांच्या हातीं आहे. वसंतानं आजन्म अविवाहित रहाण्याचा निश्चय करण्याचं कारण सयुक्तिक असलं तर आह्मांला कांहीं वाईट वाटायचं नाहीं. त्यानं आपला निश्चय मोडावा ह्मणून मी खटपट सुद्धां करणार नाहीं. पण त्यानं असा निश्चय कां केला आहे, हें आह्मांला कळायला पाहिजे! तूंच सांग बरं आमचं म्हणणं रास्त आहे कीं नाहीं? त्याला विचारलं, तो ह्मणतो मला सांगायला येत नाहीं. आमच्याजवळ नसेल सांगायला येत. पण तुझ्यासारख्या स्नेह्याजवळ सांगायला हरकत नसावी. आणखी तुझ्यासारख्या स्नेह्यांनीं आह्मांला सांगावं. आतां हें तुझं कर्तव्य आहे. तूं त्याला विचारून त्याच्या पोटांत शिरून खरं काय आहे तें आह्मांला सांग. त्याच्या मनाविरुद्ध आग्रह करून त्याला लग्न करायला मी लावणार नाहीं. पण कारण काय—असा निश्चय करण्याचं—हें नको कां मला कळायला? जुन्या लोकांसारखीं आह्मी दोघं कांहीं सुनेसाठीं हपापलों आहोंत असं नका समजूं, पण हा आपला कांहीं साहस करण्याच्या विचारांत असला; किंवा कुठें लांब निघून जाणार असला किंवा दुसऱ्या कसल्या साहसी कृत्यांत सामील होणार असला, तर त्याबद्दल आह्मांला कांहीं तरी माहिती व्हायला पाहिजे. आह्मी कांहीं इतर आईबापांसारखे आपल्या मुलाशीं अगदीं फटकून वागत नाहीं, त्यांच्यापासून आह्मी कांहीं गुप्त ठेवीत नाहीं, आणखी त्यांनीं कां बरं आमच्यापासून कांहीं गोष्टी लपवून ठेवाव्या?"

त्यांचें तें बोलणें ऐकून गंगाधरास कसेंसेंच झालें. दादासाहेब कळकळीनें बोलताहेत हें त्यास स्पष्ट दिसलें. यांचेपाशीं कांहीं प्रतारणा कोणीही करूं नये, असें त्यास वाटलें आणि तो कांहीं वेळ अगदीं स्वस्थ बसला. नंतर आपणच त्यांस ह्मणतोः—

"दादासाहेब, आपलेपाशीं मी प्रतारणा मुळींच करीत नाहीं. पण मला त्याच्या निश्चयाचं कारण खात्रीनें माहिती नाहीं ह्मणून मी आपल्याला बोलत नाहीं. मला नुसती शंका आहे. पण नुसती शंका कशाला आपल्याजवळ उच्चारून दाखवूं! मी वसंतरावाजवळ गोष्ट काढतों, आपल्या मनाची खात्री करून घेतों, आणखी मग आपल्याला काय तें सांगतों. आपण कांहीं कष्टी होऊं नये. वसंत आपली अवज्ञा करणार नाहीं. पण मला जी शंका वाटते आहे तीच जर

असली, तर तो सांगणार नाहीं हें अगदीं रास्त आहे."

"एकूण तुला कांहीं तरी माहीत आहे?" दादासाहेबांनीं त्यास मोठ्या आतुरतेनें विचारलें:–

"नाहीं, माहिती नाहीं. माझा फक्त तर्क आहे. मला शंका आहे." गंगाधरानें उत्तर दिलें.

"काय तर्क आहे? काय शंका आहे ती तरी मला सांग." दादासाहेबांनीं पुनं आतुरतेनें पुसलें.

"तर्क? तर्क आपल्याला सांगूं ह्मणतां? छे! तेवढं मात्र मला आपण सांगूं नका. तो माझा तर्क, ती माझी शंका खरी नसली तर मी आपल्याला सांगेन कीं माझी अशी अशी शंका होती, पण ती खरी नाहीं म्हणून. पण जर खरी आहे असं मला वसंताच्याकडून कळलं, तर मात्र मी आपल्याला कांहीं सांगणार नाहीं. मला कांहीं सांगतां येत नाहीं असंच आपल्याला उत्तर देईन."

गंगाधर हें एकंदर वाक्य मोठ्या कष्टानें–अत्यंत कष्टानें बोलत होता, हें स्पष्ट दिसलें. आणि दादासाहेबांस तर तें ऐकून फारच आश्चर्य वाटलें. ते त्यास एकदम ह्मणाले:–"तूं तर मला अधिकच गोंधळांत घालणार असं दिसतं. पण जी गोष्ट तो तुला सांगेल, ती त्यानं मला–तुझ्या मार्फत कां होईना, पण मला कां सांगूं नये? माझ्यापासून लपवून ठेवायची कां ह्मणून इच्छा धरावी?

"दादासाहेब, पुष्कळ गोष्टी अशा असतात, कीं त्या आपण आपल्या मित्रांना मन मोकळं करून सांगतों, परंतु वडील मंडळीजवळ नाहीं आपल्याला सांगतां येत. दुसऱ्याकडून देखील सांगणं शक्य किंवा इष्टही वाटत नाहीं. त्यांतलीच जर ही गोष्ट असली तर तो तरी कसा सांगणार, आणखी मी तरी कसा सांगणार!"

"मला तुमच्या बोलण्याचा मोठाच चमत्कार वाटतो बोवा. आम्हांलाही लहानपण होतं, तरुणपण होतं. पण वडिलांनीं विचारलं असतां–अगदीं कळकळीनं जीव तोडून विचारलं असतां–त्यांना सांगूं नये असं गुपित आह्मांला कांहीं कधीं आठवलं नाहीं. तुमचे हे सगळे प्रकारच निराळे दिसताहेत."

गंगाधर त्यावर कांहीं बोलला नाहीं. दादासाहेबांच्या या बोलण्यावर तो काय बोलणार? नंतर दादासाहेब त्यास ह्मणतातः–"बरं बोवा तुझी काय करामत आहे ती खर्चून त्याच्या मनांतलं काय कारण आहे तें तर काढ. तुला कळल्यावर आह्मांला निदान सांगण्याजोगं आहे का नाहीं हें तरी कळूंदे. मग पहातां येईल. पुढलं पुढें. काय चमत्कारिक स्थिति झाली आहे पहा!"

गंगाधर नंतर वसंतरावाकडे गेला. त्यानें दोन दिवस मुक्काम करण्याचा विचार केला.

# प्रकरण १९ वें.

## आबासाहेब व पद्मा.



आबासाहेब व पद्मा यांचें कांहीं व्यक्तींविषयीं भाषण झाल्या दिवसापासून आबासाहेबांची चित्तवृत्ति कांहीं विलक्षण झाली. त्या एका दिवसानंतर ते पांच वर्षांनीं अधिक जरठ दिसूं लागले, त्यांच्या चर्येवर काळेपणा आला आणि ते नेहमीं कांहींना कांहीं तरी फार त्रासदायक अशा विचारांत गढून गेलेले दिसत. त्यांच्या वर्तणुकींत दुसरा एक विलक्षण फरक पडला. आतांपर्यंत पद्मेस ते घटका दोन घटका तरी ती कोठें गेली तर जाऊं देत, परंतु आतां ते आपल्या दृष्टीच्या आड तिला क्षणभरही होऊं देत नसत. 'मला तुझ्यावांचून जगांत कोणी नाहीं. तूं माझ्या ह्मणण्याप्रमाणें वागशील, आणखी अहोरात्र माझी काळजी घेण्यासाठीं माझ्याजवळ राहशील, तरच मला कांहीं दिवस आयुष्य लांबवितां येईल' अशा प्रकारें ते तिला बोलत. यामुळें तिला कसेंसेंच होऊन गेलें होतें. आतां ते दुसऱ्या कोणाशीं एक अक्षरही बोलत नसत; आणि स्वतः घराच्या बाहेर फक्त एक वेळां संध्याकाळीं अगर सकाळीं जात तर पद्मेला बरोबर घेऊन जात. पद्मा आपल्यापासून एक क्षणभरही दूर गेलेली त्यांस खपत नसे. त्यांनीं दुसऱ्या कोणाच्या घरीं जाणें टाकलें. दुसरा कोणी आपल्या घरीं आला, तर त्याला पुनः येण्याची कांहीं इच्छा राहूं नये अशा प्रकारचें त्यांचें त्याच्याशीं वर्तन होई. पद्मेस हल्लीं मालतीच्या घरींसुद्धां जाणें शक्य नव्हतें. केव्हांही कोठेंही जाण्याची गोष्ट निघो, पद्मेला नकारच मिळावयाचा.

अशी स्थिति झाल्यामुळें पद्मेच्याही मनाची व शरीराची फार चमत्कारिक स्थिति झालेली दिसली. तिला एक प्रकारचा पिकुटलेपणा आला. चेहरा अगदीं निस्तेज दिसूं लागला. डोळे पूर्वीप्रमाणेंच तेजस्वी, परंतु कोणीकडे तरी दुसरीकडेच अंतर्दृष्टीनें पहात आहेत असे दिसत. आबासाहेबांची तिजवर अलीकडे इतकी जागृत दृष्टी होती, कीं तिचें पत्रचित्र असलें, तरी सुद्धां तें आपल्या देखत फोडून आपल्याला वाचून दाखविण्याबद्दल ते आग्रह करीत. त्यांच्या तिच्या ठिकाणच्या विश्वासांत कांहीं कमीपणा आला आहे असें एखाद्या अजाण पहाणारास वाटलें असतें; परंतु वस्तुस्थिति जाणणारास स्पष्टपणें असें दिसून आलें असतें, कीं हें सर्व तिच्या ठिकाणीं असणाऱ्या वात्सल्यातिशयामुळेंच चाललें आहे. आपण तिजवर नजर ठेवली नाहीं, तर मालकाच्या आटोक्याच्या बाहेर गेलेल्या साळुंकीवर जसा टपलेला बोका झांप घालून तिला मटकावून टाकतो, तशी तिची स्थिति होईल, ही भीति त्यांस अहोरात्र वाटत होती. तिच्यावर त्यांचें प्रेम

आटोकाट, आणि त्या आटोकाट प्रेमामुळेंच त्यांचें हें अलौकिकसें वर्तन असे.

परंतु पद्मेस त्या वर्तनानें अगदींसुद्धां सुख लागत नसे. ती त्यांच्याविरुद्ध कांहीं वागत नसे, त्यांनीं म्हटल्याबाहेर ती एक रतिभरसुद्धां जावयाची नाहीं. परंतु तिला फारच कोंडल्याप्रमाणें होई. ती त्यांना वाचून दाखवित असे, ते सांगतील तें लिहून काढीत असे. परंतु चार दोन घटका तरी आपण आपल्या स्वतःशींच विचार करीत बसेन, कोणा मैत्रिणीस बोलावून तिच्याशीं बोलत बसेन, किंवा कोणा मैत्रिणीच्या घरीं घटकाभर जाईन म्हणेल तर अगदींच अशक्य झालें होतें ! कोणी तिच्याकडे आलें, तरी आबासाहेबांच्या नजरेसमोर काय भाषण व्हावयाचें तें व्हावयाचें. प्रेमानें केलेली, परंतु पद्मेस हल्लीं पूर्ण नजरकैद होती म्हटलें, तरी कांहींच हरकत नाहीं. अशा नजरकैदेमुळें आपण आपल्या मुलीला मोठ्या थोरल्या संकटापासून वांचवितों आहों असें आबासाहेबांच्या मनानें घेतलें होतें, हें खरें; परंतु दुसऱ्या दृष्टीनें त्यांनीं पाहिलें असतें तर आपल्या मुलीची काय स्थिति होत चालली आहे हें त्यांस दिसून आलें असतें. परंतु तें पाहणें त्यांना अगदीं अशक्य झालें होतें.

आबासाहेबांनीं इतकें सगळें चालविलें होतें, याच्यामुळेंच कीं काय, पद्मेची कांहीं बाबतींतली आतुरता अगदीं विलक्षण वाढत चालली. आबासाहेबांना केव्हां तरी घटकाभर टाळून किंवा ते दोन प्रहरीं घटका दोन घटका वामकुक्षि करतात, तेव्हा आपण आपल्याला पाहिजे त्या गोष्टीची चौकशी करण्याची तजवीज करूं असा तिनें निश्चय केला होता; आणि ती अनुकूल संधीची मोठ्या दक्षतेनें वाट पहात होती. परंतु तिला तशी संधि लौकर सांपडली नाहीं. आतां तिच्या आईचें व वडिलांचें तर मुळींच पटेनासें झालें होतें. दोघांचें भाषण नाहीं. आईच्या मनांत जेव्हां जिकडे जावयाचें येईल तेव्हां ती तिकडे बेलाशक जावयाची, कधीं घरांतली अडचण पहावयाची नाहीं, किंवा नवऱ्याच्या परवानगीची अपेक्षा धरावयाची नाहीं, असा प्रकार चालला होता. शेवटीं एके दिवशीं आपल्या मनाप्रमाणें संधि सांपडून आपण चौकशी करण्याबद्दल निराश होऊन पद्मा आपल्याशींच कष्टी असतां एक प्रसंग घडला. ' आबासाहेब अमुक अमुक वेळीं अंमळ निजतात तर त्या वेळीं तूं येऊन मला भेट, मला फार जरूरीचें काम आहे ' असा निरोप तिनें वसंताला पाठविला, आणि त्याची ती नेमल्या वेळीं वाट पहात बसली. त्या वेळीं वसंतराव आला तेव्हां ती त्यास भेटली आणि म्हणाली:-' मुंबईची कांहीं बातमी नाहीं. ती कळावी म्हणून मीं तुला बोलावणं पाठवलं तर तर कांहीं विशेष बातमी असली, तर मला सांग. '

तें ऐकून वसंतराव अगदीं चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. त्याच्या त्या पहाण्यानें पद्मेची स्थिति विशेषच चमत्कारिक झाली आणि तीही त्याच्याकडे पृच्छेच्या दृष्टीनें पाहूं लागली.

इतक्यांत वसंतराव तिला म्हणतोः-
" कधींपासून तुला बातमी नाहीं ? "

पद्माः-कधींपासून म्हणजे ? मुंबईहून आल्यापासून कांहीं बातमी नाहीं.

वसंतरावः-मुंबईहून आल्यापासून नाहीं!

पद्माः-होय. मुंबईहून आल्यापासून मीं अगदीं नजरकैदेंत असल्यासारखी आहे. वर्तमानपत्रंसुद्धां मी आपल्याशींच बसून

वाचीन ह्मटलं, तर शक्य नाहीं. आज कितीं दिवस तुला बोलावीन ह्मणून ह्मणतें आहे, परंतु शेवटीं आज योग आला. आतां कृपा करून कांहीं बरीवाईट बातमी असेल ती सांग—आणखी लवकर सांग. आबा उठले ह्मणजे मग कांहीं तुला इथें रहाणेंसुद्धां योग्य व्हायचं नाहीं. ते उठण्याच्या आंत मला काय सांगायचं तें सांगून जा.

वसंतराव अगदीं सचिंत झाला. त्याला कांहीं सुचेनासें झालें असावें असें दिसलें. कांहींएक गोष्ट बोलूं कीं नको, बोलूं कीं नको, असा त्याच्या मनांत झगडा चालला असावा. शेवटीं तो मोठ्या मिनतवारीनें तिला ह्मणालाः "पद्माताई, तूं त्या भानगडींत पडतेस कशाला? त्यांत पडल्यापासून कांहीं हित होईल असं मला वाटत नाहीं. आबासाहेब जें करताहेत तेंच बरोबर आहे असं तूं धरून चल."

"वसंतराव, तूं हें काय ह्मणतोस? आह्मीं चांगल्या सुखांत असतां त्यांनीं भणंग भिकाऱ्याप्रमाणें कोणीकडे तरी भटकत रहावं हें चांगलं म्हणतोस तूं? छे, छे, मला नाहीं वाटलं कीं तूं असं मला ह्मणशील!"

"पद्माताई, या स्थितीला कारण कोण? त्यांचे तेच नाहींत का? ते काय लहान आहेत? तर तूं आतां त्यांची काळजी घेणार? आणखी तूं काळजी घेऊन काय होणार आहे? तूं जें काय देशील, तें त्यांना एक दिवससुद्धां पुरेल कीं नाहीं कोणास ठाऊक. त्यांची स्थिति फार वाईट आहे."

"वसंतराव, असं ह्मणूं नकोस. माझं मन मला असं सांगत नाहीं, इतकंच नाहीं, पण ते कुलीन आहेत, त्यांच्या हातून अतिशय वाईट असं आचरण कधीं घडायचंच नाहीं. आबांनीं जर त्यांना लहानपणापासून अगदीं चरकीनं धारकीं धरलं नसतं, तर ते दोघे अशा स्थितीला पोंचलेच नसते. अजून जर त्यांना मायेनं वागवून घरीं आणून त्यांची व्यवस्था ठेवली तर ते चांगले होतील, सुधारतील, असं माझं मन मला पक्कं सांगतं आहे. परंतु एखाद्याला "अगदीं वाईट अगदीं वाईट" ह्मणून एकसारखं ह्मणत राहिलं, तर तें मूळ वाईट नसलं तरी वाईट होतं. वसंतराव, वसंतराव, तूं त्यांना सुधारायची खटपट केली पाहिजेस. ते खरोखर तितके वाईट नाहींत."

"पद्माताई, ते वाईट नाहींत—नसतील, पण ते फार वाईट माणसांच्या हातीं पडले आहेत. ते त्यांच्याकडून काय करवतील आणखी काय नाहीं, याचा नेम नाहीं. थोरामोठ्यांच्या मुलांना वाईट मार्गाला लावून आपल्या तावडींत धरून त्यांच्या द्वारानं पैसे उकळून आपलं पोट जाळणाऱ्या लोकांच्या तावडींत ते सांपडले आहेत. त्यांना त्यांच्या तावडींतून सोडवणं फार कठिण आहे. किंबहुना अशक्य आहे. आणखी काय आतां तुला सांगूं?"

"अशांच्या तावडींतून त्यांना सोडवून ताळ्यावर आणलं नाहीं तर मग आपण चांगले असण्याचा तरी काय उपयोग? आबा मला क्षणभरही आपल्या डोळ्यांसमोरून हलूं देत नाहींत. मुंबईस झालेल्या सर्व प्रकारामुळं त्यांचं मस्तक अगदीं संतापून गेलं आहे, आणखी ते माझी काळजी वाहायला लागले आहेत. त्यांना असं वाटतं आहे, कीं मी त्या दोघांच्या तावडींत सांपडेन आणखी ते मला फसवितील."

"पद्माताई, खरं जर पुसशील, तर मला सुद्धां अगदीं तसंच वाटतं आहे. त्यांच्या अंगांत काय काय......"

"वसंतराव, तुला ही उगीच भ्रांति

आहे. मी तर असं ह्मणतें, कीं माझ्या मनाप्रमाणें मला वागायला सांपडलं, तर मी त्यांना खचित सुधारीन. तुह्मी ह्मणतां तसे ते खरोखर वावगे नाहींत. ते संगतीनं बिघडले, पण घरांतल्या मंडळींना, तुझ्यासारख्या मित्रांना सोडून जाण्याची बुद्धि त्यांना व्हायला कारण कोण? आह्मीचना? वसंतराव, तुह्मी सर्वजण आह्मां बायकांना अगदीं अजाण समजतां. आणखी आमच्यापैकीं बहुतेकजणी अजाण—अगदीं अजाण खऱ्याच. पण मी त्यांतली नाहीं. लहानपणापासून मला अनुभवच असे आहेत, कीं मला अजाण राहणं शक्य नव्हतं. ते दोघे जर घरांत सुखी असते, आमच्या घरांत जर तीनतेरान् सातअठरा असे प्रकार नसते, तर ते अगदीं चांगले निपजले असते. रात्रिभरसुद्धां वावगे जातेना. पण तें कशाला बोलूं? बाबारे, मला माझ्या घरांतल्या अनुभवांनीं आणखी दुःखांनींच चांगलं सुजाण केलं. दुसरं कांहीं नाहीं. तेव्हां मी फसेन हें कांहीं तुह्मी मनांतसुद्धां आणूं नका. उद्यां जर मला आबांनीं मोकळीक दिली, तर मुंबईस जाऊन त्यांना दोघांना भेटून त्यांच्या त्या वाईट संगतींतून त्यांना सोडवून आणल्याखेरीज रहाणार नाहीं. वसंतराव, तुला मी बोलावून आणलं, तें एवढ्याचकरितां कीं तूं मला या कामांत मदत करावीस. तूं जें काय मनांत आणशील तें करूं शकशील. तेवढं कर. माझ्याकडून जी मदत पाहिजे असेल, ती शक्य ती मी तुला करीन. आणखी मला कांहीं तुला सांगायचं नाहीं. मीं तुला एवढं हक्कानं कां बोलावणं पाठवावं, आणखी एवढं हक्कानं कां तुला हें सांगावं, तें मला कांहीं सांगतां येत नाहीं. पण मीं तुला हक्कानं सांगितलं, तरी तूं तो हक्क मानशील असं मनाला पक्कं वाटून मी आपलं तुला वाटेल तें सांगतें. कांहीं संकोच धरीत नाहीं. मला माझ्या भावांपेक्षांही तूं अधिक वाटतोस, तेव्हां..."

परंतु पुढें तिचा कंठ इतका सद्गदित झाला कीं, तिला एक अक्षरही अधिक बोलवेना. तिचे डोळे पाण्यानें अगदीं भरून आले. आणि तें पाणी तेथेंच न थबकतां एकसारखें तिच्या गालांवरून तुटलेल्या मोत्यांच्या सरांतील मोत्यांप्रमाणें ओघळूं लागलें. वसंतरावास तो हृदयभेदक देखावा पाहून कसेंसेंच झालें. त्याची चर्या चमत्कारिक झाली. ओंठ स्फुरण पावूं लागले. डोळे निश्चलपणें, तिजकडे पहात राहिले आणि तो तटस्थपणें तिच्याकडे पहात बसला. नंतर एकदम उठला आणि कांपऱ्या आवाजानें ह्मणालाः "ताई, तूं अगदीं निर्धोर ऐस. जें जें ह्मणून तूं मला सांगशील तें तें मी माझ्या अंगांत बळ असेल तें आणि शहाणपण असेल तें खर्च करून पार पाडीन. पण आतां मला जास्त कांहीं बोलवत नाहीं. मी आतां अर्धमिनिटसुद्धां अधिक बसूं इच्छीत नाहीं. मी पुनः येईन. पण पुनः येईन तो असा तसा येणार नाहीं. तूं सांगितलेल्या कामांतलं कांहीं तरी केलं, असं सांगण्याजोगं कांहीं तरी करीन तेव्हांच येईन."

असें बोलून तो झटक्यासारखा उठून चालताच झाला. इतका झटक्यानें गेला कीं तो गेला हें तिच्या ध्यानांत येण्यालासुद्धां थोडा अवकाश लागला. परंतु त्याच्या जाण्याला आणि दुसऱ्या दारानें आबासाहेब येण्याला एकच गांठ पडली. ती खोली अशी होती, कीं तिला समोरासमोर दोन दारें होतीं. एक दार आबासाहेबांच्या बैठकखान्याकडे जाण्याचें होतें आणि दुसरें दार बाहेरल्या व्हरांड्यांत जा-

ऊन खालीं जाणाऱ्या जिन्याकडे जाण्यासाठीं होतें. आबासाहेब जेथें निजले होते, तेथून ही खोली पुष्कळ लांब होती; कारण तो बैठकखाना अगर दिवाणखाना मोठा लांबलचक होता व या खोलींत उघडणाऱ्या दारापासून बऱ्याच लांब अंतरावर—दुसऱ्या टोंकाशींच—आबासाहेब निजले होते. या खोलींत साधारण हलकें बोलणें चाललें असलें, तर दिवाणखान्यांत जागें असलेल्या माणसासमुद्धां ऐकूं येण्याजोगें नसे. परंतु वसंतराव व पद्माताई यांचें बोलणें प्रथम प्रथम जरी हलकें सुरू झालें, तरी पुढें पुढें त्याचा हलकेपणा राहिला नाहीं; आणि तितक्यांत आबासाहेब जागे झाल्याकारणानें त्यांस कोणी तरी कुजबुजतें आहे, असा भास झाला. पाहातात तों पद्माही आसपास कोठें नाहीं, त्यांनीं पडल्यापडल्याच "पद्मे, पद्मे," ह्मणून हांका मारल्या, परंतु इकडे या दोघांचें बोलणें अगदीं भरांत आल्याकारणानें व त्या बोलण्यांत दोघेंही अगदीं तल्लीन असल्याकारणानें त्यांस आबासाहेबांच्या हांका मुळींच ऐकूं आल्या नाहींत. शेवटीं आबासाहेब उठले आणि जसजसे ते त्या दाराजवळ आले, तसतसें त्यांस अधिकाधिक ऐकूं येऊं लागलें, मात्र शब्द स्पष्टपणें ऐकूं आले नाहींत. ते दार उघडतात, तों वसंतराव वर दिलेलें आपलें बोलणें मोठ्या मनःपूर्वकतेनें बोलून झट्कन् नाहींसा झाला. कोणी तरी पुरुष येथून झट्कन् गेला एवढें त्यांस भासलें. तो कोण असावा, हें त्यांच्या दृष्टिमांद्यामुळें त्यांस दिसलें नाहीं. पण त्यांना कांहीं तरी संशय आला; आणि ते एकदम झटक्यानें आपल्या मुलीकडे वळून ह्मणाले: "तूं आतां कोणाशीं बोलत होतीस?" पद्मेनें त्यांना उत्तर दिलें नाहीं. तेव्हां त्यांना थोडासा राग आल्याप्रमाणें झालें आणि ते तिला ह्मणतात:

"पोरी, तूं स्वर्गांत राहण्याला योग्य अशी देवता आहेस. तुला या नष्ट दुष्ट जगांतल्या अत्यंत नष्ट दुष्ट माणसांचं वारंसुद्धां लागूं नये ह्मणून मी तुझ्या जन्मापासून जपत आलों. परंतु केवळ माझं खडतर नशीब कीं त्यांत मला यश न मिळतां इतरांच्यापेक्षांही जास्तच दुःख मला होईल असे प्रकार झाले. बरें ते प्रकार झाले तर झाले, आतां तरी यापुढें तुला त्या सर्व दुःखांपासून आणखी नष्टदुष्टपणांपासून अलिप्त ठेवावं, तुला त्याचं वारंसुद्धां लागूं नये ह्मणून मी आटोकाट श्रम करतों आहें तर त्यांत तूं मला यश येऊं देत नाहींस. काय ह्मणावं? माझे हे शेवटले दिवस दुःखांतच जावेत, असं तुलासुद्धां वाटतं आहे का? माझं सगळं सुख मी तुझ्या ठिकाणीं एकवटून ठेविलं आहे आणखी तेंही जर मला मिळूं नये अशी तुझी इच्छा असली तर... ...तें कांहीं नाहीं तो कोण आतां गेला तो मला सांग? आजपर्यंत जें तूं कधीं केलं नाहींस तें करूं नकोस. मला खोटंनाटं कांहीं सांगून फसवूं नकोस......"

"नाहीं, आबा, ती गोष्ट मी कालत्रयीं आणखी स्वप्नांतसुद्धां करायची नाहीं."

"मग कोण होता तो आतां गेला तो?"

"आपण नाहीं मला विचारलंत तर?"

"तेंच तें. तेंच तें. तुझ्या या प्रश्नांतच मला सगळा जबाब मिळाला. पोरी, त्या कारट्यांवांचून तुझं काय अडलं आहे? ते तुला मुंबईस भेटल्याचं मला कळलं तेव्हांच तुला मीं सांगितलं, कीं पुनः त्यांचं तोंड तूं पाहतां कामा नये. पण तें कांहीं न ऐकतां तूं त्यांना या घरांत चोरून लपून आणून त्यांच्याशीं बोलत बसतेस! त्यांनीं तुला

इतकी भुरळ घातली आहे ? मीं तुला 'नको करूं ' ह्मणून जी गोष्ट सांगितली, ती तूं या घरांत, मी जिवंत असतांना करूं लागलीस ? काय ? माझ्या कपाळीं पूर्ण सुख तर राहो, पण सुखाचे उगीच बारीक तुषार घेऊं ह्मटलं, तर ते सुद्धां नसावेत ! बोल त्या कारस्थ्यांपैकींच एक आतां आला होता का नाहीं ?–पण तो आला कसा ?..."

पद्मा त्यांचें तें भाषण ऐकून फारच चकित झाली. आपल्या बापास असा कांहीं संशय येईल ही कल्पनासुद्धां तिला नव्हती; आणि त्यामुळें ती एकदम त्यांना ह्मणाली: "आबा, आबा, भलतंच कांहीं तरी मनांत आणूं नका. त्या दोघांच्यापैकीं कोणी नव्हे."

"पोरी, आतां मला तुझासुद्धां भरंवसा धरवत नाहीं. मला अगदीं खास वाटतं कीं त्या दोघांपैकीं कोणी नसेल, तर त्यांचाच कोणी तरी साथीदार असला पाहिजे. त्याखेरीज माझीं पावलं वाजल्याबरोबर तो इतक्या झपाट्यानं पळताना. पळून जायचं काय कारण होतं ? पोरी, तूं खोटं बोलूं लागशील आणखी मला फसवशील, असं माझ्या स्वप्नांतसुद्धां कधीं आलं नाहीं. पण आतां प्रत्यक्ष अनुभव तसा येतो आहे !"

"नाहीं, आबा अगदीं तसं नाहीं. उगीच भलतंच मनांत आणूं नका. मी तुह्मांला फसवीत नाहीं. मी तुह्मांला खोटं सांगत नाहीं. मी ह्मणतें, कीं तुह्मी समजतां त्यांपैकीं कोणी नव्हता."

"मग कोण होता तर ? मी निजलों आहें अशी संधि साधून तुझ्याशीं एवढं हितगुज करायला एवढा आला होता कोण ? आणखी आला होता कां ?"

पद्मा एकदम त्यांस ह्मणाली:"वसंतराव!"

# प्रकरण २० वें.

## पद्मेवर आणखी एक संकट.



त्या घटकेपासून आबासाहेबांस असें वाटूं लागलें, कीं आपल्या ठिकाणीं पूर्ण भक्ति आणि दृढ श्रद्धा ठेवणारें असें माणूस जगांत एकही नाहीं. पद्मेवर सर्व त्यांचा विश्वास, तिच्यावर त्यांची पूर्ण भक्ति, तिचे ठिकाणीं त्यांचा जीव कीं प्राण, परंतु ती मात्र आपल्या ह्मणण्याप्रमाणें ऐकत नाहीं. आपल्या इच्छेविरुद्ध तिचें कांहींना कांहीं तरी चाललेंच आहे. आपण तिला त्या चांडाळांपासून दूर ठेवण्यासाठीं इतकें धडपडतों, तिला आपल्यापासून एकक्षणभरसुद्धां दूर होऊं देत नाहीं, तथापि ती त्यांतल्या त्यांत कांहीं तरी युक्त्या करून आपला डोळा चुकवून त्या चांडाळांना भेटते तेव्हां आतां काय म्हणावें? आपण जो काय आतांपर्यंत मनाचा निर्धार केला होता, जो काय निश्चय केला होता, तो सर्व हिच्यासंबंधानें आणि असें असतां तिची एकंदर खटपट आपल्या मनाविरुद्ध! हें सर्व मनांत येऊन त्यांस अतोनात वाईट वाटलें. त्यांचें चित्त अत्यंत दुर्विषण्ण झालें, आपल्या आशासर्वस्वाचा घात झाला, असें त्यांच्या मनानें घेतलें. 'त्या दुष्टांशीं बिलकुल संबंध ठेवूं नको,' असें आपण तिला बजावून बजावून सांगत आलों, त्यांच्या ही भेटी घेते त्यांना चोरून घरांत आणते आणि सर्व कांहीं आपल्यापासून चोरून ठेवते. तेव्हां आपल्या पश्चात् तर ही सर्वस्वी त्यांच्या आहारीं पडेल. हिच्या सरळ, विश्वासू व प्रेमळ स्वभावाचा फायदा घेऊन ते हिला आपल्याप्रमाणेंच अन्नान्न दशेला पोंचविल्याखेरीज रहाणार नाहींत, यांतून हिला वांचविण्याला आतां काय करावें, याचा विचार त्यांच्या मनांत आतां एकसारखा घोळूं लागला. हिच्या प्रेमळ स्वभावामुळें होणाऱ्या घातापासून हिचें रक्षण केलें पाहिजे. असा त्यांच्या मनाचा निर्धार झाला. आतां आपल्या देखत जो कोणी एथून गेला तो आपल्या दुष्ट कारस्थ्यांपैकींच कोणी तरी असला पाहिजे, किंवा कोणी तरी त्यांच्या वतीनें आला असला पाहिजे. याबद्दल त्यांच्या मनांत यत्किंचितही संशय राहिला नाहीं. वरील ग्रहानें त्यांच्या मनास पूर्ण ग्रासलें आणि त्या संशयग्रहानें ग्रासून अंधकारमय केलेल्या मनाच्या स्थितींतच ते झटकन् आपल्या लिहिण्यावाचण्याच्या खोलींत जाऊन त्यांनीं आंतून दार घट्ट लावून घेतलें.

नंतर ते हळूच आपल्या टेबलाजवळच्या खुर्चीवर जाऊन बसले. डावे बाजूस एका लांकडी बैठकीवर त्यांची एक मोठी थोरली तिजोरी होती. त्या तिजोरीची किल्ली त्यांनीं कोठें ठेवली होती तेथून काढली, आणि संथपणें तिजोरी उघडून त्यांनीं एक लांब व ज्याच्यावर लाखेचीं सात सिलें केलेलीं आहेत, असें पाकीट काढलें. तें

आपल्या पुढें ठेविलें आणि त्याच्याकडे पहात बराच वेळ स्वारी बसली. दोन्ही हातांनीं त्यांनीं आपलीं कानशिलें दाबून धरलीं. जणूं काय आतां जे विलक्षण विचार चालले आहेत, त्यांच्यायोगानें त्यांचे मस्तकांत शूळ उत्पन्न होऊन ते मस्तक फोडूं पहात आहेत! नंतर कांहीं विचार कायम झाला आहे असें दिसून त्यांनीं तीं सिलें फोडून त्या लखोट्याचें वरचें पाकीट फोडलें. आंत एक पांच ताव लिहिलेले होते, ते वाचण्यास त्यांनीं सुरुवात केली. मधून मधून ते वाचन सोडून खुर्चीवर मागें टेंकत; आणि विचार करण्यांत अगदीं गर्क होऊन जात. पुनः मस्तक धरून बसत आणि पुढील कागदांकडे टक लावून पहात. पण त्या कागदांकडे दृष्टी नसे, ती दृष्टि अंतःकरणांत वळली असून कांहीं तरी विचार चालला आहे असें स्पष्ट दिसत होतें. शेवटीं त्यांनीं कांहीं एक विचार कायम करून आपल्या हातांत टांक व कोरे कागद घेऊन कांहीं लिहिण्यास सुरुवात केली.

इकडे पद्मा आपल्याशींच विचार करीत बसली होती. आपण वडिलांना राग आणण्याजोगें काय केलें? ते इतके संतापले कां? आजपर्यंत त्यांचा असा संताप कधींही आपल्यावर झाला नाहीं. अशा संतापाच्या स्वाधीन ते झाले होते याबद्दल तिला शंकाच राहिली नाहीं. ते तेथून गेले तेव्हां त्यांच्या पाठोपाठ जावें असें तिच्या मनांत आलें. तिचीं पावलें त्या बाजूस त्यांच्या मागोमाग जाण्यासाठीं वळलींही. परंतु कांहीं वेळ तसाच जाऊं द्यावा आणखी मग आपण जाऊन पहावें. तोंपर्यंत ते थोडे शांत होतील. असा विचार तिनें केला; आणि ती शून्य मनानें उगीच इकडे तिकडे वावरूं लागली. अशा स्थितींत बराच वेळ गेला. आणखी तिला असें वाटलें, कीं इतका वेळ आपल्यावांचून आपल्या वडिलांनीं वेळ काढला तेव्हां कांहीं तरी विशेषच राग आला असावा. तेव्हां ती चपापली, आणि आपण होऊन आतां त्यांच्याकडे जावें म्हणून दारापाशीं गेली. परंतु पहाते तों दार आंतून लावलेलें! तिनें दार ठोठावलें, परंतु उत्तर आलें नाहीं. तेव्हां ती फारच विस्मय पावली आणि दारापाशींच स्वस्थ उभी राहिली, पुढें काय करावें हें तिला सुचेना. वडील आपल्यावर फार रागावले व मुद्दाम दार लावून बसले असावे, असें तिच्या एकदम मनांत आलें. आपण आतां लागलीच त्यांस हाका मारमारून उठवावें की आणखी कांहीं वेळ वाट पहावी असा विचार करीत उभी राहिली. आजपर्यंत आबासाहेब इतके आपल्यावर रागावल्याचें कधींही तिला स्मरेना. किंबहुना ते कधीं तिजवर रागावलेच नाहीत, आणि आज एकाएकीं कांहींतरी शंका मनांत उभी राहून ते आपल्याला टाकून आंत जाऊन दारें लावून एकटेच बसले. आपल्या बंधूंवर त्यांचा राग झाला आहे, तसा आपल्यावरही आजपासून होणार की काय? परंतु आपण त्यांची समजूत लवकर घालूं. अशी तिला उमेद वाटली व ती कांहीं वेळ त्यांस स्वस्थ बसूं द्यावें, त्यांचें मन शांत झालें म्हणजे आपलें ह्मणणें काय तें त्यांना नीट प्रकारें सांगतां येईल असा विचार करून घरांत कांहीं काम करण्यासाठीं गेली. परंतु कामाकडे तिचें चित्त कसलें लागतें! आतांपर्यंत बाप रागावल्याचा कधींमुद्धां तिला अनुभव नव्हता. तो एकाएकीं आल्यावर तिला बावरल्यासारखें वाटणें अगदीं साहजिकच आहे. शेवटीं आणखी थोडा

वेळ गेला. बाहेर जाण्याची–संध्याकाळच्या सहलीची वेळ झाली, दाराशीं गाडी येऊन उभी राहिली. तेव्हां मात्र तिला असें वाटलें कीं, आतां आपण होऊन मोठमोठ्यानें हांक मारण्यापलीकडे उपाय नाहीं. म्हणून तिनें आपल्या वडिलांच्या त्या बैठकखान्याच्या दारापाशीं जाऊन ठोठावण्याचा सपाटा चालविला. परंतु कांहीं केल्या आंतून उत्तर म्हणून मिळेना. तेव्हां ती चपापली. आपण इतका वेळ दार उघडण्यासाठीं गडबड करतों आहोंत, हांका मारतों आहोंत, आणखी असें असून आपल्याला प्रत्युत्तर म्हणून मिळत नाहीं याला काय म्हणावें ? इतका राग आपल्यावर त्यांनीं काय म्हणून करावा ?

पद्मेनें नानाप्रकारांनीं हांका मारल्या. ' आपण चुकलों पुनः आपल्या आज्ञेवांचून कोणाशीं बोलणार नाहीं ' वगैरे सुद्धां तिनें सांगितलें. परंतु आंतून उत्तर म्हणून नाहीं. तरी पण तिला पुनः वाटलें कीं, आणखी कांहीं वेळ जाऊं द्यावा. असें करितां करितां अगदीं अंधार पडण्याची वेळ आली. आतां दिवा तरी निदान ते मागतील, असें तिच्या मनांत येऊन ती अगदीं दाराशीं जाऊन उभी राहिली; परंतु कांहीं नाहीं. तेव्हां मात्र तिचें धाबें दणाणलें. आतांपर्यंत जी शंका तिला मुळींच आली नाहीं ती एकदम तिच्या मनांत उभी राहिली आणि ती घाबरून जाऊन तिनें मोठमोठ्यानें हांका मारण्यास सुरुवात केली. दर हांकेस प्रत्युत्तर येईल म्हणून जरा थांबावें, पुनः कांहीं नाहीं असें पाहिलें कीं हांक मारावी. तिची आई कोठें बाहेर गेली होती तीही अजून परत आली नव्हती. एकटी स्वयंपाकीणबाई नुकतीच येऊन चुलींत पेटवण घालीत होती. गडीमाणसांना हांका मारून तिनें त्यांच्याकडूनही 'आबासाहेब,' 'आबासाहेब' म्हणून हांका मारल्या; परंतु प्रत्युत्तर म्हणून कांहीं नाहीं. तेव्हां आतां दार उघडण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं, असें तिच्या मनानें घेतलें. कांहीं अपघात झाला हें तिच्या स्पष्टपणें मनांत आलें; आणि ती एकदम एका गड्यास म्हणाली, " मी चिठ्ठी देतें, ती घेऊन तूं दादासाहेबांच्या घरीं जा आणि वसंतरावांस ती चिठ्ठी दे." तिनें लागलीच घाबऱ्या घाबऱ्या चिठ्ठी लिहिली व त्या गड्याबरोबर पाठविली. " चिठ्ठी पावतांच गाडींतून निघून यावें, मजवर कांहीं तरी भयंकर संकट आहे. दादासाहेबांनाही मजकूर सांगून त्यांस घेऊन यावें " असें चिठ्ठींत लिहिलें होतें. गडी धांवतच गेला. कांहीं तरी वेडावांकडा प्रसंग आहे हें त्यालासुद्धां दिसून आलें. वसंतराव घरीं नुकताच आला होता. त्यांस ती चिठ्ठी दिली. ती वाचतांच तो आधीं आपल्या वडिलांकडे गेला आणि त्यानें ती चिठ्ठी त्यांस वाचून दाखविली व ' मी पुढें होतों ' असें म्हणून तीरासारखा धांवला.

पद्मावतीच्या घरीं तो येतो, तों ती पूर्वीप्रमाणें त्या दाराशीं हांका वगैरे मारीतच होती. वसंतराव आल्यावर त्याला तिनें पहातांच तिला एकदम गहिंवर येऊन ती एकदम ओक्साबोक्शीं रडूं लागली व त्याला म्हणते:–" वसंतराव, माझ्यावर कांहीं तरी भयंकर संकट येऊन गुदरलं आहे. इतका वेळ मीं फार धीर धरला, परंतु आतां कांहीं मला धीर धरवत नाहीं. आबांना कांहीं तरी अपघात झाला आहे. तसं जर नसतं तर ते इतका वेळ असे कधींच बसतेना ! मीं हांका मारण्याची वगैरे शिकस्त केली. आतां दार उचकटून

काढण्याखेरीज दुसरा कांहीं उपाय राहिला नाहीं, असं वाटून मीं तुला बोलवायला पाठविलं. आतां कांहीं तरी करून दार उघड. दुसरीकडून जाण्याला कुठूनसुद्धां वाट नाहीं. खिडक्या उघड्या असायच्या परंतु दुपारीं ते निजले होते तेव्हांपासून त्या उन्हाच्या वेळीं लावून घेतल्या तर त्या लागल्याच आहेत. जर कांहीं अपघात झालेला नसता, तर मीं इतक्या हांका मारल्या, त्यांनीं मला ओ देऊन तूं उगीच आरडाओरड करूं नको, मी दार उघडीत नाहीं, ह्मणून सांगितलं असतं; पण आंतून हूं का चूं नाहीं. "

पद्मेचें बोलणें ऐकून वसंतरावाच्या मनाची सुद्धां अशीच खात्री झाली व त्यानें दार उचकटण्याच्यापूर्वी कांहीं कोठें हात घालून किंवा तावदान फोडून हात घालावयाला जागा करून बोर्टे घालून कडी उडविण्याची सोय असली तर पहावी ह्मणून प्रयत्न केला, परंतु अगदीं व्यर्थ. कांहीं जमेना. शेवटीं दार उचकटण्याखेरीज गत्यंतर नाहीं हें तर स्पष्ट झालें आणि कांहीं अपघात होऊनच आबासाहेबांचा आंतल्या आंत अंत झाला असावा असेंही पण दोघांच्या मनांत आलें. यापुढें आतां वाट पहाण्यांत अर्थ नाहीं असें मनांत योजून वसंतरावानें एक कुऱ्हाड आणून दाराच्या प्यानेलवर हाणली. त्याबरोबर दार फुटलें. लागलींच आंत जाऊन त्यानें बोल्ट काढला. पद्मा आंत जाण्याला उत्सुक होती, परंतु भीत होती. आंत गेल्याबरोबर काय आपल्या नजरेस पडेल आणि काय नाहीं असें तिच्या मनांत येऊन मन चरकलें होतें. वसंतानें तिला दिवा घेऊन आंत येण्यास सांगितलें. ती गेली, तों तिची दृष्टि आणि तिच्या हातांतल्या दिव्याचा उजेड हीं एकदम समोरच टेबलाजवळ खुर्चीवर बसलेल्या तिच्या बापाच्या अंगावर पडलीं. त्या उजेडांत तिला जें काय दिसलें त्याबरोबर तोंडून " आबा ! " ह्मणून एकदम किंकाळी फुटली आणि हातांतला मेणबत्तीचा दिवा एकदम जमिनीवर पडला. कर्मधर्मसंयोगानें तो दिवा मालवला मात्र नाहीं. वसंतरावानें तो उचलला आणि आबासाहेबांकडे पाहिलें, तों पद्मेच्या किंकाळीचें कारण त्याला समजलें. आबासाहेब टेबलावर डावा गाल टेंकून बसले आहेत. त्यांच्या तोंडांतून रक्ताची गुळणी आलेली असून रक्ताचे ओघळ टेबलावरून खालीं सतरंजीवर गेले आहेत. त्यांचे डोळे उघडे असून अगदीं कवड्यासारखे झाले आहेत. पद्मेला आतां येथें असूं देण्यांत तात्पर्य नाहीं ह्मणून त्यानें तो दिवा टेबलावर ठेवून आधीं तिचा हात धरला व तिला त्यानें बाहेर नेलें. ती अगदींच वेड्याप्रमाणें झाल्यामुळें तिला काय करावें तें सुचेना. वसंतरावानें तिला बाहेर आणलें, ती बाहेर आली. तिला पुढल्या दिवाणखान्यांत बसविलें, ती बसली. आणि त्याच्याकडे अगदीं शून्य दृष्टीनें पाहूं लागली. 'आतां कोणातरी डॉक्टराला बोलावून आणल्याखेरीज उपयोग नाहीं, असें त्याच्या मनांत आलें. आबासाहेब अपघातानें वारले हें तर त्यास स्पष्टपणें दिसलें. परंतु त्यांच्या शवाला आपण हात लावण्यापूर्वी दोन दुसरे गृहस्थ व एखादा डॉक्टर आणला पाहिजे असें त्याच्या मनांत एकदम आलें. इतक्यांत त्याचे वडील तेथें आले, त्यांस पाहतांच पद्मेनें त्यांच्या पायांस मिठी घालून एकदम ह्मटलें: "माझे आबा माझ्यावर रागावून मला सोडून गेले हो.मला आतां तुमच्याखेरीज कोणी नाहीं."

तें ऐकतांच दादासाहेबांस कसेंसेंच झालें. त्यांनीं तिला उगी केलें. ज्या गाडींतून ते स्वतः आले होते त्या गाडींतूनच त्यांनीं आपल्या पत्नीस बोलावूं पाठविलें. पद्मेची आई कोठें कथेला बसली होती, तेथें शोधण्यास माणसें पाठविलीं. थोड्याच वेळांत वसंतरावाची आई आली. तिनें पद्मेस एके बाजूस नेऊन तिचें सांत्वन चालविलें. शोधतां शोधतां पद्मेची आईही कोठल्या एका देवळांत कथेची समाप्ति चालली होती, तेथें बायकांच्या गर्दींत बसलेली सांपडली. आपल्याला लवकर घरीं बोलाविलें आहे असें तिला कळविलें. परंतु कथेची समाप्ति झाली म्हणजे मग येईन, असा उलट निरोप तिनें पाठविला. पुनः त्यानें तांतडीचा निरोप आहे असें सांगून पाठविलें, परंतु व्यर्थ. त्याला खरा प्रकार तेथें सांगतां येईना. शेवटीं कांहीं तरी फार भयंकर प्रसंग आहे, आपण लवकर चला असा निरोप त्यानें एका बाईकडून अगदीं त्यांच्या कानांत सांगविला तेव्हां ती बाई चडफडत "काय मेला त्रास आहे. कथापुराणाला बसलें तर सुद्धां सुखानं तिथें बसूं देत नाहींत." असे उद्गार काढीत बाहेर पडली आणि घरीं आली. वसंतरावाच्या आईनें तिला एके बाजूस नेऊन काय होतें तें सांगितलें. मग मात्र तिला दुःखानें अगदीं निपचित पाडलें. ती आपल्या पोरीच्या गळ्याला मिठ्या मारून रडूं लागली.

इकडे डॉक्टरास बोलावणें पाठविलें होतें, त्यानें येऊन व आणखी दोघे गृहस्थ बोलावून त्यांच्या समक्ष आबासाहेबांच्या प्रेताची तपासणी करून असें सांगितलें कीं, "एकदम कांहीं तरी मानसिक धक्का बसून यांचा हृत्कोश फुटला व तत्काळ मृत्यु आला. मृत्यु येऊन सुमारें सहा सात तास झाले असावे. गृहस्थाचा हृत्कोश (heart) मूळचा फार अशक्त असला पाहिजे हें उघड दिसतं."

डॉक्टरानें ही चिकित्सा केली, आणि सांगितलें कीं, 'पुढचा विधि लवकर आटपाल तर बरं, नाहीं तर पोलिसचा ससेमिरा तुमच्या पाठीमागें लागण्याचा संभव फार. अशा आकस्मिक मृत्यूच्या बाबतींत त्यांचं फार फावतं.'

तें ऐकून दादासाहेब व त्यांचे स्नेही जे एकदोघे त्यांनीं बोलाविले होते त्यांना मोठा विचार पडला कीं, आतां पुढें काय करावं ? तेव्हां असा शहाणपणाचा विचार ठरला, कीं आपण होऊन सिव्हिल सर्जनला बोलावून त्याचें आधींच सर्टिफिकिट घ्यावें तें बरें. त्याप्रमाणें त्या पहिल्या डॉक्टराच्या विद्यमानेंच त्यांनीं सिव्हिलसर्जनास बोलावून आणलें. त्यानें तपासून पहिल्या डॉक्टराच्या मताप्रमाणेंच मत दिलें, तेव्हां पुढें कांहीं अडचण न पडतां प्रेताचा दहनविधि आणखी कांहीं संकट न येतां पार पडला. परंतु पद्मेवर पुढें येणाऱ्या संकटपरंपरेस या पितृमरणानें नुसता प्रारंभ झाला.

# प्रकरण २१ वें.



बापाच्या आकस्मिक मरणाची रात्र सगळी गडबडींतच गेली. हा मृत्यु ह्मणजे आपल्यावर कसला प्रसंग, याबद्दल विचार करण्यास सुद्धां पद्मेस वेळ सांपडला नाहीं. त्यांच्या प्रेताचें दहन तरी योग्य प्रकारानें होतें कीं नाहीं याबद्दलच शंका उत्पन्न झाल्या, परंतु दादासाहेब वगैरेंनीं वेळींच सिव्हिल सर्जनपर्यंत जाऊन तपासणी करवून "आकस्मिक कारणानं एकदम हृत्क्रिया बंद पडल्यानं मृत्यु आला," असें सर्टिफिकिट घेतल्याकारणानें पुढचें सर्व निर्विघ्नपणें झालें. आतां प्रेताचें तरी पुढें काय होतें? असा प्रश्न जोंपर्यंत होता, तोंपर्यंत या मृत्यूनें आपलें पुढें काय होणार हा प्रश्न मनांत उभा राहण्यास सुद्धां अवकाश नव्हता. परंतु तो पहिला प्रश्न नाहींसा होतांच दुसऱ्या प्रश्नानें त्याची जागा घेतली; आणि तो तिच्या मनास त्रास देऊं लागला; इतकेंच नव्हे, तर आणखीही एक विचार त्याच वेळीं तिच्या मनाला फार त्रास देऊं लागला. तो विचार ह्मणजे आपल्या वडिलांच्या आकस्मिक मृत्यूला आपण कारण झालों. आपण त्यांच्या मर्जीविरुद्ध आपल्या बंधूंशीं संबंध ठेविला, त्यांना तुह्मी इतक्या निष्ठुरपणें वागवीत आलां हें बरें नाहीं, अशा प्रकारचें आपण आपल्या वडिलांना बोललों, आणि त्या दिवसापासून त्यांच्या प्रकृतींत चलबिचल झाली. पुढें आज आपण त्यांना न कळत वसंतरावापाशीं बोललों, आणि वसंतराव त्यांच्या नजरेस न पडतां गेला, हें पाहून त्यांना अधिकच संताप किंवा खेद झाला; आणि त्या विकाराच्या पहिल्या तिरीमिरींत त्यांनीं दार लावून घेतलें व कांहीं तरी विचार करण्याकरितां ते बसले. हा जो सगळा संतापाच्या किंवा खेदाच्या अतिरेकांत त्यांच्याकडून प्रकार झाला, त्यांतच त्यांचें देहावसान झालें. अशी अवज्ञेची, त्यांच्या मर्जीविरुद्ध किंवा त्यांच्या मनाला फार त्रास होईल अशी वागणूक जर केली नसती, तर आतांच त्यांना मृत्यु आला नसता, असें आपलें तिच्या मनास वाटूं लागलें आणि तिचें मन तिला खाऊं लागलें.

पद्मेची आई अत्यंत शोकमग्न होऊन लेंकीच्या गळ्यास मिठ्या मारून अश्रु ढाळीत होती, आणि शेवटीं आपल्या लेंकीस ह्मणाली:—"जिवंतपणीं माझी कोणती इच्छा त्यांनीं पुरविली नाहीं तर नाहींच; पण त्यांच्या आधीं मला मरण यावं अशी

इच्छा होती, ती सुद्धां पुरण्याची आशा ठेविली नाहीं."

आपल्या आईचे हे असले चमत्कारिक उद्गार ऐकून पद्मेस फारच चमत्कारिक झालें. परंतु ती तिला कांहींएक बोलली नाहीं. तिच्याजवळ बसून तिची सेवा करावयाची व समाधान करावयाचें असा तिनें निश्चय केला. आईची पद्मेच्या ठिकाणीं कांहीं विशेष भक्ति नव्हतीच. उलट तिला असें वाटे कीं, ही तिकडली मर्जी संपादण्यासाठीं तिकडून सांगणें होईल तशी नाचे, यामुळें सारें बिघडलें. हिच्यावर त्यांची फार माया, तेव्हां जर अमुक एक गोष्ट अशी नाहींन् तशी नाहीं, असें करून त्यांना मोडून काढती तर संसाराचे भंडवडे झाले नसते. पद्मेच्या आईस पूर्णपणें असें वाटे आणि तें ती पद्मेस रोज एकदां तरी बोलून दाखवी. पद्मेला त्यामुळें अतोनात वाईट वाटे. परंतु आतां आपल्या आईला 'असं नाहीं तसं, तसं नाहीं असं' किंवा दुसऱ्या कांहीं प्रकारानें उलट उत्तरें देऊन दुखवूं नये. आतां तिला आपण किंवा आपल्याला ती. असा प्रकार आहे तेव्हां चिकटून राहून दिवस काढले तर गोडीनें सर्व होईल, नाहींपेक्षां काय प्रसंग येतील आणि काय नाहीं, असा विचार ती करी.

दारें उखळून दादासाहेबांच्या खोलींत शिरल्यानंतर प्रेताची व्यवस्था होईपर्यंत कोणास कांहींच सुचलें नाहीं. टेबलावर पडलेला मोहोरबंद लखोटा बहुतकरून मृत्युपत्राचा किंवा अशाच कांहीं महत्वाच्या विषयाचा असावा हें वसंतरावाच्या लक्ष्यांत आलें व त्यानें दादासाहेबांकडून तो व इतर कागदपत्र गोळा करून तेथेंच असलेल्या लोखंडी तिजोरींत टाकविले. आतां त्या कागदपत्रांची पूसतपास करण्याची व्यवस्था केली पाहिजे हें उघड होतें. परंतु पद्मेच्या मनांत तें इतक्या जलदीनें कांहीं करावयाचें नव्हतें. दहा पंधरा दिवस गेल्यानंतर मग पाहतां येईल, असा विचार करून ती आपली त्या कामास दिवसगत लावूं लागली. तिला कांहींएक भय वाटत होतें. आपल्या बापानें काय मृत्युपत्र केलें असेल याची कल्पना तिला पूर्णपणें होती आणि ह्मणूनच तिला असें वाटे कीं, हें बुइल फोडून पाहण्याचें काम जितकें लांबणीवर पडेल तितकें चांगलें. तें फोडण्यापूर्वी जर आपले दोघेही भाऊ घरीं आले आणि चांगल्या प्रकारें वागूं लागले, त्यांनीं आपली वाईट संगति सोडली, आणि यापुढें आपल्याला आपल्या बापानें जी काय मीठभाकरी ठेविली असेल, ती मुकाट्यानें समाधानानें खावयाची असा जर त्यांनीं निश्चय केला व क्रम ठेविला तर त्या बुइलाकडे पहावयासही नको. असें मनांत येऊन तिनें वडिलांच्या प्रेतदहनाच्या दुसरेच दिवशीं वसंतरावाकडून आपल्या वडील भावास मुंबईस तार केली, परंतु त्या तारेचें उत्तर नाहीं, कांहीं नाहीं. ती तार त्यांना पोंचली कीं नाहीं याचीच शंका राहिली.

अशा कांहीं चमत्कारिक मनाच्या स्थितींत पद्मेचे दिवस चालले होते. 'तुला या घरांत सुख लागायचं नाहीं. तूं चार दिवस माझ्या घरीं चल' असा मालतीनें तिला आग्रह केला. परंतु आईला सोडून आतां आपल्याला क्षणभरही दुसरीकडे राहतां यावयाचें नाहीं आणि राहतां येणें शक्य असलें, तरी तसें करावयाचें नाहीं असें तिनें निक्षून आपल्या मैत्रिणीला सांगितलें. तेव्हां मालती आपण दिवसाचा बहुतेक सगळा भाग आणि केव्हां रात्रही तेथेंच काढी. बहुतेकांची अशी समजूत

असे कीं, पद्मेचे वडील वारले, तेव्हां तिचे भाऊ ती ' सुवार्ता ' कानीं पडतांच तांतडीनें धांवत येऊन घरांत धुमाकूळ घालूं लागतील. परंतु आश्चर्य हें कीं तसें कांहींच न होतां, ते आहेत कोठें याचा पत्ताच लागेना. वुइल वगैरे काढून त्यांत काय आहे, काय नाहीं हें पहाण्याचें काम विनाकारण दिरंगाईवर टाकूं नये असें पुष्कळांनीं पद्मेला सुचविलें. परंतु आपले भाऊ आल्याखेरीज आपल्याला तसें कांहीं करणें रास्त नाहीं, असें तिनें उत्तर दिलें. मात्र तिजोरीची किल्ली दादासाहेबांनीं आपल्याजवळ ठेविली होती. तीही ती आपल्याजवळ घेईना. दादासाहेबांनीं अनेक वेळां ती तूं आपली आपल्याजवळ घेऊन ठेव. अगर आपल्या आईजवळ दे असें सांगितलें. परंतु व्यर्थ. तिनें सांगितलें कीं, "माझे भाऊ आले ह्मणजे मग त्यांच्या समक्ष आपण येऊन आपल्या हातून तिजोरी उघडून त्यांत काय आहे, काय नाहीं, तें पहा आणि मग आंत असलेलें वुईल उघडून सर्वांदेखत वाचून त्याची पुढें काय व्यवस्था करायची ती करा."

ते दोघे भाऊ कशा प्रकारचे लोक होते हें दादासाहेब जाणून होते. त्याप्रमाणें जें वुइल आपल्याला सांगून आबासाहेबांनीं केलें व ज्यावर आपली साक्ष आहे, तेंच जर तिजोरींतलें वुइल असलें, तर त्यांत काय व्यवस्था केलेली आहे हेंही त्यांस माहीत होतें. तेव्हां भाऊ येऊन त्यांना पूर्ण निराशेखेरीज कांहींही लभ्यांश व्हावयाचा नाहीं, याकरितां ते नसतांनाच चारचौघे लोक जमवून काय व्यवस्था करावयाची ती करावी. असें अनेकवार त्यांनीं पद्मेला व तिच्या आईला सांगितलें. परंतु व्यर्थ. ते दोघे आल्याखेरीज तिजोरी उघडावयाचीसुद्धां नाहीं असा आपला संकल्प तिनें कायम ठेविला.

परंतु भावांचा तर पत्ता नाहीं. पद्मेनें चार तारा केल्या असतील, त्या तारा परत आल्या. पत्रें पाठविलीं त्यांचाही कांहीं उपयोग झाला नाहीं, तींही परत आलीं. तेव्हां तिला ही एक नवीनच काळजी उत्पन्न झाली कीं, आपल्या भावांचें झालें काय? मुंबईस जाऊन कोणीं तरी चौकशी करून यावें, तर हिच्या घरांत जावयाला कोण आहे? हिचा सगळा आधार काय तो वसंतरावावर. परंतु त्याला आपण किती बाबतींत, किती प्रकारानें त्रास द्यावा असा विचार मनांत येऊन ती त्यास कांहीं एक बोलली नाहीं. तरी वसंतरावानें तिचा हेतु जाणला आणि तिला आधीं न कळवितांच एक दिवस मुंबईला जाऊन त्यानें तिच्या भावांचा शोध केला. तेव्हां त्याला असें कळलें कीं, दोघेही मुंबईत नाहींत, बंगलोरास गेले व तेथून मद्रासेकडून कलकत्त्याकडे जाणार होते. बंगलोर, मद्रास किंवा कलकत्ता कोणच्याच ठिकाणचा पत्ता कांहीं कोणास माहीत नाहीं. ते कोणाबरोबर गेले आहेत हें सुद्धां कोणास माहिती नाहीं. मात्र ज्यांच्याबरोबर ते नेहमीं असत, ते दोघेही मुंबईत नाहींत एवढें कळलें.

आपण एक शब्दही न बोलतां, केवळ आपली इच्छा जाणून वसंतरावानें इतकी तसदी घेतली त्याबद्दल पद्मेस फार आनंद झाला आणि कृतज्ञता वाटली व ती आपल्या आईला ह्मणाली कीं, " वसंतराव ह्मणजे माझा तिसरा भाऊच आहे. कोणाला एवढी पर्वा असते? पण त्यानं मुंबईस जाऊन.........."

त्याबरोबर तिची आई एकदम ह्मणते:

" भाऊ कसलान् काय कसलं ? आतां उद्यां क्रिया करायला त्याचा कांहीं उपयोग आहे का ? हीं पोरं मुंबईस नाहींत आणखी कुठें गेलीं आहेत याचा पत्ता नाहीं. तेव्हां आतां परवां नववा दिवस. क्रियेला सुरुवात करायला पाहिजे. नाहींतर जिवंतपणीं अट्टातट्टा वर्तन केलं, त्यानं एक स्वर्ग मुकलाच आहे ह्मणा, पण मेल्यावर क्रिया सुद्धां झाली नाहीं ह्मणजे तेंही कांहीं नाहीं. आतां चार पैसे देऊन कोणी धर्मपुत्र करून क्रिया करून घ्यायची पाळी आलीना ? वसंत त्या कामाला कांहीं उपयोगी आहे का ? सांग आतां क्रियेचं काय करणार ? "

आईचें हें भाषण ऐकून पद्मा अगदीं स्तब्ध झाली. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें करावयाच्या संस्कारावर तिच्या वडिलांची मुळींसुद्धां श्रद्धा नव्हती. अर्थात् पद्मेलाही त्यांनीं आपल्या मतांचेंच बाळकडू घातलेलें होतें. यामुळें आपल्या भावांच्या नसण्यानें हें एक मोठें लचांड झालें, हें तिच्या मनांतही आलें नाहीं. आईनें तें बोलून दाखवून त्याबद्दल अगदीं एकसारखा आक्रोश चालविला. तेव्हां तें तिच्या मनांत आलें आणि असें वाटलें कीं, बाकी कशाकरितां जरी नाहीं, तरी या एवढ्या गोष्टीसाठीं तरी दोघांपैकीं एकानें या वेळीं येऊन हजर व्हावें. परंतु नुसत्या इच्छेनें कोठें कांहीं होतें? तिची अनावर इच्छा अगदीं व्यर्थ गेली. आठव्या दिवशींची रात्र उलटून गेली, तरी त्या दोघांचा पत्ता नाहीं. तेव्हां मात्र तिच्या आईनें फारच आक्रोश चालविला.

" सोन्यासारखीं मुलं. घरांतून घालवून दिलीं. तीं आतां देशोधडीला लागलीं, आणखी ही घोडी घरांत बाळगली " असे दुःशब्द सुद्धां तिच्या आईच्या तोंडून निघाले. ते शब्द नव्हेत अत्यंत तीक्ष्ण असे खंजीरच होते. त्यांनीं तिच्या काळजाला जखमाच पाडल्या. तिला मरणप्राय दुःख झालें. परंतु काय करणार ? आईला कोणत्याही प्रकारचें दुरुत्तर किंबहुना प्रत्युत्तरही करावयाचें नाहीं असा तिचा निश्चय होता. त्याप्रमाणें तिनें ते शब्द मुकाट्यानें सहन करून घेतले. आठवे दिवशीं रात्रीं हा प्रकार झाला. आपले मुलगे येण्याचा संभव नाहीं असें दिसलें, आणि त्या बाईनें उपाध्यायास बोलावून आणून विचारलें, कीं मुलें असून हजर नसलीं, तर आपल्या स्वतःला नवऱ्याची क्रिया करण्याला अधिकार आहे कीं नाहीं ? उपाध्यायानें तत्काळ सांगितलें कीं, " कोणी ब्राह्मण आधीं तुमच्या घरचा कांहींच विधि करायला यायला तयार नाहीं आणि मी जर कांहीं करीन, तर मला त्यांनीं पूर्णपणें वाळीत टाकण्याचा धाक घातला आहे. अशा स्थितींत काय करणार ? आपण या भानगडींत पडूंच नका. कुठें एखाद्या क्षेत्रीं जाऊन जमलं तर करा. "

तें ऐकतांच पद्मेच्या आईच्या अंगाचा संताप झाला. आणि ती त्या ब्राह्मणास न भूतो न भविष्यति शिव्या देऊं लागली, आपल्या नवऱ्याला शिव्या देऊं लागली, मुलांना शिव्या देऊं लागली, आणि पद्मेलाही शिव्या देऊं लागली. व शेवटीं शिव्यांचा गडगडाट झाल्यानंतर अश्रूंचा पाऊस पडूं लागला. आपल्या नवऱ्यानें सगळ्या जन्मभर पातकी राहून मेल्यानंतर क्रियाकर्मांतरानें शुद्ध होण्याला सुद्धां अडचणी करून ठेविल्या. हा तिला फार संताप आला. पुनः तिनें त्या आपल्या उपाध्यायास विचारिलें: " कांहीं प्रायश्चित्त करून जुळलं तर पहा. तुह्मी जितका ह्मणाल तितका पैसा खर्च करून सगळीं जितकीं प्रायश्चित्तं

शास्त्रांत सांगितलीं आहेत तितकीं करूं, पण अमुक होणार नाहीं, आणखी तमुक होणार नाहीं असं मला सांगूं नका. मला आतां अमुक कर आणखी तमुक करूं नको असं सांगायला कोणी राह्यलं नाहीं. माझं सगळं स्त्रीधन जरी गेलं तरी मी खर्चायला तयार आहें. पण हें एवढं झालं आहे. पांच हजार रुपये खर्चीन, पण तुह्मी असं भलतं सलतं सांगूं नका. प्रायश्चित्तं प्रायश्चित्तं ह्मणजे काय पैसाचना ? तो मी देतें. सगळा जन्म जर पापांत गेला आहे, तर प्रायश्चित्तं करायला ह्मणून मी मागें घेईन ? तें कांहीं नाहीं. उठा. आपली सगळ्या ब्राह्मणांची सभा भरवा आणखी काय काय प्रायश्चित्तं करायचीं आह्मांला सांगा."

भटजी मनांत तर चांगलाच हरखला. चांगलेंच टावकें सांपडलें, आपलें उखळ पांढरें करण्याची संधि आली, हें त्यास स्पष्ट दिसलें परंतु तसें बाहेर न दाखवितां तो त्या भोळ्या स्त्रीस ह्मणतो, "बाई, आपण ह्मणतां ती सगळी गोष्ट खरी. पण ब्राह्मण ऐकतील असं दिसत नाहीं. आपल्याला राग येणार नाहीं, तर मी सांगतों. ते ह्मणतात, 'ज्यांनीं सगळ्या जन्मांत शास्त्राला मुळींच धुडकावून किरिस्तावासारखं वर्तन केलं, त्यांच्या प्रायश्चित्ताचा पैसा घेणं हें सुद्धां पाप आहे ! "

बाईस किती संताप, किती उद्वेग, किती खेद झाला असेल हें वर्णन करून सांगणें शक्य नाहीं !

# प्रकरण २२ वें.

## पद्मावतीच्या आईचें समाधान.



ब्राह्मण विनाकारण ओढून आणून आपल्या आईला फसवावयाला पहातो आहे असें पद्मेस स्पष्ट दिसलें. वडिलांची क्रिया करण्यासंबंधानें कांहीं तजवीज झाली नाहीं, तर आईला फार दुःख होईल. तेव्हां तिच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं घडेल असें करणें आपलें खरें कर्तव्य आहे असें तिच्या मनानें पूर्णपणें घेतलें. तिनें आपलीं मतें व आपल्या बापाचीं या बाबतींत जीं मतें होतीं तींही एका बाजूस ठेवण्याचा निश्चय केला आणि आईला अशा भयंकर दुःखप्रसंगीं कोणत्याही प्रकारानें नाराज करायाचें नाहीं असा निर्धार करून भटजींस ह्मटलें, "भटजी, उगीच अमुक होत नाहीं, तमुक होत नाहीं असं सांगून कांहीं उपयोग नाहीं. शास्त्रांत जें कांहीं सांगितलं असेल, आणखी जें काय करणं असेल, तें पैशाकडे न पाहतां आज करून टाकण्याचा आमचा निश्चय ठरला आहे. आई आज पांच हजार रुपये खर्च करायला तयार आहे. तेव्हां तुह्मी ह्मणतां तसंच जर असेल तर तुह्मांला सोडून आह्मांला दुसरा ब्राह्मण पाहायला पाहिजे. तुमच्याकडून इतर

भिक्षुकमंडळीची समजी होत नसली, तर तशी समजूत घालणारे आणखी घालून घेणारे ब्राह्मण आह्मांला पाहिले पाहिजेत. आबा जिवंत असतांना आमच्या घरीं व्रतवैकल्यं आई करी, तर त्याला ब्राह्मणांची वाण कांहीं तुह्मांला पडली नाहीं, आणखी आतां ते वारल्यावर सगळ्या अडचणी येऊं लागल्या का? बोला, तुह्मांला इतर कोणी भटजी भेटतील तर त्यांना घेऊन या. नाहीं तर तुह्मांला जमत नाहीं ह्मणून साफ सांगून जा. मग आह्मांला जें काय शक्य तें आह्मी करतों. मी तीनतीनदां तेंच तेंच बोलतें आहें, तें भिजत घोंगडं पडून कांहीं तरी थातुरमातुर करावं ह्मणून नव्हे तर आईला हें करणं आहे ह्मणून. बोला, एक सुद्धां शब्द उगीच बोलूं नका. दुसरे ब्राह्मण खात्रीनं मिळतील. आह्मी दक्षिणा चांगली देणार आहों. तुम्ही उपाध्ये, सगळं जें काय काय व्हायचं तें तुमच्या हातून व्हावं, त्यांत विशेष आहे. आजपर्यंत मी तुमच्याशीं इतकं कधीं बोललें नाहीं, परंतु आज आतां प्रसंगच आला तेव्हां स्पष्टपणानं बोलतें आहे."

पद्मेनें ह्मटल्याप्रमाणेंच खरोखरी गोष्ट होती. तिनें आजपर्यंत या भिक्षुकांशीं इतकें भाषण कधींच केलें नव्हतें, आणि आज एकदम बोलली तें तुकडा तोडल्याप्रमाणेंच बोलूं लागली. तेव्हां तो भिक्षुक अगदीं चकित झाला. तिची आईही चकित झाली. परंतु पद्मा या वेळीं तिला इष्ट असेंच बोलत असल्याकारणानें आईला त्या बोलण्याचें कौतुकच वाटलें व ती आपणही भटजीस ह्मणाली:-

"खरंच भटजी, तुह्मांला पद्मा सांगते त्यांत अक्षरसुद्धां खोटं नाहीं. तुह्मांला जमत नसलं तर तसं सांगा. आमच्या त्या पुराणीकबोवांना बोलावून आणतें, आणखी पुढचं काय करायचं तें त्यांना सांगून टाकतें. ते सगळं चोख करतील. ते मला कालच विचारीत होते कीं...... "

"छे. छे. तसं कांहीं नाहीं बाईसाहेब," उपाध्येबोआ एकदम मध्येंच ह्मणतात:- "तसं अगदींसुद्धां कांहीं नाहीं. आपलं कांहीं ब्राह्मणांचं ह्मणणं काय पडेल तें सांगितलं. बाकी आपण सर्व प्रायश्चित्त करायला तयार असतांना आणखी आपल्याला पुनीत करायला काय हरकत आहे? कांहीं ब्राह्मण गांवांत असे कुटाळ आहेत, ते काय करतील, आणखी इतर ब्राह्मणांना कसं चिथावितील, तें आपलं आपल्या कानावर घालून ठेवलेलं असावं म्हणून मी तें बोललों. आपण पांच हजार ह्मणतां, पण वेळीं चार हजारांच्या आंतही आटपेल, वेळीं एखादा हजार जास्त लागेल. आपला आजपर्यंतचा नांवलौकिक मनांत आणला पाहिजे. आपल्या घरीं जरी कांहीं कोणाचं वर्तन असलं, तरी आपली एकंदर फार निराळी वृत्ति. आपला दानधर्म काय! आपली पुण्याई केवढी दांडगी, हें काय लोकांना माहीत नाहीं! आपण सर्व अगदीं यथासांग विधि करणार असं मी जाऊन आमच्या मंडळींत सांगण्याचा अवकाश, कीं सर्व मंडळी तयार होतील. मी मघाशीं ह्मटलं तें केवळ कांहीं कुटाळ—आमच्यांतले कांहीं कुटाळ—काय म्हणतील, आणखी काय प्रसंग करून बसतील तें सांगितलं. आणखी असा प्रसंग प्रत्यक्ष झाल्यावर मग आपण मला असं कांहीं होणार होतं तर तुम्हीं मला आधीं कां नाहीं सांगितलंत म्हणून म्हणूं नये, ह्मणून आपलं सगळं स्पष्टपणानं बोलून टाकलं. पुढें मागें माझ्या गरीबाकडे बोल नसावा. पद्माताई,

आपण थोड्या रागावलां पण मला जें सांगावेंसं वाटलं तें सांगून टाकलं, यांत वावगं काय झालं ? "

भटजींचें तें लांबलचक भाषण ऐकून पद्मावती मनांतल्या मनांत हंसली. परंतु बाहेर कांहींएक न दाखवितां त्या भटजीस ह्मणालीः " भटजी, मी रागावूं कशाला ? पण तुह्मांला आपलं काय खरं होतं तें सांगितलं. अहो, जे ब्राह्मण नाहीं यायचे ते नाहीं यायचे. पण दहा पांच तरी भेटतीलना ? पुष्कळ झाले. काय जी योग्य क्रिया करायची असेल, त्याच्याबद्दल काय शास्त्रार्थ काढायचा असेल, तो काढा. पण सगळं जें जें ह्मणून आईला करावसं वाटेल तें करा. "

" इतकी आपण " भटजी एकदम मध्येंच ह्मणाले, " इतकी आपण मला परवानगी दिल्यावर आणखी काय पाहिजे. सगळे भिक्षुक आपोआप आपल्याकडे येऊन आपल्याला आशीर्वाद देतील. आधींच आपल्याला त्रास झाला आहे आणि त्यांत आमच्यासारख्या कांहीं दुराग्रही लोकांनीं आपल्याला दूर ठेविलं तर आह्मांला फायदा काय ? उलटी नामुष्कीच ना ! पण आपण आतां सर्व प्रकारचीं प्रायश्चित्तं करायला जर तयार आहां तर आतां त्यांना विचारणार आहे कोण ? ते आपल्या ठिकाणीं करूं द्या, आह्मी त्यांची हड्डी नरम करूं. अहो, यजमानांचा जोर असला, तर आमचं तरी कांहीं चालणार. तसा नसला, तर मग......... "

" तसा नाहीं कां ह्मणतां पण ? मीं तुह्मांला सांगितलंना आतां, कीं खर्चाला मी मुळींच डगमगत नाहीं ह्मणून. पण सगळं नीटनेटकं करा. या पोरट्यांना काय ह्मणावं आतां ? एक जरी येता तरी फार चांगलं झालं असतं, पण कोणीकडे गेले दोघेही भटक्या मारायला या वेळीं कोण जाणे ! पण, आपले ते चुलत चुलत भावजी नाहींत का ? ते नुकतेच परवां इथें आले होते नाहीं का ? त्यांना तरी निरोप पाठवून बोलावून आण बरं. ह्मणजे त्यांना विचारून पाहूं. कोणी तरी धर्मपुत्र करून क्रिया करायची आहे. त्या धर्मपुत्राला कांहीं तरी द्यायला पडणारच, तें यांनाच पोंचवूं. त्याला काय हरकत आहे ? धाड त्यांना कोणाला तरी बोलावूं. ते तरी आमच्या वंशांतलेच आहेत, त्यांनीं क्रिया केली म्हणून काय झालं ! अगबाई, स्वतःचे पोरगे असून ते अशा वेळीं नसायचे हें तरी पापच नाहीं तर काय ? पाप पाप तें काय, आणखी त्याचीं फळं तीं काय ? हीं अशींच व्हायचीं. या हाताचीं फळं त्या हातावर. तूंच पहा, पांच सात वर्षांच्या पूर्वीं आमचं अगदीं सगळं ठीक होतं ना ? त्याचं पांच सात वर्षांत काय झालं पहा. पोरांशीं पटेनासं होऊन पोरं चालतीं झालीं. तुला धरून बसले तर तुझ्या नवऱ्याचं पटेनासं झालं. तुला नवऱ्यानं टाकली. मरण या प्रकारानं आलं आणखी पापाचीं फळं तीं काय असायचीं ? हीं अशींच. मी पहिल्या पहिल्यानं रोज कानीं कपाळीं आरडायची कीं नकाहो अशीं अनान्वित पापं करूं. असा पाखंडीपणा करूं नका. यानं कधीं कल्याण व्हायचं नाहीं. पण छे, मला अगदीं दूर सारून वाटेल तसं वागायचं. आपल्याप्रमाणें वागायसाठीं माझा छळ करायचा. पण मी अगदीं खंबीरच भेटलें, तेव्हां त्यांनीं माझं नांव सोडलं आणखी तूं थोडी मोठी झालीस, तसं तुला आपल्याबरोबर नाचवायला लावलं. त्या पापांचीं, त्या नाचरेपणाचीं

हीं सगळीं फळं आहेत. दुसरं कांहीं सुद्धां नाहीं. इतका पैसा असून त्याचा उपभोग तरी कोण घेणार आहे ? तूं एकटी का घेणार आहेस ? तुझा नवरासुद्धां तुला बाळगीनासा झाला, त्यानं तुला टाकली, भाऊ देशोधडीला लागले, मी उद्यां हीं क्रियाकर्मांतरं झालीं कीं काशीला निघून जाणार. मग बस हा पैसान् हें काय आहे तें सगळं पोटाशीं कवटाळून. " आपल्यास बोलते आहे ही आपली आईच काय ? ही आपणास अशी कां बोलते ? एकाएकीं दुःखाचा डोंगर कोसळला यामुळें हिची चित्तवृत्ति चमत्कारिक होऊन तर ही आपल्याला असें बोलूं लागली नाहींना ? नाहीं तर सध्यांच्या या दुःखाच्या प्रसंगीं एकमेकींना एकमेकींनीं धीर देण्याचें सोडून हें बोलणें तरी काय ? आपण तिच्या मनाप्रमाणें सर्व कांहीं करावयाचें ह्मणून धडपड करतों, आणखी ही आपल्याला असें ह्मणते हें आहे तरी काय ? हिला आपल्याइतकें दुःख झालें नाहीं असें ह्मणावें काय ? आबा वारल्याबद्दल तिच्या मनास कांहींच न वाटतां त्यांचीं और्ध्वदेहिक क्रियाकर्मांतरें नीट होण्याला अडचणी येताहेत हेंच फार वाईट वाटलें. सगळा शोक, खेद, उद्वेग त्यांच्याकरितां. हें पाहून पद्मेस आश्चर्य वाटलें. वडिलांनीं तिच्या देखत व केव्हां केव्हां तिला प्रत्यक्ष उद्देशून बोलूनही हिंदुधर्माच्या चालीरीतींची, किंबहुना धर्मसमजुतींची अत्यंत अनादरानें हेटाळणी करावी. सगळ्यांत और्ध्वदेहिक क्रियाकर्मांतरांसंबंधानें तर त्यांची अत्यंत अश्रद्धा. मढ्याच्या नाकाडोळ्यांवर कणकीचे गोळे ठेवून आणि मडकेंभर पाणी घेऊन मढ्याला प्रदक्षिणा घालून तूं स्वर्गाला जो ह्मणून कोठें कोणी स्वर्गाला जाईल का ? असल बोलून त्यांनीं हंसावें, चेष्टा करावी. बायकोच्या बाळकृष्णाची चेष्टा करून केव्हां केव्हां तो उचलून फेंकून देऊन तिला संताप आणावयाचा असा तिच्या वडिलांचा वर्तनक्रम असल्याकारणानें तिच्या मनावर फार निराळ्या प्रकारचा परिणाम झाला होता. परंतु तिचें तिच्या वडिलांच्या ठिकाणीं अतोनात प्रेम असे त्या प्रेमामुळें त्यांचा मृत्यु ह्मणजे आपल्या सर्वस्वाचा नाश असें तिला वाटे. आईला आपल्यापेक्षां अत्यंत दुःख व्हावयाला पाहिजे असें असून तिला मृत्यूबद्दल कांहींच दुःख होत नाहीं. भलत्याच गोष्टींबद्दल—ज्या गोष्टींवर आपल्या वडिलांचा भरंवसा मुळींच नव्हता त्यांबद्दल—वाईट वाटतें आहे याचें तिला आश्चर्य वाटलें. आपली आई आपल्या वडिलांच्या मृत्यूबद्दल शोक करीत बसावयाची तें एकीकडेच राहून, ते असेच कां वागले, असेंच कां बोलत, तसेच कां मेले, हीं त्यांच्यां त्यांच्या कर्मांचींच फळें, असें बडबडते आहे. एखाद्या लग्नासारख्या मंगलकार्यांत हौसेनें जसें काय करावयाचें, काय नाहीं याबद्दल वाटाघाट करावी तशी करते आहे याचें तिला आश्चर्य वाटलें.

परंतु ती आईला कांहीं बोलली नाहीं. जें काय करावयाचें असेल तें तिनें खुशाल करावें. खर्चाच्या बाबतींत आपण तिला बोलावयाचें नाहीं, अमुक गोष्ट कशाला हें ह्मणावयाचें नाहीं. आणि आपल्याला ती लावून टाकून बोलली, तरी त्याहीबद्दल कांहीं बोलावयाचें नाहीं असा आपला निश्चय तिनें कायम ठेविला. उपाध्येबोवा आणि पुराणीकबोवा तिला " आपला नांव लौकिक आणि केल्या पापांबद्दल प्रायश्चित्त " या दोन सबबींवर फसवून वाटेल तसा

पैसा खर्च करण्यास लावणार हें तिला स्पष्टपणें दिसत होतें. परंतु आपण त्यांत कांहीं बोललों तर रिकामा वाईटपणा येणार हें जाणून ती स्वस्थ बसली. दादासाहेब व त्यांच्या पत्नी यांनीं येऊन तिच्या आईस बोलावें, परंतु त्यांनासुद्धां तसें करण्यापासून आपल्याला नांवें ठेवून घेण्यापलीकडे कांहीं उपयोग होणार नाहीं हें ठाऊक असल्यामुळें, त्यांनीं तसें कांहीं मनांत आणलें नाहीं. बाईला बोलण्याची कोणाचीच छाती होईना. अगदींच तिऱ्हाईत मंडळी होती त्यांना तो और्ध्वदेहिकाप्रीत्यर्थ चाललेला दानधर्म पाहून कुचेष्टा करण्यास मात्र कारण मिळालें. "आबासाहेबांनीं जिवंतपणीं एकही ब्राह्मण जेवूं घातला नाहीं, पण आतां मेल्यावर त्यांच्या नांवानं शेकडों ब्राह्मण ढेंकरा देताहेत, धोतरं नेसताहेत, तांब्ये नेताहेत, पळ्यापंचपात्र्या खडखडावताहेत, जोडे, छत्र्या, गाद्यागिर्द्या पटकावताहेत. या समाजिष्टांची पण खूपच झाली!" असें ह्मणून आपापल्या ठिकाणीं खूष होऊन एकमेकांच्या हातांवर टाळ्या देत ही मंडळी निंदाष्टक चालवावयाची!

"तुमच्या हातून होत नसलं, तर मी आमच्या पुराणीकबोवांना बोलावून आणून त्यांच्याकडून सगळं करवितें" असा धाक बाईनीं उपाध्येबोवांस घातला असतां उपाध्येबोवा घाबरून जाऊन त्यांनीं सर्व कांहीं नीटपणें पार पाडण्याचें आश्वासन दिलें होतें. परंतु उपाध्येबोवांस तेव्हांच असें वाटलें कीं, आपण या पुराणीकबोवांस आपल्या जथ्यांत घेतलें नाहीं तर ही अशी विलक्षण शिकार केव्हां आपल्या हातांतून निसटून जाईल याचा नेम नाहीं. ह्मणून त्यांनीं बाईच्या घरून निघतांच पुराणीकबोवांचा तपास लावून त्यांच्याशीं भागीदारी ठरविली. बाईचा विश्वास उपाध्येबोवांपेक्षां पुराणीकबोवांवर फार. कारण त्यांनीं त्यांचा गुरूपदेश घेतलेला होता. उपाध्येबोवांनीं सामानाची, दक्षिणेची वगैरे यादी केली कीं, बाईनीं ती आधीं आपल्या पुराणीकबोवांना दाखवावयाची, त्यांनीं त्याला आपली पसंती दिली कीं मग तें एस्टिमेट पास झालेंच. पुराणिकबोवांनीं उपाध्येबोवांच्याकडून एखाद्या बाबींत 'इतकें कशालाहो' ह्मणून कांहीं कमी करण्याचा आव घालावयाचा, उपाध्येबोवांनीं "बाईच्या नांवालौकिकाकरितां ह्मणून मीं ती तितकी रक्कम घातला. नको असल्यास कमी करा." असें ह्मणावें. पुनः पुराणीकबोवांनीं त्यावर "अहो नांवालौकिकाप्रमाणें ह्मणाल, तर तुह्मीं घातलेली रक्कमही अगदीं अपुरी आहे. पण नुसता नांवलौकिक घेऊन काय करतां? कांहीं आपला पैशाचा अंदाज पाहिला पाहिजे कीं नाहीं." असें ह्मणावें, आणि बाईनीं "तसं कांहीं नाहींहो. पैशाचा अंदाज कांहीं पाहूं नका. सगळं ठीकठाक आणखी नांवालौकिकाप्रमाणें झालं पाहिजे. किती अधिक पाहिजे असेल, तितकं घाला. अगदींसुद्धां अनमान करूं नका." असें ह्मणावें. आणि शंभराच्या जागीं दीडशें दोनशें व्हावे असा एकंदर प्रकार सुरू झाला. आणि चार दिवसांत न भूतो न भविष्यति असा खर्च—ज्या गोष्टींवर आबासाहेबांची अणुमात्र श्रद्धा नाहीं, त्या क्रियाकर्मांतरावर त्यांच्या आत्म्यासाठीं खर्च—झाला. ज्या क्रियाकर्मांतराप्रीत्यर्थ त्यांनीं आपल्या मातुःश्रींच्या मृत्युसमयीं पंचवीस रुपयेसुद्धां खर्च केले नाहींत, त्याच क्रियाकर्मांतराप्रीत्यर्थ त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नीनें कोणातरी दूरच्या नातलगास उभें करून

जवळ जवळ चार पांच हजार रुपये खर्च केला! इतका खर्च करूं नये असें कोणीं बोलण्याची छाती नव्हती आणि कोणास बोलण्याचा अधिकारही नव्हता. भिक्षुकांच्या मतें आबासाहेबांनीं केलेलीं सर्व पापें त्या खर्चाच्या ओघानें अगदीं पार धुवून गेलीं व त्या ओघाच्या सामर्थ्यानेंच आबासाहेब नरकांत न जातां–किंबहुना यमदूत त्यांस नरकाचे बाजूस नेत असतां त्यांस तिकडे जाण्याची शक्ति न राहतां–स्वर्गाकडे लोटत अगदीं इंद्राच्या सिंहासनाशेजारीं जाऊन बसले व आपल्या पत्नीची आतां मार्ग-प्रतीक्षा करीत आहेत असा त्या बाईच्या पुराणीकबोवांनीं–अर्थात् बाईच्या गुरूंनीं-व उपाध्येबोवांनीं समज करून दिला आणि तिला अत्यंत संतोष झाला. आजन्मांत आपल्या नवऱ्यानें जिवंतपणीं जो संतोष दिला नाहीं, तो त्याच्या पश्चात् आपण योग्य तीं धर्मकार्यें करून मिळविला या-बद्दल तिला मोठा अभिमान वाटूं लागला. शेजारणीपाजारणी व तिच्याबरोबर कथा-पुराणाला बसणाऱ्या बायांनीं तिच्या समा-चाराला आल्यावर तिचा फार गौरव केला, तिचा धन्यवाद गाइला. तेव्हां तर तिला मूठभर मांस आल्याप्रमाणें झालें. तिला गहिंवर आला तो त्या धन्यवादानें आला! एक शेजारीण तर तिला ह्मणाली: "बाई. तुह्माला घरांत इतका भ्रष्टपणाचा जाच, असून तुह्मी आपलं तें विसरलां नाहीं, तुळशीची पूजा सोडली नाहीं, कथापुराणं सोडलीं नाहींत, त्या बाडग्या प्रार्थनासमा-जांत का कुठें तुमचे यजमान जात असत तिथें गेलां नाहीं ह्मणून हीं तुह्मांला चां-गलीं फळं मिळाला. दुसरी एखादी बाई असती तर नवऱ्याच्या त्या त्रासाला कंटा-ळून केव्हांच त्याच्या ह्मणण्याप्रमाणें करा-यला लागून वेडंवांकडं वागायला लागली असती, खोंयलीं प्यायला लागली असती. तुमच्या घरांत तुमच्या लेकीचं तसं उदा-हरण झालंच ना ? " कोणी बाईनें असें ह्मटलें कीं, बाईस अतोनात समाधान वाटे व ती " आतां मी आपली काशीयात्रेला जाणार ती पुनः परत ह्मणून येणार नाहीं. आलं यांच्या धर्माला कांहीं, आणखी ठेवलं मला कांहीं, तर पाठवितील तिथें, नाहीं तर भिक्षा तर कांहीं कुठें गेली नाहीं। माझ्याजवळ जें कांहीं होतं, तें कुणाला न विचारतां न संवरतां मीं आपलं त्यांच्या उत्तरक्रियेला लाविलं. माझी उत्तरक्रिया कांहीं त्यांनीं अशी केली नसती. अहो त्यांचं डोकंच बिघडलेलं. आपल्याच माण-साबद्दल असं आपण ह्मणणं चांगलं नाहीं. पण खरं आहे तें बोलल्याखेरीज कसं राह-वतं ? आपली आई वारली, तर पंचवीस रुपयेसुद्धां दानधर्म तिच्या हातून किंवा तिच्या मागून केला नाहीं. आणखी ह्मणत काय ? मा दहा हजार रुपये कुठें, त्या परीक्षा घेतानना मुंबईस, तिथें ठेवणार आहे. आणखी आपल्या आईच्या नांवानं, मुलींना शिकण्यासाठीं दरमहीं देणार आहे. आणखी मी आधीं मेलें असतें तर माझ्या-ही नांवानं आणखी दहा हजार ठेवणार होते. मुली परीक्षा देऊन आमच्यासारख्या ह्मातान्यांना स्वर्गाला पोंचविणार आहेत ! काय बाई यांच्या मनानं घेतलं होतं; स-गळा गोलंकार व्हायचा या कलियुगांत असं आमचे पुराणिकबोवा रोज सांगतात तें कांहीं खोटं नाहीं. "

बाईच्या एकंदर बोलण्याचा ओघ या-प्रमाणें चालावयाचा. त्यांचें त्यांच्या पती-वर प्रेम नव्हतें असें नाहीं. त्यांच्या ठि-काणीं निष्ठा नव्हती असें नाहीं. परंतु

तिच्या मनाची पूर्ण समजूत अशी कीं, त्यांनीं जुना धर्मकर्माचा मार्ग सोडल्यामुळ इहलोकीं आपल्या स्वतःस व आपल्या आप्तेष्टांस दुःखाचें साधन आणि परलोकीं नरकाचें साधन करून ठेविलें. त्यांच्या आधीं आपण वारलों असतों तर आपण मात्र स्वर्गांत गेलों असतों. परंतु त्यांची फार दुर्दशा झाली असती. त्यांच्या पश्चात् आपण राहिल्यानें त्यांच्या साऱ्या भ्रष्टाकाराचें क्षालन करून आपण त्यांस स्वर्गमार्गाला लाविलें आणि आतां आपलें उरलेलें आयुष्य असेंच आपण व्रतवैकल्यें करण्यांत, यात्रा करण्यांत, उपासतापास करण्यांत, कथापुराणें ऐकण्यांत आणि गुरुमंत्र घेतला आहे त्याचा जप करण्यांत घालविलें तर आपण त्यांच्या संगतीस स्वर्गलोकीं जाऊं. तिनें आपल्या मुलीला एकसारखा असाच उपदेश करण्यास प्रारंभ केला. तुला तुझ्या नवऱ्यानें टाकल्याप्रमाणें झालें आहे, तर तूं आतां माझ्याबरोबर एकसारखी राहून माझ्यासारखीच कालक्रमणा करीत जा. दुसऱ्या तिसऱ्या गोष्टी पार विसरून जा. यांत खरें पुण्य आहे. पुराणिकबोवांकडून गुरुमंत्र घेण्याबद्दल तर तिनें पद्मेला इतका आग्रह चालविला कीं, तिला तेथें रहाणेंसुद्धां आतां नकोसें झालें

# प्रकरण २३ वें.

## कृष्णाजीपंतदादा.



**ब**रेच दिवस झाले पण कृष्णाजीपंतदादांस वाचक विसरले नसतीलच. त्यांचे घरीं दुखवट्यास जाण्याचा प्रसंग त्यांच्या मित्रमंडळीवर आलाच. भगवंतरावांच्या औषधानीं गुण येईना, तेव्हां दुसऱ्या एक दोन डॉक्टरांचीं औषधें व तपासण्या झाल्या. एक वेळां सिव्हिल सर्जनही झाला. गोरा डॉक्टर घरीं आणावयाचा कीं नाहीं याबद्दल पुष्कळ भवति न भवति झाली. परंतु आपणाकडून होणारे सर्व उपाय करून पहावयाचे असा निश्चय कृष्णाजीपंतदादांनीं केला असल्यामुळें शेवटीं सिव्हिल सर्जनास आणण्याचें ठरून एका डॉक्टराच्यामार्फत त्यास आणलें. त्यानें सूक्ष्म तपासणी करून असें सांगितलें कीं, ही मुलगी आतां या दुखण्यांतून बरी होणें अगदीं कठिण, किंबहुना अशक्य. यदाकदाचित् जगण्याच्या पंथाला लागली तरी तिचे पाय अजीबाद गेले आहेत ते मुळींच सांवरावयाचे नाहींत. ती जगावी एवढ्याकरितां उपाय चालले आहेत हे ठीक आहेत.

कृष्णाजीपंतास तें ऐकून वाईट वाटलें. दिगंबरपंत यांचे जीवश्चकण्ठश्च स्नेही त्या वेळीं तेथें होतेच, त्यांनीही तें ऐकून फार दुःख झाल्याचा चेहरा केला. सिव्हिल सर्जन गेल्यावर तर त्यांच्या त्या दुःखास एकदम वाचा फुटली व ते कृष्णाजीपंतदादास ह्मणतातः "अहो, या गोऱ्या डॉक्टरांना कांहीं वैद्यकीचं ज्ञान असतं का?

तुम्हीं त्याला आपल्या घरांत आणलं याचंच मला आश्चर्य वाटलं. आपलं वैद्यक चांगलं. आपलीं औषधं चांगलीं अशा थापा पहिल्यानं मारीत होतां. पुढें त्या सुधारक डॉक्टराचं–तो हो भगवंतराव–त्याचं औषध सुरू केलंत त्याचा कांहीं उपयोग नाहीं असं पाहिलं तरी तुमचं मन कांहीं देशी वैद्याकडे किंवा देशी औषधांकडे गेलं नाहीं. आतां तर काय सिव्हिल् सर्जन आणला! तुमच्या एकंदर ब्रीदाला हें शोभतं का? तुमचा नांवलौकिक काय, तुमचा देशाभिमान अगदीं दुनियेभर गाजलेला आहे तो असाच का!"

कृष्णाजीपंतदादांनीं त्यास कांहीं उत्तर दिलें नाहीं. दिगंबरपंत अतिशय फटकळ असे त्यामुळें तो कृष्णाजीपंतदादांची अशी पूजा करीत असे. पण कृष्णाजीपंतदादा अशा बोलण्यास हंसण्यापलीकडे उत्तर देत नसत. फार झालें तर 'आमचा दिगंबरपंत मोठा वाघ आहे बोवा. मोठा फटकळ. त्याच्यापुढें आपल्याला बोलणं शक्यच नाहीं, तो कुणाची मुर्वत ठेवायचा नाहीं,' असें बोलून दिगंबरपंताच्या पाठीवर थाप मारावयाचे.

दिगंबरपंत तेवढ्यानें फार खुष. त्यांचा सगळा आनंद काय तो, ते मोठे स्पष्ट, ते मोठे फटकळ, ते मोठे कडक, ते कोणाच्या बापाची मुरवत धरावयाचे नाहींत असें ह्मणून घेण्यांतच. बेमुरवतपणा हा आपला मोठा गुण असें दाखविण्याकरितां ते एक आपल्या स्वतःच्या बापाचीही मुरवत न बाळगल्याबद्दल गोष्ट सांगत; असा त्यांचा स्वभाव होता. अर्थातच त्यांनीं हलकटपणानें एखादा फटकळपणा केला कीं बाकीच्यांनीं "काय बोवा तुमची कमाल आहे" असें ह्मणावें आणि स्वस्थ बसावें. असा प्रकार होत असे.

तसाच प्रकार त्या दिवशीं झाला. सिव्हिल् सर्जन आणून त्यास आपल्या कुटुंबाची प्रकृति दाखविल्याबद्दल दिगंबरपंतांनीं आपल्या श्रीमंत मित्रावर ताशेरा झाडला तेव्हां कृष्णाजीपंतांनीं आपल्या बाजूनें तें सर्व हंशेऱ्यानें मारून नेलें.

सिव्हिल सर्जनानें "आपल्या कुटुंबाचा जीव वांचला तरी पाय गेलेच" असें सांगितलें, तेवढेंच दिगंबरपंतांनीं उचललें आणि कोणी मंडळी नाहींत असें पाहून कृष्णाजीपंतदादांस ह्मटलें: "तुह्मी ह्मणत होतां तसंच झालं. मग आतां उगीच दिवसगतीवर तरी कां ढकलतां? ही बायको जगली, तरी उपयोग नाहीं. म्हणून आतांच काय तें करावं. हा ज्येष्ठाचा महिना उगीच जाऊं देऊं नये. पुनः चार आठमहिने तुह्मांला पोरक्यासारखं पडावं लागेल. आणखी श्रीमंतांनीं दोन दोन तीन तीन बायका एका वेळीं करायला शास्त्राचा किंवा रूढीचा कोणत्याच प्रकारचा प्रतिबंध नाहीं. काय हंसतील ते डॉक्टर भगवंतरावासारखे चार सुधारक हंसतील, पण त्यांच्याकडे तुम्हीं आजपर्यंत लक्ष्य दिलं नाहीं, तर पुढें तरी काय ह्मणून द्याल!"

"अरे पण दिगंबरपंत," कृष्णाजीपंतदादा त्यास अत्यंत कोमल आवाज काढून ह्मणाले: "हिचं काय बरं वाईट होतं आहे तें तर होऊं दे. अगदींच......"

"अहो कृष्णाजीपंतदादा!" त्यांच्यासारखाच कोमल आवाज काढून दिगंबरपंत त्यांस उत्तर करतो, "बरं काय व्हायचं तेवढंच राहिलं आहे. वाईट काय व्हायचं तें झालंच आहे. तुमच्या मनांत सहावं लग्न करायचंच आहे. सिव्हिल सर्जननं सां-

गितल्याप्रमाणं ही जर कायमची दोनही पायांनीं पांगळी राहिली तर मेली काय न् जगली काय सारखीच. तिच्याकरितां तुह्मी आपले कां हाल करून घेतां ? आहेत तुमचे वांईकर वैद्य, त्यांच्या मात्रा चालूं द्यात; खाईल तुकडा न् राहील. तिच्या नशिबीं संसार नाहीं धड व्हायचा त्याला तुह्मी काय करणार ? मीं आपल्याकरितां वधूसुद्धां योजून ठेवली आहे. कोंकणची आहे. पण सुसतं नक्षत्र आहे. अंगापिंडानं ठीक अन् खूप मोठी आहे. बारावं वर्ष संपन गेलं आहे. आणखी काय पाहिजे ? सांगा. "

कृष्णाजीपंतदादा थोडा वेळ कांहीं बोलले नाहीत. आपल्या कुटुंबाचे पाय गेले आहेत असें त्यांच्या वांईकर वैद्यबोवांनींही त्यांस सांगितलें होतें, परंतु ते अगदीं बरे व्हावयाचे नाहींत असें मात्र त्यांचें ह्मणणें नव्हतें. त्याचें ह्मणणें कीं, आपण एक तेल करून देतों, त्याचें मर्दन एकसारखें झालें तर पाय येतील; आणखी पोटांतलें औषध सुरू ठेवाल तर प्रकृति सुधारेल. परंतु थोड्याच वेळांत अगदीं दुःख स्वरानें ते ह्मणाले: " आमच्या वैद्यबोवांनीं आह्मांला सांगितलें तेव्हां त्याचं ह्मणणं आपल्याला खरं वाटलं नाहीं. पण आतां मला वाटतं असंच करावं. त्यांचं औषध सुरू करावं. झालं कांहीं तर झालं. आतां आणखी डाक्तरन् फाक्तर आणण्याचं कांहीं प्रयोजन नाहीं. "

दिगंबरपंत मध्येंच ह्मणाला: " मी तेंच ह्मणतों आहें. आतां आपण तो वैद्य, आणखी एक ब्राह्मणाचीन् एक कुळंब्याची अशा दोन बाया, या कुटुंबाच्या तैनातीला ठेवा, आणखी आपला दुसरा नव्हे चुकलों— सहावा संसार थाटा. "

" संसाराचं असूं देरे दिगंबरपंत, पण आतां या दुखण्यानं मीं त्रासलों. आतां त्यांत कांहीं तथा राहिली नाहीं. तेव्हां उगीच खर्च खर्च तरी काय करायचा ? "

दिगंबरपंताचें व कृष्णाजीपंतदादांचें याप्रमाणें भाषण झाल्यावर दुसरे दिवसापासून कृष्णाजीपंतदादांनीं आपल्या कुटुंबाची खरोखरीच अशी व्यवस्था करून टाकली. वांईकर वैद्यबुवा त्यांच्या आश्रितासारखेच असत. त्यांचें औषध सुरू झालें, आणि दोन बायांपैकीं एक कुळंब्याची बाई तैनातीला आली इतकेंच नव्हे तर त्या बायकोची संसारांतली जागा घेण्यासाठीं दुसरीची यथाविधि नेमणूक करण्याचा विचार मनःपूर्वक सुरू झाला. स्नेह्याच्या दुःखानें अत्यंत दुःखित झालेला दिगंबरपंत मुली पहाण्यासाठीं धांवाधांव करूं लागला. मुली पहाण्यासाठीं घरींही येऊं लागल्या. त्या कृष्णाजीपंतदादांच्या पुढें उभ्या करण्यांत येऊं लागल्या. त्या कृष्णाजीपंतदादा पाहून प्रत्येकीचे गुणावगुण निरखीत पसंत नापसंत काय तें सांगत, परंतु पुनः अत्यंत दुःखी असा चेहरा करून आपल्या मित्रास ह्मणत: " अरे दिगंबरपंत, तूं हें मांडलं आहेस तरी काय ? एक झाली, दोन झाल्या, पांच बायका झाल्या, तरी आपली सहावी करायचा तूं मला आग्रह करतो आहेस ! आतां तुला काय ह्मणावं ? या बायकोची अजून आशा आहे मला. तिच्या पत्रिकेंत तिला दोन मुलं होणार ह्मणून स्पष्ट सांगितलं आहे. आणखी त्या आशेवर मीं हें लग्न केलं. आणखी आतां तें कुटुंब असून सहावं करूं ? छे बोआ आपलं तर कांहीं मन घेत नाहीं. तूं उद्यांपासून मुलगी आणूं नकोस कोणाचीही मला दाखवायला, आणखी मी कांहीं पहाणार नाहीं. बाकी तूं ती बारा वर्षांची बगडेपंताची मुलगी ह्मणालास ती बरी आहे सगळ्या पाहिल्या

त्यांत. पण बरी असो कीं बुरी असो, आपण आतां पुनः संसारांत पडण्याची इच्छा करीत नाहीं, ''

" अहो पण तुम्हांला नव्यानं पडा ह्मणून ह्मणत आहे कोण. तुह्मी आहांतच संसारांत. तो संसार नीट चालण्यासाठीं ह्मणून दुसरं कुटुंब करा ह्मणतों, दुसरं काय? तुह्मी आपल्या गांवच्या वसुलाकरितां कारकून ठेवतां की नाहीं? घरांतील काम करण्यासाठीं नोकर ठेवतां कीं नाहीं? एक लंगडा लुळा झाला तर त्याला दूर करून दुसरा नेमतां कीं नाहीं? त्यांतला हा प्रकार आहे. तुह्मी आपले मुली पहा. एकादी चांगली आढळली तर ज्येष्ठ महिन्यांतच ठोकून टाका. तुह्मांला सहाव्यानं सावधान करून घ्यावं लागणारच. तें कांहीं चुकत नाहीं. मग दोन दिवस आधीं झालं ह्मणून काय बिघडतं आहे? तीं लेकाचीं सुधारक कुत्रीं भुंकायला लागतील ह्मणून का तुह्मांला भय वाटत आहे? तसं असलं तर वा! आपण फारच विचित्र झालां ह्मणायचे!"

तें ऐकतांच कृष्णाजीपंत दादा एकदम मोठ्यानें हंसले, आणि दिगंबरपंतास ह्मणतातः—"तुला काय आतां ह्मणावं? माझ्यासंबंधानं तुला ही का शंका आहे, शाबास! मला नाहीं वाटलं आपली कल्पना इतकी धांवेल. अरे, त्या लेकांना काय भ्यायचंय? त्यांच्या भुंकण्याची मला पर्वा असती तर छप्पन्नाव्या वर्षीं हें पांचवं तरी कसं केलं असतं? तें कांहीं नाहीं. तसं तुला वाटत असेल तर उद्यां एक मुलगी ठरवून संध्याकाळला वरात घरीं आणूं. आपल्याला ही बायको दगा देऊन जाणार याबद्दल शंकाच नाहीं. शंका एवढीच कीं, तिनं पक्का दगा दिल्यावर मग आपण पुढला......"

" अहो कृष्णाजीपंतदादा, दगा दिल्यावर ह्मणजे काय? तिनं तुह्मांला पुरता दगा दिलाच आहे. आतां दगा द्यायचा तो काय राहिला आहे? दोनही पाय जाऊन लोळागोळा होऊन पडली, आणखी दगा तो काय द्यायचा? मला वाटतं तुम्हांला वर्तमानपत्रांतल्या टीकेचं भय वाटतं आहे. नाहीं तर तुह्मी असें तेंच तें घोळीत बसलां नसतां. ''

असा बऱ्याच वेळां खल होऊन लग्नाच्या मुहूर्तांचा मोसम संपण्यापूर्वींच एखाद्या मुहूर्तावर आपल्या संसारास सहावी भागीदारीण करून घेण्याचा कृष्णाजीपंतदादांनीं निश्चय केला. त्यांनीं एक मुलगी पसंत केली, त्या मुलीच्या बापास जामात पसंत पडले. मुहूर्त ठरला. मुहूर्त धरला होता त्या दिवसाच्या पूर्वीं एकच दिवस ती बातमी फुटली आणि ती त्यांच्या आजारी कुटुंबाच्या कानीं गेली. त्याबरोबर तिच्या काळजास धक्का बसला कीं काय झालें कोणास कळे! तिच्या तैनातीस असलेल्या कुळंबिणीला ती बातमी लागून तिनें आपल्या यजमानणीस सांगण्याचा अवकाश, तिची यजमानीण बसली होती ती धाडकन् खालीं पडली व तिनें डोळे पांढरे केले. परंतु तेव्हां जीव गेला नाहीं, पुनः ती शुद्धीवर आली. नंतर तिनें आपल्या नवऱ्यास बोलावण्यास पाठविलें. ' वहिनीबाई आपणास बोलावताहेत' असा निरोप जाण्यास आणि दिगंबरपंत, कृष्णाजीपंतदादा व आणखी एक गृहस्थ दुसरे दिवसाच्या शुभकार्याकरितां नेमलेल्या बागेंत जाण्यासाठीं गाडींत बसण्याच्या तयारींत असण्यास एकच गांठ पडली.

जी कुळंबीण वहिनीबाईच्या तैनातीस होती, त्या कुळंबिणीनेंच तो निरोप आण-

ला होता. तो तिनें सांगतांच दिगंबरपंत मोठ्यानें हंसला व ह्मणालाः "त्यांना सांग कीं 'उद्यां रात्रीं आपल्या पायां पडण्यासाठीं कोणाला तरी बरोबर घेऊन दादा आपल्याला भेटतील. आतां जरा कामाला जाताहेत.'"

तें उत्तर ऐकून ती कुळंबीण थोडा वेळ थिजल्यासारखी उभी राहिली. पण ते गाडींत बसून चालले असें पाहतांच भानावर येऊन ह्मणालीः "अहो, त्यांचा जीव घाबरा झाला आहे. डोळे पांढरे झाले आहेत थोडे........"

कृष्णाजीपंतदादा तें ऐकून किंचित् चरकले. परंतु आपणच ह्मणतातः "वैद्यबोवांना जाऊन सांग जा. त्यांना ह्मणावं 'उद्यां रात्रीपर्यंत असलं कांहीं होऊं देऊं नका.' आणखी तुझ्या यजमानणीलाही सांग कीं, 'इतके दिवस लोटलेस तसा उद्यांचा सबंध दिवस लोट. मग मी येतों'."

दिगंबरपंतानें तें ऐकून त्यांच्या पाठीवर थाप मारून ह्मटलें: "शाबास. आतां मात्र खरे कृष्णाजीपंतदादा बोलले. मी ह्मटलं आतां या मोहांत पडतात का काय!"

"अरे मीं एकदां एक गोष्ट करायची ह्मटली ह्मणजे मग मोहबीह कांहीं नाहीं." असें ह्मणत गाडीवाल्यास त्यांनीं गाडी हांकण्याबद्दल इषारा केला. गाडी निघून गेली. ती मोलकरीण त्या गाडीकडे अशा दृष्टीनें पहात राहिली कीं, आंत बसलेलीं हीं माणसेंच आहेत का पशु आहेत, हेंच तिला समजत नसावें. ती आपल्याशींच कांहीं पुटपुटली आणि आपल्या यजमानणीला तिनें जाऊन सांगितलें कीं, 'उद्यां रात्रीं आपल्या सवतीला पायां पडायला आणतों, मग भेटेन,' असें ते ह्मणाले. ती कुळंबीण थोडी अचरट होती ह्मणून ह्मणा, किंवा तिच्या मनाला तीं त्यांचीं बोलणीं दुःसह झाल्यामुळें तिला काय बोलावें, काय सांगावें, हें सुचेना म्हणून ह्मणा,—पण तिनें सरळपणानें त्यांचे शब्द त्या मृत्यूच्या द्वारीं पडलेल्या स्त्रीला सांगितले. त्य शब्दांनीं तिला फार मोठा धक्का बसला; आणि थोड्याच वेळांत तिला वाताचा झटका आला. "देवा, मला सुखानं मरूं तरी चं होतंस. पण माझ्या मरणापर्यंत थांबाय इतकीसुद्धां कळ निघाली नाहीं ना ! माझी सवत माझ्या पायां पडायला आणणार. आणा. माझ्या मढ्याच्या पायां पडायला आणा. आले. आले वाटतं तिला घेऊन. नको. मला ती दिसायल नको. माझ्या आधीं चार झाल्या. पण त्या मेल्यानंतर तरी मी आलें. आणखीह ही आतां माझ्या देखत, माझ्या नाकावर पाय देऊन येणार. नको. नको. मला घोंगडीवर ठेवा हो. ती इथें यायच्या आंत मला घराच्या बाहेर काढा. जाळून टाका. माझा मागमूससुद्धां राहूं देऊं नका."

अशी तिची बडबड सुरू झाली. कोणाही ऐकणाराला त्यांत विसंगतपणा वाटला नसता. परंतु ती बडबड वाताच्या झटक्यांतच होती. वैद्यबोवांनीं नाडी वगैरे पाहण्यास हात धरला तो तिनें इतक्या जोरानें हिसकला कीं, इतका जोर एक्दम एकीं तिला कशानें आला आहे तें नाडी न पाहतांच वैद्यबोवांस ताबडतोब समजलें. त्यांनीं आपल्याकडून तो वात उतरण्यासाठीं कांहीं जालीम मात्रा काढली, परंतु ती कांहीं केल्या औषध घेईना, कोणाला जवळ येऊं देईना, आणि वर सांगितलेल्या मजकुराची कांहीं तरी बडबड एकसारखी तिनें सुरू ठेविली. मारे हातवारे करूं लागली आणि 'हें प्रकरण कांहीं ठीक नाहीं' असें

वैद्यबोवांस वाटून त्यांनीं कृष्णाजीपंतदादास ज्या बागेंत ते गेले होते त्या बागेंत निरोप पाठवून बोलावण्याचें ठरविलें. 'बोलावण्यास जा' ह्मणून एका कारकुनास त्यांनीं सांगितलें. तो कारकून गेला. त्यानें "वैद्यबोवांनीं आपल्यास बोलाविलें आहे, आपण त्वरित चला. बाईसाहेबांची प्रकृति फार बिघडली आहे" असा निरोप त्यांना सांगितला. परंतु कृष्णाजीपंतदादांनीं उलट निरोप सांगण्यास सांगितलें, तो असाः– "मी आतां येऊन काय करणार? वैद्यबोवांना ह्मणावें 'उद्यां संध्याकाळपर्यंत तुह्मी तिला मात्रानू औषधें देऊन तगवा. मध्येंच घोंटाळा होईल, असें करूं नका.' आह्मी आतां उद्यां रात्रीपर्यंत कांहीं येत नाहीं."

कारकून फार चमत्कारिक–आपण कोणा तरी क्रूर श्वापदाकडे पहातों आहोंत, किंवा राक्षसाकडे पहातों आहोंत,–अशा दृष्टीनें पहात उभा राहिला. इतर मंडळी त्याच्यासारख्याच परंतु थोड्या निराळ्या दृष्टीनें त्यांच्याकडे पहात होती. त्यांचे स्नेही दिगंबरपंत मात्र अशा दृष्टीनें पहात होते, कीं जणूं काय "वारे बहादूर!" असेंच त्यांचे डोळे त्यांस म्हणत आहेत. त्या कारकुनाच्यानें त्या जागीं उभेंसुद्धां राहवेना. शेवटीं तो तेथून जास्त कांहीं न बोलतां चालता झाला.

कृष्णाजीपंतदादा आपल्या मित्राकडे वळून ह्मणाले, "हें पहा, करूं नये तो निश्चय आपण केला. आतां तें कांहीं नाहीं. आतां शेंडी तुटो कीं पारंबी तुटो. आतां आयत्या वेळीं सुतकाचा घोंटाळा न होवो ह्मणजे झालें."

दिगंबरपंत तत्काळ त्यांस ह्मणालेः "तें कांहीं होत नाहीं. मी आतां दारांतून कोणी आंत येऊं नये, कोणी जाऊं नये, असाच बंदोबस्त करतों. मग आपल्याला कळतें आहे कशाला? कळलें तर त्याचा दोष! त्याप्रमाणेंच त्यांनीं व्यवस्था केली. मुहूर्त दुसरे दिवशीं तिसऱ्या प्रहरचा होता. त्या मुहूर्ताची वेळ होण्याच्या आधींच कृष्णाजीपंतदादांच्या पांचव्या कुटुंबानें "अहो, मला पुरतें मरूं तरी द्या. अहो मला पुरतें मरूं तरी द्या" असें ह्मणत ह्मणत प्राण सोडला. ती बातमी कृष्णाजीपंतदादांस सांगावी कीं नाहीं, याबद्दल वाड्यांत भवति न भवति झाली. परंतु कोणाची जाण्याची छाती कांहीं होईना. गांवगुंडांपैकीं कोणास कळून तो केवळ मजा ह्मणून धांवत त्या बागेकडे गेला. परंतु त्यास आंत कोणी जाऊं देईना. त्याच्या कानीं '**शुभमंगल सावधान!**' हीं अक्षरें मात्र पडलीं.

त्याबरोबर त्याला संतापाची तिरीमिरी येऊन त्यानें मोठ्यानें फाल्गुनवाद्य वाजविलें आणि ब्राह्मण 'शुभमंगल सावधान' ह्मणत असतांना त्याच्या कानीं जितक्यांदां तीं अक्षरें पडलीं तितक्यांदां त्या ब्राह्मणांच्याच सुरांत '**तुमच्या बायकोचा गेला प्राण!**' असें तो खूप मोठ्यानें ओरडला.

# प्रकरण २४ वें.

## मोरमास्तर.



दिगंबरपंत सकाळच्याच प्रहरीं उठून डेप्युटीसाहेबांच्या घरीं गेले होते. परंतु डेप्युटीसाहेब गांवीं गेले असल्यामुळें त्यांचा थोडासा हिरमोड झाला. ते कांहीं विशिष्ट हेतु धरून गेले होते. आपण आतां हें जर साधलें नाहीं, तर आपली अब्रु जाणार असें त्यांस वाटूं लागलें होतें. तेव्हां घरांतून निघतांनाच त्यांचा निश्चय झाला होता कीं, आज आपण आपलें काम फत्ते करून घ्यावयाचें, काय वाटेल तें झालें तरी हरकत नाहीं; पण आपण डेप्युटीसाहेबांकडून आपल्या इच्छेप्रमाणें करून घ्यावयाचें असा विचार करून स्वारीनें डेप्युटीसाहेबांच्या घरांत पाऊल घातलें, तों डेप्युटीसाहेब हिंडावयाला गेले आहेत, दोन दिवस येणार नाहींत असें मोरमास्तरांनीं पुढें होऊन त्यांस सांगितलें, तें ऐकतांच त्यांच्या चर्येवर निराशलेपणाची छाया दिसूं लागली. ते क्षणभर तटस्थ उभे राहिले. नंतर हळूच त्या मोरमास्तरास ह्मणतात: "काय हो, आपल्यालाकांहीं विचारावं असं मनांत आलं आहे. आपण आपली अनुज्ञा दिली तर विचारीन ह्मणतों."

"हो हो. बेलाशक विचारा." मोरमास्तर त्यांस त्वरित ह्मणाला, "जें कांहीं कुणाला आमच्या साहेबांना विचारायचं असेल तें त्यानं मला विचारावं. जें मी सांगेन तें आमचे साहेब करणार. त्याबद्दल तुह्मांला अगदीं सुद्धां शंका नको. काय आपलं काम आहे मला सांगा."

मोरमास्तरांचे ते शब्द ऐकतांच दिगंबरपंतांनीं मान हलविली व हंसतमुख करून ह्मटलें:

"अहो मास्तर, मला का हें ठाऊक का नाहीं ? मी मुळीं तुह्मांलाच माझ्याबरोबर घेऊन जाऊन कांहीं गोष्टी प्रत्यक्ष दाखवायला, आणखी कांहीं सांगायला आलों. तेव्हां तुह्मी माझ्याबरोबर चला ह्मणजे......"

"चला बिला कांहीं नाहीं बोवा. मला वहिनीबाईनीं सांगितलं आहे, कीं इथून हलायचं नाहीं. त्यांच्या सांगण्याच्या बाहेर काडीभर सुद्धां जायचं नाहीं. तुम्हांला काय सांगायचं असेल, तें तुम्ही सांगा."

"अरे सांगायला हरकत नाहीं. पण तुमच्या वहिनीबाई थोड्या कडक आहेत. रावसाहेब इथें नसतांना आह्मी इथें बसलेले दिसलों, तर काय बोलतील आणखी काय नाहीं. तेव्हां ह्मटलं..."

"कांहीं नाहीं हो. वहिनीबाई कांहीं बोलायच्या नाहींत. अन् यदाकदाचित् बोलल्याच, तर माझ्याकडे लागलं. मी त्यांना साऱ्या गोष्टी सांगेन नीट समजावून. मग नाहीं त्या कांहीं तुम्हांला बोलायच्या."

तें ऐकतांच दिगंबरपंतास थोडें आश्वासन मिळून ते मोरमास्तरास म्हणतात:

" अहो मास्तर, खरा पगडा या घरांत तुमचा आहे हें काय आह्मांला दिसत नाहीं ! तेव्हां खरं कोणतंही काम व्हायचं ह्मणजे तें आपल्याकडूनच. मग आतां सांगतोंच आपल्याला. चला रावसाहेबांच्या बैठकखान्यांत जाऊं. "

असें म्हणून दिगंबरपंत पुढें झाले आणि मोरमास्तर त्यांच्या मागोमाग चालले. बैठकखान्याचें दार ढकललेलें होतें. तें उघडण्यासाठीं म्हणून दिगंबरपंतांनींच हात पुढें केला व दार उघडलें. तों आंत वहिनीबाई पडलेल्या होत्या. त्यांची व यांची दृष्टादृष्ट झाली. दिगंबरपंत आपणास मोठा शूर समजे, परंतु या वेळीं तो अगदींच घाबरून मागें सरकला. वहिनीबाईचें पित्त कपाळाला चढलें, आणि त्या एकदम मोठ्यानें ओरडून ह्मणतात: " मोरमास्तर, तुम्हाला ठाऊक नाहीं का मी इथें पडलें आहें तीं ? बायका पडलेल्या असल्या ह्मणजे तिथें हळूच चोरासारखं येणारांना काय ह्मणतात ? तुह्मीं यांना काय ह्मणून आणलंत ? इथें बसून कांहीं कागद् का चोरून पहायचे होते ? आतां घरीं यायचं झालं कीं मी सांगून देईन हे कोणातरी धटिंगणांना घेऊन येऊन इथें बसणार होते. तुम्हांला नव्हतं का ठाऊक मी इथें पडलें आहे तीं ? "

मोरमास्तर अगदीं थंड होता. उलट आणखी हंसून म्हणाला, " अहो मीं यांना सांगितलं, कीं रावसाहेब घरीं नाहींत. एकट्या वहिनीबाई आहेत, आणखीं त्या आतां जरा दिवाणखान्यांत पडल्या असतील. पण हे मला ह्मणाले, 'वहिनीबाईनाच भेटूं. वहिनीबाई वाटेल त्याच्याशीं बोलतात तर आमच्याशीं बोलतीलच. त्यांनाच मी सांगतों, मला काय सांगायचं आहे तें.' इतकं त्यांनीं मला स्पष्ट ह्मटल्यावर मी तरी काय करणार ? बरं बोवा चला असं ह्मटलं आणखी इकडे आलों तों माझ्यापुढें ते..."

" माझ्याकडे काय ? माझ्याकडे काय काम असायचं बाई यांचं ? जा त्यांना सांगा माझ्याकडे आपलं कांहीं काम नाहीं. आणखी अशा बायका पडल्या असतील तिथें तुह्मी जात जाऊं नका, न् येत जाऊं नका. त्यांचीं कामं काय असतात तीं मला ठाऊक आहेत. "

दिगंबरपंत बिचारा चार पावलें मागेंच होऊन हें सर्व ऐकत होता व आपल्या ठिकाणीं लाल झाला. हें शेवटलें बोलणें ऐकतांच मोरमास्तर त्यास खूण करून जाण्यास सांगूं लागला; इतकेंच नव्हे, तर त्यांचा हात धरून त्यास मागें घेऊन गेला. दिगंबरपंत खालीं जातांच मोरमास्तरावर उसळून म्हणाला: " अरे, माझ्या देखत माझ्याबद्दल तूं खोटं सांगितलंस ? तुला लाज नाहीं वाटली ? दुसरा एखादा असता तर तिथल्या तिथें तुझी–" परंतु संतापानें त्यांना पुढें अगदीं एक अक्षरही बोलवेना. तेव्हां मोरमास्तर त्याला ह्मणतो: " मग त्यांत काय झालं ? मींच यांना आणलं दिवाणखान्यांत बसून गप्पागोष्टी सांगायला असं ह्मणूं का ? मला नव्हतं ठाऊक वहिनीबाई तिथें निजल्या होत्या तें. तुम्हांला इतकं वाटत होतं, तर तुम्हांला कोणीं इकडे अगदीं माझ्यापुढें येऊन दार उघडायला सांगितलं होतं ? सांगितलं होतं का कोणीं ? मी आपला पुढें झालों असतों, दार हळूच उघडलं असतं, डोकावलों असतों, आणखी काय आहे तें पहातांच मागें झालों असतों. तुह्मी पुढें

झालांत, मग मी काय करणार ? बरं त्याचं काय ? तुमचं काम काय तें तर मला सांगा. तुमचं काम मी फत्ते करून दिलं, तर मग तर हरकत नाहीं ? "

परंतु संतापानें आलेल्या लालीनें दिगंबरपंताच्या चेहऱ्यास अद्यापि सोडलें नव्हतें ते डोळे वटारून त्या मोरमास्तरकडे पहातच होते. शेवटीं म्हणतात: "तुझ्या यजमानणीला फार घमेंड दिसते आहे, आणखी तूंही जरा......"

मोरमास्तर हंसत हंसत दिगंबरपंतास ह्मणतो: "हें पहा, आमची यजमानीण कशी आहे, आणखी मी कसा आहें तें सांगण्याच्या भानगडींत नका आपण पडूं. सध्यां तुमच्या इच्छेप्रमाणें तुमचं काम व्हावं, अशी इच्छा असली, तर बोला. माझ्या लक्ष्यांत आलं आहे आपलं काय काम आहे तें. अन् तेंच जर काम असलं तर मग कांहीं तें आपल्या हातून व्हायचं नाहीं."

"मग काय करणार तूं ? मला वर नेऊन माझी नाचक्की करून, शेवटीं काम व्हायचं नाहींच ह्मणतोस ?"

"जें काम व्हायचं नाहीं असंच आहे, तें होईल ह्मणून तरी कसं सांगावं ? त्या गरीब बिचाऱ्या मथुराच्याच बाबतींतलं आपलं काम आहे ना ? कांहीं व्हायचं नाहीं. मागें एकदां तिला रजा मिळूं नये ह्मणून खटपट करतांना तुह्मी तोंडघशीं पडलां तसाच आतां मीही पडेन. तें नको. त्यापेक्षां आमच्या हातून तुमचं काम होत नाहीं असं तुह्मांला सांगितलेलं काय वाईट ? अहो तिला वशिला कुणाचा आहे तुह्मांला ठाऊक नाहीं का ? तिला रजा मिळूं नये, ह्मणून तुह्मीं थोडी का खटपट केलीत ? पण काय झाला उपयोग त्या खटपटीचा !"

"मी आतां तुझ्याशीं बोलूं इच्छितच नाहीं मुळीं. तुझ्यासारख्या तोंडचाऱ्या लोकांच्या हातून काय व्हायचं आहे ? मी आज रावसाहेबांना सुचवायला आलों होतों, कीं तुह्मी या मास्तरणीचा बंदोबस्त करा, नाहीं तर आह्मी डायरेक्टर, कलेक्टर इत्यादि मंडळीकडे निनांवी अर्ज टाकणार. आणखी त्यांत तूं यांच्या घरीं अहोरात्र पडलेला असून काय काम करतोस, आणखी तुला भराभरा प्रमोशनं होतात तीं त्यामुळें होतात हेंही टाकतों लिहून ह्मणजे तुझी भंबेरी उडेल, आणखी तुझ्या रावसाहेबांचीही टर उडेल."

"आतां मात्र आपण आपलं खरं स्वरूप दाखवायला लागलां. एकूण आपण डायरेक्टरांकडे आमचं गाऱ्हाणं नेऊन पोंचविणार का ? आणखी डायरेक्टर आम्हांला दोघांला घालवून लावील. एवढंच कीं नाहीं ? अन् हें इतकं कशाला केलं, तर आपल्या मनांत एका अनाथ विधवेला अन्नास मोताद करून सोडायचं. फार चांगलं आपलं काम. पण तें काम खरोखर व्हावं असं जर तुह्मांला वाटत होतं तर वहिनीबाईनीं विचारल्याबरोबर कां नाहीं पुढें झालां ? तुह्मी लाजलांत आणखी घाबरलांत दुसरं काय ? जा आतां, वहिनीबाईना हें जर कळलं, तर त्या उद्यांपासून तुह्मांला आमच्या दारांत पाऊलसुद्धां घालूं द्यायच्या नाहींत."

इतक्यांत फार कर्कश व संतापलेल्या स्वरांत उच्चारलेलीं पुढील वाक्यें त्यांच्या कानीं पडलीं. "उद्यांपासून कशाला ? आतांच सांग त्यांना इथून जायला. मेले निनांवी पत्रांचे धाक घालताहेत आह्मांला. त्या कृष्णाजीपंताला पांचवी बायको जिवंत असतां सहावी बायको करण्याबद्दल भर द्यायला तुह्मीच ना ? हे तर तुमचे धंदे, आणखी त्या गरीब बिचाऱ्या अनाथ

पोरीवरचं तुमचं जर कारस्थान मला कळतंना, तर तुह्मी तिला काय केलं असतंत आणखी काय नाहीं. मोरमास्तर, तूं यांना त्यांत सामील होतास का? मला नव्हतं हें ठाऊक. ती बिचारी किती गरीब! किती सुशील! तिला आतां बढती होईल अशी खटपट मी करणार आहें. समजलांत. आणखी आतां तुह्मांला सांगतें, कीं तुह्मांला आपल्या अब्रूची चाड असली, तर आतांच्या आतां इथून चालते व्हा. आणखी पुनः माझ्या घरांत पाऊल म्हणून घालूं देणार नाहीं."

दिगंबरपंत अगदीं चकित झाला. आपलें बोलणें चाललें होतें तें या बाईनें आडून ऐकलें, आणखी ती आपल्या तोंडावर आतां अशा प्रकारें बोलूं लागली हें पाहून त्याची जीभ टाळ्याला चिकटून बसली; ती कांहीं केल्या खालींच येईना. तो आपला न बोलतां आपला पाय काढीत होता आणि शेवटीं अगदीं बाहेरल्या दरवाज्याशीं आला तसा त्याच्या जिवांत जीव येऊन त्यास थोडेंसें बोलण्यालाही धैर्य आलें व तो जातां जातां ह्मणतो: " बरं आहे बरं आहे. आपण काय समजलां आहांत? आपण सापाच्या शेंपटीवर पाय दिला आहांत त्याची आपल्याला चांगली बक्षिसी देईन. मी नांवाचा दिगंबर आहें, चवताळलों नाहीं तोंवरच मी गरीब. चवताळलों कीं झाला निकाल ज्याच्यावर चवताळेन त्याचा. पहा आतां काय होतं आहे तें. समजलांत?"

एखाद्या भात्यांतून जसे वाऱ्याचे फुस्कारे येतात, तसे एकसारखे फुस्कारे त्यांच्या तोंडांतून दर शब्दागणिक निघत होते. आणि त्या शब्दांच्या फुस्काऱ्याच्या सपाट्यांतच ते आपलीं पावलें टाकीत चालले होते. या रावसाहेबांना येथून उचलल्यावांचून कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें सूड उगवितां येणार नाहीं, असें त्यांच्या मनानें पक्कें घेतलें होतें. परंतु त्यांना येथून हालविण्याला काय युक्ति करावी ती कांहीं सुचेना. तोंपर्यंत जुळलें तर यांच्याचकडून काम करून घ्यावें असेंही केव्हां केव्हां त्यांच्या मनांत येई आणि त्या विचारांतच आज ते रावसाहेबांस भेटण्याच्या उद्देशानें आले होते. परंतु ते आले असतां काय झालें हें वाचकांस आतां दिसलेंच आहे.

आतां आपण या मंडळीचा सूड उगविल्याखेरीज रहावयाचें नाहीं असा त्यानें पूर्ण निश्चय केला. आणि आपले परम स्नेही जे कृष्णाजीपंतदादा त्यांच्याकडे स्वारी गेली. कृष्णाजीपंतदादा नुकतेच सुतकांतून सुटले होते. दोघे परमस्नेही भेटतांच दिगंबरपंतास कृष्णाजीपंतानें "तूं आज इतका सचित आणखी त्रासलेला असा कां दिसतोस?" असें विचारिलें, तेव्हां दिगंबरपंतानें कांहीं खरें कांहीं खोटें असें सर्व सांगून शेवटीं ह्मटलें:

" कृष्णाजीपंतदादा, आपण मोठे निश्चयी, एकदां जें काम हातीं घ्याल, तें सोडायचं ह्मणून नाहीं, मग त्यांत वाटेल त्या अडचणी आणखी संकटं आलीं तरी हरकत नाहीं. शेंडी तुटो कीं पारंबी तुटो असा आपला लौकिक आहे. तेव्हां आतां त्या लौकिकाचा कांहीं अनुभव येऊं द्या आह्माला. या रावसाहेब डिपुटीची कांहीं नाचक्की झाली आणखी त्याला कमी पगारावर नेला, तर पहा. कांहीं तरी त्याचं चांगलं नुकसान झालं पाहिजे. त्याच्या बायकोनं तुमचा ते दिवशीं कांहीं कमी पाणउतारा केला आहे असं नाहीं ......"

कृष्णाजीपंतदादा त्यास ह्मणतात, "तुझ्या बोलण्याचं मला फार आश्चर्य वाटतं बोवा. पण तुला त्या पोरींशीं आणखी या लोकांशीं तरी करायचंय् काय ? जाईनात मरेनात ते. आपल्याला तरी काय करायचंय् ? "

" हें कोण बोलतं आहे हो ? " दिगंबरपंत एकदम चकित झाल्याप्रमाणें चेहरा करून ह्मणतो: "हे बोलताहेत हे कृष्णाजीपंतदादाच का ? का मला कांहीं स्वप्न पडतं आहे ? आजपर्यंत हजारों लोकांचा छळ केलांत, शेंकडों कुलंगडीं केलींत, लाखों तंटे उपस्थित केलेत, ते त्या लोकांशीं कांहीं आपल्याला करायचं होतं ह्मणून का सगळं केलंत ? तेव्हां नाहीं कुठें " जाईनात, मरेनात ते, आपल्याला त्यांच्याशीं काय करायचंय् " असे उद्गार काढलेत ? वाहवा ! वाहवा ! हें आपलं सहावं लग्न झालं. तेव्हांपासून आपल्याला नानाप्रकारचे विचार सुचूं लागले आहेत. आणखी आह्मांला फार मोठे मोठे उपदेश करायला लागलां आहांत आपण. तेव्हां—काय ह्मणावं ? पण आतां असं करा. एवढ्या वेळेपुरता आपला उपदेश गुंडाळून ठेवून या दोन चार माणसांवर चांगला सूड उगवितां येईल, अशी तजवीज करा. आपल्याला माहीत आहे, कीं मी आपल्याच तालमींत वाढलेलों आहें. तेव्हां तसा कांहीं उगीच बसणार नाहीं. काय वाटतील त्या युक्त्या काढा, पण या दोनचार गोष्टी झाल्या पाहिजेत. आपल्याला शक्य नाहीं असं कांहीं नाहीं. आपण सगळं कांहीं करूं शकतां. पण आपण एकदां मनावर धरलं मात्र पाहिजे. "

या शेवटल्या भाषणानें कृष्णाजीपंतदादा फार खुष झाले. आणि हंसून ह्मणतातः " तूं तरी मोठा दुराग्रही बाबा. पण आतां युक्ति काय करावी याच्या विचाराला तरी मला वेळ देशील ? ते इन्स्पेक्टरसाहेब इथें आले कीं जातों एकदां मुलाखतीला आणखी देतों चेतवून. पाहूं मग काय होतं तें आणखी. असं कांहीं तरी कुलंगडं केल्याखेरीज बरोबर काम होणार नाहीं. तुझा तर आग्रह कीं हें झालंच पाहिजे. "

" हो माझा आग्रह आहे तर, हें तर काम झालंच पाहिजे. "

इतकें बोलून दिगंबरपंत उठला व रस्त्यांतून घरीं जातांना आपल्याशींच विचार करतो: " हा गृहस्थ आतांशा फार गमजा करतो. आपला स्नेही खरा. पण याच्याही गळ्याशीं कांहीं तरी आणलं पाहिजे. निरांजनशास्त्रीबोवांना गांठून काय होतं तें तरी पहावं. "

# प्रकरण २५ वें.

## दुसरें पत्र.



पद्मावतीच्या दुःखाला अद्यापि ओहोटी लागली नव्हती. तिच्या भावांचा अजून मुळींसुद्धां पत्ता लागला नाहीं. पोलिसांकडून व खासगी रीतीनेंही जितका तपास करणें शक्य, तितका तपास पद्मावतीच्या सांगण्यावरून वसंतरावानें केला. त्यानें जेथें जेथें ह्मणून आपले स्नेही होते, तेथें तेथें पत्रें पाठविलीं; नाहीं तेथें ओळखी काढून, त्या ओळखीच्या गृहस्थाच्या द्वारें शोध केला, परंतु कांहींसुद्धां पत्ता नाहीं. पोलिसांत वर्दी देऊन त्याही मार्गानें पुष्कळ जारीनें तपास चालविला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. दोन तरुण पुरुष, कांहींसुद्धां कारण नसतां एकदम चारदोन दिवसांत नाहींसे व्हावे, आणि त्यांचा थांगपत्ता मुळींसुद्धां लागूं नये, यासारखें दुसरें आश्चर्य जगांत नाहीं. पद्मा आतां त्यांचा तपास लावावयाला कांहीं मार्ग उरला नाहीं ह्मणून हात जोडून निराश होऊन बसली. ते भाऊ येईपर्यंत वडिलांचें व्यवस्थापत्र वाचावयाचें नाहीं, पहावयाचें नाहीं, असा तिचा निश्चय होता. तिच्या त्या निश्चयाच्या आड कोणी आलेंही नाहीं.

तिची आई आपला देव देव करीत दिवस काढी. पहिल्याप्रथम सुमारें एक महिना सव्वा महिना तिनें जेमतेम घरांत काढला. पद्मेनें तिला घरीं पुराण सांगण्यास पुराणिकबोवाही ठेविले, परंतु तिला कसें तें मुळींच चैन पडेना. मग ती सायंकाळीं बाहेर जाऊं लागली देवदर्शन करून आल्याखेरीज तिला रहावेनाच. हें तिचें चार घटका बाहेर जाणें पद्मेला फार हितावह झालें. कारण तेवढा वेळ तिला आपल्या स्वतःशींच विचार करण्यास सांपडूं लागला. आई घरांत असली ह्मणजे एकसारखी " माझीं सोन्यासारखीं दोन मुलं देशोधडीला लाविलीं. " ह्मणून आपल्याशींच विव्हळत बसावयाची आणि त्या विव्हळण्यांत भान न राहून ह्मणा किंवा आपल्या पोरीच्या मनाला किती लागेल याचा सुमार न राहून तिनें पद्मेच्या मनास अतोनात वाईट वाटेल अशा प्रकारचे उद्गारही काढावे. " तूं जर हेका धरून आपलं चि-ऱ्हाड निराळं करतीस, आपल्या नवऱ्याला आमच्या घरी राहण्याची भर न देतां वेगळं राहण्याची भर देतीस तर त्यांनीं पोरांना घालवून लाविलं नसतं. तुझी भर करण्याकरितां त्यांनीं हें सारं केलं. आणखी तुझीन् तुझ्या नवऱ्याची मर्जी संपादन करण्याकरितां त्यांनीं पोरांना वाईट तऱ्हेनं वागविलं. " असले उद्गार स्पष्टपणें ह्मातारीनें तिच्या तोंडावर काढावे. जणूं काय ते नाहींसे झालेले तेवढे तिचे मुलगे, आणि पद्मा ही तिची कोणी नव्हेच! पुराणिकबोवांचा उपदेश घेण्याबद्दल तर नानाप्रका-

रांनीं तिनें पद्मावतीस आग्रह केला. आपल्याबरोबर आतां देवदर्शनें आणि तीर्थयात्रा करण्यास चल ह्मणूनही आग्रह चालविला, परंतु पद्मा कांहीं त्या दोनही बाबतींत ऐकेना. यामुळें तोही एकराग तिच्यावर असे.

या प्रकारें पद्मेची स्थिति फार विलक्षण झाली होती. दुःखाला तसें वास्तविक कारण नसतांना तिला अतोनात दुःख होत असे. जिकडे पहावें तिकडे निराशेखेरीज तिला कांहीं सुद्धां दृष्टीस पडत नसे. तशांत तिची मैत्रीण मालतीही आपल्या नवऱ्याच्या नेमणुकीच्या गांवीं गेली. पहिल्याप्रथम आपली व्यवस्था त्या गांवीं लवकर जुळेल असें त्यास वाटलें नव्हतें, परंतु पुढें तशी व्यवस्था लवकर लागल्यामुळें त्यानें तिला तिकडे येण्याविषयीं पत्र पाठविलें व तीही गेली. जाते वेळीं आपण आपल्या मैत्रिणीला अशा दुःखांत टाकून जातों आहोंत ह्मणून तिला फार दुःख झालें, परंतु काय करणार? पद्मेला "माझ्याबरोबर चल. चार दिवस अगदीं नवीन प्रांतांत तुला सर्वच नवें पाहून कांहीं तरी विरंगुळा वाटेल" असें ह्मणून आपल्याबरोबर चालण्याचा आग्रह करणें मुळींच शक्य नव्हतें. आपल्या आईला सोडून, घरची सर्व अव्यवस्था झाली होती ती तशीच ठेवून तिला कोठेंही जाणें अगदीं अनिष्ट व अशक्य होतें. मालती गांवांत होती तोंपर्यंत रोज ही तिच्याकडे व ती हिच्याकडे येऊन एकमेकींच्या भेटीचें सुख मिळे. परंतु मालती गेल्यावर तेंही सुख नाहींसें झालें. कांहीं गोष्ट मनांत आली, तर ती उघडपणें बोलून तिच्या बरेवाईटपणाबद्दल भवति न भवति करण्याची जागा नाहींशी झाली. कांहीं मनाला वाईट वाटण्याजोगें घडलें किंवा आई बोलली तरी त्याबद्दल खुलासपणें बोलून मनाचें समाधान करून घेण्यास ठिकाण होतें तें नाहींसें झालें. मालती येथें होती तोंपर्यंत तिच्याबरोबर वसंतराव पद्मेच्या घरीं येऊन तिचें कांहीं काम करावयाचें असल्यास तें विचारून घेई व जें कांहीं आधीं करण्याचें त्यानें पत्करिलें असेल, त्याचें काय झालें, काय नाहीं, सर्व सांगे. कांहीं विशेष आण ने करावयाची असल्यास तीही करी. मालती आली नाहीं तर पद्मा तिच्या घरीं जाऊन बसे व वसंतास कांहीं सांगण्या-विचारण्याचें असलें तर सांगे, अगर विचारी. परंतु मालती आपल्या पतीकडे गेल्यानंतर वसंतास पद्मेच्या घरीं जाण्यास संकोच वाटूं लागला. अशी पद्मावतीची स्थिति फार विलक्षण झाली. तिला काय करावें, काय नाहीं, कांहींसुद्धां सुचेना; आणि ती आपल्या विवंचनेंत दिवस काढीत होती.

इतक्यांत एका शनिवारीं दोनप्रहरीं टपाल आलें, त्यांत तिच्या नांवचें विलायतेचें पत्र होतें. पत्रावरलें अक्षर पहातांच तिच्या पोटांत अगदीं धस्स झालें. पत्र फोडूं नये, असें तिला वाटलें. पत्र तिच्या नवऱ्याचें होतें, हें तिनें ओळखिलें; आणि त्यामुळेंच तिची वर सांगितल्याप्रमाणेंच स्थिति झाली. तिला तें याच्यापूर्वीं आलेलें भयंकर पत्र आठवलें, तशाच मासल्याचें हें पत्र असावें. असें तिच्या मनानें घेतलें. एखाद्याकडून भयंकर सर्प घालून ठेविलेली पेटी जशी नजर यावी आणि त्यास "ती पेटी उघडूं नये. जशी आली तशीच बंद ठेवावी" असें वाटून त्यानें त्या पेटीकडे भयभीत दृष्टीनें एकसारखें पहात मात्र रहावें तशीच तिची त्या पत्राच्या बाबतींत स्थिति झाली. तें पत्र पूर्वींच्या पत्राप्रमाणें आपणास शिव्या देऊन नाना

प्रकारच्या निर्भर्त्सनांनीं भरलेलेंच असेल· त्यांत आपल्या स्वर्गस्थ पित्याची न भूतो न भविष्यति अशी निंदा असेल. असें तिच्या मनास पक्कें वाटत होतें आणि त्यामुळें तिनें तें शनिवारचा सारा दिवस इकडून तिकडे व तिकडून इकडे असें टाकूनच काढला. एखादे वेळ मध्येंच मनास वाटे कीं, काय आहे तें एकदां पहावें. मागें आलें होतें, त्या पत्रापेक्षां कांहीं विशेष वाईट असणें शक्य नाहीं. पुनः लागलीच वाटे कीं, आपले वडील वारले, त्यांस त्यांत शिव्याशापाखेरीज कांहींसुद्धां असणार नाहीं. तेव्हां तें वाचण्यांत तरी काय विशेष आहे ? आलें, तसेंच टाकून ठेवावें झालें.

असें एकदां एक, मग एक, पुनः एक, पुनः दुसरें, असें वाटत झोंपाळ्याप्रमाणें तिचें मन हेलकावे खात राहिलें होतें. परंतु शेवटीं जिज्ञासेनें आपला पगडा तिच्या मनावर बसवून तिच्या हातून तें पत्र फोडविलें. आंत खास फार भयंकर असा कृष्ण सर्प आहे असें मनास पक्कें वाटून, परंतु तो कसा आहे हें पाहण्याची उत्कंठा दाबून ठेवतां येईनाशी होऊन एखाद्यानें घाबरत घाबरत थरथरणाऱ्या हातांनीं जसा तो करंडा उघडण्याचें धारिष्ट करावें, तशीच थेट पद्मेची अवस्था झाली. पत्र फोडण्यास घेतांच तिचे दोन्ही हात थर थर कांपूं लागले, काळीज धडधड उडूं लागलें. ‘ देवा, मला कितीही शिव्याशाप असले, तरी माझ्या स्वर्गस्थ पित्याला उद्देशून लिहिलेलें तसं कांहीं नसूं दे ’ अशी प्रार्थना करीत करीत तिनें तें पत्र फोडलें. आंतलें पत्र बाहेर काढलें, आणि त्याच्या घड्या उलगडून तिनें त्याकडे डोळे लाविले. पहिल्याच ओळींतील पहिलीं चार अक्षरें पाहतांच तिला कसेंसेंच झालें. तीं चार अक्षरें हीं होतीं: “ प्रिये पद्मे ! ”

काय, आपल्या पतीनें आपल्याला पुनः ‘ प्रिये पद्मे ’ असें संबोधून लिहिलें ? तेवढ्या त्या चार अक्षरांकडेच ती तटस्थपणें किती वेळ तरी पहात राहिली. तिच्या डोळ्यांवर अश्रूंचें पटल आलें, आणि क्षणमात्र तिला कांहीं दिसेनासें झालें. तिनें एकवार डोळे मिटून अश्रू गाळले. ते अश्रुबिंदु चिंता व दुःख यांनीं अत्यंत पांडुरवर्ण झालेल्या तिच्या गालांवरून वाहूं लागले. तेवढीं चारच अक्षरें किती वेळ तरी पहात बसावें असें तिला वाटलें. पुढें कांहीं वेडेंवाकडें असेल तें वाचण्यापेक्षां अगदीं अनपेक्षितपणें मिळालेल्या चार अक्षरांचेंच वाचन पुनः पुनः करून मनास वाटणारा आनंद कां गमवावा ? असा विचार तिच्या मनांत उभा राहिला असावा. परंतु असा नुसताच त्या चार अक्षरांपासून होणारा आनंद किती काल टिकणार ? थोड्याच अवकाशांत जिज्ञासेनें त्यास दूर सारून पुढें काय आहे तें वाचावें अशी तिच्या मनाची प्रवृत्ति केली व त्याप्रमाणें ती वाचूं लागलीही. तिनें वाचलें तें पत्र असें होतें:—

प्रिये पद्मे,

तुझ्यावर आलेला दुर्धर प्रसंग तूं मला कां कळविला नाहींस ? तुझे वडील एकाएकीं वारले, ही गोष्ट तूं मला कां कळविली नाहींस ? वर्तमानपत्रांत वाचून एकदम माझ्या मनाला धक्का बसावा, हें तुला उचित दिसलें काय ?

पण मी हें तुला काय लिहितों आहें ? ज्या मीं चांडाळानें तुला वेडींवाकडीं पत्रें लिहिलीं, तुझा सर्वस्वी त्याग केला आहे,

तुझें पुनः तोंडसुद्धां पहावयास नको असें लिहिलें, तुझ्या सत्वशील सरलोदार पित्याला नाहीं नाहीं त्या कुशब्दांनीं निंदिलें, त्या मला त्याच्या मृत्यूची वार्ता तूं कळवावीस, ही अपेक्षा तरी मी कशी धरावी? प्रिये, माझ्या मनाला गेल्या चार महिन्यांत जी विलक्षण उपरति झाली आहे, ती रतिमात्र जरी तुला समजती, तरी तूं मला पत्र लिहून माझ्या मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न करतीस. आपल्यास मागल्या सर्व मूर्खपणाच्या कृत्यांबद्दल, शब्दांबद्दल व पत्रांबद्दल किती प्रकारांनीं पश्चात्ताप झाला आहे हें तुला स्पष्टपणें समजावें ह्मणून तुला खुलासेवार पत्र लिहून तुझ्याजवळ व तुझ्या द्वारें तुझ्या वडिलांजवळही क्षमा मागावी असें अनेक वेळां माझ्या मनांत आलें; परंतु तसें करण्यास माझा हात लेखणी धरीना, कागद पुढें घेऊं देईना. ज्या मीं तीं मागलीं दुष्टपणाचीं पत्रें लिहिलीं तोच मी आतां असलीं क्षमा मागण्याचीं पत्रें लिहूं लागलों, तरी कोणाचा भरंवसा बसणार आहे? उलट कांहीं तरी लुच्चेगिरी आहे असेंच मनांत येईल असा विचार करून मी अगदीं स्वस्थ बसलों. पश्चात्तापाच्या अग्नीनें माझें हृदय आंतल्या आंत जळत राहिलें; आणि त्यामुळेंच खंगत जाऊन मी जगतों का मरतों, अशी माझी गेल्या महिन्यांत स्थिति झाली. तशांत एकाएकीं आबासाहेबांच्या आकस्मिक मृत्यूची हृदयभेद करणारी वार्ता वर्तमानपत्रांत वाचली. आणि एकदम असें वाटलें कीं, आपली धर्मपत्नी आतां अगदीं अनाथ झाली. तिचे भाऊ तर वाईट आहेत. आतां वडिलांचे पश्चात् त्यांचेजवळ तिला रहावें लागणार. तें तिला अत्यंत दुःसह होईल. तेव्हां आपण धांवत जाऊन तिची क्षमा मागून तिला सुख द्यावें.

सुख सुख तें काय श्रीमंतींत, मुबलक पैशांत आणि जें पाहिजे तें सारें इच्छा होतांच मिळण्यांतच तेवढें असतें कीं काय? भाजीभाकरी खाऊन दमट कुबट अशा भिकार जागेंत सुखानें संसार करणारीं गरीब बापडीं किती तरी जोडपीं आहेत! त्यांतच आपण एक कां होऊं नये? आपण हिंदुस्थानांत जावें, आपल्या बायकोची क्षमा मागावी, आणि कोठें तरी पांचपंचवीस रुपयांची नोकरी धरून तिला घेऊन "झोंपडींत प्रेमसंसार" थाटावा असा निश्चय केला. माझ्या मनांतून हें पत्रसुद्धां तुला लिहिण्याचा विचार नव्हता. एकदम दत्त ह्मणून तुझ्यापुढें उभें राहून हात जोडून 'क्षमा कर' ह्मणून तुला आश्चर्यचकित करावयाचें होतें, परंतु धीर धरवेना. वडील वारल्यामुळें तुझी चित्तवृत्ति अत्यंत दुःखमय झाली असेल, तुझ्या बंधूंनीं तुला अतोनात त्रास देण्यास आरंभ केला असेल, आईनेंही त्याचप्रमाणें त्यांत भर घातली असेल, असे नानाप्रकारचे विचार माझ्या मनांत येऊन शेवटीं मीं हें पत्र तुला ल्याहावें असा निश्चय केला. आजपर्यंत जें झालें, तें सर्व विसर. मी पूर्वीचा नाहीं. तुझ्या चांगल्या गुणांच्या स्मरणामुळें व येथें आलेल्या अत्यंत वाईट अनुभवामुळें माझें मन पुनः तुझ्याकडे परत फिरलें आहे. तुझ्या पित्यास मीं विनाकारण निंदिलें. दूध पाजणाऱ्या हातासच डसणाऱ्या कृष्णसर्पासारखी कृति मीं केली. तुझ्या वडिलांनीं माझें कांहींसुद्धां वाईट केलें नाहीं. तुझ्यामुळें मला त्यांनीं आपल्या मुलांपेक्षांही जास्त—मुलांपेक्षांही जास्त असें मीं काय ह्मणतों!—मुलांस दूर सारून, मला जवळ करून आवडता मुलगा असावा तसें वागविलें. माझे सर्व हट्ट पुरविले. परंतु तेवढ्यानें तृप्ति न

होऊन मी वेडेवेडे हट्ट करूं लागलों व ते पुरविण्यांत त्यांची नाखुषी दिसतांच तेवढ्यावरून पक्का कृतघ्न बनून मी त्यांस व तूंही माझें ऐकेनास ह्मणून तुला भलभलत्या शिव्या देऊं लागलों, तुमच्या निंदा करूं लागलों. वाटेल तसें बडकूं लागलों. सारांश, कृतघ्नपणाची व दुष्टपणाची अगदीं परमावधि करून सोडली आणि येथें आल्यावर थोडे दिवसांपूर्वीं जीं पत्रें लिहिलीं त्यांत अगदीं कृतघ्नपणाचा कडेलोट झाला! तीं पत्रें लिहिलीं आणि दुसरे कीं तिसरे दिवशींच मला कांहीं कारणांमुळें पश्चात्ताप झाला. पत्रें टपालांत टाकलीं नसतीं तर फार बरें झालें असतें, असें वाटूं लागलें. केल्या मूर्खपणाबद्दल मी स्वतःस शिव्या देऊं लागलों. आणि लागलीच क्षमा मागण्याचीं पत्रें लिहावीं असें मनांत येऊं लागलें परंतु क्षमा मागण्याची लाज वाटूं लागली. माझ्यासारखे दुष्ट स्वभावाचे लोक असतात, त्यांची हीच मौज असते. दुष्कृत्यें करण्याला किंवा दुर्वचनें बोलण्याला त्यांना लाज वाटत नाहीं, परंतु तीं आपण विनाकारण केलीं अगर बोललों असें स्पष्ट दिसून आल्यावरही त्याबद्दल पश्चात्ताप झाला, वाईट वाटलें असें लोकांस कळूं देण्याची लाज वाटते. आपण क्षमा मागितली, आणि आपल्याला त्यांनीं ती दिली नाहीं, तर केवढा आपला अपमान, केवढी आपली अवहेलना, केवढी आपली विटंबना! असें मनांत येऊन लाज गुंडाळून ठेवून क्षमा मागण्याचें धारिष्ट होत नाहीं. आपली चूक झाली, त्या चुकीच्या भरांत आपण भयंकर कृत्यें केलीं असें पूर्ण मनाला वाटूं लागलें असतांही तसें स्पष्टपणें कबूल करण्यास धारिष्टच लागतें. तें धारिष्ट मला होईना. यामुळें गप्प बसलों. तुझ्या मनाला त्या माझ्या मागल्या पत्रानें झालेलें दुःख तसें राहूं देणें पसंत केलें. आपली लाज बाजूस ठेवून तुझें दुःख कमी केलें नाहीं. अशाच पश्चात्तापानें दग्ध झालेल्या स्थितींत मी आणखी किती दिवस तरी बसलों असतों, परंतु तुझे वडील–माझे प्रिय सासरे आबासाहेब-अकस्मात् वारल्याचें वर्तमानपत्रांतून वाचतांच फार वाईट वाटूं लागलें. आतां येथें राहूंसुद्धां नये असें मनांत आलें. एकदम तुझ्याजवळ यावें व तुला झालेल्या दुःखाचें परिमार्जन करावें, असा निश्चय केला. तुला पत्रसुद्धां पाठवूं नये, आपलें तुझ्यापुढें अचानक उभें रहावें असें मनांत आलें, परंतु तसें नको. आपलें एका आठवड्यास पत्र ल्याहावें आणि दुसऱ्या आठवड्यास निघावें असा विचार करून पत्र टाकलें. हें पत्र तुझ्या हातीं येतें तों मी एडनपासून चार दिवसांच्या अंतरावर येऊन पोंचलों असेन. आणि ज्या शुक्रवारीं किंवा शनिवारीं तुझ्या हातांत पत्र येईल, त्याच्या आठव्या दिवशीं मी तुझ्यापुढें उभा आहें असें समज. एकाद्या क्रूर श्वापदाला दचकून जशी एखादी हरिणी पळते, तशी पळूं नकोस. मी आतां पहिला–मागल्या खेपेचा लिहिणारा दुष्ट दुर्योधन राहिलों नाहीं. आतां मी पत्र लिहिणारा पश्चात्तापानें शुद्ध झालेला, आपल्या स्वर्गस्थ श्वशुराच्या आत्म्याजवळ अत्यंत लीनदीनपणें क्षमा मागणारा, तुझ्या क्षमेची व तुझ्या प्रेमाची लालसा धरून तुझ्याकडे धांव घेणारा, तुझ्या प्रेमार्द्र दृष्टीच्या वृष्टीनें शांति मिळवूं इच्छिणारा व तुझ्या चरणीं या जगांत आपलें सर्वस्व वाहण्यास उत्सुक असणारा तुझा खरा पति आहें असें पक्कें समज."

पद्मावतीनें तें पत्र वाचलें आणि तिच्या डोळ्यांवाटे एकसारखे अश्रू गळूं लागून ती एकदम निश्चेष्ट पडली.

# प्रकरण २६ वें.

## आनंद



जसा एखादा योगी समाधि लावून स्वानंदसाम्राज्यांत तल्लीन होतो, मग जगाचें अस्तित्वही त्यास समजत नसतें, तशीच पद्मावती त्या वेळीं निश्चेष्ट पडून स्वानंदसाम्राज्यांत गर्क झाली असें दिसलें. तिच्या त्या निश्चेष्ट स्थितींतही तिच्या चर्येवर आनंदाची छाया स्पष्ट दिसत होती. तिच्या चर्येवर स्मित दिसत होतें. तिचा आत्मा आनंदांत निमग्न होऊन शरीर सोडून कोठें तरी भराऱ्या मारीत होता; तरी त्याची दृष्टि त्या शरीरावर होती असें दिसत होतें. एखादी घार आपलें पिलांनीं भरलेलें घरटें सोडून आकाशांत उंच भराऱ्या मारीत आनंदानें गिरक्या घालीत असली तरी तिची सूक्ष्म दृष्टि त्या घरट्याकडे असते व तिच्या घरट्यांतील पिलांची–आपली माता प्रत्यक्ष दिसत नसली तरीही आपल्या दूर गेलेल्या मातेकडे असते, तशीच पद्मेच्या शरीराची व तिच्या आत्म्याची स्थिति झाली असावी. तिच्या कुडीला सोडून तिचा आत्मा दूर कोठें तरी संचार करण्यास गेला होता. परंतु त्याचें सर्व लक्ष्य कुडीकडे होतें. यामुळें त्या कुडीवर त्याच्या आनंदाची छाया स्पष्ट दिसत होती. मनुष्य स्वप्नांत असलें ह्मणजे त्याचा आत्मा शरीर सोडून जेथें गेला असेल, तेथल्या सुखदुःखांच्या छाया त्या शरीरावर घडत असतात, हा अनुभव कोणास नाहीं? सुखस्वप्न पडत असलें ह्मणजे त्या स्वप्नांत सुखाचा अनुभव आत्मा शरीरापासून शंभर कोसांवर जाऊन घेत असला, तरी त्या सुखापासून होणाऱ्या समाधानाची छाया (त्यामुळें येणारें हंसूं वगैरे) शरीरावर, मुखावर दिसूं लागतें. हा अनुभव रोजचा आहे. आपण कोठें तरी फार दूर अशा गांवीं गेलों आहों आणि तेथें कांहीं तरी सुख भोगीत आहों असें स्वप्न पडत असलें तर अंथरुणांत असणाऱ्या शरीरास त्या सुखाचा अनुभव घडत असल्याप्रमाणें त्याजवर विकार होतात. दुःख भोगीत आहों असें स्वप्न पडत असलें तर शरीरास त्या दुःखाचा अनुभव घडत असल्याप्रमाणें त्यावर विकार होतात. लहान मूल गाढ झोंपेंत असलेलें आपणास दिसतें; परंतु मध्येंच त्याच्या चर्येवर कोमल स्मित किंवा रुदित दिसूं लागतें; त्याचें मुख हंसरें किंवा रडकें दिसतें; त्याचें कारण तरी हेंच. मूल शरीरानें निश्चेष्ट असतें, परंतु त्याचा जीवात्मा संचार करितांना त्यास होणाऱ्या सुखदुःखाची छाया त्या कुडीवर पाडल्याखेरीज राहत नाहीं. तशीच स्थिति सुखदुःखामुळें येणाऱ्या निश्चेष्टपणांत होते. सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें मात्र पाहिजे.

परंतु हें तत्वज्ञान सोडून आपण व्यव-

हाराकडे येऊं. पद्मा बिचारी आनंदातिरेकानें अश्रु गाळीत एकदम निश्चेष्ट पडली. तिला कोणी सांवरण्यास, तिला शुद्धीवर आणण्याची खटपट करण्यास त्या वेळीं तिच्याजवळ कोणी नव्हतें. आई जेवण होतांच कोठें कांहीं माहात्म्यवाचन चाललें होतें तिकडे गेली होती. घरांतली बाई आपलें काम संपल्यावर खालींच चटई टाकून पडली होती. वर काय चाललें आहे, किंवा काय झालें आहे याचा तिला मागमूससुद्धां नव्हता. एक गडी होता तो नुकताच त्याला वाढून दिलेलें खाऊन पुढल्या दाराशीं बसून ढेंकर देत आपली चिलीम भरीत होता. त्यालाही वर पद्मावतीची अशी कांहीं स्थिति झाली असेल ही कल्पना नव्हती.

इतक्यांत वसंतराव तेथें आला व त्यानें 'पद्माताई आहेत का ' म्हणून विचारलें.

गड्यानें त्यास पहातांच आपली चिलीम झटकन लपवून "हां असतयाल वर" असें उत्तर दिलें, व त्यास वर पोंचविण्यास तो उठला. आंत जातांना "काकूबाई, ताईसाहेब हयतना वर?" असें तो त्या स्वयंपाकीणबाईस म्हणाला.

स्वयंपाकीण बाईनीं निजल्या निजल्याच आपल्या उशाच्या चौघडीचा बोळा हातानें धरून डोकें वर करून "कारे, तुला कशाला त्यांची चौकशी आतां?" असें म्हटलें. तों वसंतराव त्यांच्या नजरेस पडला त्याबरोबर त्या तशाच निजल्या निजल्या प्रथम भुंवया आकुंचित करून नंतर गड्याकडे पाहून हंसून "हां आहेत. जा वर!" असें म्हणाल्या. आणि त्यांनीं आपलें डोकें पुनः आपल्याच चौघडीच्या बोळ्यावर ठेविलें. वसंतराव गड्यास म्हणालाः "असली म्हणजे झालें. तूं बस. मी जातों वर. काकू कुठें बाहेर गेल्या वाटतं?"

गड्यानें हंसून "हो" असें उत्तर दिलें. आणि तो मागेंच राहिला. वसंतराव वर गेला. ज्या दिवाणखान्यांत आबासाहेबांचें पर्यवसान झालें, तो दिवाणखाना अजीबाद बंद केलेला होता. बाकी बऱ्याच माड्याही बंदच होत्या. फक्त दोनतीन खोल्या उघड्या असत. पद्मा आपल्या नित्याच्या खोलींत होती. वसंतराव त्या खोलीच्या दाराशीं गेला, दार लाविलेलें होतें. पद्मा निजलीबिजली तर नसेल? असा प्रश्न एक क्षणभर त्याच्या मनांत आला. परंतु ती दिवसां कधीं निजत नाहीं हें त्यास माहीत होतें. म्हणून त्यानें दारावर टिकटिक केलें, परंतु आंतून "कोण आहे?" असा प्रश्नही आला नाहीं, किंवा आंत कोणी असल्याचें चिन्हही दिसलें नाहीं. पद्मा कदाचित् कांहीं वाचण्यालिहिण्यांत गढून गेली असेल आणि त्यामुळें तिला आपलें टिकटिकणें ऐकूं गेलें नसेल म्हणून त्यानें दारावर जोरानें ठोठाविलें, तों एकदम तें दार उघडलें, आणि पद्मा अस्ताव्यस्त पडलेली त्याच्या दृष्टीस पडली. वसंतराव किंचित् दचकला व मागें झाला. क्षणमात्र त्याला वाटलें, कीं ती दमूनभागून सहज पडली असावी. तेव्हां आपण तिला जागें न करितां माघारें जावें. पुनः वाटलें कीं जें काय तिला सांगण्याकरितां आपण आलों, तें न सांगतां जाऊं नये. तिला हांक मारावी. तिला दुपारची निजण्याची संवय नाहीं, तेव्हां तिला जरी उठविलें तरी हरकत नाहीं. पुनः वाटलें, आपण कां आलों होतों, तें तिला कळण्यासाठीं कागदावर लिहून ठेवावें. म्हणून तो तिच्या टेबलाकडे जाण्यासाठीं पुढें झाला. आतां जवळ गेल्यावर मो-

त्यानें तिला 'पद्माताई, पद्माताई' असें ह्मणून हांक मारूं लागला. एक दोन हांका मारल्या तरी ती ओ देईना. तेव्हां त्याच्या मनांत आलें, 'इतकी बिचारीला गाढ निद्रा लागली आहे, आणि त्या निद्रेंत कांहीं तरी समाधान देणाऱ्या स्वप्नाचा अनुभव घेते आहे तर आपण तिला विनाकारण या जगावर आणावी कशाला?' पुनः त्या तिच्या हातच्या पत्राकडे त्याचें लक्ष्य गेलें आणि पुनः वाटलें कीं तें कांहीं नाहीं, तिला जरूर जागें करावें. ह्मणून तो तिच्याजवळ गेला, आणि मोठ्यानें तिच्या कानाशीं हांका मारूं लागला. तरी जेव्हां ती कांहीं केल्या जागी होईना, तेव्हां मग त्याच्या मनांत शंका आली. हिला मूर्च्छा तर आली नसेलना? मग त्याचें लक्ष्य तिच्या हातांनीं तें पत्र कसें धरलें गेलें आहे त्याकडे गेलें. सहजगत्या वाचतां वाचतां झोंप लागली असती, तर तें पत्र तिच्या हातून गळून गेलें असतें. असें पेचकांत घट्ट धरून ठेवल्याप्रमाणें तें अडकून बसतेंना. त्यानें नीट न्याहाळून पाहिलें आणि हिला त्या पत्रांतील कांहीं मजकुरामुळें आनंद होऊन मूर्च्छाच खास आली, असें त्यास दिसलें. त्याबरोबर तो पाणी आणण्यास खालीं धांवला. त्यानें त्या स्वयंपाकीण काकूस 'लवकर पाणी द्या, आणखी वर चला. पद्माताई बेशुद्ध होऊन पडली आहे' असें सांगितलें. तें ऐकतांच ती झटकन् उठून बसली, व त्याच्या चर्येकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागली आपल्याशींच हंसली आणि मग हलकेंच उठून तिनें एक तांब्या भरून त्याच्यापुढें ठेवला, आणि त्याच्यापुढें ती नुसती ठाणवाईसारखी उभी राहिली. "आपण वर चला, तिला कदाचित् धरून उठवून बसवावी लागेल. त्या धोंड्यालाही बोलवा." असें ह्मणून तो वर निघून गेला. बाई हळूच आधीं बाहेर गडी होता त्याला बोलावण्यास गेली. वसंतरावास पद्मेला हात कसा लावावा याबद्दल यत्किंचित् सुद्धां संकोच वाटला नाहीं. त्याची बहीण मालती अशा स्थितींत पडलेली त्याला दिसली असती तर जें त्यानें संकोचहीन मनानें केलें असतें, तें त्यानें या वेळी केलें. तो तिच्याजवळ गेला. त्यानें प्रथम तिच्या तोंडावर पाणी मारलें. नंतर तिच्या डोळ्यांस पाणी लावलें. परंतु कांहीं नाहीं. तिची दांतखिळी बसली असावी, असें दिसलें. 'आतां कांहीं तरी उपाय केल्याखेरीज गत्यंतर नाहीं.' असें मनांत येऊन त्यानें त्या गड्यास व बाईस मोठ्यानें हांका मारल्या. गड्यास हांका मारण्याला म्हणून गेलेली बाई खुशाल कांहीं तरी बोलून पद्मा व वसंतराव यांची निंदा करीत होती.

इतक्यांत वसंतरावाची हांक तिच्या कानीं गेली. आणि ती व तो गडी झटकन् उठून दोघेही वर आलीं. पद्मा खरोखरीच मूर्च्छित पडलेली पाहून मात्र बाई तिच्या जवळ गेली व तिला हलवून हांका मारूं लागली. पद्मेचें अगदीं लांकूड झालें होतें. 'डोळ्यांत अंजन घातलं तर आतां शुद्धीवर येईल. आह्मांला कांहींच ठाऊक नाहीं. जेवून वर आल्या. टपाल आल्याबरोबर धोंडीनं तें वर नेऊन दिलं. आह्मांला वाटलं रोजच्यासारख्या कांहीं लिहीत वाचीत बसल्या असतील.'

वसंतराव तें ऐकून थोडा त्रासून ह्मणाला, "तें असूं द्या. आतां आधीं हिला शुद्धीवर आणा. तुमचं अंजन काय येतं आहे तें पाहूं द्या. वेळ लावूं नका."

हें बोलत असतांना त्यानें तिच्या तोंडावर पाण्याचे हबके मारण्याचा सपाटा चालविलाच होता. ती कांहीं केल्या शुद्धीवर येईना, तेव्हां तो घाबरला. बाईनें तितक्यांत कांहीं अंजन उगाळून आणलें; आणि त्यानें व तिनें मिळून तिला धरून तिच्या डोळ्यांत बोट फिरविलें. तें सुंठीचें अंजन असावें. तें अंजन डोळ्यांत जातांच ती खडबडून जागी झाली; आणि डोळे उघडूं लागली, तों ज्या डोळ्यांत अंजन घातलें होतें, त्यांत फारच त्रास होऊं लागला. ती इकडे तिकडे पाहूं लागली. जणूं काय आपण कोठें आहों आणि कोण आपल्या जवळ आहे, याचें कांहीं सुद्धां तिला ज्ञान होईना. इतक्यांत वसंतरावाकडे तिची दृष्टि गेली; आणि ती एकदम भानावर आल्याप्रमाणें होऊन उठून उभी राहून पदर सांवरून आपले अस्ताव्यस्त झालेले केंस व्यवस्थित करूं लागली. नंतर तिच्या हातून पडलेलें तें पत्र झटकन् तिनें उचललें आणि त्याची घडी करून आपल्या अंगांतल्या पोलक्याच्या खिशांत घातली. नंतर सहजगत्या स्मित करून वसंतरावाकडे वळून त्यास म्हटलें: "वसंतराव, तूं केव्हां आलास? हें काय चाललं होतं?" वसंतराव इतका वेळ अगदीं टक लावून तिच्या प्रत्येक चलनवलनाकडे पहात होता. तो तें तिचें भाषण ऐकून हंसला व ह्मणाला: "पद्माताई, तुला कांहीं बातमी सांगण्यासाठीं ह्मणून मी आलों; इथें आलों तों तूं तें हातांत कोणाचंसं पत्र घेऊन स्वस्थ पडली होतीस. मला वाटलं, तुला झोंप लागली होती. ह्मणून मी तसाच जाणार होतों, पण तूं दुपारची कधीं निजत नाहींस, आणखी बातमी सांगायची होती ती फार महत्वाची, ह्मणून तुला हांका मारून जागी करूं लागलों. पण तुझा जागं व्हायचा कांहीं संभव वाटेना. तेव्हां खालीं वांकून पाहूं लागलों तों तूं निजलीस नसून बेशुद्ध पडली आहेस असं दिसून आलं. लागलीच तुला शुद्धीवर आणण्याच्या खटाटोपास लागलों. आणखी बाईनीं कांहीं अंजन उगाळून आणून तुझ्या डोळ्यांत बोट फिरवलं त्याबरोबर तूं जागी झालीस. तोंडावर पाण्याचे हबके वगैरे मारले, त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अशी एकाएकीं तुझी स्थिति व्हायला कारण तरी काय झालं?"

पद्मा त्याचें बोलणें ऐकून घेत होती. मध्यें कांहींसुद्धां बोलली नाहीं. नंतर हळूच ह्मणते: "काय? मी बेशुद्ध पडलें होतें? मी तर एका सुखस्वप्नाचा अनुभव......"

परंतु तितक्यांत तिच्या मनाला काय वाटलें, तिनें आपल्या खिशांत हात घातला. त्यांत ठेवलेलें तें पत्र नीट आहे कीं नाहीं, तें तिनें पाहिलें. नंतर बाईकडे पाहिलें. बाई अद्यापि तेथेंच उभी होती आणि तो गडीही तसाच पलीकडच्या बाजूस उभा होता.

पद्माताईनीं आपल्याकडे पाहिलें तेव्हां आपण कांहीं तरी बोललें पाहिजे असें वाटून बाई तिला ह्मणते, "यांनीं मला हका मारल्या, ह्मणून मी वर धांवत आलें. आपण अगदीं लांकडासारख्या होऊन पडल्या होतां. हे जर आले नसते, तर केव्हां आह्मांला कळलं असतं आपल्याला काय होतं आहे तें याचा नेमच नाहीं! चार पांच वाजेपर्यंत आपण खालीं आलां नसतां कीं आलें असतें वर. पण आतांशा तुह्मी अशाच एकट्या बसतां, यामुळें वर येऊन काय करतां तें पहाण्याचं मनांतसुद्धां कदाचित् आलं नसतं. वसंतराव आले ह्मणून बरं झालं. बरं आतां आह्मी जातों. तुह्मांला कांहीं दूधबीद आणूं कां? चहा करून

आणूं का? ऊन ऊन चहा घ्या थोडा ह्मणजे जरा बरं वाटेल."

पद्मातार्इनें तिला "आणा करून दोन पेले" असें सांगितलें. बाईनें गड्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसून भुंवया उडविल्या; आणि दोघेंही खालीं गेलीं.

पद्माताई वसंतरावाकडे वळून ह्मणते: "एकूण आज तूं वेळेवरच आलास ह्मणायचा. वसंतराव, मालुताई गेल्यापासून माझी चित्तवृत्तिच कांहीं चमत्कारिक झाली आहे. तिच्याकडून कांहीं पत्रचित्र आलं का? मला आज आठ दिवसांत पत्र नाहीं."

वसंतरावः—वरीही आठ दिवसांत पत्र नाहीं. ती आतां सुखांत निमग्न झाली, तिला कशाला कोणाची आठवण होते आहे?

पद्माताई:—छे. छे. छे. वसंतराव, थट्टेंत सुद्धां तिच्याबद्दल असं बोलूं नकोस. अहोरात्र ज्याला आठवण होत असेल, माझी काळजी वाटत असेल, असा तेवढा एकच प्राणी आहे. ती तिथें नुकतीच गेली आहे. तेव्हां तिला व्यवस्था लावतां लावतांच पुरेसं झालं असेल. खरं ह्मटलं तर तिच्याबरोबर कोणी तरी जायला हवं होतं.

वसंतरावः—दोघांत तिसरं कशाला बोवा कोण जाईल! तें कांहीं नाहीं. तिला काय झालं आहे! नवऱ्याला ओंझंभर पगार आहे. चांगला बंगला घेतला असेल. कलेक्टर, दुसरे असिस्टंट कलेक्टर, जज्ज, असिस्टंट जज्ज त्यांच्या मडमा असतील, एखादा क्लब असेल, तिथें खेळ होत असतील, ही जात असेल, तिची चैन असेल. साहेबमंडळींत ती गुरफटून गेली. आतां आपल्या नेहिंवांची कसली तिला आठवण आली आहे!

पद्माताई:—पुरेरे, तुझी आपली नेहमीं थट्टाच! आज उद्यां इतक्यांत तिचं पत्र येईल बघ मला अगदीं सविस्तर. सूर्य एकवार उगवायचं विसरेल, पण ती विसरायची नाहीं पत्र ल्याहायला. बरं पण तूं काय सांगायला आला होतास?

वसंतरावः—विशेष कांहीं नाहीं.

वसंतरावानें हें उत्तर दिलें खरें, परंतु त्याच्या गुळमुळ्यावरून, संकोच दाखविणाऱ्या त्याच्या चर्येवरून स्पष्ट असें दिसलें कीं तो कांहीं तरी लपवितो आहे. तो आला तेव्हां फार उत्सुकतेनें आला. त्या वेळीं जर त्याची चर्या पद्मेनें पाहिली असती तर तिला असें दिसलें असतें कीं, तो आपल्यास कांहीं तरी काळजी उत्पन्न करणारी बातमी सांगण्यास आला असावा. परंतु "जी बातमी आपण सांगण्यासाठीं आलों ती सांगूं कीं नको सांगूं!" असें त्यास वाटत असावें असें त्याच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें. तें जाणून पद्मेनें त्यास विचारलें: "वसंतराव, माझ्यापासून असं कांहीं लपवून ठेवण्याची ही बुद्धि तुला कशामुळें झाली!"

वसंतरावः—छे. छे. तुझ्यापासून कांहीं लपवून ठेवण्याचा विचारच नाहीं. इंग्लंडाला गेलेल्या माझ्या एका स्नेह्याचं पत्र आलं आहे; त्यावरून असं कळतं कीं... सदाशिवराव इकडे यायला निघाले आहेत, तेव्हां—

हें ऐकून पद्मा एकदम हंसली व ह्मणते: "काय? तेव्हां काय?"

वसंतरावः—कांहीं नाहीं. हें तुला कळवून ठेवावं ह्मणून आलों होतों. पण तुलाही कदाचित् कळलं असेलच.

वसंतरावाचें हें बोलणें ऐकून पद्मा पुनः हंसली. तिच्या चर्येवर आतांपर्यंत असलेली खेद व चिंता यांची छटा पार नाहींशी झाली आणि ती एकदम त्यास ह्मणाली:

" हो. मलाही पत्र आलं आहे. अगदीं स्वतःच्या हातचं पत्र आहे. आगबोट केव्हां येणार; कुठं येणार; याची चौकशी करून मला सांग असा मी निरोपही तुला पाठविणार होतें तों तूं आयताच आलास. वसंतराव, आतां तिकडली वृत्ति पालटली आहे. मला आलेलं पत्र तूं वाचलंस, तर तुला असं वाटेल, कीं...... "

हें बोलत असतां पद्मेचें मन अगदीं उल्हसित झालें होतें. तिची चर्या प्रफुल्लित झाली होती. आणि आज कित्येक वर्षांत जो आनंद तिच्या चर्येवर कधीं दिसला नाहीं त्याच्या उकळ्या स्पष्ट दिसत होत्या. तें बोलत असतांना पोलक्याच्या ज्या खिशांत तिनें आपलें पत्र ठेविलें होतें तिकडे तिचा हात गेला. तिनें तें पत्र बाहेर काढलें. त्याच्याकडे पाहिलें. क्षणभर विचार केला आणि एकदम पुनः हंसून वसंतरावास ह्मटलें:

" हें पत्र मालूताईला कधीं दाखवीन असं मला झालं आहे. पण आतां कुठली माझी तिची भेट व्हायला ! वसंतराव, पहिली सगळी स्थिति बदलली आतां. "

हें शेवटलें वाक्य उच्चारतांना तिची चर्या विशेषच संतुष्ट दिसली. तिच्या डोळ्यांत आनंदाचें तेज नाचूं लागलें होतें. वसंतरावाच्या जागीं जर मालती असती तर ती खरोखरच तिच्या गळ्याला मिठी मारून " मालूताई, माझं नष्टचर्य संपलं बाई एकदां " असें ह्मणून आनंदाश्रू गाळूं लागली असती.

वसंतरावानें तें तिचें बोलणें ऐकलें व तिची स्थिति पाहिली. त्याच्या ओंठांवर कांहीं शब्द आलेले त्यानें परतविले, बळेंच आपल्या मुखावर हंसूं आणलें, आणि म्हणाला:

" आज तुला इतके दिवसांनीं आनंदांत पाहिलं तेव्हां मनाला मोठं समाधान वाटत आहे. तूं सांगतेस तो शोध आणून तुला सांगतों. मुंबईस जाणार असलीस तर मी तुझ्याबरोबर येईन. "

" आतां असाच एकदां या दोघांचा शोध लागला, ह्मणजे झालं. काय चमत्कार आहे पहा. कुठें नाहींसे झाले आहेत, त्याचा अजून पत्ता नाहीं. आज जवळजवळ दोन महिने झाले. इकडे येणं झालं ह्मणजे शोध होईल. तूं कांहीं कमी केलास असं नाहीं... "

वसंतराव मध्येंच ह्मणालाः " मीं अजूनही चालविलाच आहे, परंतु कांहीं धागाच लागत नाहीं. बरं, मी आतां जातों. बोटीची येण्याची वेळ वार कळवितों. मग केव्हां जायचं, कुठें जायचं तें ठरवूं. "

इतकें बोलून तो झटकन् उठला व ' जातों आतां. पुनः एक दोन दिवसांत येईन ' असें म्हणून चालूं लागला. पद्मेनेंही त्यास थांबण्याचा आग्रह केला नाहीं.

तो बाहेर पडला तेव्हां आपण एकदां कसल्या तरी मोहांतून-संकटांतून सुटलों असें वाटून येणारें समाधान त्याच्या चर्येवर दिसूं लागलें.

# प्रकरण २७ वें.

## बबीची प्रकृति.



बबीच्यासाठीं जितके ह्मणून मनुष्यप्राण्यास श्रम करणें शक्य तितके श्रम मथुराबाई करीत होत्या. डॉ० भगवंतराव आपल्या परोपकारी स्वभावास अनुसरून अद्यापि आपल्या स्वतःच्या पोरीप्रमाणें तिची औषधपाण्याची व्यवस्था करीत होते. परंतु कांहीं केल्या त्या पोरीच्या प्रकृतीला आराम म्हणून वाटेना. मथुराबाईनें एक महिन्याची रजा मागितली, त्यांच्या हेडमास्तरीणबाईनीं जितकीं म्हणून रजा न देण्यास कारणें, तितकीं कारणें मथुरताईस सांगितलीं. 'पोरीला तुह्मीं घरांतच ठेवून तिची शुश्रूषा केलीत म्हणून काय ती आतां बरी होणार आहे ?' असेंही मास्तरीणबाई ह्मणाल्या. त्यांचें म्हणणें कीं "पोरीला इस्पितळांत पोंचवून द्यावं, आणि तिथें आठचार दिवसांनीं एकदां जाऊन यावं. डॉक्टर भगवंतराव फुकट हेलपाटे घालतात, आणखी फुकट औषधं देतात, म्हणून किती दिवस घ्यायचीं ? अन् ते काय कांहीं तरी हेतूवांचून हें सगळं करीत असतील ? अन् लोक काय म्हणतात इकडे तुमचं लक्ष कसं जात नाहीं ?" इत्यादि इत्यादि मास्तरीणबाईनीं पुष्कळ बोलून तिनें रजा मागूंच नये, असा प्रयत्न चालविला होता. दुसरीकडे तिला रजा देण्यांत येऊं नये, अशाबद्दल जितक्या खटपटी करावयाच्या तितक्याही तिनें चालविल्या. लेखी रिपोर्ट केले, मोरमास्तरांस सांगितलें, प्रत्यक्ष रावसाहेब गिरिधरपंतांच्याही कानीं घातलें. परंतु रावसाहेब गिरिधरपंतास डॉ० भगवंतरावांनीं पत्र लिहून असें कळविलें कीं, मथुरताईस रजा दिली नाहीं तर तिची बहीण मुलींच जगणार नाहीं, करितां भूतदयेचें एक कृत्य ह्मणून तरी तिला रजा देण्यांत यावी. इतकें झालें, तेव्हां मथुरताईला रजा मिळाली. इतक्या अट्टाहासानें मिळविलेल्या रजेचा कांहीं उपयोग मात्र झाला नाहीं. सात रुपये मिळत असत, तेव्हां घुटं भाकरी तरी पोरांना व स्वतःला मिळत असे, परंतु तो दरमहा बंद झाल्यावर "आतां इतक्या तोंडांत रोज सकाळसंध्याकाळ काय घालायचं" हा विचार मथुरताईच्या समोर उभा राहिला ! घरांत काय खिडूकमिडूक होतें, तें संपत चाललें. आधीं होतें काय ? परंतु जें काय होतें, तेंच रुपयास चार आणेप्रमाणें काढून टाकून रोजचा खर्च भागविण्याची पाळी आली. डॉ० भगवंतरावांस त्यांचें दारिद्र्य किती आहे, हें बरेंचसें माहीत झालें होतें. परंतु त्याला असें ह्मणतां येईना कीं, 'तुमचा पगार बंद झाला आहे, तर हे दहा रुपये दरमहा मी तुम्हांला देतों.' त्याच्या मनांत आलें असलें तरी तसें करतां येईना. औषधपाणी

आणि मुलांना खाऊ ह्मणून कांहीं जिन्नस ते आणून देत. परंतु रोकड पैसा किंवा धान्यधुन्य कसें आणून द्यावें ? असें त्यांच्या मनांत आलें. आपण तसें कांहीं करूं लागलों, तर लोक त्याबद्दल काय ह्मणतील ? लोकांचें एक राहो, परंतु मथुराताईला स्वतःला तरी तें कसें आवडेल ? असा विचार त्यांच्या मनांत वारंवार येई. लोक-दिगंबरपंत, कृष्णाजीपंतदादा, मोरमास्तर इत्यादि लोकांच्या प्रतीचे व त्यांच्यामुळें इतर लोकही–काय ह्मणूं लागले होते, तें त्यांच्या गांवींही नव्हतें !

शुद्ध अंतःकरणाच्या मनुष्यास अशुद्ध कल्पनांचें वारेंही नसतें. त्यांतीलच डॉक्टर भगवंतरावाची गोष्ट होती. तो अत्यंत सात्विक वृत्तीचा माणूस. कॉलेजांतून परीक्षा पास झाल्यानंतर डॉक्टरीचें काम करूं लागला आणि थोडेसे हातपाय हलूं लागून लोकांत त्याचा जम बसतो न बसतो, तों कौटुंबिक आपत्तींतली सगळ्यांत मोठी आपत्ति त्याजवर आली. त्याचें कुटुंब प्रसूत होत असतांना वारलें. एक मुलगी झाली ती मात्र जगली, ती त्यांच्या कुटुंबाच्या मातुःश्रीनें आपल्या घरीं नेली. व तेथें तिचें पालनपोषण चाललें होतें, परंतु त्याविषयीं पुढें पाहूं. भगवंतराव अत्यंत प्रेमळ माणूस. पत्नीच्या ठिकाणीं त्याचें अत्यंत प्रेम. पत्नी मरतेवेळीं तिच्याजवळ ते नव्हते, हेंच त्यांच्या मनास लागलें; आणि याउपर आपण पुनः लग्न करावयाचें नाहीं असा निश्चय करून स्वारीनें परोपकाराचें काम करावयाचें असा निश्चय केला. पत्नीनें मागें ठेविलेली पोरगी जगली तर तीच आपलें सर्वस्व ह्मणून एकाकी रहाण्याचा त्यांनीं निर्धार केला. मुलगी आतां पांच वर्षांची झाली असेल. ती अजून आपल्या आजोळींच होती. डॉ. भगवंतराव तिला भेटण्यासाठीं ह्मणून मात्र नियमानें जात असत. असो.

डॉ. भगवंतरावाच्या मनाची अशी वृत्ति असल्यामुळें त्याला असें वाटे कीं, खऱ्याखऱ्या दरिद्री व सत्पात्र माणसांना आपण अगदीं होईल तितकी मदत करावी. याच बुद्धीनें त्यांनीं मथुराताईस हरप्रकारची मदत करण्याचा क्रम चालविला. मात्र त्यांच्या रोजच्या खर्चासाठीं त्यांस पैसे कसे द्यावे, आणखी आपण दिले तर त्या घेतील कीं नाहीं, याबद्दल त्यांस विचार पडला होता. इकडे मथुराताईस दर दिवस जात होता हा फार मोठा संकटाचा. आतांची वेळ निभली, संध्याकाळचें काय ? असा विचार रोज तिला पडे. पहिल्यानें रजा घेतली होती ती संपली, तरी बबीला आराम नाहीं. ती अधिकाधिक खंगत चालली. पुनः मागितली. आतां मात्र रजा मिळण्यास तिला अडचण पडली नाहीं. रावसाहेब गिरिधरपंतांच्या कुटुंबास तिची हकीकत कळून त्यांनीं तिची शिफारस केली. परंतु एके दिवशीं तीही रजा संपली. घरांत दुसरे दिवसाला पुरेसें धान्यही नाहींसें झालें. तें मनांत येऊन तिच्या पोटांत धोंडा उभा राहिला. मनोहर शाळेंत गेला होता. लहान दोन मुलें बाहेरचे बाजूस खेळत होतीं. बबी आतां अस्थि आणखी चर्म होऊन त्या आपल्या कित्येक दिवस धरून बसलेल्या अंथरुणांत पडली होती. तिचा श्वासोच्छ्वास चालला होता, एवढ्यावरूनच त्या अंथरुणावर कोणीतरी प्राणी आहे, असें समजत होतें. मथुराताई तिच्या शेजारीं आपल्या डाव्या मांडीवर कोंपर टेंकून हात उभा ठेवून व त्याच्या तळहातावर आपला डावा गाल ठेवून घळघळां अश्रु

गाळीत बसली होती. देव आपला इतका अंत कां पहातो आहे, हा विचार तिच्या मनांत घोळत होता; आणि त्याबरोबर दुसराही एक विचार आज सात आठ दिवस तिच्या मनांत येत होता. परंतु तो विचार मनांत येतांच तिच्या पोटांत धस्स होई. आणि तो ती दूर सारी. आज मात्र तो विचार दर क्षणाला तिच्या मनांत येऊं लागला होता. दर क्षणाला येऊं लागला होता असें ह्मणण्यापेक्षां आज त्या विचारानें तिच्या मनास सोडलेंच नाहीं, असें ह्मणणें विशेष खरें होईल. ती आपल्या दुःखद विचारांत अगदीं गर्क होऊन गेली होती. डोळ्यांतून गळणारे अश्रु पुसण्याचें सुद्धां तिला भान राहिलें नाहीं. ते एकसारखे एखाद्या झऱ्याप्रमाणें वहात होते. दोन वर्षांपूर्वी तिला चांगल्या स्थितींत पहाणारानें आज जर तिला पाहिलें असतें तर सर्व प्रकारच्या चिंतांनीं ती किती वाईट, किती क्षीण, किती निस्तेज झाली होती हें पाहूनच त्याच्या अंतःकरणास दयेचे पाझर फुटले असते.

वर सांगितल्याप्रमाणें ती किती वेळ तरी अश्रु ढाळीत बसलीच होती. ज्याप्रमाणें डोळ्यांवाटे अश्रूंचा प्रवाह एकसारखा चालला होता, त्याचप्रमाणें मनांत विचारांचाही प्रवाह एकसारखा चालू होता. त्याच दिवशीं तिला विशेष वाईट वाटण्याचें कारण दुसरे दिवशीं त्या साऱ्या चिमुकल्या तोंडांत व आपल्या स्वतःच्या तोंडांत काय घालावें हा प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला होता, हें होय. घरांत चिमूटभर पीठही नव्हतें, कीं मूठभर दाणेही नव्हते. इतके दिवस तिनें मोठ्या काटकसरीनें काढले. आपली दैना किती आहे, याचा मागमूसही कोणास लागूं दिला नाहीं. कोणाच्याजवळ एक चिमूटभर पिठासाठीं किंवा धारभर ताकासाठीं तिनें तोंड वेंगाडलें नाहीं. कोणीं कांहीं कामास बोलाविलें आणि हिची गरिबी जाणून जर कांहीं देऊं लागलें, तर हिनें घेऊं नये. 'मला लागलं कीं मी मागेन' असें सांगावें. परंतु आज तिच्या जवळची शेवटली कवडी संपली. घरांत विकण्याजोगें कांहीं राहिलें नाहीं. आतां आपण भिकारी ह्मणून भिक्षाच मागण्याचा उपाय राहिला. किंवा कोणाच्या येथें काम पाहण्याचा मार्ग राहिला. कोणाच्या येथें काम करावयाचें असा विचार करून कोणाला न कळत तिनें एक दोन सुखवस्तु घरीं सकाळ संध्याकाळ उष्टीं-खरकटीं काढणें व ताटें वाट्या घासण्याचें काम मिळेल तर चौकशी करून पाहिलें. मधला वेळ शाळेंतली नोकरी करून सकाळ-संध्याकाळचा वेळ असें काम करण्यांत गेल्यास आपल्याला आपल्या पगाराला भरती करतां येईल. हा विचार तिच्या मनांत आला व त्या विचाराचे भरांत तिनें वर सांगितलेल्या एक दोन घरीं चौकशी केली. एका घरीं तिला 'आमच्या घरीं येऊन रहाल तर काम आहे' असें उत्तर मिळालें. दुसऱ्या घरीं एका बाईनें उत्तर दिलें: 'डोक्यावरलं छप्पर काढाल तर तुमच्या हातचं पाणी कोणी घेईल, नाहीं तर कोण घेतो!' या दोनही उत्तरांनीं तिला अतोनात उद्वेग आला. परंतु गरीबाचा उद्वेग काय कामाचा! अशा उत्तरांनीं तिनें कोणाच्या घरीं कामधंदा करण्याचा विचार सोडून दिला खरा; परंतु उद्यां आतां मुलांपुढें काय घालावयाचें, हा प्रश्न आलाच. या प्रश्नानेंच तिला आज अत्यंत दुःखी केलें होतें. उद्यां पोरांच्या तोंडीं कांहीं पडण्यास मार्ग एकच होता. परंतु तो मार्ग सुचल्या दिवसापासून—किंबहुना कोणा गृहस्थानें

सुचविल्या दिवसापासून-त्याचें स्मरण झालें कीं तिला अत्यंत वाईट वाटे. पण आज तें वाईट वाटणें बाजूला सारलें पाहिजे असें तिला स्पष्टपणें दिसूं लागलें. तो मार्ग ज्यास पतकरावयास सांगावयाचा, त्याच्याजवळ गोष्ट काढावी कशी हा विचार तिच्या मनांत या क्षणीं घोळत होता. हा विचार व त्यामुळें होणारें दुःख यांच्या संगतींत दिवस कसा भराभर गेला, हें तिला समजण्यांतसुद्धां आलें नाहीं. तिच्या अत्यंत आवडत्या अशा त्या बहिणीजवळ ती बसली होती. परंतु ती जवळ आहे याचें तरी भान तिच्या त्या चित्ताला त्या वेळीं होतें कीं नाहीं कोणास कळे.

अशा स्थितींत ती असतांना मनोहर शाळेंतून आला. बयी फार आजारी असल्यामुळें बाहेरून आल्यास पायसुद्धां वाजूं द्यावयाचे नाहींत अशी संवय त्या मुलास लागली होती त्याप्रमाणें तो अगदीं पाय न वाजवितां आंत आला. अर्थातच आपल्या दुःखविचारांत गर्क झालेल्या मथुराताईस त्याचें येणें समजलेंही नाहीं. मनोहर आंत आला तों आपली बहीण अशी बसलेली पाहून अगदीं स्तब्ध झाला. " ताई मला भूक लागली आहे, कांहीं खायला दे " असे शब्द तो उच्चारणार होता, परंतु ते शब्द त्याच्या जिभेवर तितकेच थबकले. तो हळूच तिच्याजवळ गेला व ह्मणतोः " ताई, तूं आज अशी कां बसलीस ? "

हे शब्द तिच्या कानीं पडतांच दचकल्याप्रमाणें तिला झालें व ती त्याच्याकडेच चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागली. नंतर काय तिच्या मनांत आलें, तिनें त्याचा हात धरून त्यास ह्मटलें: " मनोहर, ये. माझ्याजवळ बैस. मला तुला कांहीं सांगायचं आहे. शाळेंत तुझा अभ्यास बरा चालला आहेना ? " तें भाषण ऐकून मनोहरही चमत्कारिक दृष्टीनेंच तिच्याकडे पाहूं लागला. त्याचा अभ्यास जितक्या उत्तम प्रकारानें चालावयाचा तितक्या उत्तम प्रकारानें चालतो आहे हें तिला पूर्णपणें माहीत होतें. असें असून आजच हा प्रश्न काय असें त्याच्या मनांत आलें. परंतु तो त्यासंबंधानें कांहीं न बोलतां मथुराताईजवळ बसला. तिनें त्याच्या पाठीवर हात ठेविला व त्यास ह्मटलें:

" मनोहर, तूंच काय तो सगळ्यांत वडील मुलगा. आणखी समजूतदार आहेस. आह्मा सगळ्यांचा काय तो आधार तूं. खरं ना ? मी बायकोमाणूस. तूं घरांतला पुरुष. "

इतकें बोलून ती थांबली. तिला जें काय बोलावयाचें होतें, त्याची प्रस्तावना कशी करावयाची, तें तिला समजेना असें दिसलें. आणि त्यामुळें जें काय तोंडाला आलें तें ती बोलली.

आपली ताई आज असें काय बोलते, असें मनांत येऊन तो फारच चमत्कारिक तऱ्हेनें तिच्याकडे पाहूं लागला.

नंतर कांहीं वेळ दोघेंही एकमेकांकडे अगदीं स्तब्धपणें पहात बसलीं. शेवटीं मथुराताई मनोहरास ह्मणतेः

" मनोहर, मी आतां तुला सांगणार आहें, तें कसं सांगावं मला कांहीं सुचत नाहीं. तुला काय वाटेल हेंच राहून राहून मनांत येतं. दुसरं कांहीं नाहीं. "

मनोहर तें ऐकून एकदम ह्मणालाः " ताई, तुझ्या बोलण्याचं मला काय वाटणार ? तूं आज असं कां बोलते आहेस ? मला त्यामुळें कसंसंच वाटायला लागलं

आहे. काय सांगायचं तें सांग. मीं कधीं तरी तुझी अवज्ञा केली आहे का ?"

"मनोहर, अवज्ञेची गोष्ट नाहींरे. मला जें बोलायचं आहे, तें माझं मलाच कसंसंच वाटतं आहे."

"काय तें ? अगदीं स्पष्ट सांग. कांहीं वाटायला नको."

"मनोहर, आपली स्थिति गरिबीची आहे हें तुला दिसतं आहे ना ?"

"हो, ताई हें तूं काय विचारतेस ? मी त्याबद्दलच आज पंधरा दिवस तुला कांहीं विचारणार आहें, पण माझ्या विचारण्यानं तुला काय वाटेल असं वाटून मी गप्प बसलों."

"तूं काय विचारणार ?" मथुराताईनें त्याला आतुरतेनें विचारलें.

"मी ? तुला वाईट वाटणार नाहीं, आणखी तूं रागावणार नाहींस तर विचारतों."

"राग कसला आणखी वाईट कसलं ? विचार काय तें."

"ताई, तुझ्या एकटीच्यावर आमचा सगळ्यांचा भार किती दिवस पडायचा ? तेव्हां माझ्या मनांत असं आलं आहे कीं, मीं आपले वार लागले तर पहावे, आणखी सकाळीं या दोघां तिघांपुरती माधुकरी मागावी." हे शब्द उच्चारतांना त्याच्या आणि ऐकतांना मथुराबाईच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तिनें त्यास आपल्याजवळ ओढलें, आणि ती त्याच्या खांद्यावर मान ठेवून स्वस्थ रडूं लागली. इतक्यांत दारांत, कोणी आलें त्याची सावली पडली. परंतु या दोघांसही त्याचें भान नाहीं.

# प्रकरण २८ वें.

## दिगंबरपंतांची कळकळ.



तीं बहीणभावंडें वर सांगितल्याप्रमाणें एकमेकांच्या अश्रूंत अश्रू मिळून जाऊन त्यांचा ओघ वाहीपर्यंत रडलीं. जी गोष्ट आपण आपल्या लहान भावापाशीं कशी काढूं ह्मणून आज आठचार दिवस मथुराताईस इतकें अवघड वाटत होतें, तीच गोष्ट आपोआप त्याच्या मनांत उभी राहून त्यानेंही आपणास कशी विचारावी याच विचारांत दिवस काढावे याचेंच मथुराताईस फार आश्चर्य वाटलें. आपली बहीण आपल्यास माधुकरी मागावयाला सांगते असें मनांत येऊन त्याला राग येईल कीं काय ? अशा विचारानें केवळ तिनें गेल्या आठचार दिवसांत तो विचार मागें ठेविला होता, परंतु आज आतां दुसरा कांहींच मार्ग नव्हता, आपण पुनः दुसरे दिवसापासून शाळेंत रुजू झालों तरी महिना भरेपर्यंत आपल्याला एक छदामही दिसावयाचा नाहीं हें तिला धडधडीत दिसत होतें. इकडे घरांत तर कांहीं ह्मटल्या कांहींही नव्हतें. तेव्हां सकाळच्या प्रहरीं मनोहरानें झोळी घेऊन जाऊन माधुकरी मागितली, तरच चार तुकडे मिळून या पोरांच्या तोंडीं पडतील, आपण

एखाद्या दिवशीं उपास काढला तरी हरकत नाहीं, हा विचार तिच्या मनांत घोळत होता. परंतु त्याचा उच्चार कसा करावयाचा! परंतु तोच विचार आपल्या भावाच्याही मनांत घोळत होता हें समजतांच तिला कसेंसेंच झालें. आपला भाऊ लहान, त्याला कांहीं अजून समजत नाहीं. माधुकरी मागावयाला जात जा असें सांगितलें, तर त्याला फार वाईट वाटेल असें तिला वाटे. तो इतका समंजस असेल, आपली खरी स्थिति काय आहे, हें त्याच्या मनांत घोळत असेल ही कल्पनाही तिला नव्हती, तों एकदम त्यानेंच आपल्या मनांतला विचार उच्चारून दाखविल्याबरोबर तिचें अंतःकरण भरून आलें आणि त्याच्या खांद्यावर मान टाकून रडण्यापलीकडे तिला कांहीं सुचेना. बबी जवळ पडली होती ती आतां बऱ्याच वेळांत अगदीं हलली चालली नाहीं हें काय? हा विचारसुद्धां तिच्या मनांत आला नाहीं. मग दारांत कोणी येऊन उभें राहिलें असेल हें मनांत कशाला येतें? मनोहरची स्थिति तीच होती.

दारांत येऊन उभा राहिलेला गृहस्थ दिगंबरपंत होता. बहिणभावंडें एकमेकांच्या मानेवर मान टाकून रडत होतीं हें पाहून तो तेथेंच थबकला. त्याच्या चर्येवर एकप्रकारचें समाधान दिसलें. ती स्थिति पहावयाला सांपडेल तितका वेळ पाहून घ्यावी, पुनः कदाचित् पहावयास मिळणार नाहीं, असें वाटूनच कीं काय तो स्वस्थपणें उभा राहिला. परंतु तसें त्याच्यानें किती वेळ काढणें शक्य होतें? तो कांहीं हेतूनेंच त्यांच्याकडे आला होता. तेव्हां आपल्याला जें करावयाचें तें करून चालतें व्हावें असें मनांत आणून तो पुढें झाला व आपल्याकडून जितकी वाणींत मधुरता आणवेल तितकी मधुरता आणून ह्मणतोः "अरे बाबांनो, मी नेहमीं तुमच्या बऱ्याचं तुह्माला सांगत असतांना तुह्मांला गोड लागलं नाहीं. आतां ही स्थिति आली, आतां तरी तेंच करणार ना? लोकांच्या नादीं लागून छीः थूः परी छीः थूः झाली, आणखी शेवटीं जें टाळायला पहात होतां तें नशिबीं आलं. अजून तरी शहाणी हो. मी तुला तुझ्या बऱ्याचीच गोष्ट सांगतों आहें. तूं सोंवळी हो, ह्मणजे तुला कुठें तरी काम लावून देतों. हा पोरगा माधुकरी मागेल, आणखी या दोघांचं पोट भरील. तूं सोंवळी होऊन चाकरीला रहाण्याला तयार असलीस तर आपले कृष्णाजीपंतदादा आतां तुला आपल्या घरीं ठेवायला तयार आहेत. हीं पोरं माझ्या इथें रहातील. तुह्मांला ठाऊकच आहे, कीं मीं जरी किती नको ह्मटलं तरी ती यांना कालवणपाणी देईलच. मग विनाकारण हाल कां काढतां? कृष्णाजीपंतदादांनीं नवी बायको केली आहे, ती लहान आहे, तेव्हां तिला सोबत होईल, आणि तुझंही काम होईल. तुह्मी मला शत्रूपेक्षां शत्रु समजतां, तेव्हां मीं वास्तविक तुमच्या दारांत पाऊलसुद्धां घालूं नये, पण मन कळवळल्यावर तें सारं मनांतून दूर सारावं लागतं."

इतकें बोलून ते आणखी दोन पावलें पुढें गेले आणि त्या आजारी मृतवत् पडलेल्या पोरीकडे पाहून आणखी ह्मणतातः "ही पोरगी एकदांची बरीही होत नाहीं आणखी मरतही नाहींना! केवढा हा तुमच्या जिवाला ताप!"

दिगंबरपंतांचें हें अगदीं शेवटचें बोलणें कानीं पडतांच मथुरताईला अत्यंत संताप व उद्वेग झाला. मनोहराचे डोळे तर लाल

इंगळासारखे झाले. मथुराताईस या माणसाला आतां काय बोलावें हें सुचेना. आज कित्येक दिवसांत दिगंबरपंत तिच्या घरांत आला नव्हता. प्रत्यक्ष तिला संबोधून तिच्याशीं बोलला नव्हता. अपरोक्ष तऱ्हेनें—किंबहुना तिला स्पष्ट ऐकूं जाईल अशा प्रकारानें पुष्कळ बोले. मनाला लागेल असें, हृदयांत सलेल असें पुष्कळ बोले. परंतु मथुराताई कधींच त्याच्या तोंडास तोंड देत नसे. आपणास जणूं काय ऐकूं येतच नाहीं अशा प्रकारें तिची वागणूक असे; परंतु दिगंबरपंतानें आज अधिक प्रसंगच केला. आपल्या घरांत आला, आपल्याशीं बोलला आणि मरणाच्या दारीं बसलेल्या 'आपल्या बिचाऱ्या बहिणीस ती एकदांची मरत कां नाहीं, असें स्पष्ट बोलला. हा आज नवाच प्रकार काय आहे ? या प्रकाराला काय ह्मणावें ? हे विचार तिच्या मनांत उभे राहिले.

मनोहर लहान होता, परंतु त्याला तसला विचार झाला नाहीं. तो संतापला आणि दिगंबरपंतास एकदम ह्मणालाः—

" तुम्हांला आमची पंचाईत कुणीं करायला सांगितली आहे ? आह्मी तुमच्या दाराशीं आलों होतों का ? तुह्मांला कांहीं विचारलं का ? तुमच्यापाशीं कांहीं मागितलं का ? मी माधुकरी मागायला निघालों, तरी तुमच्या घरीं कांहीं तुकडा मागायला येणार नाहीं. मग माझ्या भावंडांना घेऊन येऊन राहण्याची गोष्ट कशाला ? तुम्ही कशाला आमच्या घरांत आलां ? तुम्ही कोण ?......... "

दर शब्दास पोराचा संताप वाढतच चालला आहे, असें पाहून मथुराताई त्याला आवरूं लागली. " बोलूं नको. बोलूं नको. मनोहर, आपल्यासारख्या गरिबांनीं मुकाट्यानं कोण काय ह्मणेल तें ऐकून घ्यावं. ज्यास्ती बोलूं नये. त्यांना जें वाटतं तें त्यांनीं सांगितलं. आपल्याला जें वाटेल, तें आपण करतोंच आहोंत..."

" अन् लोकांत छीः थुः करून घेतोंच आहोंत ! मथे, तुला इतकी कशी अक्कल नाहीं कीं आपण काय स्थितींत आहोंत, आणि काय करतों आहोंत. तुझ्या वडिलांचा आणखी माझा स्नेह, म्हणून मी तरी इतका वडील माणसाप्रमाणं तुमच्यावर रागावलों, आणखी बोललों. नाहीं तर मला काय करायचं आहे ? पण हा कारटा माझ्यावरच तांबरतो आहे ! ही पोरगी मरावी असं का मी म्हणत आहें ? पण जगावी तरी. अशी किती दिवस पडणार असं सहज माणूस बोलतंच आहे. मी तुह्मांला पहिल्यापासून एकच गोष्ट सांगतों आहें. बरं तें तुम्हांला पतकरत नाहीं तर असं लपवून छपवून कां ? डॉक्टर भगवंतरावाला सामर्थ्य आहे. तो तुह्मांला सगळ्यांना पोशील. ही घाण जागा. या जागेंत तो तुम्हांला राहूं देतो कसा ? ही पोरगी चांगल्या जागेंत गेल्याखेरीज बरी व्हायची नाहीं असं त्यानं तुह्मांला कितीदां सुचवलंन्. मी ऐकलं. त्याच्या ह्मणण्याला रुकार दिलास तर तो तुम्हांला फक्कड जागा पाहून देईल. तो दुःख्यांचा दयाळू आणि कष्ट्यांचा कनवाळू आहे ! त्यानं इथें किती दिवस यावं आणखी........... "

मथुराताईच्यानें सुद्धां आपला राग आवरेना. त्याचीं तीं अत्यंत उपरोधिक भाषणें तिलासुद्धां अगदीं दुःसह झालीं. तेव्हां ती त्यास एकदम म्हणालीः " अण्णा, आजपर्यंत मीं तुमच्या उत्तराला उत्तर कधीं दिलं नाहीं. पण आतां माझ्याच्यानं

राहवणार नाहीं. तेव्हां आपला मान आपण राखून द्या. आपल्याला आमची तोषीस कधीं लागूं दिली नाहीं. मग विनाकारण आतां आपल्या घरांतून येऊन आमचा छळ कां करतां ? तुमचा आमचा संबंध नाहीं, कांहीं नाहीं. "

" संबंध नाहीं ? माझान् तुमचा संबंध नाहीं ! तुमच्या बापाचा आणखी माझा या वाड्यांत सगळा जन्म गेला ना ? आणखी संबंध नाहीं म्हणतेस कसं ? तुमचे कान धरायचा मला अधिकार आहे ! तुझ्या या वागण्यानं माझी स्वतःची बेअब्रू होत आहे अस्सं मला वाटतं आहे, आणखी म्हणून मी आलों आहें. कोण ह्मणतं माझान् तुमचा संबंध नाहीं म्हणून ? मी इतके दिवस बोललों नाहीं म्हणून. पण मी यापुढें तुझ्या अशा गमजा नाहीं चालूं देणार. इथून आपलं बिऱ्हाड काढ. मग तुला दाही दिशा मोकळ्याच आहेत. पण मी याच्यापुढें डोळ्यावर कातडं ओढणार नाहीं. मी इथें धरणं धरून बसणार. तुह्मी काय माझं कराल तें करा. आतांपर्यंत तुला सगळं पोकळ वाटलं नाहीं ? "

दिगंबरपंतांचा आजचा हा प्रकार कांहीं कल्पनेच्या बाहेरचाच होता. मनोहराला आपला संताप आवरेना. परंतु बिचारा करतो काय ? लहान पडला. तुसतें पहिल्यासारखेंच बोलूं लागला, तेव्हां दिगंबरपंतानें त्याचा दंड धरून त्याच्या खाडकन् एक कानफटांत मारली, आणि त्यास तो ' बघ मी कोण आहे तो. नसलं दिसलं तर आणखी दाखवतों ' असें म्हणाला.

हा एकंदर प्रकार आज अगदीं नवा होता. दिगंबरपंत दुरून जरी कांहीं अद्वातद्वा बोलला तरी पोरांना मारण्यापर्यंत किंवा आपल्याशीं अशा प्रकारानें बोलण्यापर्यंत प्रसंग आणील ही कल्पना मथुराताईस मुळींच नव्हती. या वेळीं काय करावें हें तिला सुचेना. ती बायको माणूस, तिला त्याच्याजवळ जाऊन मनोहरास सोडवितां येईना. दिगंबरपंताची बडबड चालली होती. त्यानें अजून मनोहराचा दंडही सोडला नव्हता. " मी कोण आणखी तुमच्या घरांत काय म्हणून आलों हें तुम्हाला समजायला पाहिजेना ? बघ सांगतों. बघून घे " असें ह्मणून त्यानें त्या गरीब पोराच्या आणखी एक थोबाडांत दिली. त्याबरोबर मथुराताईचें भान अगदीं गेलें, आणि ती एकदम ओरडून दिगंबरपंताला ह्मणते, " अहो हें आज तुह्मी मांडलं आहेत काय ? आह्मीं तुमचं असं काय केलं आहे ! अयाईग ! काय हें पोराला मारणं ! आह्मी तुमच्या कधीं वाटेस नाहीं........ "

ती असें मोठ्यानें बोलत आहे तों तीं दुसरीं दोन लहान मुलें बाहेर कोठें खेळत होतीं, तीं तेथें आलीं. आंत येतात, तों आपला भाऊ मोठ्यानें रडत आहे. दिगंबरपंतांनीं त्याचा दंड धरला आहे, आणि ते बडबडत आहेत, व ताईही मोठमोठ्यानें ओरडते आहे, असें त्यांच्या नजरेस पडलें. त्याबरोबर तीं दचकलीं, आणि मागल्या पावलींच मागें जाऊं लागलीं. तों दिगंबरपंतास काय चेव आला, त्यानें मनोहरास सोडलें, व " यारे कारट्यांनो, तुम्हांलाही मी कोण, आणखी तुमच्या घरांत कां आलों तें सांगतों " असें ह्मणत तो त्यांच्या मागोमाग धांवला. त्या दोन मुलांत जो मोठा होता तो चपळ होता, यामुळें पळाला. धाकटा त्याच्या हातीं सांपडला. त्याचा त्यानें कान धरला आणि त्यास फरफटत आंत आणलें. त्याबरोबर

तो किंकाळ्या फोडूं लागला. आतां या पाजी माणसाच्या अंगवटीस गेल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं असें मथुराताईच्या मनांत आलें. परंतु नुसतें मनांत येऊन काय उपयोग ? तिचा धीर होईना. ती दुरून "अहो हें काय ? अहो हें काय ? तुह्मीं हें काय आरंभलं आहे ? पोरांना काय म्हणून मारतां ?" असें ओरडली.

या वेळीं फारच गोंधळ उडाला, त्यामुळें बची एकदम फार विलक्षण किंकाळ्या फोडूं लागली. तिला इतका वेळ झोंप लागली होती कीं काय कोण जाणे. ती चांगली जवळ जवळ दोन तास निचेष्ट पडली होती. तिच्या किंकाळ्या ऐकण्याबरोबर मथुराताई तिच्याजवळ धांवली; आणि तिला तिनें घट्ट पोटाशीं धरून 'भिऊं नको. घाबरूं नको,' असें ह्मटलें. आपल्या या आरड्याओरड्यानेंच ती घाबरून उठली असावी हें तिला खास वाटलें. आतां या पोरीला सांभाळावें, कीं त्या पोराला सोडवावें, कीं काय करावें, असें तिला होऊन गेलें. हा राक्षस आतां या पोरीलाही एखादा धपाटा देतो कीं काय, असें तिला होऊन गेलें. तसा धपाटा बसला तर ती क्षणांतच प्राण सोडायची ! जें पोर त्याच्या हातीं सांपडलें होतें, तें धामधाकट तरी होतें. परंतु तिची काळजी आपोआप निवारण झाली. त्या आजारी पोरीच्या किंकाळ्या चालल्या असतांच डॉक्टर भगवंतराव दाराशीं आले. त्याबरोबर दिगंबरपंत दचकले आणि एक क्षणभर त्यांच्याकडे घाबरल्यासारखें पाहून एकदम त्यांस म्हणतात, "अहो डॉक्टरसाहेब, हा आमच्या मागें काय हा त्रास तुह्मीं लावला आहे ? आपण यांना आपल्या घरीं कां घेऊन जात नाहीं ? नाहीं तर दुसरी जागा तरी पहा. म्हणजे आम्हांलाही त्रास नाहीं आणखी यांनाही नाहीं. मनुष्यानं सबुरी सबुरी तरी किती करायची ? या कारट्यांनीं रोज त्या नळावर येऊन आम्हांला आणखी आमच्या कुटुंबाला विटाळ करायचा. रोज कोणाला खपेल ? बरं बोलायला गेलं, तर यांनीं सगळ्यांनीं शिव्या द्यायच्या. अशा शिव्या कोण ऐकून घेईल ? घेतल्या. पुष्कळ घेतल्या. शेवटीं आज कांहीं आपल्याला तितका सहनशीलपणा राहिला नाहीं. तेव्हां धरला या थोरल्या पोराला, आणखी बोललों सडकून. अहो याचं उदाहरण पाहून हीं लहान मुलं तसंच करतात. आम्हांला वांकुल्या काय दाखवतात, चेष्टा काय करतात, आम्ही नळावर गेलों कीं मुद्दाम पाणी उडवतात. असा चावटपणा किती सहन करावा ? सांगा तुम्ही. आम्ही बोलून चालून ऑर्थोडॉक्स. या तुमच्या मथुराबाई अशा राहिल्या आहेत, यांच्या हातचा स्वयंपाक हीं पोरं खातात, तेव्हां आह्मी यांना साऱ्यांना शूद्र समजतों. मग आम्हांला विटाळ झालासा वाटेल यांत नवल काय ? ही आपली धर्मसमजुतीची गोष्ट आहे. आम्हांला कांहीं बोवा तुमचा ब्रह्मघोंटाळा नको. आम्हीं कांहीं मिल्ल वाचला नाहीं. आम्हीं कांहीं सर हर्बर्ट स्पेन्सर वाचला नाहीं. लॉर्ड ब्रॉडलॉचे भक्त नाहीं. आम्ही आपले अगदीं जुन्या काळचे, वसिष्ठवामदेवांसारख्या गांवढळांचे वंशज. आमच्या समजुती आमच्याजवळ; तुमच्या तुमच्याजवळ. पण आम्हांला जर त्रास व्हायला लागला, तर आह्मीं किती सहन करावा, सांगा. आला संताप आज याच्या माकडचेष्टांनीं. अहो आतां आमचं कुटुंब आमच्या संध्याकाळच्या धुपारतीसाठीं घागर भरून नेत होतं, या पोरानं

आपला कुठला कातड्याचा तुकडाच त्यांत टाकलान्, आणखी 'माझा कातड्याचा तुकडा तुमच्या घागरींत गेला आहे तो द्या' म्हणून तिला जाऊन बिलगला ! अशा वेळीं किती संताप येईल तुह्मीच सांगा. तें कांहीं नाहीं. मला हा त्रास नको. तुह्मी यांना आपल्या घरीं घेऊन जा. नाहीं तर आपण रहातां तें घर मला भाड्यानं देऊन आपण माझ्या जागेंत रहायला या. ह्मणजे आपली सोय होईल. माझ्या मागला त्रास चुकेल !"

हा लांबलचक कांगावा चालला असतां मथुराताई व मनोहर अगदीं थक्क झालीं. हा हें काय—आणखी कां म्हणतो आहे, त्यांना कांहीं कल्पनाच होईना. मनोहराला दंडानें धरून थोबाडल्याचें अजीबाद् गाळून त्या लहान मुलाला धरल्याबद्दल काल्पनिक मचर्चा सांगून हा नीच माणूस केवढा कांगावा करीत आहे ! हा बोलतो आहे हा मथांचाच दिगंबरपंत काय ! आपण ऐकतों आहोंत हें जागेपणींच कीं झोंपेंत ! त्यांस कांहींसुद्धां समजेनासें झालें. हा माणूस साफ खोटें बोलतो आहे; आणि यानें आज अशा अशा प्रकारचा भयंकर धिंगाणा माझ्या घरांत येऊन केला हें बोलण्याचेंसुद्धां तिला सुचेना. मनोहराचें तर अगदीं तोंडच बंद झाल्यासारखें झालें. डॉ॰ भगवंतराव अगदीं स्तब्ध झाले. हीं मुलें असें कांहीं करतील असें त्यांच्या स्वप्नांतसुद्धां त्यांस वाटलें नाहीं; आणि हा माणूस तर असा बडबड बडबड करून त्यांच्याबद्दल असें बोलतो आहे. तेव्हां आतां काय म्हणावें. असें त्यांस होऊन गेलें.

आपण जें काय बोललों, त्याबद्दल घटकाभरांत निराळाच प्रकार होईल, हें जाणूनच दिगंबरपंत आणखी कांहीं बडबड करीत, हळूहळू दरवाज्याकडे चालले. त्यांची बडबड चालली होती ती अशीच थोडी मासलेवाईक होती. "आमचं काय ? आतां खरोखर आमच्यासारखीं माणसं असल्या शहरांत राहूंच नयेत. सगळा भ्रष्टाकार ! नीतिशिक्षण, नीतिशिक्षण म्हणून ओरड चालायची, आणखी अनीतीची पराकाष्ठा झाली आहे. वर्णाश्रमधर्म मुळींच राहिला नाहीं. पूजाअर्चा देवधर्म नांव नको. जो उठला तो सुधारणा सुधारणा ह्मणून ओरडतो. विटाळ कसले कसले समाजांत कालवले जाताहेत याची तर कल्पना केली कीं अंगावर शहारे येतात. आमच्यासारख्यांनीं आतां काय करावं सांगा. आणखी खोटं तर माणसं पावलोपावलीं बोलायला लागलीं कीं हो. एवढींशीं पोरं आपलीं वाटेल तेव्हां वाटेल तसं खोटं बोलतात. कांहीं त्यांना दिक्कतच वाटत नाहीं. आणखी मोठीं माणसं तर काय वाटेल तें करतातच. त्यांना कसलीच दिक्कत नाहीं. नीति कायन्, सत्य कायन्, पातिव्रत्य कायन्, अरारारारा सगळं भयंकर झालं आहे ! खरंच सांगतों भगवंतराव, तुम्ही यांना इथून काढून यांची सोय करान् आमची सोय करा. जातों आतां मी. तुम्ही आतां त्या पोरीला पहा. आपल्या घरीं तिलान् तिच्या मंडळीला नेलीत तर आपले रात्री बे रात्रीचे हेलपाटे वांचतील."

हें शेवटलें वाक्य बोलतांना त्याचे डोळे डॉक्टर भगवंतरावाच्या तोंडाकडे एकसारखे लागले होते. कदाचित् त्याला असेंही वाटलें असेल, कीं आपण आपल्या मतानं कोणाला समजावयाच्या नाहींत अशा खोंचींनीं बोलतों आहोंत, पण जर का समजल्याच तर परिणाम ठीक होणार नाहीं. म्हणून शेवटल्या शब्दाबरोबर त्यान

पाऊल बाहेर टाकून घराच्या बाहेरचाच रस्ता धरला. घरांत सुद्धां तो राहिला नाहीं.

तो गेल्यावर डॉक्टर भगवंतराव त्या मुलांकडे व मथुराताईकडे वळले, व ह्मणाले "आज हा गृहस्थ घरांत कसा आला, आणखी याचं काय बंड आहे ?" परंतु तितक्यांत मथुराताईंना त्या दुसऱ्या मुलाचें स्मरण झालें. तेव्हां त्यांनीं बबीस निजाविलें. त्या धांवतच बाहेर जाऊन त्यास मोठ्यानें हांका मारून आंत घेऊन आल्या. तों डॉक्टर भगवंतराव बबीजवळ बसून एकीकडे तिची तपासणी करीत आहेत व दुसरीकडे मनोहराला काय झालें, त्याबद्दल विचारीत आहेत. मनोहराला एकदम उस्मरून आल्यामुळें तो ओक्साबोक्सीं रडत आहे. अर्थात् मथुराताई आंत येण्याबरोबर त्यांनाही त्यांनीं विचारलें. परंतु त्यांनीं "कांहीं नाहीं. आमची ही जन्मकथाच आहे. आपल्याला किती सांगून ताप द्यायचा ? आपण आमच्यावर करतां आहां या उपकाराचंच आह्मांला किती ओझं वाटतं आहे. आणखी आपल्याला आमचं तापत्रय ऐकून काय करायचं आहे ? बबी आज अंमळ बरी होती. तिला चांगली दोन घटका गाढ झोंप लागली होती. ती बरी होईल काहो ?"

डॉक्टर भगवंतरावांनीं जाणलें कीं, दिगंबरपंताच्या संबंधाचा विषय बदलण्यासाठीं बबीच्या प्रकृतीची ही गोष्ट यांनीं काढली. परंतु आपण तें समजलों असें न दाखवितां ते मथुराताईला ह्मणतात: "अहो, ती आतां फार अशक्त झाली आहे इतकंच. आतां ती खास बरी होईल, पण या जागेंतून तिला हलवली पाहिजे आहे. पाहूं. मी एक केली आहे योजना. कायरे मनोहर काय झालंरे आज ? हा विक्षिप्त घरांत कशाला आला तुमच्या?" मनोहराचे हुंदके थांबले होते, तेव्हां तो कदाचित् कांहीं बोलेल, असें वाटून मथुराताई आपणच चट्कन् ह्मणाल्या: "कांहीं नाहीं. रोज बाहेरून बोलतात, आज त्यांना आंत यावंसं वाटलं. मी जागा बदलणार आहें. उद्यांचा दिवस [illegible]चा आहे, तो सगळा जागा शोधण्यां[illegible] घालवणार आहें."

डॉक्टर भगवंतरावांनीं जास्त [illegible]ांहीं विचारलें नाहीं. ते थोडे सचिंत बसले. नंतर बबीबद्दल कांहीं सांगून ते निघून गेले.

# प्रकरण २९ वें.

## बिऱ्हाड बदलण्यासाठीं.



डॉ. भगवंतराव गेले तेव्हां मथुराताईस एक प्रकारें बरें वाटलें खरें, कारण त्यांना दिगंबरपंताबद्दल बोलण्याची कांहीं केल्या इच्छा होईना. आपण आपली कर्मकथा या परोपकारी गृहस्थाला किती म्हणून सांगावी, आणि आपल्यावर त्याच्या उपकारांचें ओझें किती ह्मणून लादून घ्यावें हा विचार तिच्या मनांत एकसारखा उभा राहून तिला बोलूं देईना. मनोहरानें डॉक्टरसाहेबांस सर्व हकीकत सांगितली असती, परंतु आपल्या ताईची मर्जी ज्या अर्थी तशी दिसत नाहीं, त्या अर्थी आपण गप्प बसलें पाहिजे असें त्यानें जाणलें व तो स्वस्थ बसला. डॉ. भगवंतरावांनाही जास्त कांहीं विचारणें बरोबर न वाटून ते तेथून बबीसंबंधानें काय सांगावयाचें तें सांगून चालते झाले.

डॉ. भगवंतराव तेथून जाईपर्यंत मथुराताईस ते जातील केव्हां असें झालें होतें. परंतु ते गेल्यावर मिनिट दोन मिनिटें जातात न जातात तों आपण त्यांना ही आजची हकीकत सांगितली असती, तर बरें झालें असतें असें वाटावयास लागलें. कांकीं, हा चांडाळ दिगंबरपंत जर रात्रीं येऊन आपल्याला व आपल्या पोरांना त्रास देऊं लागला तर कसें होणार ? आणि दिवसा त्याला एकाएकीं जावें लागलें आहे, तेव्हां रात्रीं कोणी कांहीं आमचा कैवार घ्यावयाला येणार नाहीं, मनसोक्त बोलावयाला किंवा एखाद्या पोराला धरून कुंबलावयाला सांपडेल, असा विचार करून तो आपल्या बिऱ्हाडांत आला, तर काय करणार ? हें भय तिला आतां पडलें. तिन्ही सांजाची वेळ होऊन गेली, पोरांना कांहीं भाकरतुकडा घालावयाचा त्याच्या उद्योगाला लागावयाचें, तें एकीकडेच राहून ती एकसारखी ही विवंचना करूं लागली. परंतु अशी विवंचना करीत बसून काय निभणार ? थोड्याच वेळांत तिनें काय चिमूटभर पीठ होतें त्याच्या दोन दामट्या केल्या, आणि त्या दोघां लहान भावांस खावयाला घालून पाणी पाजून निजविलें. मनोहरानें व आपण काय करावयाचें याची तिला खरोखरीच विवंचना होती. परंतु मनोहरानें तिला त्या विवंचनेंतून लवकर सोडविलें. तो आपलें अंथरूण पसरून त्याजवर जाऊन पडला व तेथूनच "ताई, मला आज बिलकूल भूक नाहीं. मी निजतों" असें म्हणाला.

मथुराताईची स्वतःचीही तहानभूक पार हरली होती; आणि मनोहराच्या तशा मनःस्थितींत व घरांतल्या नकारघंट्याच्या स्थितींत 'कांहीं तरी खारे बाबा आणि मग नीज' असें ह्मणण्याची मुळींच शक्यता नव्हती. बिचाऱ्या बबीनें मात्र रात्रीं कांहीं मागितलें तर काय द्यावें, हा विचार तिला

जाचत होता. परंतु नुसता विचार जाचून काय उपयोग! काय होईल तें होईल, तिनें कांहीं मागितलेंच तर पिठाचें टोपलें झाडून तें पीठ भाजून पाण्याशीं तिला देऊं अशी आपल्या मनाची समजूत करून व त्या चांडाळानें आंत येऊन आपल्याला त्रास देऊं नये ह्मणून दाराला घट्ट कडी लावून घेऊन तीही आपल्या बबीच्याजवळ आपल्या अंथरुणावर जाऊन पडली. बबी पुनः दुपारच्या प्रमाणेंच आपल्या गुंगींत होती.

मथुराताईला पडून सुमारें पांच दहा मिनिटें झालीं असतील तोंच तिच्या दाराशीं कोणीतरी खुटखुट करतें आहे असें तिला वाटलें. त्याबरोबर तिच्या पोटांत धस्स झालें. दुपारीं एकाएकीं डॉक्टर भगवंतराव आल्यामुळें आपल्याला जावें लागलें त्याचें आतां पुरें उट्टें काढावें ह्मणून हाच चांडाळ आला असावा असें तिच्या मनास पक्कें वाटलें. ह्मणून ती डोकें वर उचलून कानोसा घेऊं लागली. तों दाराशीं कोणी खुडबुडत असून आपल्यास हांका मारीत आहे हें स्पष्ट वाटलें. इतक्या हलके आणि मुकाट्यानें दिगंबरपंत कधींच आपल्याला हांका मारणार नाहीं हें तिला पक्कें ठाऊक—पण 'न जाणों, मोठ्यानें आरडाओरडा केला, तर ही दार उघडणारच नाहीं,—तेव्हां अशा कल्पनेनें दार उघडवून मग वाटेल तसा धिंगाणा घालून दुपारच्याबद्दल सूड उगवावा असा कपटविचार त्याच्या मनांत नसेल ह्मणून तरी कशावरून!' असेंही तिच्या मनांत आलें. ह्मणून तिनें कांहीं केल्या दार उघडावयाचें नाहीं असा निश्चय केला. परंतु तितक्यांत "मथुराताई, ए मथुराताई, दार उघड" असे शब्द ऐकल्याचा तिला भास झाला व तो आवाज दिगंबरपंताच्या कुटुंबाचा—बगुताईचा—असावा असें तिला वाटलें. लागलीच ती दाराशीं गेली. तों पुनः बगूताई तिला ह्मणाल्या: "मथुराताई, एक क्षणभर दार किलकिलं कर, तिकडे परसांत जायचं झालं आहे, परत यायच्या आंत मला घरांत जाऊं दे." मथुराताईनें अर्थात् झटकन् दार उघडलें. बगूताईनीं हातांत एक ताट आणलें होतें, तें झटकन् खालीं ठेवलें; आणि "एवढं खाऊन तूंन् पोरं पाणी प्या. तशीं निजूं नका. मला सगळं समजलं आहे. तुला खायला हरकत नाहीं, निर्लेप आहे." असें ह्मणत ह्मणत तेथून त्या झपाट्यानें निघून गेल्या. मथुराताईनीं दिव्याची वात बारीक केली होती, यामुळें त्यांना त्या दिसल्यासुद्धां नाहींत, आणि "नको. हें कशाला!" वगैरे ह्मणण्यास अवकाशसुद्धां त्यांनीं दिला नाहीं. अर्थात् पुनः दार लावून तें ताट उचलून त्यांनीं दिव्याजवळ नेलें. ताटावरलें झांकण काढतात तों चांगलें तीन मोठ्या माणसांना पुरेल इतकें अन्न त्यांत वाढलेलें! तें पहातांच मथुराताईस फार चमत्कारिक झालें. नवऱ्यानें आमचा इतका द्वेष—दुष्टावा करावा आणखी बायकोनें आपल्या पोटच्या मुलांप्रमाणें आमची काळजी वहावी, हें मनांत येऊन ती त्या अन्नाकडे पहात अचंबाच करीत बसली, त्या अन्नावर तिची वांछा तर जाईना. परंतु त्या बाईनीं इतक्या आस्थेनें व ममतेनें—आपल्या नवऱ्यास समजलें तर तो आपल्यास जिवेंसुद्धां मारील हें पक्कें ठाऊक असतां आपल्यास आणून दिलेल्या अन्नाचा अव्हेर तरी कसा करावा? असा विचार मनांत घेऊन तिनें मनोहरास उठविण्याचा विचार केला, व ती मनोहराच्या जवळ गेली आणि त्यास हांका मारूं लागली.

मनोहर जागाच होता. इकडे काय चाललें होतें तें त्यानें अर्धवट ऐकलेंही होतें. मथुराताईनीं त्याला हांक मारून "ऊठ बाळ. इकडे दिव्यापाशीं ये" असें ह्मटलें.

त्याबरोबर मनोहर एकदम उठून बसला. त्यानें आपल्या बहिणीपुढें हात जोडले; आणखी अत्यंत सद्गदित कंठानें ह्मटलें: "ताई, ताई, मी कधीं कधीं तुझी अवज्ञा करणार नाहीं, पण मला तें त्या चांडाळाच्या घरचं अन्न खायला सांगूं नको. मी भुकेनं मेलों तरी पतकरलं, पण...... " पुढें त्याच्यानें एक अक्षरही बोलवेना. सर्व शब्द कंठांतल्या कंठांत अडखळले. ती त्या वेळची त्याची मुद्रा आणि ते त्या वेळचे शब्द ऐकून मथुराताई चकित झाली. मनोहर अजून लहान, त्याला कांहीं समजत नाहीं असें आजपर्यंत तिला वाटत होतें. परंतु शाळेंतून येण्याबरोबर त्यानें आपण होऊन आपला मधुकरी मागण्याचा विचार तिला सांगितला. त्यानंतर दिगंबरपंताच्या पाजीपणाच्या भाषणानें संतापून त्याच्या अंगावर चवताळून गेला आणि आतां त्याच्या बायकोनें आणून दिलेल्या अन्नाबद्दल हे असे उद्गार काढतो! या सगळ्या गोष्टी पहातांच तो जितका अजाण असें आपण समजत होतों तितका तो अजाण नाहीं, याबद्दल तिची अगदीं खात्री झाली, आणि असें वाटलें कीं, आतां याला आपण जास्त त्रास कांहीं देऊं नये. परंतु किती झालें, तरी ती बायको माणूस, बगूताईसारख्या मायाळू अंतःकरणाच्या बाईनें मुद्दाम कळकळीनें वाढून आणून दिलेल्या अन्नाचा अपमान करूं नये, असें तिच्या मनास वाटलें. आधींच आपल्याला अन्नाची मोताद झाली आहे, आणखी त्यांत तिन्हीसांजाच्या वेळीं घरांत आलेल्या अन्नाला पाठ दाखविण्याचा माजोरीपणा केला तर काय होईल! हा विचार तिच्या मनांत आला व तिनें पुनः मनोहरास ह्मटलें: "बाळ, असा तिन्हीसांजा घरांत आलेल्या अन्नाशीं माजोरीपणा करूं नये रे. दोन घांस खाऊन पाणी पी."

"ताई, मी माजोरीपणा करीत नाहीं. माझ्या पोटांत भुकेनं एकसारखं कालवतं आहे, पण मला तूं तें अन्न खायाला लावूं नको. मी त्याचा अपमान करीत नाहीं. त्याला साष्टांग नमस्कार घालतों. पण तूं मला त्यांतलं खायचा आग्रह करूं नको. आणखी...आणखी......ताई, तूंही पण त्यांतलं एक शीत खाऊं नकोस."

असें ह्मणून त्यानें खरोखरीच उठून त्या ताटापुढें साष्टांग नमस्कार घातला. आणि अधिक कांहीं एक न बोलतां तो स्फुंदत स्फुंदत पुनः अंथरुणावर पडला. त्या त्याच्या करण्यानें मथुराताईच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. मनोहराचें करणेंच बरोबर. आपणच चुकतों असें तिला वाटलें; आणि तिनेंही पाटीखालीं तें ताट ठेवून त्याला वंदन करून ती आपल्या अंथरुणावर पडली. इतक्यांत बाहेर कांहीं आरडाओरडा चालला आहे असें तिला वाटलें. हा बहुतकरून नवराबायकोचा झगडा आहे, असें तिच्या मनास वाटलें. परंतु काय आहे त्याचा तपास काढण्यासाठीं दाराशीं जाण्याची सुद्धां तिला इच्छा झाली नाहीं. नानाप्रकारचे विचार मनांत येऊन मन व्यग्र झालें. त्या व्यग्रतेनें, पोटांत लागलेल्या भुकेनें, उद्यां आतां बिऱ्हाड मिळण्याची खटपट करावी तरी कुठें, या विचारानें, आपलें पुढें होणार

तरी काय या विवंचनेनें, आणि बबी केव्हां जागी होईल, आणि काय मागेल या धास्तीनें तिला थोडी सुद्धां झोंप येणें कोठलें शक्य होतें ? परंतु त्यांतल्या त्यां-तही मनुष्यशरीराच्या गरजा शरीर थोड्याबहुत भागवून घेतेंच; यामुळें तिला दहा दहा पंधरा पंधरा मिनिटांचे झोंपेचे चुटके मिळून कशी तरी शरीरास विश्रांति मिळाली.

दुसरे दिवशीं पहाटे मथुराताई जागी झाली, तों तिचा पहिला विचार अर्थातच आज आतां पुढें काय करावें हा होता. या घरांत राहणें तर आतां तिला अशक्य होतें. आजपर्यंत दिगंबरपंत पोरांच्या अंगाला कधीं हात लावीत नव्हता, कधीं घरांत येऊन अद्वातद्वा बोलत नव्हता, परंतु कालपासून त्याची वृत्ति अजीबाद फिरली. आतां एकदां त्यानें असा प्रारंभ केला आहे, तेव्हां काय करील आणि काय नाहीं, कोण्या पोराला केव्हां धरून बोचाडील आणि किती मारील, याचा मुळींच नेम नव्हता. आपण घरांत नाहीं, मनोहर घरांत नाहीं, तेव्हां घरांत मुलेंच. त्यानें जर कांहीं केलें तर निवारण तरी कोण करणार ? असा एकंदर विचार करून तिनें निश्चय केला कीं, आज दुसरें बिऱ्हाड पाहिल्याखेरीज रहावयाचें नाहीं. थोड्या वेळांत मनोहरही उठला. त्यानें एकवार आपल्या बहिणीकडे पाहिलें. काल रात्रीच्या आपल्या करण्यामुळें तिला राग आला आहे कीं काय अशी त्याला शंका वाटली. परंतु तसा प्रकार त्याला दिसला नाहीं. तेव्हां एक प्रकारचें समाधान वाटून तो आपलें अंथरूण गोळा करूं लागला. ताईशीं कांहीं बोलला नाहीं, मुकाट्यानें प्रातर्विधि करण्यास गेला. ताई उठून तिनें केरवारा केला. थोड्या वेळांत बबी जागी झाली, तिला रात्रीं बरीच झोंप लागली होती. यामुळें ती आज थोडी अधिक तार्जीतवानी दिसत होती. तेव-ढ्यानें मथुराताईस आज संतोष वाटला. तिला त्यांनीं गोड शब्दांनीं उठवून गुळणा वगैरे करण्याला लावून आतां हिला लाप-शीला दूध वगैरे कसें आणावें या विचा-रांत त्या होत्या, इतक्यांत डॉक्टर भगवंत-रावांकडून त्यांचा गडी " मनोहरास तावड-तोब कांहीं कामासाठीं बोलाविलें आहे " म्हणून सांगत आला. डॉक्टरांच्या मनांत कालच्यासंबंधानें कांहीं तरी संशय असावा म्हणून त्यांनीं कांहीं विचारण्यासाठीं बोला-विलें असावें असा दोघांनीं कयास केला आणि मनोहर तावडतोब डॉक्टरांकडे गेला. इकडे आदले दिवशीं रात्रीं विचार केल्या-प्रमाणें बरोबरच पिठानें टोपलें झाडून त्यांत काय सांपडेल तें पाण्यांत कालवून साखर टाकून बबीला द्यावें, या विचारांत मथुराताई होती. दूध आणण्यास दम-डीच्या कवड्याही जवळ नव्हत्या, तेव्हां दुसरा इलाज काय ? ती पोरगी बिचारी अगदीं स्वस्थ पडली होती. मथुराताईनीं आपलें टोपलें झाडण्यासाठीं हातीं घेतलें तों तिला त्या टोपल्याखालीं ठेवलेल्या अन्नाचें स्मरण झालें, आणि असें वाटलें कीं, त्यांतलें कांहीं तिला घालावें. परंतु ति-तक्यांत तें शिळें अन्न तिला पचावयाचें नाहीं हें मनांत आलें आणि त्या अन्ना-बद्दल मनोहर रात्रीं काय बोलला तेंही आठवलें. परंतु आतां त्या अन्नाचें करा-वयाचें काय ? आणि दोन प्रहराची व्य-वस्था करावयाची काय ? हाही विचार तिच्या मनांत उभा राहिला. दरिद्र्यांना काय, शिळें असो ताजें असो, अन्न पुढें

असून तें न खातां अन्न कसें मिळेल, असा विचार पडणें हें किती चमत्कारिक! परंतु मथुराताईंची स्थिति आज तशी झाली होती. पण असा नुसता विचार करून थोडाच निभाव लागणार होता! त्यांतलें अन्न बबीला काय, दुसऱ्या मुलांना काय, किंवा कोणाला काय, 'नाहींच घालावयाचें,' असा निश्चय करून, आपल्या पहिल्या विचाराप्रमाणें बबीच्या खाण्याची व्यवस्था करावयाची म्हणून ती थोडें पाणी घेण्यास गेली. तों इतक्यांत मनोहर घरीं आला. त्यानें कसलेसे दोन डबे ताईच्या पुढें ठेवले, आणि दहा रुपये ठेवून म्हटलें: "ताई, डॉक्टर भगवंतराव आपल्यावर कां एवढे उपकार करतात? त्यांचा आपला कांहीं संबंध नाहीं; पण ते आज काय बोलले, तें जर तूं ऐकतीस तर परमेश्वर त्यांच्याकडून आपल्याला मदत करवतो आहे असंच तुला वाटलं असतं. ते आज मला स्पष्ट म्हणाले: 'तुझ्या मथुताई मला बहिणीसारख्या आणखी तूं धाकट्या भावासारखा मी समजतों. इतके दिवस मीं तुम्हांला पैशाची मदत करण्याला संकोच केला. कारण तुम्ही काय म्हणाल, तुमची बहीण काय म्हणेल कोण जाणे, असं माझ्या मनांत आलं. पण काल रात्रीं मला एकाएकीं असं वाटलं, कीं तुम्हांला उद्यां कोरभर भाकरीची मुद्दां भ्रांत पडणार, मग बिचाऱ्या बबीला दूध कुठलं आहे? बबी आतां बरी होईल. तिला फार जपलं पाहिजे. तेव्हां मी देतों हे दोन डबे घेऊन जा आणखी त्यांतला एक घरीं गेल्याबरोबर उघडून त्यांतून एक चमचाभर घट्ट दूध काढून तें अर्धा पेला ऊन पाण्यांत विरघळवून तिला प्यायला देत जा.' इतकं ते बोलले; थोडेसे थांबले, आणखी माझ्या हातांत दहा रुपये देऊन म्हणाले, 'हे तुमच्या खर्चाकरितां म्हणून घेऊन जा.' मी घेईना, नको म्हणून टाकूं लागलों, तर ते रागें भरले, आणखी म्हणाले 'मी इतके दिवस बोललों नाहीं. परंतु आतां जर तूं माझं ऐकलं नाहींस तर मी पुनः तुमच्या घरीं पाऊल घालणार नाहीं. ताईंना म्हणावं-मी हे तुम्हांला बक्षीस कांहीं देत नाहीं. तुम्हांला पगार मिळून सवड झाली तर माझे आपले रुपये आठ आण्याच्या हप्त्यांनीं फेडा. मग तर झालं! जा. आतां इथें उभा राहूं नको.' माझा नाइलाज झाला आणखी मी निघून आलों. ताई, मला वाटतं सध्यां आतां हे ठेवावे, आणखी मग आपले परत करावे. मी काल संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें आपला माधुकरी मागायला लागणार. आणखी कुठें वार मिळाले, तर वारही पहाणार. आज मला लहान ताट आणखी फडकं दे. आंघोळ करतों आणखी जातों. निदान आमच्या तिघांपुरतं तरी अन्न आज आणीन. उद्याचं उद्यां पहातां येईल. तुझ्यासाठीं आणखी बबीसाठीं एक रुपयाभऱ्याचं धान्य आतां आधीं आणून देतों. ताई, यांचा पैसा किंवा अन्न घ्यायला कोणती मुद्दां हरकत नाहीं, असं आपलं मला वाटतं. ते किती चांगले आहेत!..."

मथुराताई अगदीं स्वस्थ चित्तानें त्याचें बोलणें ऐकून घेत होत्या. क्वचित् त्यांचें लक्ष्य दुसरीकडेही असेल. नंतर त्यांनीं एक दीर्घ उसासा टाकला व त्या त्याला म्हणतात: "मनोहर, मग तूं तरी आजच कशाला माधुकरी मागायला जातोस? आज आपण दुसरं चिन्हाड आधीं पाहूं. तूं थोडेसे जोंधळे, आणखी तांदूळ, आणखी भाजी घेऊन ये. मग मी स्वयंपाक करतें, आणखी तोंपर्यंत तूं शाळेंत जाऊन आ-

उद्याच्या दिवसाची रजा मागून घे. तूं घरीं बबीजवळ बस. मी कुठें तरी बिऱ्हाड पाहून येतें. आज इथून बिऱ्हाड हलवलं पाहिजे. आतां कांहीं इथें राहण्याची सोय नाहीं. कोणत्या वेळीं कोणा पोराला ते मारतील याचा नेम नाहीं. आणखी त्यांचा द्वेष कोणच्या पछयाला जाईल याचाही नेम नाहीं. तूं इथें बसलास कीं मी दोन तीन तास हिंडून जमलं तर कुठें तरी शाळेच्या जवळपास जागा पहातें. यांचा हा द्वेष नको, आणखी छळ नको."

"वा! ही अक्कल जर आधीं सुचती, तर इतक्या थराला गोष्टी आल्या असत्या कशाला!" असें अत्यंत कठोर व कर्कश शब्दांनीं दिगंबरपंत तितक्यांत आंत येऊन ह्मणाले, तितक्यांत मनोहरानें ठेवलेल्या डब्यांकडे व रुपयांकडे त्यांची दृष्टि गेली. त्यांच्या दृष्टीस ते पडूं नयेत ह्मणून मनोहर ते उचलूं लागला तों दिगंबरपंत मोठ्यानें खिंकाळल्यासारखा हंसून ह्मणतो: "ओ हो, हा आपला भगवंतरावांकडून आलेला पगार वाटतं!"

त्याच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच मथुराताईचें सर्वांग संतापानें थरारून त्या लाल झाल्या. त्यांच्या डोळ्यांतून विस्तवाच्या ठिणग्याच बाहेर पडताहेत असा भास झाला आणि त्यांची ती संतप्त मुद्रा इतकी भयंकर दिसली कीं, तो नीच माणूस वर डोळे करून पाहीना. त्याची वाचा तर अजीबाद बसली, इतकेंच नव्हे तर तो हळू हळू आपलें पाऊल तेथून काढण्याच्याच मार्गाला लागला. तो आदले दिवसाच्या फजित्याबद्दल सूड उगविण्याच्या दुर्बुद्धीनें तेथें आला होता. आतां एखाद्या लहान पोराला धरून ओबाडावें, त्यावरून ती किंवा तो थोरला कारटा बोलूं लागला तर पुनः आदले दिवसाप्रमाणें भडिमार करावा हा त्याचा उद्देश होता. परंतु या वेळचें तिचें तें उग्र स्वरूप पहातांक्षणींच स्वारी भेदरली. आजपर्यंत त्याला तिचें फक्त सौम्य स्वरूप मात्र दिसलें होतें, हें उग्र स्वरूप दिसलें नव्हतें. तें दिसतांच तो मागें सरकला व मागें सरकून आपल्याशींच बडबड करीत त्यांच्या दारांतून बाहेर पडतो, तों त्याचें पूर्वधैर्य पूर्णपणें परत येऊन त्यानें मोठमोठ्यानें अद्वातद्वा भापणास सुरुवात केली.

इकडे मथुराताईनीं असा निश्चय केला कीं, एखाद्या धर्मशाळेंत वाटलें तर बिऱ्हाड लावूं; पण आतां या घरांत अन्न ह्मणून खावयाचें नाहीं. ती लागलीच मनोहरास ह्मणाली "मनोहर, तूं दाराला कडी लावून बस. मी आतां एका ठिकाणीं जागा मिळण्याचा संभव आहे, तिथें जाऊन तपास करून येतें. जागा चांगली नाहीं असं ह्मणतात, पण ती कशीही असली, तरी आज तिथें जाऊं, चार दिवसांनीं दुसरी जागा पाहून मग पुनः बिऱ्हाड बदलूं. तूं दाराला कडी लावून घे. आणखी तो डबा फोडून त्यांतून तें कसं द्यायचं तें बबीला दे. दोघां पोरांनाही बाहेर जाऊं देऊं नको. तीं आज अजून उठलीं नाहींत, ही तरी एक बरीच गोष्ट आहे. नाहीं तर त्यांचं काय करायचं ही एक काळजी."

इतकें बोलून ती लागलीच बाहेर पडली. तिला आदले दिवशीं एका ओळखीच्या बाईनें सांगितलें होतें कीं, अमुक पेठेंत अमक्याच्या घराशेजारीं अमक्याचें घर आहे तेथें चार खण जागा आहे. अगदीं तावडतोब मिळण्याजोगी आहे. तेव्हां ती जागा रिकामी असली तर आधीं गुंतवावी, असा विचार करूनच ती घराबाहेर

पडली. ती थेट त्या पेठेंत त्या खुणेच्या वाड्याजवळ गेली. आपल्याला जो वाडा सांगितला तो हाच का ? याबद्दल चौकशी करावी ह्मणून ती इकडे तिकडे पाहूं लागली, तों विचारण्याजोगें माणूस दिसेना. ह्मणून ती त्या वाड्यांत शिरली व 'आबासाहेब दीक्षितांचा वाडा हाच काय ?' ह्मणून विचारण्यासाठीं आजूबाजूला पाहूं लागली. वाड्यांत कोणी नव्हतें. अगदीं शुकशुकच होतें, ह्मटलें तरी चालेल. एवढ्या थोरल्या वाड्यांत कोणीच कसें नाहीं, याबद्दल आश्चर्य वाटून ती परत फिरणार तों एक तिच्याच वयाची तरुण स्त्री ओटीवर आली व तिला 'कोणाकडे तुह्मी आलां ? तुह्मांला कोण पाहिजे ?' ह्मणून विचारूं लागली. तेव्हां मथुराताईंनीं 'आबासाहेब दीक्षितांचा वाडा हाच का ?' ह्मणून विचारलें.

त्या तरुणीनें 'होय' असें उत्तर देऊन लागलीच पुनः विचारलें "तुह्मी कोणाकडे आलां ? कोणाला भेटायचं आहे ?"

"नाहीं, मला कोणाला भेटायचं नाहीं. या वाड्याच्या एका घरांत चार खण जागा भाड्यानं द्यायची आहे, असं मीं ऐकलं, तेव्हां त्याचा शोध करायला आलें. मालशांचं घर इथें शेजारी आहे का ?" मथुराताईंनीं विचारलें.

"आहे, या घराच्या शेजारचं घर टाकून पलीकडलं डाव्या बाजूचं घर तुह्मी ह्मणतां तें आहे. चला तुह्मांला दाखवतें."

त्या तरुण स्त्रीचे "चला, तुह्मांला दाखवतें" हे शब्द ऐकण्याबरोबर मथुराताईस फार आश्चर्य वाटलें. कारण घर श्रीमंतांचें आणि बाईही श्रीमंताची दिसत होती, असें असून आपल्याला घर दाखवायला येतें ह्मणते, तेव्हां हें काय ? असें साहजिकच तिला वाटलें. ह्मणून ती "कशाला ? मला आपण खूण सांगितली तें काय थोडं झालं ? आपण कशाला त्रास घेतां ?" त्या तरुणीस ह्मणाली.

परंतु "त्यांत हो त्रास कसला ? माझी तिथें ओळखही आहे. सहज जाणंही होईल." असें ह्मणून ती तरुण मुलगी तिच्याबरोबर जाण्यास निघाली.

मथुराताईनें मग कांहीं 'नको' वगैरे कांहीं ह्मटलें नाहीं. आणि त्या दोघीही वाड्याबाहेर पडल्या. त्या मालशांच्या घरांत गेल्या. तेथें गेल्याबरोबर त्या घरच्या मालकिणीनें एकदम त्या तरुणीस ह्मटलें: "पद्माताई, आज आपण कोणीकडे इकडे ?"

"मी आपली उगीच आलें. तुमच्या घरांत भाड्यानं द्यायला जागा आहे ह्मणून यांना कळलं, आणखी या आमच्या घरांत आल्या चौकशी करीत; तेव्हां ह्मटलं यांना तुमचं घरही दाखवावं, आणखी तुह्मांला भेटावंही."

"हो, आहे ही पुढच्या अंगणांतली चार खणांची पडवी. दोन रुपये भाडं पडेल. या बाई कुठें असतात ?"

पद्माताईनें तें ऐकून काय उत्तर द्यावें या विचारानें मथुराताईकडे पाहिलें, तों मथुराताई एकदम ह्मणतात: "मी एक गरीब बाई आहें. माझी आई, बाप, आणखी सासरची मंडळी गेल्या वर्षीं प्लेगानं वारली. आतां मी, आणखी बारा वर्षांपासून तीन वर्षांपर्यंतचीं भावंडं राहिलों आहों. मला मास्तरणीची जागा आहे. दहा रुपये मिळतात. चांगल्याच्या घरांत रहावं, ह्मणून बिऱ्हाड पहातें आहें. कांहीं भाडं कमी करून जागा दिलीत तर पहा."

मथुरताईचें तें स्पष्ट व सरळ भाषण ऐकून पद्मताईचें अंतःकरण तिच्याकडे ओढवलें आणि त्या एकदम आपणच ह्मणाल्याः " रिकामी जागा आहे तर द्यायला काय हरकत आहे ? गंगाकाकू, दाखवाना त्यांना जागा. "

" जागा दाखवतें " गंगाकाकू म्हणतात: " पण भाडं कसं कमी करतां येईल ? भाडं नाहीं कमी करतां यायचं. "

पद्मताई ह्मणाल्याः " पण यांना जागा तरी दाखवा. "

गंगाकाकूंनीं जागा दाखविली. मथुरताईला ती पसंत पडली. ' वाटलं तर दुसरी स्वस्ती जागा मिळतांच ही सोडूं. पण आज तर जागा बदलूं ' असा विचार करून तिनें ' जागा मला पसंत आहे आणखी भाडंही मला कबूल आहे ' असें सांगितलें. कारण ह्यातली जागा जाऊं देण्याचें तिच्या मनांत येईना.

' आह्मी आपलं सामान संध्याकाळच्या आंत घेऊन येतों ' असें सांगून व पद्मताईचे जागा दाखविल्याबद्दल आभार मानून मथुरताई आपल्या बिऱ्हाडीं येण्यास निघाल्या.

पद्मेस त्या वेळीं काय वाटलें कोणास ठाऊक ! ती मथुरताईस ह्मणाली: "आतां तुह्मी आमच्या शेजारीं राहायला येणार आहां. माझी आणखी तुमची आपली अचानक गांठ पडली आहे. तेव्हां इकडे आलांत राह्यला ह्मणजे कधींमधीं येत जा. मीही तुमच्याकडे येत जाईन. "

मथुरताई हंसत हंसत: " आपण कशाला यायला पाहिजे ! मला निरोप आला कीं मी येईन. " असें ह्मणून निघून गेल्या.

आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें घडतें आहे, आज बिऱ्हाड उचलून येथें आणून संध्याकाळीं भात करून खाऊं ह्मटलें, तर तसें होतें आहे, हें पाहून तिला समाधान झालें.

# प्रकरण ३० वें.

## पद्मावतीचें मालतीस पत्र.



मथुराबाईनीं त्या दिवशीं आपलें बिऱ्हाड उचललें, त्या नव्या जागेंत नेलें आणि नंतर त्या दिवशीं स्वयंपाक करून जेवल्या. डॉ. भगवंतरावांनीं पाठविलेले रुपये त्यांना त्या दिवशीं फार उपयोगीं पडले. 'डॉक्टरांनीं पाठविलेले हे रुपये आपण अशा तऱ्हेनें घ्यावे का?' हा प्रश्न त्यांचे मनांत वारंवार उभा रहातच होता. परंतु मनोहराचे शब्द त्यांच्या मनाला "त्यांत कांहीं वावगं नाहीं" असें भासवूं लागले. या दुष्ट मनुष्यानें काल रात्रीपासून जो नवाच प्रारंभ केला आहे त्याचा प्रतिकार करण्याला—तत्काळ प्रतिकार करण्याला दुसरा कांहीं उपाय नव्हताच. बिऱ्हाड पाहून मथुराताई घरांत येतांच मनोहराला तिनें बिऱ्हाड कसें सांपडलें याची हकीकत कळविली, ती ऐकतांच त्याला फार आनंद झाला. आतां आपण या भयंकर राक्षसाच्या तोंडांतून बाहेर खास पडणार असें त्यास वाटलें, आणि "ताई, तं ह्मणालीस तसं कर. आज आपण त्या नव्या बिऱ्हाडांत जाऊन जेवूं. इथें अन्नसुद्धां मला गोड लागणार नाहीं." असें त्यानें तिला ह्मटलें.

बचीनें त्याचे ते शब्द ऐकले. त्याबरोबर तीही आपल्या ताईला हांका मारून ह्मणाली, "ताई, आपण दुसऱ्या बिऱ्हाडीं जाणार? खरंच जाऊं या. मला तिथें बरं वाटेल. इथें अगदीं कंटाळा आला. आज मला अंमळ बरं वाटतं आहे."

मनोहरानें तिला दूध डॉक्टरांच्या सांगण्याप्रमाणें तयार करून दिलें होतें. तेंच दूध तिला पुनः एकदां दिलें. थोडेसे तांदूळ आणून भात शिजवून त्या दोघां मुलांस घातला आणि दोन बैलगाड्या आणून सामान भरण्यास सुरुवात केली. हा इकडे प्रकार चालला असतांना दिगंबरपंत सर्व पहातच होता; परंतु सकाळीं मथुराताईचें उग्र स्वरूप पाहिल्या वेळेपासून त्याची तिच्यापुढें येऊन कांहीं बोलण्याची छाती होईना. आपल्या खोलीपुढील ओटीवर बसून "सुंठीवांचून खोकला गेला." "सुंठीवांचून खोकला गेला." असा महामंत्र तो जपीत बसला; आणि त्याबरोबर जे काय दुसरे शाब्दिक छळ करावयाचे, तेही त्यानें यथास्थित सुरू ठेवले. जणूं काय त्यास असें वाटलें कीं, आतां चार दोन घटकांत आपल्याला सांपडेल तेवढें उगवून घ्यावें, ही कोठें जाईल, तेथें मग

आपण संधान बांधूं आणि त्रास देऊं तें कोणीं पाहिलें आहे!

मथुराताई अगदीं बाईन्याप्रमाणें झाल्या. पहिल्या खेपेलाच मुलांना घेऊन जाऊं आणि तेथें ठेवून येऊं, असें तिनें मनांत आणलें. त्याप्रमाणें तिनें व मनोहरानें भराभरा गाड्या भरल्या. दोघां मुलांना बरोबर घेऊन त्या गाड्यांबरोबर ती निघाली. घरांत आतां सामान कांहीं राहिलें नाहीं. फक्त बबीला घेऊन जाण्यासाठीं परत यावयाला पाहिजे होतें. तिला सोबत मनोहर राहिला. तेथें जाऊन पोंचतांच त्या गाडीवाल्यांकडून आपल्या बिऱ्हाडांत सामान ठेवण्याची तजवीज केली. त्या घराच्या मालकीणबाईस काकुळतीनें विनंति केली कीं, 'हे लोक सामान उतरून आंत ठेवीत आहेत तिकडे व या मुलांकडे घटकाभर पहा. मी पुनः परत जाऊन माझ्या आजारी बहिणीला आणखी दुसऱ्या भावाला घेऊन येतें.' गंगाकाकूंनीं "जा, कांहीं हरकत नाहीं. मी पहातें" असें म्हटलें. त्याबरोबर मथुराताई तडक परत येऊन पहाते, तों दिगंबरपंतांचें कुटुंब आपल्या घरांत येऊन बसलें असून बबीला आपल्या मांडीवर घेऊन व पोटाशीं आवळून स्फुंदस्फुंदून रडत आहे. तें पहातांच त्यांस कसेंसेंच झालें. दिगंबरपंत घरांत नाहीं हें तर स्पष्ट दिसलेंच. बगुताई आपल्या नादांत इतक्या गर्क होत्या कीं, मथुराताई आलेल्या त्यांना किती वेळ तरी समजलेंच नाहीं. मथुराताईही त्यांची ती स्थिति पाहून अगदीं स्तब्धपणें उभ्या राहिल्या. आपण येथून जातों म्हणून या बाईला खरें खरें वाईट वाटत आहे; आणि नवरा कर्मधर्मसंयोगानें बाहेर गेला आहे म्हणून ती संधि गांठूनही आली, हें तिच्या लक्षांत आलें. तिनें मनोहराला प्रथम एका बाजूला बोलावून एक चांगली मोठी चार चाकी गाडी आणण्यास सांगितलें. आतां सामानसुमान कांहीं राहिलें नव्हतें. फक्त बबीचें अंथरूण, बबी, मनोहर आणि आपण गाडींत बसून जावयाचें होतें. मनोहर धांवत गेला. बगुताई त्या बहीणभावंडांच्या कुजबुजण्यानें भानावर आल्या आणि मथुराताईस पाहून एकदम म्हणाल्याः "शेवटीं आमच्या छळामुळें तुम्हांला ही जागा सोडून द्यायची पाळी आलीच ना! पण एक प्रकारानं चागलं झालं. कोण्या थरावर गोष्टी गेल्या असत्या-आणखी कोणत्या नाहीं, याचा अगदीं नेम नाहीं. माझी मात्र सोबत नाहींशी झाली. पण मला तरी काय त्या सोबतीचा उपयोग होता? कधीं निर्धास्त येऊन बसायला तरी सांपडत होतं का? कधीं स्वस्थ चित्तानं मला बोलायला सांपडत होतं? कांहीं नाहीं, पण ........" इतक्यांत त्यांना बाहेर गाडी वाजल्याची चाहूल लागली; आणि त्यांनीं बबीला पटकन् खालीं ठेविली व दारांतून त्या पळत सुटल्या. त्यांस असें वाटलें कीं, आपले पतिराज बहुतकरून कृष्णाजीपंत दादांच्या गाडींतून आले असावे. कोण आले, गाडी कोणाची, याचा विचार न करतां त्या तडक आधीं आपल्या घरांत गेल्या. आपल्यास मथुराताईच्या घरांत जर का या वेळीं आपल्या पतिराजांनीं पाहिलें, तर आपली अवस्था काय होईल? आणि आपली अवस्था कांहीं झाली, तरी बिचाऱ्या मथुराताईच्या जाण्याच्या वेळीं कचकच त्यांच्या कपाळाशीं नको असेंही त्या माउलीच्या मनांत आलें असेल.

वास्तविक पहातां मनोहर गाडी आण-

ण्याला गेला होता तों गाडी आली व तिची चाहूल त्यांस लागली होती. पण मनोहर आंत आला तें पहाण्यास सुद्धां ती बिचारी राहिली नाहीं. मनोहर आंत आल्यावर मथुरातांईनीं बगुताईस हांक मारून बाहेर बोलाविलें; आणि म्हटलें: " बगुताई, आजपर्यंत आमच्यावर आपलं प्रेम होतं तसं राहीलच. केव्हां आपल्याला वेळ झाला तर येतहीं जा. तिथें कोणी तुम्हांला........ "

परंतु इतका वेळ अगदीं मुद्दाम आंवरून धरलेला गहिंवर यापुढें अनावर झाला, आणि मथुराताई एकदम रडूं लागल्या. त्यांना पुढें काय बोलावयाचें होतें, तें बोलवेना. बगुताईचीही तीच स्थिति झाली. त्यांनीं मथुराताईस एकदम पोटाशीं धरलें, आणखी त्या मनसोक्त रडूं लागल्या तों दारांतूनच "वा! वा! काय गाढवांचा गोंधळ चालला आहे! आपलीं कामं टाकून हिच्या मढीच्या गळ्यांत मिठ्या ! " असे अत्यंत कर्कशवाणीनें उच्चारलेले शब्द त्या दोघींच्या कानीं पडले. त्याबरोबर विजेचा धक्का बसल्यासारखें त्या दोघींस झालें आणि त्या एकमेकींपासून अलग झाल्या. हा विजेचा धक्का कोणाचा प्रभाव असेल हें वाचकांस सांगावयास नकोच. बगुताई एकदम आपल्या घरांत गेल्या आणि दिगंबरपंत त्यांच्या मागोमाग त्यांना शिव्या देत गेले. त्या शिव्यांचा उच्चार येथें करणें शक्य नाहीं. त्यांच्या त्या आपल्या बायकोच्या मागोमाग जाण्यानें एवढें मात्र एक झालें कीं, मथुराताईस त्या घरांतून चटकन् बाहेर पडून निघून जाण्यास कोणत्या तऱ्हेची अडचण आली नाहीं. त्यांनीं स्वस्थपणें बबीला उचलून घेतली. गाडींत एका बाजूला निजविली. आपल्या बिऱ्हाडाच्या दाराला कुलुप लावलें. आणि शेवटीं स्वस्थपणें बगुताईचा निरोप घेण्यास व त्यांना नमस्कार करण्यासही आपल्यास सांपडलें नाहीं याबद्दल अत्यंत खिन्न होऊन त्या गाडींत बसून आपल्या नवीन बिऱ्हाडीं गेल्या.

हें सर्व ज्या दिवशीं घडलें, त्याच दिवशीं पद्मताईच्या मनांत काय आलें, त्यांनीं आपल्या मैत्रिणीला एक सविस्तर असें पत्र लिहिलें तें आपल्या कथानकाच्या दृष्टीनें उपयोगी आहे ह्मणून येथें देतों:—

प्रिय मैत्रीण मालती इला सप्रेम आलिंगनपूर्वक विनंति विशेषः—

आज जवळ जवळ चार दिवस झाले. मी तुला पत्र लिहितें आहें. कांहीं तरी प्रारंभ करावा. चार दोन ओळी झाल्या नाहीं, तों प्रारंभ बरोबर नाहीं असें वाटावें आणि तो कागद फाडून टाकावा. असें एकसारखें चाललेलें आहे. मला वाटतें निदान आठ एक तरी रोज फाडले असतील. मला वाटतें अतिशय दुःखानें जसें मनुष्याला कांहीं सुचेनासें होतें तसेंच अतिशय आनंदानेंही होतें. निदान मला तरी काय ल्याहावें काय बोलावें हें अगदीं सुचेनासें झालें आहे तें अतिशय आनंदानेंच झालें असावें. तूं जर इथें असतीस तर मी माझ्या या आनंदाचें कारण तुला सांगण्यासाठीं धांवत तुझ्याकडे येऊन तुला कडकडून मिठी मारून काय तें सांगितलें असतें. किंबहुना ज्या कारणानें मला एवढा आनंद झाला आहे तें कारणच तुझ्या हातीं तुला वाचण्यासाठीं दिलें असतें. आज चार दिवस मी तें तुझ्याकडे जसेंच्या तसें पाठवावें कीं त्याची नक्कल करून पाठवावी या विचारांत घालविले. शेवटीं नक्कल

करावयाची असें ठरवून आतांच त्याची नक्कल तयार केली. आणि आतां जसें येईल तसें पत्र लिहून टाकावयाचें. आतां आणखी एक तासही वायां जाऊं द्यावयाचा नाहीं असा निश्चय केला. त्यांतही इतका एकाएकीं निश्चय होण्याला एक विशेष कारण झालें. पण तें तुला या पत्राच्या शेवटीं कळवीन.

मालुताई, माझे दुर्दैवाचे दिवस संपून आतां मला बरे दिवस दिसूं लागणार असें वाटूं लागलें आहे. सोबत पत्राची नक्कल करून पाठविली आहे ती वाचलीस, ह्मणजे मी ह्मणतें हें खरें असें तुला वाटेल. मला वाटतें माझी ग्रहदशा फिरली होती, ह्मणूनच तिकडे तशी बुद्धि झाली होती, ग्रहदशा वाईट होती म्हणूनच माझे भाऊ एकाएकीं नाहींसे झाले, ग्रहदशेमुळेंच बाबा एकाएकीं वारले, आणखी आई मला नानाप्रकारांनीं त्रास देऊं लागली. परंतु तुला काय सांगूं ? सोबतचें पत्र जे दिवशीं हातीं आलें, ते दिवसापासून सर्व बरें होणार असें वाटूं लागलें आहे. आईला त्या पत्रांतला मजकूर सांगतांच तिला फार आनंद झाला व त्यांच्याबरोबर माझे पोरगेही आले, ह्मणजे फार फार चांगलें वाटेल. आणखी आतां जर बुद्धि इतकी चांगली झाली आहे, तर त्या पोरांचीसुद्धां चांगली होईल. असें ती एकसारखी ह्मणून माझ्याशीं जरा बरी वागूं लागली आहे. तिकडे येणें झालें कीं, अमुक करूं, तमुक करूं, असे तिचे बेत सुरू झाले आहेत आणि ती नवस तर इतके करूं लागली आहे कीं, हे फिटावयाचे तरी कसे याबद्दलच मला काळजी वाटूं लागली आहे ! माझे भाऊ येण्याकरितां नवस आहेतच. त्यांत हे आणखी नवस ! कांहीं कांहीं नवस तर आह्मीं जोडप्यानें कुठें जाऊन फेडायचे आहेत ! तेव्हां विलायतेहून आलेल्या माणसांना असे नवस फेडण्यासाठीं इकडून तिकडे नू तिकडून इकडे हेलपाटे घालावेसें वाटणार कसें ? आणि हे नवस फिटणार कसे ? मालुताई, तुला दाखविलेल्या पहिल्या पत्रांत आणखी आजच्या पत्रांत काय विलक्षण फरक ! मी हें पत्र दररोज पांच सहा वेळां तरी वाचिलें. आतां तें बहुतेक पाठ झाल्यासारखेंच झालें आहे. परंतु त्या पत्राची आठवण होतांक्षणीं अंगावर कांटाच उभा राहतो. हें पत्र वाचतां वाचतां एकदां मनांत अशी वाईट कल्पना आली कीं, हें कोणी तरी माझी थट्टा करण्याकरितां तर लिहिलें नाहीं ? थोड्या दिवसांपूर्वीं आलेलें पत्र किती भयंकर, आणखी आजचें हें पत्र किती प्रेमळ ! तेव्हां दोहोंपैकीं एक कोणतें तरी अगदीं खोटें असलें पाहिजे. पण पहिलें खोटें कसें असेल ? कारण त्याचा या पत्रांत उल्लेख आहे. तेव्हां तें तर कांहीं खोटें नाहीं. आणखी तें पत्र लिहिल्याबरोबर पश्चात्ताप झाला असेल, तशांत आबांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी त्यांच्या कानीं गेल्यामुळें जास्तच वाईट वाटलें असेल ह्मणून हें दुसरें पत्र इतकें चांगलें लिहिलें असेल. एकदां मधेंच वाटलें हें पत्र नू तें पत्र दोनही एकदां एकामागें एक अशीं वाचूं ह्मणून तें पत्र काढायला पेटीजवळ गेलें मात्र तों एकदम पोटांत कसेंसेंच झालें. त्या पत्राला हात लाविला कीं हात भाजेल, नाहीं तर गळून पडेल, असें वाटलें. आणखी पेटी तशीच्या तशी लावून मी त्या पेटीपासून दूर गेलें. त्या पत्राचा मला असा कांहीं विलक्षण धाक बसला आहे. काल तर एकदां मनांत असें

आलें कीं, तें पत्र जाळून टाकावें. आतां त्या पत्राचें पुनः दर्शनसुद्धां नको. आणि तें जाळण्यासाठींसुद्धां मीं त्या पेटीला हात लावूं नये. त्याचा विटाळ कोणत्याही कारणाकरितां नको, हें मनांत येतांच पुनः पेटी मीं लावून टाकली. आणि आतां त्या पेटीला पुनः कधीं हात म्हणून लावायचा नाहीं, असा निश्चय मीं केला आहे आणि ज्याची नक्कल तुला मीं पाठविली आहे तें पत्र? तें पत्र माझ्या हृदयाजवळ अहोरात्र ठेविलें आहे. त्या पत्रानें माझ्या कुडींत नवा जीव घातला आहे. सारें जग आतां मला अगदीं निराळ्याच प्रकारचें दिसूं लागलें आहे. आतांपर्यंत तें जसें कांहीं अंधारांत गढून गेलेलें असें दिसत होतें. कोणाच्याही चर्येवर उदासीनपणाच्या कळेखेरीज मला दुसरी कळाच दिसत नव्हती. कोणी विशेष आनंदी आहे असें दिसलें तर त्याला पाहून असें वाटे कीं, याचा हा आनंद किती काळ टिकणार आहे? लवकरच नाहींसा होईल. असा विचार—त्या माणसाचा आनंद लवकरच नाहींसा होईल असा वाईट विचार—मनांत आल्याबरोबर मी तो लागलीच घालवून देई, पण तो आपला तेल्या शाईप्रमाणें निघायचा म्हणून नाहीं. आज चार दिवस झाले माझ्या मनांतून तो विचार पार नाहींसा झाला. सगळें जग आतां मला प्रकाशानें उजाळल्यासारखें दिसतें आहे. त्याच्यावरली उदासीनपणाची कळा पार जाऊन तें अगदीं आनंदानें टवटवीत झाल्यासारखें दिसूं लागलें आहे. एखादुसरें माणूस अगदीं दुःखी—कष्टी असें दिसलें, तर मला वाटतें कीं आपल्याप्रमाणेंच याचें दुःख लवकरच पार नाहींसें होऊन आपल्याप्रमाणेंच हेंही आनंदांत गढून जाईल. मालुताई, तूं इथें नाहींस यामुळें माझ्या आनंदाला थोडासा कमीपणा आला आहे. तूं जर इथें असतीस तर त्याला पारावारच नाहींसा झाला असता. परंतु अगदीं पूर्ण असें झालें म्हणजे मनुष्य अगदीं माजल्यासारखें होईल. म्हणूनच मला वाटतें देव आपल्याला कांहीं तरी कमीपणा ठेवतो.

स्वारी येण्याच्या दिवशीं मीं मुंबईला जावें असा माझा विचार होता. परंतु कालच वसंतराव आला होता, त्यानें सांगितलें कीं त्या बोटीची मुंबईस येण्याची तारीख अगदीं नक्की अशी सांगतां येत नाहीं, असें त्या आगबोटकंपनीकडून कळतें. नक्की झालें म्हणजे तार करूं असें त्याचें लिहून आलें आहे. वसंतराव माझ्याबद्दल किती काळजी वहातो! मी त्याला बोट कधीं येणार, वेळ कोणती, याचा शोध करायला सांगितलें तों त्यानें शोध करतां असें म्हणून आणखी म्हटलें: "तूं मुंबईस जाणार असलीस तर मी तुझ्याबरोबर येईन." त्यालाही ती बातमी कळून तो आनंदानें मला ती सांगण्यासाठींच आला होता. त्याला वाटलें मला पत्र लिहिलें नसेल; पण मग मीं त्याला सांगितलें. पत्र दाखवावें असें सुद्धां एकदम माझ्या मनांत आलें होतें. परंतु असें पत्र पुरुषांना कसें दाखवावें? त्यांतले ते पश्चात्तापाचे उद्गार दुसऱ्याच्या नजरेस—निदान दुसऱ्या पुरुषाच्या नजरेस—पडण्यासारखे नव्हतेच. तुझी गोष्ट निराळी. तूं आणखी मी कुडया मात्र दोन, जीव एकच. पण गडे ही पाठविलेली पत्राची नक्कल आपल्या पतीला दाखवूं नको हो. नाहीं तर तूं आणखी ते एक म्हणून आपली दाखविशील. पण तें अगदीं उपयोगाचें नाहीं.

कोणी आपल्या बायकोला काय वाटेल तें लिहील ह्मणून तें दुसऱ्याला कळलें, कीं संताप यायचा. तेव्हां तुला काय लिहिलें आहे मैत्रिणीनें असें विचारलें तरी नुसती आनंदाची बातमी ह्मणून सांग, पण पत्र दाखवूं नको. वसंतरावाला तार आली, आणखी ती वेळींच आह्मांला कळली तर माझा असा विचार आहे कीं, मुंबईला जायचें. एखादा दिवस आधीं जाऊन कोणाच्या घरीं उतरायचें माझ्या कांहीं मनांत नाहीं. एवढ्याकरितां आह्मीं दोघांनीं असें ठरविलें आहे कीं तार आल्याबरोबर रात्रीं इथून निघायचें. सकाळीं गाडींतून उतरतांच धक्क्यावर जायचें आणखी धक्क्यावरून निघून जी पहिली गाडी इकडे परत यायला मिळेल त्या गाडींतून परत यायचें. पुरुषांची खाण्यापिण्याची कांहींच अडचण नाहीं, माझी मला मुलींच काळजी नाहीं अशी एकंदर व्यवस्था केली आहे. आतां आणखी एक गोष्ट तुला सांगायची आहे. ती सांगितली, तर तुला फार आश्चर्य वाटेल. कदाचित् मला आतां वेडच लागलें असेंही तूं ह्मणशील. पण मला तुला हें त्याहावेंसेंच वाटतें आहे, त्याला मी काय करूं ! हें पत्र आज त्याहायचेंच असा निश्चय माझ्या मनाचा होण्याला जें कारण झालें त्या कारणाचा संबंध येथें येतो, यामुळें मी हें लिहीत आहें. लिहितें आहे ही गोष्ट मी तुला कां लिहितें आहें ह्याचें मला सुद्धां आश्चर्य वाटतें आहे.

आज सकाळीं सुमारें नऊ वाजतां एक तुझ्या माझ्या वयाची तरुण स्त्री आमच्या घरांत आली व 'आबासाहेब दीक्षितांचा वाडा हाच का' ह्मणून कोणाला तरी विचारण्यासाठीं इकडे तिकडे पहात होती. कर्मधर्मसंयोगानें मी अगदीं सहज बाहेर आलें तों माझी नजर तिच्याकडे गेली. मालुताई, तुला काय सांगूं ? तिला पाहिल्याबरोबर मला असें वाटलें कीं, या बाईचें काय काम असेल तें आपण करावें आणि हिला घरीं बोलवावें. ही आपली मैत्रीण आहे. ह्मणून मीं तिच्याकडे कौतुकानें पहात तिला विचारलें: "तुह्मी कोणाकडे आलां आहां ? तुह्मांला कोण पाहिजे ?" तिनें 'आबासाहेब दीक्षितांचा वाडा हाच का' ह्मणून विचारलें. मला आश्चर्य वाटलें. मीं तिला हो ह्मणून पुनः तुह्माला कोण पाहिजे असें विचारलें. तिनें मला सांगितलें, येथें शेजारीं कोठें मालशांचा वाडा आहे तेथें बिऱ्हाडाला जागा आहे असें ऐकून मी शोधायला आलें आहें. तिच्या त्या बोलण्याबरोबर मला असें वाटलें कीं तिला किती जागा पाहिजे ती आपल्या घरांतच द्यावी. असें कां वाटलें, तें माझें मलाच कळेना. परंतु अनोळखी बाईला असें आपण कशाला ह्मणावें ? असा विचार करून मी तिच्याबरोबर गंगाकाकूच्या घरीं गेलें. आईची पुराणाची मैत्रीण गंगाकाकू तुला माहीतच आहे. तिचेंच घर आमच्या शेजारीं आहे, तिच्या घरांत चार खण जागा बाहेरल्याच सोप्यांत आहे. ती जागा गंगाकाकूंनीं दाखविली, आणखी महिना दोन रुपये भाडें पडेल ह्मणून सांगितलें. तुह्मी कोण, कुठल्या ह्मणून विचारलें तर त्या बाईनें—मुलीनें—तुझ्या माझ्या वयाचीच ती मुलगी आहे. तिनें जें सांगितलें तें ऐकून माझ्या पोटांत कालवूं लागलें. अगदीं भडभडून येऊं लागलें. ती बिचारी प्लेगांत विधवा झाली इतकेंच नव्हे, तर तिची आई, तिचा बाप, तिचा चुलता, आणखी उपयोगी पडणारीं सगळीं माणसें मरून चार मुलें—तिचीं भावंडें तिच्या ग-

ळ्यांत पडलीं आहेत. हीं सगळीं भावंडें बारा वर्षांपासून तीन वर्षांच्या मधलीं आहेत. ही बिचारी मास्तरणीचें काम करून दहा रुपये मिळविते आणखी तेवढ्यावर पांच जिवांचा गुजारा करते. तिनें ही आपली हकीकत गंगाकाकूंना सांगतांच मला असें वाटलें कीं, हिला आपण मदत करावी. आपल्या घरीं घेऊन जाऊन बिऱ्हाडाला जागा द्यावी. परंतु एकदम तसें बोलवेना. तेव्हां तिला "तुमची माझी ओळख झाली आहे. तुह्मी आतां आमच्या शेजारीं राहला आलां आहां तेव्हां कधींमधीं या. मीही तुमच्याकडे येईन" असें बोलून मी आपल्या घरांत आलें. पण काय असेल तें असो, तिला पाहिल्यापासून मला असें वाटूं लागलें आहे कीं हिच्यावर आपण सख्ख्या बहिणीप्रमाणें प्रेम करावें—करावें कसलें, तुझ्यावर जसें माझें प्रेम आहे असें माझें तिच्यावर प्रेम जडलें आहे; इतकेंच नाहीं, पण हिचा आणखी माझा पूर्वजन्मींचा कांहीं तरी संबंध असावा असें मला वाटूं लागलें आहे. हें सगळें तुला ताबडतोब कळवावें असें वाटून आणि पहिला सगळा मजकूर लिहिण्याचाही ओढा होता ह्मणून हें पत्र लिहिलें. आज टपालांत टाकवून त्या मुलीची गांठ घेण्यास जाणार आहें. पुनः उद्यां पत्र लिहीन. ती मुलगी फार दुःखी दिसली. ज्याप्रमाणें माझें दुःख देवानें नाहींसें केलें, तसेंच तिचेंही तो माझ्या हातून करवील असें आपलें मला वाटत आहे. आतां अधिक काय लिहूं?

आनंदांत गर्क झालेली, परंतु तूं तो आनंद पहाण्याला नाहींस ह्मणूनच खेद करणारी तुझी मैत्रीण—तुझी बहीण,

**पद्मा.**

# प्रकरण ३१ वें.

## स्वारी आली !



ज्या बोटीनें आपण येतों म्हणून पद्मेच्या नवऱ्यानें लिहिलें होतें, ती बोट तर येऊन गेली, परंतु त्याचा स्वतःचा मुळींच ठिकाण नाहीं पद्मावतीची तर पाण्यांतून बाहेर काढलेल्या माशाप्रमाणें स्थिति होऊन गेली होती. बोट अमुक वेळीं येणार असें नक्की वसंतरावास कळतांच त्यानें तिला येऊन सांगितलें, आणि लागलीच तिनें मुंबईस जाण्याचा बेत केला. मालतीचा नवरा येण्याच्या दिवशीं जशी आधींपासून जय्यत तयारी झाली होती व कितीतरी मंडळी मुंबईस जाऊन स्वतंत्र बंगला वगैरे पाहून ठेवून व्यवस्था झाली, तसें कांहीं या प्रसंगीं झालें नाहीं. वसंतराव व पद्मावती दोनच माणसें मुंबईस गेलीं. मुंबईस गेल्यानंतर आगबोट बंदराला लागण्याची नक्की वेळ कळण्यासाठीं वसंतराव पी. ओ. कंपनीच्या ऑफिसांत चौकशी करण्यास गेला. आगबोटीची नक्की वेळ कळल्यानंतर त्यानें सहज उतारूंची यादी आपलेकडे आली आहे काय ? म्हणून विचारलें. आणखी या बोटीनें कोण कोण येत आहेत, तेंही पहावें अशी त्यास सहज इच्छा झाली. कोणीं कोणीं आगाऊ खोल्या राखून ठेविल्या होत्या, त्यांची यादी त्यास दाखविण्यांत आली. पहातो, तों त्या यादींत पद्मेच्या नवऱ्याचें नांव मुळींच नाहीं. तें पहातांच वसंतराव अत्यंत चकित झाला. परंतु अगदीं आयत्या वेळीं बेत झाल्याकारणानें कशी तरी जागा मिळविण्याची व्यवस्था करून स्वारी निघाली असेल असें मनाचें समाधान करून तो परत गेला. त्यानें तसें आपल्या मनाचें समाधान केलें खरें, परंतु खरोखरी त्याचें समाधान झालें नाहीं. त्याला उलट हुरहूर लागली. पद्मा मुंबईस इतक्या उत्सुकतेनें आली, आणखी तिची निराशा होणार काय ? असा प्रश्न त्याच्या मनांत राहून राहून उठे. स्वारींनीं आयत्या वेळीं बेत बदलला कीं काय ? बदलला असल्यास या गरीब मुलीला विनाकारण मुंबईपर्यंत येण्याचा त्रास आणि शारीरिक त्रासापेक्षां मानसिक त्रास किती होणार ! असें मनांत येऊन त्यानें पद्मेस ऑफिसांत आपण काय शोध केला, आणखी तेथें आपल्याला काय कळलें हें सांगितलेंच नाहीं. कदाचित् आयत्या वेळीं तिकीट घेतल्यामुळें त्याचें नांव इकडे पाठविणें शक्य नसेल असेंच खरें अशी आपली स्वतःची समजूत घालून त्यानें वेळ मारून नेली. सकाळच्या प्रहरीं उठून पद्मा व तो दोघें धक्क्यावर गेलीं. उतारू एकामागून एक येऊं लागले, बोट करून आगबोटीच्या जवळ जाण्यांत तात्पर्य नाहीं असें सांगून वसंतरावानें तिला

एके बाजूस बसविलें. शेवटीं उतारू सर्व संपले, तरीं आपल्या पतीचा पत्ता नाहीं, हें पाहून पद्मेच्या मनाची स्थिति फार विलक्षण झाली. आपणास पत्र आलें तें खोटें असेल काय? आपली थट्टा करण्यासाठीं कोणा तरी दुष्टानें लिहून पाठवून दिलें असेल काय? पण तसें नसावें. कारण अक्षर तिकडचेंच. तिनें तें पत्र बरोबर आणलें होतें. तें तिच्या पोलक्याच्या खिशांत होतें. तें तिनें तेथें आहे कीं नाहीं हें चांपसून पाहिलें. नंतर बाहेर काढलें. आणि त्याच्याकडे एकवार पाहिलें. अक्षर तेंच. त्याबद्दल अगदीं संशय नाहीं. मग हें कसें? पत्र लिहिल्यानंतर पुनः मन बदललें कीं काय? पुनः तेथल्याच मोहांत स्वारी गुरफटली कीं काय? पद्मेच्या मनांत हे प्रश्न उभे रहातांच डोळ्यांत अश्रूही उभे राहिले. वसंतरावाचें लक्ष्य एकसारखें तिच्याकडे होतें. तिच्या चर्येवर होणारा प्रत्येक फरक त्याच्या अंतःकरणांत प्रतिबिंबित होत होता. तिचें समाधान काय करावें हें त्याला समजेना. तिनें आपल्या नवऱ्याचें पत्र बाहेर काढलें, त्याच्याकडे पाहिलें वगैरे सर्व गोष्टी त्याच्या लक्ष्यांत आल्या. तिच्या नेत्रांतील अश्रूंनीं त्याच्याही नेत्रांत आपल्या बंधूंस उभें केलें. परंतु त्यानें तिला किंवा तिनें त्याला आपली मनःस्थिति समजूं नये ह्मणून यत्न केला. पद्मावती एकदम ह्मणाली: "तर मग आपण लागलीच्याच गाडीला परत जाऊं. आतां परत जाण्याला माझें मन नाहीं घेत. मला स्टेशनावर नेऊन पोंचव. मी तिथें बसतें. आणखी तूं आपलें सामान घेऊन ये." पद्मावतीनें असा विचार करावा, हें अगदीं साहजिक होतें. आणि त्या विचाराप्रमाणेंच तिला करूं द्यावें असें वसंतरावास वाटलें. तो आपल्या एका स्नेह्याच्या घरीं उतरला होता. तेथल्या मंडळींनीं पाहुण्यांचा आदरसत्कार करण्याची तजवीज केली होती, परंतु प्रसंग काय आहे हें त्यांस समजलें ह्मणजे ती मंडळी कांहीं नांवें ठेवणार नाहींत असा विचार करून त्यानें पद्मावतीच्या ह्मणण्यास रुकार दिला. दोघेंही निघालीं. ठरल्याप्रमाणें पद्मावती स्टेशनवर जाऊन बसली. गाडीला निघण्याला दोन तास अवकाश होता. वसंतरावानें तिला एक पुस्तक काढून दिलें, आणि सामान घेऊन येतों ह्मणून तो सांगून गेला.

बोरीबंदरच्या स्टेशनवर स्त्रियांच्या वेटिंगरूममध्यें पद्मा तें वसंतरावानें दिलेलें पुस्तक हातीं घेऊन स्वस्थ बसली. तिच्या मनांत या वेळीं काय काय विचार चाललेले होते, त्यांचें पृथक्करण करून वर्णन करणें फारच कठिण होय. ती चर्मदृष्टीनें कोठें तरी पाहून अंतर्दृष्टीनें मात्र आपल्या एकंदर आयुःक्रमाची उजळणीच करीत होती. त्याच बोटीनें आलेल्या कांहीं मडमा तिच्याकडे पाहून ही बाई इतकी कोणत्या दुःखानें गांजली आहे! असें आपल्याशींच ह्मणत असाव्या. परंतु आपल्याकडे कोणी पहातें आहे, आणखी आपलें दुःख आपल्या चर्येवरून प्रत्येकास अगदीं स्पष्टपणें दिसतें आहे हें तिच्या मनांतसुद्धां आलें नाहीं. ती देहानें तेथल्या ईझीचेअरवर होती. मनानें फार दूर कोठें तरी होती. तिच्या अंतःकरणांत शिरून तिच्या विचारांचें शोधन व वर्णन करण्याचा मोह दूर सारणेंच या वेळीं बरें वाटतें.

वसंतराव जो परत गेला, त्यानें तेथील मंडळीस काय वस्तुस्थिति होती, ती सांगून, एकाएकीं जावें लागत आहे, याबद्दल माफी मागितली व दिलगिरी प्रदर्शित केली

आणि सामान घेऊन निघाला. स्टेशनवर आल्यावर त्यानें तिकिटें वगैरे काढून सामान वगैरे जेथल्या तेथें नेऊन ठेवून मग पद्मावतीस तो डब्यांत बसण्यास घेऊन गेला. येतांना जशी ती बायकांच्या डब्यांत बसून आली तशीच या वेळींही बसवावी, असा त्यानें एकवार विचार केला. परंतु पुनः त्याला वाटलें, न जाणों तिच्या नवऱ्याचें पत्र आलें ते दिवशीं जी स्थिति झाली, ती जशी किती वेळ तरी बेशुद्ध वगैरे पडली होती, तशी जर या दुःखामुळें पुनः पडली, तर आपण आपलें जवळ असावें. असा विचार करून त्यानें पुरुषांच्या डब्यांत तिला बसविलें. आणि आपण तेथेंच दुसऱ्या बांकावर बसला. डब्यांत आणखी मंडळी कोणी आली नाहींत. साहेब व मडमा येत, परंतु नेटिव्ह बसले आहेत, असें पाहून दुसरीकडे जात. यामुळें पद्मावतीस अनुकूल तेंच घडलें. कोणाचाही मध्यंतरीं उपसर्ग झाला नाहीं. आपल्या मनांतील विचारांच्या संगतींतच तिचा सर्व वेळ गेला.

कांहीं दुःखें अशीं असतात कीं, त्यांविषयीं दुसऱ्यानें कांहीं उल्लेख केला ह्मणजेच तीं फार दुणावतात. तीं एकट्यानें अनुभवण्यानेंच त्यांचा तीक्ष्णपणा कमी कमी होत जातो. पद्मावतीचें सध्यांचें दुःख अशाच प्रकारचें होतें. वसंतरावानें हें जाणून एका अक्षरानेंसुद्धां त्याबद्दलचा उल्लेख केला नाहीं. पद्मावतीला अगदीं स्वस्थ पडूं दिलें.

गाडी स्टेशनावर आली. पद्मावती घरीं गेली, त्या वेळीं तिची आई दारांतच उभी होती. पद्मावती एकटीच अगदीं खिन्नमुख अशी गाडींतून उतरली. दुसरें कोणी नाहीं हें पाहून तिनें पद्मावतीस "जांवईबोवा आले नाहींत का ?" असा प्रश्न विचारला. परंतु पद्मावती उत्तर देण्याच्या मनःस्थितींत नव्हती. ती कांहीं न बोलतां तडक आपल्या खोलींत गेली. वसंतरावानें ह्मातारीला काय सांगावयाचें तें सांगितलें. ह्मातारीलाही अर्थातच वाईट वाटलें, परंतु तितक्यांतल्या तितक्यांत "हिनं पहिल्यापासूनच तिकडच्या नादीं लागून त्यांचं मन बिघडविलं, तें आतां काय सुधारतं ? असं नवऱ्याशीं वैर करून कुठं चालतं ? तेव्हां त्याला यांनीं त्रास दिला, आतां त्यानं नांव सोडलं." असें मोठ्यानें ह्मटल्याखेरीज व आणखी कांहीं तसेंच पुटपुटल्याखेरीज ती राहिली नाहीं. पोरीला दुःख झालें असेल, तर तिचें समाधान करावें, तिला उठवून कांहीं तरी बोलून झाली गोष्ट विसरून जाण्याचा यत्न करावा वगैरे गोष्टी तिच्या मनांतही आल्या नाहींत. तिला उठवून जेवण्यासाठीं बोलवावें ह्मणून मात्र ती वर गेली. पद्मावती आपल्या खोलींत जाऊन स्वस्थ पडली व इतका वेळ कोणाच्याही दृष्टीस पडूं नये ह्मणून अगदीं दाबून ठेविलेल्या शोकास तिनें मनसोक्त वाफरूं देण्याची मुभा दिली. तिची स्थिति फारच विलक्षण झाली. कोणाजवळ मन मोकळें करून बोलूं म्हणेल, तर तिला जिव्हाळ्याचें असें कोणी नव्हतें. मालती नसल्यामुळें तिला किती किती तरी अवघड झालें होतें. पद्मावती याप्रमाणें मनसोक्त रडत असतांच तिची आई वर आली व दार उघडण्याविषयीं सांगतांना ह्मणाली, "ऊठ, ऊठ बाई, आतां असं करून कसं चालतं आहे ! तुझ्या पोटांत कांहीं नसेल. तर लवकर अंग धू. सगळी तयारी आहे. पहिल्यानं त्यांच्याशीं तशी वागणूक केलीस, तेव्हां आतां हें असंच व्हायचं. मी तरी किती सांगत

होतें, पण माझं ऐकतो कोण ? ह्मातारीचं कोण ऐकतो ! चल ऊठ. "

ह्मातारीच्या मनांत पोरीविषयीं कळकळ नव्हती असें नाहीं. अत्यंत कळकळ होती; परंतु ती कळकळ दाखविण्याच्या प्रकारांत हा असा भाग असे. आपण सांगत होतों त्याप्रमाणें पोरगी वागली नाहीं, आणखी त्यामुळें हा असा प्रकार झाला. ही गोष्ट ती स्वतः कधीं विसरली नाहीं आणि कोणाला तिनें कधीं विसरूं दिली नाहीं. आईच्या पोटांत आपल्याविषयीं प्रेम आहे; परंतु आपल्या वडिलांवरला व त्यांच्या सांगण्याप्रमाणें आपण वागत होतों ह्मणून आपल्यावरला तिचा राग कांहीं केल्या जात नाहीं, हें तिला आजपर्यंत अनेक प्रकारांनीं दिसून आलें होतें. आईचें आतांचें बोलणें तिला कांहीं ऐकूं गेलें नाहीं. परंतु तें बोलणें झाल्यानंतर तिनें फार मोठ्यानें हांका मारल्या तेव्हां पद्मेनें दार उघडलें. तिचा शोकही आतां थोडासा ओसरला होता. असें बसून पडून आपलें कसें चालणार ? असा विचार करून तीही उठली. स्नान वगैरे झाल्यानंतर थोडासा भात खाऊन ती पुढील दारीं येते, तों टपालच्या शिपायानें एक पत्र तिच्यापुढें टाकलें. तें पहातांच तिनें आपल्या नवऱ्याचेंच तें असें ओळखलें आणि लागलीच फोडलें व ती वाचूं लागली. दर ओळ जशी ती वाचीत चालली तसतशी तिच्या चर्येवरली शोककळा नाहींशी होत चालली. पहांटे पूर्व दिशा प्रथम अंधारानें व्याप्त असतांना सूर्याचा एक एक किरण जसा तिच्यावरील अंधाराचें एक एक पुट दूर करीत जातो तसाच हुबेहूब प्रकार त्या पत्रांतील प्रत्येक ओळीनें तिच्या मुखावरील दुःखाचे नाबतींत केला. पत्र अगदीं लहान परंतु मोठें प्रेमपूर्ण होतें. तें असें:-

" प्रिये पद्मे, तूं माझी वाट पाहून अगदीं निराश झाली असशील. हें पत्र तुझ्या हातीं पडेपर्यंत तुझ्या तोंडचें पाणी पळालें असेल. मी तिकडे येण्याला तर इतका उतावळा झालों आहें कीं, पंख जर असते तर मी एका भरारीसरसा तिकडे उडून आलों असतों. राहून राहून तुझी स्थिति काय झाली असेल तें मनांत येऊन अंतःकरण कसेंसेंच होतें. झाल्यागेल्या गोष्टींचा तुला पार विसर पाडून केव्हां एकदां तुला आनंदांत गढून गेलेली पाहीन असें मला झालें आहे. तुह्मी बायका आपला राग तेव्हांच विसरतां. माझ्यासारख्या निष्ठुर नीचानें तुमचा कितीही छळ केला असला, कितीही मानखंडना केली असली, तरी आह्मी पुन्हां दोन गोष्टी बोललों कीं तुह्मी तें सारें विसरून आह्मांला देवाहूनही पलीकडे मानतां. या तुमच्या स्वभावाची पक्की माहिती असल्यामुळेंच मीं तरी तुला पत्र लिहिण्याचें धाडस केलें. प्रिये, मी एकदां तेथें आलों, ह्मणजे मागल्या सगळ्या माझ्या मूर्खपणाबद्दल, नीचपणाबद्दल व दुष्टपणाबद्दल भरपाई करीन. पण मी हें काय करतों ? पत्र लिहावयास बसलों तें तुला मला येऊन पोंचण्यास चार सहा दिवस उशीर लागेल व तो कां हें कळविण्यासाठीं बसलों आणि लिहितों आहें. मागल्या पत्रांत लिहिलें तेंच. प्रियतमे, मागलें पत्र लिहिलें आणि तिकीट घेण्यास ह्मणून गेलों, तों त्या बोटींत जागा नाहीं असें उत्तर मिळालें. तेव्हां माझी किती निराशा झाली असेल ! शेवटीं असें वाटलें कीं, आतां जी कोणती दुसरी बोट मिळेल ती पकडावी, आणि ह्मणून धांवतच चार

पांच कंपन्यांकडे जाऊन कोणाची बोट आधीं निघते त्याची चौकशी केली. तों एका फ्रेंच कंपनीची बोट मार्सेलमधून तावडतोब निघणार आहे असें कळलें. या बोटीचें भाडें थोडें जबर असतें. मजजवळ पैसे तितके नव्हते, तरी एका स्नेह्यापासून घेऊन तिकीट काढून आतांच घरीं आलों आणि हें पत्र लिहिण्याला बसलों, आतां परवांचे दिवशीं येथून निघून तेरवांचे दिवशीं मार्सेल येथून निघेन. एडनास आलों ह्मणजे तार करीन. पण नाहीं. तारबीर कांहीं करणार नाहीं. कारण या बोटींचा नेम नसतो. उगीच तुला नक्की वेळ त्याहावी, आणखी ती चुकली ह्मणजे आतां जशी तुझी निराशा होऊन तूं हवालदील बसली असशील, तशी पुनः बसण्याचा प्रसंग तुजवर येईल. प्रिये पद्मावती, माझें मन किती आतुर झालें आहे, आणखी काय त्याची अवस्था झाली आहे, याचा कांहीं तुला कल्पना यायची नाहीं. एखाद्या मूर्खपणाचा व मनाला खाणारा लेख लिहावा, आणखी मग तो नाहींसा करून टाकण्यासाठीं धडपड करावी तशीच माझी स्थिति झाली आहे. मागलें सगळें पुसून टाकून तुझें मन पुनः अगदीं निर्मळ केव्हां करीन असें मला झालें आहे; तुझी मूर्ति डोळ्यांसमोरून हलत नाहीं. पण ती दुःखी कष्टी अशी सध्यां दिसते आहे ती आनंदमय अशी केव्हां दिसूं लागेल असें मला झालें आहे. आपण अमुक एक तप केलें व अमुक तीर्थाला गेलों म्हणजे आपलें पाप सगळें धुवून जाऊन आपली देवता आपल्यावर सुप्रसन्न होईल असें एखाद्या भक्तास वाटलें म्हणजे तो जसा त्या तीर्थाला जाण्यासाठीं व तें तप आचरण्यासाठीं अगदीं आतुर होऊन जातो, तशीच माझी स्थिति झाली आहे. त्या भक्ताप्रमाणें माझी अशी खात्री आहे कीं, ती माझी देवता माझे सर्व मागले अपराध पोटांत घालून माझ्यावर सुप्रसन्न होईल. आतां अगदीं अकस्मात् असा सुमारें पंधरा दिवसांनीं तुझ्या चरणांजवळ येऊन उभा राहून तुला आश्चर्यचकित करीपर्यंत कसे तरी दिवस लोटायचे आहेत.

... ... ... ... ... ...

हें पत्र वाचतांच तिचें सर्व दुःख पार मावळलें. इतका वेळ आपण उगीच आपल्या देवाला दोष दिला आणि तिकडच्या खरेपणाबद्दलही संशय घेतला, असें तिला वाटून ती आपल्या स्वतःला दोष देऊं लागली. परंतु तें सर्व आतां आनंदाच्या भरांतच चाललें होतें. पत्र वाचतांच तिनें त्यांतील मजकूर आईला सांगितला. त्याचप्रमाणें एक लहानशी चिट्ठी लिहून वसंतरावासही आपल्या नवऱ्याचें न येण्याचें कारण पत्रांत असें असें लिहून आलें आहे, असें कळविलें; आणि ती तें नवऱ्याचें पत्र पुनः पुनः वाचीत बसली. किती वेळ तें पत्र वाचलें तरी तिला समाधान होईना. पहिलें पत्र आणि दुसरें पत्र दोनही पत्रें लागोपाठ वाचून कोणतें विशेष प्रेमळ हेंच ती पहात बसली व दुसरें पहिल्यापेक्षांही फार प्रेमळ व कळकळीनें लिहिलें आहे, असें तिला निश्चित वाटलें. नंतर मालतीला त्याही पत्राची नक्कल करून पाठवावी, असें तिच्या मनास वाटलें. ह्मणून ती लिहीत बसली. मालतीचें पत्र लिहितां लिहितां तिला मथुराताईचें स्मरण झालें आणि तिला वाटलें, कीं आपण त्या बाईकडे जावें. पत्र पुरें केलें. तें गड्याजवळ टाकण्यास दिलें. तों संध्याकाळचे पांच वाजून गेले. तेव्हां आतां मथुराताई घरीं

आल्या असतील किंवा येतील. आपण त्यांच्या घरीं जावें, असा तिनें विचार केला. ती आतां आनंदांत मग्न झाली होती. सकाळपासूनच्या दुःखाचा मागमूससुद्धां आतां राहिला नाहीं. आई केव्हांच पुराणास निघून गेली होती. तेव्हां एकटी बसून तरी काय करणार ? शिवाय मालतीच्या पत्रांत तिनें लिहिल्याप्रमाणें मथुराताईच्या संबंधानें तिच्या मनांत खरोखरीच फार प्रेम उत्पन्न झालें होतें. मध्यंतरीं मुंबईला वगैरे जाण्यासंबंधानें गर्दी असल्यामुळें तिला मथुराताईंचें विस्मरण झालें होतें. तें स्मरण होतांच ती उठली व मथुराताईच्या बिऱ्हाडीं गेली.

मथुराताई अद्यापि आल्या नव्हत्या. तरी त्या थोडक्या अवकाशांत येतील असें मनांत आणून त्या त्यांच्या खोलींत गेल्या. तेथें बबी पडली होती, व मुलेंही तेथेंच खेळत होतीं. पद्मावतीस पहातांच तीं मुलें ह्मणालीं, "बबे, ताई आली, ताई आली. ताई आह्मीं आज बबीला त्रास......"

इतकें तीं बोलतात, तों आलेली बाई ताई नसून दुसरीच कोणी आहे, असें त्यांच्या लक्ष्यांत आलें, आणि तीं वरमलीं. लागलींच दूर पळालीं व खालीं पहात उभीं राहिलीं. बबी नुसती टकटक पहातच राहिली.

त्यांची ती मौज पाहून पद्मावती हंसली व त्या मुलींजवळ जाऊन बसून ह्मणालीः "मी दिखील तुमची ताईच आहें बरं का! इकडे या इकडे तुह्मी दोघे. पहा बरं नीट मी तुमची ताई आहें का नाहीं तें. या इकडे, अगदीं भिऊं नका. अगदीं मी तुमची ताई आहें."

तेव्हां तो थोरला मुलगा ह्मणतोः "नाहीं. तुह्मी आमची ताई नाहीं. आमची ताई तुमच्यासारखं मोठं लुगडं कुठें नेसते ?"

आपल्या थोरल्या भावाचें हें धाडस पहातांच धाकट्यालाही अवसान आलें, आणखी तो ह्मणालाः "आणखी तुमच्यासारखं कुंकू कुठें ती लावते ? आमची ताई नाहीं तुह्मी. आमची ताई आतां येईल. तुह्मी ताईच्याकडे आलां होय ?"

पद्मावती त्यावर हंसून ह्मणतेः "हो हो. तुमच्या ताईकडे आणखी तुमच्याकडे आलें मी. पण तुमच्यासारखीं वेडीं मुलं दूरच पळतात, त्याला काय करावं ?"

नंतर त्या बबीकडे वळल्या, आणखी ह्मणाल्या, "मुली, मी तुझी ताईच आहें बरं. तुला काय होतं ग ?"

बबी नुसती चकित दृष्टीनें पहात होती. तिला काय उत्तर द्यावें तें सुचेना आणि ती अगदीं बुचकळ्यांत पडली. तों इतक्यांत मथुराताई आंत आल्या. त्यांना पहातांच मथुराताईंना फार आनंद झाला; व त्या लागलीच ह्मणाल्याः "आपल्याला येऊन फार वेळ झाला का ?"

पद्माताईः—छे. छे. नुकतीच मी आलें. मी आलें तेव्हां या मुलांची काय मौज ! त्यांनीं मलाच ताई ह्मणून ह्मटलं आणखी मग तोंडाकडे पाहून बेटीं दोघेंही ओशाळून तिकडे लांब उभीं राहिलीं. या ह्मटलं, तर येत नाहींत. मी तुमची बहीणच नाहीं का हो ?

मथुराताईः—हो बहीण नाहीं तर कोण? बबे, तुला कांहीं दूधबीध ? या पोरीला आज किती दिवस आपलं दुखणं लागलं आहे ! ते डॉक्टर भगवंतराव फार भले गृहस्थ ! ते फुकट घरीं हेलपाटे घालून औषध देताहेत. आतां तीनच दिवस झाले, इथें आल्यापासून पुष्कळ बरं आहे. आणखी त्यांनीं तें दूध दिलं आहे, तेंही तिच्या बरंच पचनीं पडलं आहे.

अशा प्रकारें भाषणास सुरुवात होऊन मथुराताईंच्यासंबंधाची सर्व हकीकत पद्माताईनीं त्यांजपासून काढून घेतली. थोड्या वेळांत मनोहरही आला. त्याला व त्या सर्व भावंडांना पाहून पद्माताईचें अंतःकरण अतिशय कळवळलें व या अशा माणसांस जर आपण आश्रय दिला, तर सत्पात्रीं दान होईल, असें तिच्या मनांत वारंवार घोळूं लागलें व ती त्याप्रमाणें कसें करावें व यांस आपण मदत करतों असें न दिसून येतां कशी मदत व्हावी, याच्या विचारास लागली.

त्या दिवसापासून तिनें उठल्यासुटल्या त्यांच्या घरीं जाणें अगर कांहीं तरी निमित्त काढून त्यांना आपल्या घरीं बोलाविणें या गोष्टीस सुरुवात झालीच. शिवाय मनोहरास तिनें आपल्या येथें वार ह्मणून जेवावयासही सांगितलें. डॉक्टर भगवंतरावांनाही वसंतरावाबरोबर तिनें निरोप पाठविला कीं, आपण या मंडळींना जशी मदत करतां आहां तशीच मीही एक मदत करणारी आहें. तरी कांहीं लागल्यास मला कळवावें.

अशा प्रकारें मथुराताई व पद्माताई यांची ओळख होऊन मैत्रीस सुरुवात झाली. दररोज दोघींचें प्रेम वाढत जाऊन थोड्याच अवधींत ह्मणजे एका आठ दिवसांत एकमेकींच्या सर्व हकीकती एकमेकींस कळल्या. आणि मुलांची तर पद्माताईच्या ठिकाणीं फारच भक्ति जडली.

इकडे आपला नवरा आज येईल काय, उद्यां येईल काय, हा निदिध्यास पद्माताईस होताच. तिनें आपल्या मनानें रोज हिशेब चालविला होता. रोज सकाळीं उठलें का, आज बहुतकरून स्वारी येईल अशी आशा उत्पन्न होई व रात्र झाली कीं निराशा होई. असें करतां करतां दुसऱ्या आठवड्यांत एके दिवशीं दुपारीं जेवल्यावर ती मथुराताईकडे जाण्यास निघाली असतां दारांत येते तों एक पुष्कळ सामानानें भरलेली चार चाकी गाडी येऊन उभी राहिली !

# प्रकरण ३२ वें.

## प्रेमपूर.



ता गाडी थांबतांच त्यांतून नखशिखांत साहेबी थाटाच पोषाख केलेला एक तरुण गृहस्थ पटकन् उतरला. कानडी पेट्या, ट्रंका वगैरे सामानानें भरलेली गाडी पहातांच पद्मताई-ची चर्या प्रसन्न झाली होती; परंतु आतां या गृहस्थास पहातांच तिच्या चर्येवर किंचित् लज्जायुक्त स्मित दिसूं लागलें. त्या तरुण गृहस्थाच्या चर्येवरही आनंदीआनंद व प्रेमळता हीं दिसूं लागलीं. परंतु पद्मेच्या चर्येवरील स्मित क्षणभर टिकलें असेल नसेल, तें लागलींच मावळलें. आणखी त्याची जागा दुःखानें व्यापली. तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले, कंठ दाटून आला. आपले वडील हा आपला आनंदाचा दिवस पहाण्याला नाहींत, याबद्दल तिला वाईट वाटलें; तथापि आपलें दुःख तिनें आवरलें. ती पटकन मागें वळली, आणि तिनें गड्यास हांका मारल्या. गडी येतांच त्यास सामान आणण्यास सांगून आपण आंत गेली. थोरला दिवाणखाना वगैरे जागा तिनें साफसूफ करून ठेविलीच होती, तेथें ती गेली. तो तरुण गृहस्थ त्या गड्यास काय सांगावयाचें तें सांगून लागलीच तिच्या मागोमाग वर गेला; आणि एखाद्या नाटकांतला दुष्टवृत्तीचा उपनायक वाटेल तितका छळ करून त्या नाटकाच्या पर्यवसानीं जसा नायिकेच्या जवळ जाऊन गुडघे टेंकून दीन व केविलवाणानें क्षमा मागतो, तद्वतच त्या गृहस्थानें या प्रसंगीं केलें. तो आपल्या पाठोपाठ आलेला पाहून लाजून खालीं मान घालून आपल्या पायांच्या नखांकडे पहात उभ्या राहिलेल्या परंतु अत्यंत आनंदवृत्तींत असलेल्या पद्मताई-जवळ तो गेला व आपल्या खिशांतला हातरुमाल काढून तो पसरून त्यावर गुडघे टेंकून आपल्या पत्नीचे दोन्ही हात धरून तिच्या खालीं वांकलेल्या मुखाकडे आपल्यावर केलेल्या डोळ्यांनीं पाहूं लागला. इतक्यांत तिच्या डोळ्यांवाटे आनंद व दुःख यांनीं उभे राहिलेले अश्रू पटापट पडूं लागले. त्यांतले कांहीं त्याच्या गालावर पडले. परंतु तिकडे लक्ष्य न देतां तो एकदम तिला सद्गदित कंठानें ह्मणालाः "प्रिये, तूं मला क्षमा केलीस असं मला एकदां तूं आपल्या मुखानं सांग. त्याखेरीज माझं समाधान होणार नाहीं. त्याखेरीज मी या जागचा उठणार नाहीं. मी मोठा दुष्ट, नष्ट, चांडाळ! मीं तुला फार छळलं. परंतु आतां मला पश्चात्ताप झाला आहे. आतां मला तुझी खरी योग्यता कळली आहे. पहिल्यानं मला असं वाटलं, कीं तूं मला कसली क्षमा करतेस? पण पुनः वाटलं कीं तसं नाहीं. तुझं ब्रीद कांहीं तसं नाहीं. तेव्हां आपण

प्रत्यक्ष जाऊनं तुझ्याजवळ क्षमा मागावी. बोल. तूं आपल्या तोंडानं एकदां ह्मण, कीं 'मीं क्षमा केली. मागलं सारं विसरलें.' ह्मणजे माझं कांहीं ह्मणणं नाहीं. तोंपर्यंत मी उठणार नाहीं......"

तो तरुण गृहस्थ अशा प्रकारें बोलत असतां पद्माताईस फारच गहिंवराचें भरतें आलें. जे अश्रू एक दोन, एक दोन असे पडत होते, ते आतां तुटलेल्या सरांतून गळणाऱ्या मोत्यांप्रमाणें एका पाठीमागून एक पडूं लागले. तें पहातांच तो तरुण गृहस्थ तसा गुडघे टेंकलेला असतांच ह्मणतोः "अहाहाहा! प्रेमाश्रूंनीं मला स्नान मिळेल असं तर माझ्या स्वप्नींसुद्धां आलं नाहीं. आतां एकंदर मीं सांगितलं तसं ह्मण. लाजूं नको. माझा आग्रह ह्मणून ह्मण. ह्मणः 'मीं क्षमा केली. मागलं सारं विसरलें.' त्याखेरीज माझं समाधान होणार नाहीं ह्मणतेसना? त्यांत काय लाजायचं आहे!"

पद्माताई मोठ्या कष्टानें पुटपुटली: "हें काय हें? मीं काय क्षमा करायची आहे!"

"पण माझ्याकरितां ह्मण ह्मटलंना? दुष्यंतानं शकुंतलेजवळ अशीच आपल्या दुष्ट वर्तनाबद्दल नाहींका क्षमा मागितली? माझ्या समाधानाकरितां ह्मणेनासका पण? त्यांत तुझं काय जातं? बरं, इथें दुसरं कोणी नाहीं तर त्याला लाजायचं आहे!"

शेवटीं आतां हे कांहीं ऐकायचे नाहींत असें मनांत येऊन पद्मावती एकदांची मोठ्या कष्टानें ह्मणाली, "आपला आग्रहच आहे ह्मणून मी ह्मणतें. पण हें बायकांच्या ब्रीदाला कसंसंच वाटतं. झाल्या गोष्टी गेल्या. आतां काय त्यांचं!"

"नाहीं पण, माझ्या आग्रहास्तवच का होईना. पण ह्मण, मीं सांगितले शब्द ह्मण."

पद्माताईनें ते त्यानें सांगितलेले शब्द उच्चारले. त्याबरोबर तो तरुण गृहस्थ झट्कन् उठला, त्यानें आपला हातरुमाल उचलला, आणि एकदम तिला जवळ घेऊन आलिंगन त्या रुमालानें तिचे डोळे पुशीत ह्मणतो, "आतां मं समाधानच झालं. काय असेल तें असो, इतकं तूं ह्मटल्याखेरीज माझं समाधानच झालं नसतं." पतीनें मिठी मारीपर्यंत पद्माताई अगदीं आनंदसागरांत निमग्न होती. परंतु मिठी मारतांक्षणींच काय कारण असेल कोण जाणे, आपण आपल्यास कसें सोडवून घेऊं असें तिला झालें. ती लागलीच ह्मणाली: "आतां हें काय? आई नाहीं तर कोणी सहज वर येईल. मी खालीं जातें, चहा वगैरे करून घेऊन येतें. आधीं मला नक्की वेळ कां नाहीं लिहिली? मी सगळी तयारी करून बसलें असतें."

"नक्की कळविणार कसं? बोट मुंबईस केव्हां लागणार याचाच नेम नव्हता. पण बोट मुंबईस येऊन पोंचल्यावर पांच मिनिटंसुद्धां तिथें ठरलों नाहीं. जी पहिली गाडी सांपडली ती धरली, आणखी इथें आलों. आतां मला चहा कॉफी—कशाची इच्छा नाहीं. तूं मला क्षमा केलीस यांत सगळं आलं."

असें म्हणून त्यानें तिला पुनः एकदां घट्ट मिठी मारली व नंतर तो आपले कपडे वगैरे उतरण्याच्या विचारास लागला. पद्मावतीताईस अत्यंत आनंद झाला, परंतु हें आपलें सुख पहाण्याला आपले आबा नाहींत हें मनांत येऊन त्यांतल्या त्यांत तिला खेदही होत होता. नंतर ती खालीं गेली व जेवणाखाणाच्या तयारीला लागली. जेवणखाण मोठ्या आनंदांत

झालें. सासूबाईंना आनंदाचें भरतें आलें; आणि त्यांनीं आपण जांवईबोवांच्या नजरेस न पडतां म्हटलें, "आतां सुखानं नांदा. देवाच्या दयेनं कांहीं कमी नाहीं. आपण आलां तशींच माझीं पोरं एकदां आणा. आणखी त्यांचे दोहोंचे चार हात करा. तुमच्याचसारखं त्यांना आनंदांत राहिलेलं पाहिलं, म्हणजे मग कांहीं इच्छा राहिली नाहीं. ते गेले, तशी मीही सुखानें जाईन. त्यांनीं काय कागदपत्र करून ठेविले आहेत, त्याप्रमाणें व्यवस्था करा. हिनं अजून ते कागद उघडले सुद्धां नाहींत. म्हणते ' माझे भाऊ आल्याखेरीज उघडणार नाहीं. ' आतां तुम्ही आलां, मला कांहीं काळजी नाहीं. तिलाही आतां कांहीं काळजी नाहीं. आतांपर्यंत दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी प्यावं लागत असे. आतां तें कांहीं नाहीं. तेव्हां त्या पोरांना शोधून आणा. ह्या कागदाप्रमाणें काय ती व्यवस्था करा. आतां काय तें तुमचं तुम्ही करा. तीं पोरं आलीं, तरी त्यांना कांहीं समजतं आहे, असं नाहीं. त्यांना तरी सल्लामसलत आपण द्याल तीच खरी... "

जांवईबोवा जेवून उठून आंचवून टुवालाला हात पुशीत असतांना तेथें पलीकडे दाराच्या आड तोंड लपवून म्हातारीनें हें सगळें भाषण केलें. त्यांतील बराचसा भाग ऐकून स्वारी हंसली व " आहे. आतां मी आलोंच आहें. तेव्हां त्यांचा शोध लावून सगळी व्यवस्था लगामीं लावून दिलीच पाहिजे. ती व्यवस्था लावून मी आपल्या उद्योगाला लागेन. मग तर झालें ? उद्यांपासून आतां त्याच कामाला लागेन. आपण अगदीं काळजी करूं नका. मी आतां तो मागला बाळा नाहीं. आतां माझे डोळे उघडले आहेत. मनुष्य ठक्केटोणपे खाल्ल्याखेरिज शहाणा हो नाहीं "

बाळासाहेबांचें ( जांवईबोवांचें टोपणनांव बाळासाहेब होतें ) हें भाषण ऐकतांच सासूबाईंना मूठभर मांस आल्यासारखें झालें. आणखी जांवईबोवा वर निघून गेलेले पाहतांक्षणींच सासूबाई आपल्या लेंकीस म्हणतात: "पद्मे, आतां तरी शहाणपणानं यांना मुठींत राख. प्रकरण फार निबळलेलं दिसतं आहे. हें जर यांच्या देखत झालं असतं तर ! पण नाहीं. जो नेमानेम नाहीं, तो कसा घडून येणार ? बरं चला. त्यांना पाहून तरी काय करायचं आहे ! कोणीकडून तुम्ही सुखानं नांदलां म्हणजे झालं. आम्हांला आणखी काय पाहिजे ? एकदां माझीं पोरं अशीं येऊन त्यांचीं लग्नं होऊन जाऊन त्यांना संसाराला लागलेलं मला पाहूं दे म्हणजे झालं. आतां तूं यांच्या पाठीस लागून एकदां त्या पोरांचा शोध करव. त्यांना एकदां माझ्या दृष्टीस पाड. काय चमत्कार तरी बाई, साता समुद्रांपलीकडे गेलेले जांवईबोवा आले आणखी इथल्या इथेंच कुठें तरी कऱ्हाडवऱ्हाडांत बसलेले माझे पोरगे आज चार महिन्यांत सांपडेनात ! तें कांहीं नाहीं. त्यांचा शोधच झाला नाहीं चांगला. तुझा येऊनजाऊन भरंवसा त्या वसंतरावावर. कोणी तरी आपलं मायेचं माणूस असल्याखेरीज अशीं कामं कुठें काय झालीं आहेत ! तो इथल्या इथें बसून सगळ्या चौकशा करणार. त्या कुठें व्हायच्या तशा होणार आहेत ! आतां हें ठीक झालं. आतां यांचा पिच्छा पुरव. मी तर रोज त्यांची पाठ पुरविणारच. मला म्हातारीला कसली लाज आली आहे ! जशीं तीं दोघं माझीं पोरं, त्यांतलेच हे. आज आपला पहिलाच दिवस म्हणून आपली त्यांच्या नजरेस न पडतां

आडून बोललें, पण आतां पांचचार दिवसांनीं खुशाल त्यांच्या नजरेस पडून बोलणार. त्यांना कांहीं वाटायचं नाहीं. पण मीच काय आपली बोलत बसलें तुझ्याशीं! तूं आपली वर जा कशी! राहूं दे काय असेल काम तें. आतां विडाशनसुपारीच पहा काय तें. आतां त्यांची मर्जी संभाळायची हा एक नेम धर. पैशाअडक्याला कांहीं कमी नाहीं. कांहीं मागितलं संवरलं तर नाहीं ह्मणूं नकोस. समजलीस? जा. जा. आतां जा विडा दे नेऊन. असं बावचळल्यासारखं आणखी बावळ्यासारखं करूं नकोस. जा.सामानसुमान सगळं कांहीं आहे नाहीं तें पहा. विडा करून दे. त्यांना रात्रीं जाग्रण झालं असेल. पंधरा दिवसांच्या प्रवासाची दगदग झाली असेल. अंमळ पायबीयू चेप. आणखी आतां खालीं येऊं नकोस. आपली त्यांच्या मागेंमागें अस. वेडे पोरी, तुझं नशीब थोर ह्मणून इतक्या लवकर त्यांची वृत्ति निवळली. नाहीं तर अशीं माणसं कशीं एकदम ताळ्यावर यायचीं? आतां जर पुनः हातचे सोडलेस तर मात्र तुझ्यासारखी वेडी कोणी नाहीं. जा...."

ह्मातान्या माणसांस आपल्या स्वतःच्या शब्दासारखें कांहीं गोड लागत नाहीं. तीं बोलावयाला लागलीं कीं आपला शब्दप्रवाह चालू रहातो. त्याला खळ ह्मणून नाहीं. त्यांत आणखी अशा माणसांना आनंद झालेला असला ह्मणजे तर विचारूंच नका. आईच्या त्या उपदेशपर व्याख्यानानें पद्मावतीस फार हंसूं येऊं लागलें. शेवटीं आपण आतां येथून हलल्यावांचून हिचा हा बोलण्याचा सपाटा बंद व्हावयाचा नाहीं हें मनांत आणून ती बाहेर आली; व माडीवर जाणार तों समोरून मथुराताई आंत आल्या. त्या आल्याबरोबर पद्मावतीस ह्मणाल्याः

"तुह्मी आज येणार होतां पण इतका वेळ झाला, आलां नाहीं तेव्हां काय आहे? आपले यजमान आले असं मनांत आलं आणखी उठून इकडे आलें."

पद्मावतीच्या प्रफुल्लित चर्येवरून आपला तर्कच बरोबर आहे असें मथुराताईस वाटलें व त्या लागलीच ह्मणाल्या, "मग मी बाई उगीच या गर्दीच्या वेळीं आलें. जातें मी. जरा आपलं स्थिरस्थावर झालं ह्मणजे येईन. बरं झालं बाई एकदांची काळजी निवारण झाली तुमची. जातें आतां. येईन आतां केव्हां तरी."

"बसाहो मथुराताई, जातां कसल्या इतक्यांत?" असें ह्मणून पद्मावतीनें त्यांचा हात धरून ओटीवरल्या झोंपाळ्यावर बसविलें आणि आपण त्यांच्याचकडे येण्याला निघालों होतों, इतक्यांत दारांत 'गाडी आली' वगैरे सांगितलें. मथुराताईस तें ऐकून फार आनंद झाला व तो तो आनंद शब्दांनीं व्यक्त करून दाखवीत होती; इतक्यांत वरल्या बाजूस एका खिडकीकडे तिचें सहज लक्ष्य गेलें. तेथें बाळासाहेब एक चिरूट ओढीत उभे होते. बाह्यतः ते सहजगत्या उभे असतील असें वाटलें. परंतु त्यांचा त्याप्रमाणें उभें राहण्यांत हेतु आहे हें मथुराताईच्या सहज मनांत आलें व त्या तिकडे आणखी न पहातां पद्मावतीस ह्मणाल्याः "इकडे पहा, मी आतां खरंच जातें. आपली वर वाट पहाताहेत. आतां आपण आहोंतच."

"मथुराताई, तुह्मी सुद्धां माझी थट्टा करूं लागलां का? मग काय ह्मणायचं आहे?"

इतक्यांत बाळासाहेब मोठ्यानें खांकरले.

त्याबरोबर त्या दोघींनीं सहजच वर पाहिलें. बाळासाहेबांस तेंच हवें होतें. शेवटीं मथुराताई एकदम उठल्याच; आणि तितक्यांत घरांतून आईसाहेब बाहेर आल्या; व त्यांनीं पद्मावतीस खालींच बसलेली पाहून ह्मटलें: "पद्मे, अजून तूं इथेंच ! हें अस्सं अस्सं तुह्मां पोरींचं होतं. आतां चटकन विडा द्यायला जायचं तें टाकून आपली इथ बसलीस, याला काय ह्मणावं ! कांहीं यांच्याशीं मोठं महत्वाचं काम का अडलं होतं ! जा. त्या पुनः येतील काम असलं तर. जा. त्यांना अंमळ पडाविडायचं असेल. पायबीयू रगड जा. अगदीं अशुद्धाळ पोरगी आहेस तूं. तुला कांहीं समजत नाहीं. सांगावं न शिकवावं तरी किती ! जा. जा. जा. ते वर उभे राहून पहात हेत. त्यावरून नाहीं का तुला तर्क हात ! जा. जा. बसूं नको इथें. ते आपलं माझं बोलणं ऐकून हंसताहेत."

बाळासाहेब वरून एकसारखे चिरूट ओढून धुराचे लोट हवेंत सोडीत खालीं मथुराताईकडे व आपल्या बायकोकडे पहात होते; आणि खरोखरीच सासूचें बोलणें थोडें थोडें त्यांना ऐकूं गेल्यामुळें त्यांना हंसूंही येत होतें.

शेवटीं पद्मा तेथून निघाली. मथुराताईही निघून गेल्या. पद्मा वर गेल्यानंतर बाळासाहेब तिला ह्मणतात: "कां खालींच बसलां होतां इतका वेळ ? बाकी खालींच बसलांत तें कांहीं वावगं नाहीं. साहेबलोकांत चालच आहे कीं जेवणानंतर बायकांमंडळींत पुरुष बसत नाहींत. तेव्हां तुह्मीं केलं तें एका अर्थी ठीकच केलं. बरं पण ती आपल्याच वयाची नवीन कोण मैत्रीण पाहिली आहे ? माळनीच्या बद्‌ली आणली वाटतं कुठून ?"

"बद्‌ली कसलीन् काय कसलं ! गरीब बिचारी एक मास्तरीण आहे. प्लेगमध्यें तिचीं सारीं माणसं मरून ती बिचारी एकटी आणखी तिचीं भावंडं तीन राहिलीं. अशा स्थितींत त्यांचेन् आपलं पोट भरते, आणखी राहते. काय करणार ! इथें शेजारींच राहिली आहे. तेव्हां माझीन् तिची ओळख पडली. ती इथें येते."

"अरेरे. गरीब बिचारी. अशा बायकांनीं पुनर्विवाह करावा. तरी पण आतां पुढं काय विचार आहे ? मी आजच रात्रीं या मंडळींच्या शोधाला जाणार आहें. पण जाण्यापूर्वीं मला त कागद्‌पत्र काय आहे, तें पहायला सांपडलं तर बरं."

"कागद्‌पत्र ! ते दोघे आल्याखेरीज कागद्‌पत्र पाहूं नयेत असं मला वाटतं."

"तें कां ! ते कुठें गेले आहेत, तेव्हां त्यांची अशी वाट पाहूं नये. कागद्‌पत्र आहेत कुठें !"

"आहेत इथेंच, पण ते दादासाहेब आणखी वसंतराव ......"

"दादासाहेब आणखी वसंतराव ! त्यांचा काय संबंध ! आण ते.कुठें आहेत ते."

"किल्ली दादासाहेबांजवळ आहे."

"दादासाहेबांजवळ ! ती कां ! बरं तर त्यांच्याकडे जाऊन ती घेऊन ये. आज ते कागद्‌पत्र पाहिले तर पाहिजेत. जा. जा. बसूं नकोस. किल्ली घेऊन ये. तूं नूं मीं बसून पाहूं काय आहे तें. दुसऱ्याची जरूरी नाहीं."

पद्मा फार विचारांत पडली, तिला कांहीं सुचेना.

# प्रकरण ३३ वें.

## किल्ली आणली.



पद्माताई तें एकण्याबरोबर अगदीं स्तब्ध बसली. आपले भाऊ कोणीकडे गेले आहेत, ते परत येईपर्यंत आपण आपल्या बापाच्या कागदपत्रांस हात ह्मणून लावावयाचा नाहीं, असा तिनें निर्धार केला होता. ते घरीं येतील तेव्हां त्यांचे देखत तो बंद केलेला लखोटा उघडावयाचा. त्यांच्या पश्चात् उघडावयाचा नाहीं, असा तिचा कृतनिश्चय. तो निश्चय आज मोडावा लागतो असें तिला स्पष्ट दिसलें. नवऱ्याची तिला चर्याच अशी दिसली कीं, त्याच्या मनांतून ते कागद आज पहावयाचेच असें असावें.

आपण तिला दादासाहेबांकडे जाऊन किल्ली आणावयास सांगतलें असतां ती स्वस्थ विचार करीत बसली आहे, हें पहातांच तो तिला ह्मणतोः "काय! विचार काय करीत बसली आहेस! मीं काय सांगितलं, तें ऐकलं नाहींस कां! तें कागदपत्र पाहणं हें पहिलं काम, तें तूं अजून केलं नाहींस, याचंच मला मोठं आश्चर्य वाटतं. त्यांत कोणाकडे येणं असेल त्याचे कागद असतील, कोणाच्या दस्तऐवजाची मुदत भरत आली असेल; ती जर मुदत मध्येंच भरत आली असली, तर लागलींच त्याच्या वसुलाची तजवीज नको करायला! ते दोघे मूर्ख कुठें जाऊन बसले आहेत, ह्मणून काय पैसे बुडूं द्यायचे! असा भलताच आग्रह काय उपयोगी! जा. आतां आधीं जा. आणखी ती किल्ली कोणची ती घेऊन ये. नाहीं तर मी दुसरा कांहीं प्रयत्न करून ती सेफ उघडीन. तुह्मांला बायकांना कांहीं समजत नाहीं. आणखी भलतंच कांहीं तरी करून बसतां. आपले कागदपत्र पेटींत घालून ठेवून लोकांच्या स्वाधीन त्या पेटीची किल्ली काय ह्मणून करायची! तुझी तूं चांगली शिकलेली संवरलेली, तुझं तुला समजूं नये! कागदपत्र काढायचे, नीट पहायचे, आणखी त्यांत लिहिल्याप्रमाणं काय जी व्यवस्था असेल ती करून टाकायची. त्यांत त्या दोघांचा कांहीं संबंध असला तर असला! त्यांना शोधण्याची खटपट चालूच होती, पण ते कुठें सांपडत नाहींत ह्मणून कागदपत्र उघडायचे नाहींत हा कुठला वेडा विचार! जा. आतां जा, आणखी ती किल्ली घेऊन ये. ते कागदपत्र पाहून त्यांची व्यवस्था लावल्यासेरीज मी त्यांच्या शोधाला नाहीं

जायचा. त्याचा कांहीं नेम आहे? एखा-द्याकडे पांच दहा हजार रुपये येणं असेल, आणखी तें इतक्यांत मुदतीबाहेर जात असेल किंवा गेलंसुद्धां असेल, तेव्हां त्याची पुढं तजवीज नकोका करायला? जा जा ऊठ."

पद्मावतीस तें वसुलासंबंधाचें बोलणें अगदीं बरोबर वाटलें. कोणाकडे येणें असण्याचा फार संभव होता. देणें कांहीं कोणाचेंही दिसलें नाहीं. असतें तर केव्हांच कोणी तरी "आपलें असें असें देणें आहे तर त्याची वाट काय?" असें विचारण्यास आला असता. तसा कोणी आतांपर्यंत आला नाहीं. तेव्हां कोणाचें देणें आबासाहेबांस नव्हतें हें खास. शिवाय कोणाचें देणें असल्याबद्दल तिच्या कानीं कधीं कांहीं आलेंही नव्हतें. परंतु घेणें कोणाकडे असण्याचा संभव तिच्या आज मनांत आला. तरी पण त्याही बाबतींत तिला तितकें कांहीं वाटेना. कारण बापाचा सर्व व्यवहार तिला माहित होता. पुष्कळसा व्यवहार तिच्या देखत—तिच्या हातूनच ह्मटलें तरी चालेल—होत असे. तेव्हां नवऱ्यानें सुचविल्याप्रमाणें कांहीं असण्याचा तिला संभव दिसेना. तरी पण न जाणों, तसें कांहीं असलें तर आपल्या हलगर्जीपणानें येणें बुडूं नये, हें तिलाही बरोबर वाटलें. आतां तिला अवघड वाटलें तें इतकेंच कीं, आतांपर्यंत आपण ज्याला त्याला "आपले भाऊ आल्याखेरीज आपण कागदपत्र पहाणार नाहीं असा निश्चय केला आहे" असें सांगत होतों, आणि आतां तो मोडावा कसा?

तिच्या मनांत अद्यापि कांहीं चलबिचल चालली आहे असें पहातांच पुनः तिच्या नवऱ्यानें थोडा त्रासिक चेहरा करून तिला ह्मटलेंः "मी मघापासून तुला सांगतों आहें काय, आणि तूं बसली आहेस काय? तूं मला काय मूर्ख का समजतेस? असं वेड्यासारखं करून कसं चालेल? आतांपर्यंत दिरंगाई केलीस हाच मूर्खपणा झाला. तेव्हांच दादासाहेब, वसंतराव, आणखी चार मंडळी जमवायची, पटकन् काय कागदपत्र आहेत ते पहायचे, आणखी ......जा आतां तरी जा. आतां त्यांची कांहीं जरूरी नाहीं. पण किल्ली त्यांच्याजवळ देऊन बसली आहेस ह्मणून सगळी पंचाईत. नाहीं तर मी जाऊं का? पण मला नाहीं वाटत किल्ली मागायला मीं त्यांच्याकडे जावंसं. तूंच आपली जा, आणखी घेऊन ये काय त्यांच्याकडे दिलं असशील तें."

"त्यांच्याजवळ काय दिलं आहे? त्यांच्याजवळ फक्त किल्ली दिली आहे. आणखी कांहीं नाहीं. ते किल्लीसुद्धां आपल्याजवळ नकोच ह्मणत होते, पण मीं आपली त्यांच्या पाठीस लागून त्यांच्याजवळ ती दिली. कोणीच इथें नव्हतं, तेव्हां त्या विलक्षण प्रसंगांत मी दुसरं काय करूं?"

"खरं तें. त्या वेळीं तूं केलंस, तें ठीकच केलंस. तसंच करायला पाहिजे होतं. पण चार आठ दिवस गेले नाहींत, तों पुढं काय करायचं, काय नाहीं, याचा विचार तुझा तुला सुचायला पाहिजे होता,—निदान त्यांनीं तरी तुला सुचवायला पाहिजे होता! पण त्यांचं काय जातं आहे, कांहीं कोणाकडून येणं असेल तें बुडालं तर......!"

"छे छे त्यांच्याकडे काय त्याचा दोष? ते मला ह्मणत होते कीं, एकदां तो लखोटा काय आहे तो पहा आणखी मग तुला काय थांबायसंवरायचं असेल, तें थांब. पण माझ्याच मनांत काय आलं, कीं ते दोघे परत येईपर्यंत एकाही कागदाला हात लावूं नये. म्हणून मींच त्यांना मोडता घातला."

"वाहवा! वाहवा! शहाण्याच आपण. फारच शहाण्या? दीर्घ शहाण्या ह्मणायच्या. बरं पण आतां तरी जा लवकर. तेव्हां एक कोणी नव्हतं तुह्मांला अक्कल शिकवायला, पण आतां मी आलों आहें ना? आतां तर कांहीं हरकत नाहीं? मला कळलं त्या भावा-करितां कां थांबावें असं तुझ्या मनांत आलं तें। पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्याना कांहीं तुझा स्वभाव माहीत नाहीं, कां आबासाहेबांचं आपल्याबद्दल काय मत होतं हें त्यांना ठाऊक नाहीं? पण एका दृष्टीनें तूं केलेंस तेंही कांहीं वावगं नाहीं. पण अजून जर त्यांचा पत्ता नाहीं, तर आतां काय कल्पांतापर्यंत थांबा-यचं आहे? काय आहे तें पाहून त्याची व्यवस्था बरोबर लावून टाकली ह्मणजे झालं. ते आले कीं, त्यांच्यापुढें सगळे कागदपत्र टाकूं, कांहीं नोटांचीं व्याजं आणायचीं असतील, कांहींचे केजेस भरले असले तर त्या नोटा रिन्यू करून आणायच्या असतील. तूं शिकली सवर-लीस, आबांनीं तुझ्याकडून सगळा व्यवहार करवला, पण अखेरीस बायकांचा स्वभाव-सिद्ध अजाणपणा आपला तुझ्या ठिकाणीं असावा तसा आहे. आतांच पहाना मीं मघांपासून तुला चारदां सांगितलं कीं, तूं जा आणखी किल्ली घेऊन ये. पण तुला आपलं 'कसं जावं? किल्ली कशी मागावी?' असंच वाटतं आहे. या भिडस्तपणाला काय ह्मणावं? कांहीं त्यांची किल्ली तुला मागायची आहे! आपली किल्ली मागा-यची आणखी घेऊन यायची. त्यांना त्यांत बरंच वाटेल. कारण विनाकारण इतके दिवस अंगावर घेतलेली जबाबदारी दूर झाली. जा बोवा आतां, नाहीं तर तुला आतां लोटून घालीन. हें काय हें? असला कसला संकोच?"

हें शेवटलें बोलणें त्यानें मोठ्या प्रेमांत येऊन आपल्या हातीं असलेल्या चिरुटाचा झुरका मारून धुराचा लोट तिच्या तोंडा-वर सोडीत सोडीत ह्मटलें. शेवटल्या शेवटल्या शब्दांत किती तरी गोडपणा व प्रेम हीं भरलीं होतीं! त्याच्या चर्येवरही दिसत होतीं तीं. धूर सोडतां सोडतां त्यानें तिला आपल्या दोनही हातांनीं हळूच उठविण्याचाही प्रयत्न केला. त्या प्रेमाच्या दर्शनानें पद्मा-वतीचें सर्वांग रोमांचित झालें, आणि ती चटकन् हंसत हंसत उठली. तिनें लाग-लीच गाडी जोडावया सांगितलें व आ-पली अंगावर घेण्याची शाल उलगडतां उलगडतां ह्मणाली: "आपणही आलां माझ्याबरोबर तर काय होईल? त्या मंड-ळीला एकदां भेटायला गेल्यासारखंही होईल, आणखी यासंबंधांत काय करा-यचं, कसं करायचं, त्याबद्दल त्यांचा विचा-रही घ्यायला सांपडेल."

"त्यांच्या भेटीला यायला मला मुळींच हरकत नाहीं. ते तरी आह्मांला आबासाहे-बांसारखेच आहेत, पण त्यांचं कांहीं माझ्याबद्दल बरं मत नाहीं. मी इथें होतों, तेव्हांच नव्हतं. त्यांत मी इंग्लंडला गेल्या-वर तर फारच वाईट झालं असेल. त्या फेअरब्रेनसाहेबाचे तेही चूटपुटे दासच होते. ह्मणजे त्यांची निंदा करायचा तसा माझा हेतु नाहीं, पण मी गेलों आणखी त्यांना तें बरं वाटलं नाहीं किंवा ते माझ्याशीं नीट बोललेच नाहींत, तर मग आपल्याला अगदीं अपमान झाल्याप्रमाणें वाटेल. आणखी मग तिथें कसं वर्तन होईल, आणखी कसं नाहीं, याचा कांहीं नेम नाहीं. तूं आतां जा. त्यांचं मायाविषयीं काय मत आहे,

तें मला कळूं दे. मग पाहूं ! त्यांच्याकडे जायचं नाहीं असा माझा कृतनिश्चय थोडाच आहे ! "

हें सर्व तो बोलत असतां त्याची चर्या अत्यंत त्रस्त व थोडी क्रुद्धही दिसत होती. यामुळें पद्मावतीनें त्याला त्याबद्दल जास्त कांहीं ह्मटलें नाहीं, फक्त " आपण त्यांना भेटलांत तर त्यांना आनंदच होईल. आबा असते आणखी आपण आलां असतां ह्मणजे त्यांना जसा आनंद झाला असता, तसा त्यांना आनंद होईल. "

" बरं. बरं जाऊं मग. तूं किल्ली तर घेऊन ये. आधीं आपण दोघंच बसून ते कागदपत्र काय आहेत ते पाहूं. आणखी मग त्या बाबतींत कांहीं विचार घेण्याच्या निमित्तानं मी त्यांच्याकडे जाईन. त्यांत त्यांना मोठेपणाही दिल्यासारखा होईल. आज गेलों ह्मणजे ह्मणतील किल्लीसाठीं आला. हो! लोकापवादाला भ्यावं लागतं. तूं जा. आतां माझी सगळी हकीकत सांग. मग मी जाईन. आधीं नाहीं जाणार. जा आतां. "

इतकें झालें, तों गाडी जोडून तयार असल्याची वर्दी आली. तेव्हां पद्मावती लगबगीनें खालीं गेली. आतां किल्ली आणावी कीं नाहीं, याबद्दल तिच्या मनांत मुळींच संशय राहिला नाहीं. ती दादासाहेबांच्या घरीं गेली, तों दादासाहेब नुकतेच कोठें बाहेर जाण्यास निघाले होते. तिला पहातांच ते माघारे वळले व तिला ह्मणतातः " या पद्माताई, आज या वेळींच कुठें आलीस? तुझा नवरा ह्मणे यायला निघाला आहे. आतां येणारच तो. "

पद्मा तें ऐकून किंचित् लाजली व तिला किंचित हंसूं आलें. इतक्यांत आंतून वसंतराव तेथें आला व ह्मणालाः " स्वारी आली वाटतं. त्याखेरीज हें हंसूं आलं नसतं. अरे वा! आले तरी कोणच्या बोटीनं अन् केव्हां? आम्हांला अगदींच कळूं दिलं नाहींस? केव्हां आलेत? पण आह्मांला कोणा गड्या माणसाच्या हातीं कळवायचं तरी होतंस. अरे वा! पद्माताई तूं इतकी खोल झालीस अं? "

" वसंतराव, अशी थट्टा रे! काय करतोस माझी! खोल कसलीन् काय कसलं? दुसऱ्या कोणाला तरी पाठवायचं, तें मीच आलें आणखी काय पाहिजे? पण दादासाहेब बाहेर जाताहेत वाटतं. हें सांगायला आलें अन् थोडी कामालाय आलें होतें. ते कागदपत्र आतां पाहिलेच पाहिजेत. त्यांत कांहीं भानगडी असल्या, कोणाकडून येणं असलं, तर त्याची मुदत किती आहे, काय आहे, तें सगळं पाहिलं पाहिजे असं ह्मणायचं. आणखी तेवढ्यासाठीं ती सेफची किल्ली आणायला मला पाठवून दिलं. इकडे भेटायला येण्याचा हेतु आहेच. पण नीट कागदपत्र पाहून मग काय त्यासंबंधाचा सल्ला घ्यायचा असेल तो घ्यायला जावं असं ह्मणायचं. "

तें ऐकण्याबरोबर वसंतराव थोडा सचिंत झाला. नंतर त्याच्या दोनही भिवया एकदम मध्यभागीं आकुंचित झाल्या. त्यानें आपल्या कपाळावर, केंसांवरून हात फिरविला, आणि आपल्या बापाकडे पाहिलें. बापाच्याही चर्येवर थोडा तसाच प्रकार झाला. परंतु तो वसंतरावाच्या चर्येवरल्या प्रकाराइतका स्पष्ट नव्हता. दादासाहेब किंचित् वेळ स्तब्ध बसले. नंतर ह्मणालेः " जरूर, जरूर. ते आले आहेत तेव्हां आतां कोणी तरी जबाबदारी घेणारा आला. आतां कांहीं हरकत नाहीं. चल वर मी किल्ली देतों. किल्ली करतां तूं स्वतः

एवढी कशाला आलीस? मला एक चिठ्ठी पाठवायची होतीस. मी स्वतःच घेऊन आलों असतों. नाहीं तर वसंताला पाठवला असता. नुसतं निरोपाचं काम होतं. पण पद्मे, तुझा नवरा आला, तसेच तुझे भाऊही आले असते तर फार चांगलं झालं असतं. कुठें मूर्ख गेले आहेत पृथ्वीच्या कोणच्या भागावर, कोणाला ठाऊक! वर्तमानपत्रांत जाहराती दिल्या, पोलिसांत वर्दी दिल्या, तरी पत्ता नाहीं तेव्हां हें आहे तरी काय गौडबंगाल? बरं चला हे तरी आले हेंच विशेष."

असें ह्मणत ते वर जाऊं लागले. पद्मा त्यांच्या मागोमाग गेली. दादासाहेबांनीं आपल्या सेफमध्यें एका जाड पाकिटांत किल्ली घालून ठेविली होती. तें पाकीट त्यांनीं बाहेर काढलें व तसेंच तें पद्मेच्या पुढें करून ते तिला ह्मणाले: "हें बघ हें पाकीट. यांत किल्ली आहे. हें वर चारी बाजूला सील आहे, हें सील तूं इथें फोडूं नको. घरीं असंच असं पाकीट घेऊन जा. आणखी असंच त्यांच्या हातांत दे. त्यांना तीं सिलं बिलं नीट बघूं दे. पद्मे, हें काम मोठं जबाबदारीचं असतं. हीं सीलं आबासाहेबांच्या आंगठीचीं आहेत. ती आंगठी तुझ्याजवळ आहे. नाहीं तर असं कर. मीच तुझ्याबरोबर येतों आणखी त्यांना सगळी हकीकत सांगून मग परत येईन. वाटलं तर ते माझ्या देखतच सेफ उघडून तो लखोटा फोडून पहातील. नाहीं तर नुसती किल्ली त्यांच्याजवळ मी देईन, आणखी काय हकीकत झाली ती सांगेन. कसं करूं बोल? का वसंतरावाला पाठवूं? का तूं आपली सगळं नीट सांगून देशील?

"काय मी सांगूं? आपण आलां तर फारच चांगलं होईल. पण मी आपल्याला कशी माझ्याबरोबर चला म्हणून म्हणूं? वसंतराव आला ह्मणजे झालं."

दादासाहेब त्यावर ह्मणाले: "ठीक आहे. वसंतराव, तूं जा हिच्याबरोबर. हें पाकीट त्यांच्या स्वाधीन करून नीट सिलंबिलं दाखवून दे. आणखी असंही सांग कीं, आपल्याला माझी जरूर वाटली तर मध्यरात्रीं आपण बोलावणं पाठवलं तरी मी येईन."

वसंतरावानें तें ऐकलें, परंतु 'हो' किंवा 'नाहीं' कांहींच उत्तर दिलें नाहीं. मात्र त्याच्या ओंठावर कांहीं तरी उत्तर आलें असावें, तें त्यानें तितकेंच दाबलें आणि तो ह्मणाला: 'मला कशाला जायला पाहिजे? जिनं आपल्याजवळ किल्ली दिली, तिच्या स्वाधीन ती आपण केली. आतां ती आपली जाईल, त्यांच्याजवळ देईल, सगळं कांहीं करील. आपल्या जाण्यानं कोणाला ठाऊक त्यांना बरं वाटेल का वाईट वाटेल!'

वसंतरावाचें तें बोलणें ऐकतांच पद्मा त्याच्यावर एकदम रागावल्याप्रमाणें करून ह्मणाली, "हें काय रे हें असं तुझं बोलणं? तुझ्या येण्यानं कोणाला वाईट का वाटेल? तुला आलंच पाहिजे माझ्याबरोबर. आणखी तूंच ही किल्ली दिली पाहिजेस तिकडे. मला ठाऊक आहे, तुला कां राग आला आहे तो! तुझ्याला कळवलं नाहीं हेंच ना कारण? पण येऊन तरी असा किती वेळ झाला? शिवाय लागलींच दादासाहेबांना भेटायला येण्याचा बेत आहे. कागदपत्र पाहून पुढें काय करायचं तें ठरावायचं—त दादासाहेबांना विचारल्याखेरीज का ठरवणार आहे कोणी? तुझं आपलं कांहीं तरी एक असतं.'

तिचा तो खरा खरा राग पाहून वसंतरावास कौतुक वाटलें, आणि तो एकदम ह्मणाला, " पद्माताई, त्यांनीं बोलावल्यावर का आह्मी येणार नाहीं ? त्यांनीं बोलावल्यावर मध्यरात्रीं सुद्धां येऊं, असं नाहीं का दादासाहेबांनीं आतां सांगितलं ! पण न बोलावतां जायचं का नाहीं, एवढाच प्रश्न."

" प्रश्न रे कसला ? दम धर, मी काकूला सांगतें तुझं हें बोलणं. मालूताईचं असं कांहीं काम असतं तर अशीच बोलावण्याची वाट पहातास वाटतं ? दादासाहेब, आपण तरी सांगाहो याला. यानं माझ्याबरोबर आलंच पाहिजे. हा नाहीं ह्मणतो आहे, इतके आढेवेढे घेतो आहे, तेव्हां याला पाठवाच. 'नको' ह्मणून सांगितलं तर मग ये परत. "

" काय? तुझ्या तिथें येऊन तुझ्या नवऱ्यानं 'नको' ह्मणून सांगितलं, 'तुह्मी कशाला आलांत ? तुह्मांला कोणी बोलावलं होतं ' असं विचारून आह्मांला जायला सांगितलं ह्मणजे परत येऊं का ? ठीक आहे. तूंच असं सांगतेस तेव्हां तसं करूं " वसंतरावानें हंसत हंसत पद्मावतीस असें ह्मटलें खरें, परंतु त्याच्या चर्येवर जो मनोविकार दिसत होता तो निराळाच दिसत होता. पद्माताई त्याच्यावर कांहीं तरी उत्तर देणार तों दादासाहेब मध्येंच ह्मणाले, " तुमचं हें भांडण तोडायला मला कांहीं आतां वेळ नाहीं. वसंतराव, आतां मीं सांगितल्याप्रमाणें हिच्याबरोबर जा. मग पुढचं पुढें पाहूं. मी आतां कामाला जातों—पद्मे, तुमच्या घराकडेच चाललों आहें. परत येतांना मला वेळ मिळाला, तर मी तिकडे येईन. मग तर तुझं कांहीं बोलणं रहाणार नाहींना ! पण माझं काम आटपलं लवकर—आणखी वेळ मिळाला तर येईन हो ! जा, आतां तुला खालीं आणखी भेटायचं असेलना ? तुझा आवाज ऐकून यायची पण कांहीं तरी विशेष कामांत गुंतलेली दिसते आहे स्वारी. "

इतकें ह्मणून दादासाहेब निघून गेले. पद्मा व वसंतराव दोघेही खालीं आलीं व वसंतरावाच्या आईकडे आंत गेलीं. तेथें वसंतरावानें विनोद करून पद्मेच्याच तोंडून आपला नवरा आल्याचें आपल्या आईला कळविलें, आणि " ही आतां आपली किल्ली पोंचवण्यासाठीं आह्मांला गडी ह्मणून बरोबर नेते आहे. " असेंही पण तिला सांगितलें. पद्मेचा नवरा आला हें ऐकून त्या ह्मातारीला मोठें समाधान वाटलें. आणखी " आतां तो तुला सोडून जाणारच नाहीं असें कर." " त्याच्या मर्जीनं वाग " वगैरे उपदेश तिनें पद्मेला केला. हा उपदेश करतांना ह्मातारीच्या डोळ्यांत पाणी आलें. तें पाहून पद्माताईचीही स्थिति चमत्कारिक झाली. थोड्याच वेळांत वसंतरावाला बरोबर घेऊन ती आपल्या घरीं गेली.

तिचा नवरा रस्त्यावरल्या माडीच्या खिडकींतून तिची अत्यंत उत्सुकतेनें वाट पहातच होता. गाडी दाराशीं येतांच त्याची उत्कंठा फार वाढली. गाडी दाराशीं—तो उभा होता त्या खिडकीच्या बरोबर खालीं-उभी राहतांच यानें तिची उतरण्याची वाटही न पाहतां तिला वरूनच मोठ्यानें इंग्रजींत विचारलें: "किल्ली आणलीस का ?" परंतु त्याचें उत्तर त्याला तिच्याकडून मिळण्याच्या ऐवजीं गाडींतून प्रथम उतरणाऱ्या वसंतरावानें दिलें:—"नमस्कार महाराज ! आपल्या स्वागतासाठीं आह्मीं मुंबईला जातों, आणखी आह्मांला न कळवितां तुह्मी केव्हांच पटकन् इथें येतां ! "

वसंतरावानें गाडींतून उतरतांना व उतरल्यानंतर वर खिडकीकडे तोंड करून हें उत्तर दिलें. तों त्याच्या नजरेस पद्माताईच्या नवऱ्याचा कुरठलेला चेहरा पडला. वसंतरावानें तत्काळ जाणलें कीं, याला आपलें येणें आवडलें नाहीं. क्षणांत त्याच्या मनांत असें आलें कीं, आपण असेंच माघल्या पावलीं परत जावें. परंतु तितक्यांत पद्मा गाडींतून उतरून झटकन् आंत गेली. वसंतरावाला आतां दुसरा कोणचाही विचार करणें शक्य नव्हतें. क्षणभर त्यानें त्या हातांतल्या पाकिटाकडे पाहिलें आणि आतां दुसरा तिसरा विचार नाहीं असा निर्धार करून तो वर गेला. लागलीच त्या स्वारीच्याजवळ जाऊन त्यानें त्यांस ह्मटलें: "हं, ही दादासाहेबांनीं किल्ली दिली आहे. ही त्यांनीं त्या दिवशीं पाकिटांत घालून हीं पांच सिलं आबासाहेबांच्या आंगठीनंच करून पद्मताईच्या सांगण्यावरूनच पाकीट घरीं नेलं. आतां ती मागायला आली, तेव्हां मला त्यांनीं सांगितलं कीं, तूं स्वतः जाऊन त्यांच्या हवालीं कर. आपण आलांत, आतां त्यांच्यावरली जबाबदारी उतरली."

"बरोबर. बरोबर. पण अजून जबाबदारी उतरली असं मात्र समजायचं नाहीं हो! सगळं जें काय करायचं तें दादासाहेबांच्या परवानगीनं, त्यांना विचारून असंच करायचं. इतके दिवस आपण दिरंगाई केली हीच थोडी......"

"दादासाहेबांनीं असा विचार केला कीं, कोणी तरी जबाबदार माणूस आल्याखेरीज कसं कुलूप काढावं?"

वसंतरावानें याप्रमाणें बाळासाहेबांस सांगून त्यांच्यापुढें तें किल्लीचें पाकीट ठेविलें, नंतर तो कांहीं वेळ स्तब्ध बसला. बाळासाहेबही थोडासा कुरठलेला चेहरा करून त्याच्याकडे पाहूं लागले. नंतर त्यास ह्मणतात:–

"आपण कशाला एवढी तसदी घेतली? ही आलीच होती. नुसती किल्ली तिच्याबरोबर पाठवून द्यायची होती झालं! भेटायला मी येणारच होतों कागदपत्र पाहिल्यानंतर. आबासाहेबांनीं काय व्यवस्था केली आहे, काय नाहीं–आपल्याला आणखी आपल्या वडिलांना माहिती असेलच."

"छे. कांहीं सुद्धां नाहीं. आबासाहेबांचा मृत्यु कशा स्थितींत झाला, हें आपल्याला कळलं असेलच सगळं. त्या स्थितींत त्यांनीं कोणाला कांहीं सांगणं शक्यच नव्हतं. प्रत्यक्ष पद्मताईला त्यांनीं सांगितलं नव्हतं, आणखी तर काय! आणखी तिनें तर असा निर्धार केला आहे कीं, आपले दोघे भाऊ आल्याखेरीज आपण कांहीं ते कागदपत्र उघडून पाहणार नाहीं."

"बायका कितीही जरी शिकल्या तरी वेडगळपणा त्यांचा जायचा नाहीं ह्मणतात तें कांहीं खोटं नाहीं...... "

इतक्यांत पद्मताईनें दोन चहाचे पेले भरून आणून दोघांपुढें ठेवले, तेव्हां बाळासाहेब हंसत तिच्याकडे पहात पुढें ह्मणतात "अहो, नुसते कागदपत्र उघडून पहाण्यांत कांहीं पाप का होतं? त्या कागदपत्रांप्रमाणें व्यवस्था करायची तेव्हां काय तो विचार करायचा. तुह्मी होतां, तुमचे वडील होते. आबासाहेबांचे दुसरे कोणी स्नेही बोलवायचे, आणखी काय आहे तें पाहून टाकायचं तें टाकलं, आणखी ही बसली आपली नुसती त्या दोघां सैरटांची वाट पहात! ते आहेत कुठें का कांहीं त्यांचं झालं, काय सांगावं........ "

हे शेवटले शब्द बाळासाहेबांच्या तोंडून निघाले त्याबरोबर पद्मावती अगदीं

कावरीबावरी होऊन अंगावर शिरीरी आल्याप्रमाणें करून फार चमत्कारिक दृष्टीनें आपल्या नवऱ्याकडे पाहूं लागली. त्यावेळीं तर तिला त्याच्या चर्येवर किंचित् स्मितही दिसलें. तें पाहून पद्मावतीचें अंतःकरण आणखी उद्विग्न झालें. तिनें एकवार वसंतरावाकडे पाहिलें. त्याच्या कपाळावर तर आठ्या व तिरस्कार हीं दिसलीं. त्यानें कसा तरी चहा घेतला, आणखी बाळासाहेबांपेक्षां पद्मताईकडेच विशेष पाहून ह्मटलें: " बरें आहे, मी येतों. ही किल्ली आपल्या स्वाधीन केलीच आहे. संभाळा. मी जातों. "

इतक्यांत त्याला आपल्या वडिलांनीं शेवटीं सांगितलेल्या निरोपाचें स्मरण झालें आणि तो बाळासाहेबांकडे पाहून ह्मणालाः " दादासाहेबांनीं सांगितलं आहे कीं, आमची कांहीं जरूरी आपल्यास वाटली, तर आह्मी आपण बोलवाल तेव्हां येऊं. 'कशी तसदी द्यावी, असं मनांत आणून संकोच करूं नये. आबासाहेबांच्या..'. "

बाळासाहेबांनीं त्यास पुरतें बोलूंसुद्धां दिलें नाहीं. ते एकदम ह्मणालेः-

" हें काय आपण मला सांगायला पाहिजे ! जसे तुह्मी दादासाहेबांच्या जवळ अगदीं हक्कानं कांहीं विचार विचारायला किंवा मागायला जाल, तस्सा आमचा हक्क आहे, असं मी समजतों. मात्र जोंपर्यंत परस्पर निभेल, तोंपर्यंत आपल्याला आम्ही त्रास द्यायला येणार नाहीं. दादासाहेबांना सांगा माझा निरोप कीं "मध्यरात्रींसुद्धां वाटलं तर येऊन आपल्याला तसदी द्यायला मी कमी करणार नाहीं. मात्र कारणावांचून उगीच त्रास द्यायला येणार नाहीं. "

नंतर मधेंच पद्मेकडे वळून ते ह्मणालेः " काय हो, असंच कीं नाहीं ? आपल्याला जर ते आपली मुलगी मानतात, तर मी-मी जांवई नाहीं का ? "

इतकें बोलून त्यांनीं फरकन् एक काडी ओढून चिरूट पेटविला व ती काड्याची पेटी आणि चिरूटाची पेटी वसंतरावाकडे ढकलली.

वसंतरावानें आपण ओढीत नाहीं असा हातांनीं व मानेनें निर्देश केला. त्याबरोबर बाळासाहेब मोठ्यानें हंसून ह्मणतात"काय? You are not a devotee of my Lady Nicotine ? ( आपण तंबाखूदेवीचे भक्त नाहीं ? ) इंग्लंडांत तर हजारांत एकसुद्धां असा अरसिक तरुण सांपडायचा नाहीं. बरं आहे. आपण यावं आतां. आपल्याला फार तसदी झाली. मी आपल्या वडिलांना भेटायला येईन एक दोन दिवसांत. ते केव्हांशीं घरीं असतात ? सकाळीं ? दुपारीं ? दोनही वेळा सांगून ठेवा. "

वसंतराव त्यावर उत्तरला, "बहुतकरून ते घरींच असतात. कुठें जात नाहींत. आणखी आतां कांहीं वेळानं कदाचित् आपल्याकडे येतीलही. याच बाजूला कुठें कामाला गेले आहेत. वेळ झाला तर येतांना येतों ह्मणाले. बहुतकरून येतील. "

ते ऐकतांच बाळासाहेबांच्या कपाळाला फार आंठ्या चढल्या, आणखी ते एकदम ह्मणालेः-" कांहीं यायचं कारण नाहीं. कशाला एवढी तसदी ! मी आहें आतां हिची आणखी या कुटुंबाची काळजी घ्यायला. "

हे शब्द उच्चारतांना त्यांचा चेहरा फार विलक्षण झाला. तो पद्मेलाही दिसला. ती किंचित् कावरीबावरी झाली. वसंतरावानेंही तो पाहिला. त्याबरोबर त्याच्या मनांत काय आलें, त्यानें एकवार पद्मेकडे पाहिलें व त्याचा चेहरा एकदम खिन्न झाला. एखादा फार दुःखी कष्टी प्राणी पाहिला ह्मणजे जशी

एखाद्याला कींव येऊन त्याची चर्या व्हावी तशी त्याची चर्या झाली कोणासही समजून आला नाहीं असा त्यानें उसासा टाकला, आणि तो जाण्याच्या उद्देशानें उठला. बाळासाहेबांनीं बसल्याबसल्याच त्याच्याशीं शेकह्यांड करण्याकरितां हाताचीं दोन बोटें पुढें केलीं. परंतु वसंतरावानें त्यांना स्पर्श केला नाहीं. नुसतें तोंडानें " येतों मी आतां. आपला निरोप दादासाहेबांस सांगतों. " असें ह्मटलें व तो निघाला. तेव्हां बाळासाहेब त्यास मोठ्यानें ह्मणतात, " हा निरोप तर सांगाच. पण आतां ते कुठें गेले आहेत, तें माहीत असलं तर त्यांना कळवा कीं आपण आज कांहीं येण्याची तसदी घेऊं नये. कांहीं कमी जास्ती असलं तर मीच आपल्याकडे येईन. "

एखाद्या माणसाच्या मनांतून दुसऱ्या अमुक एका माणसानें आपल्याकडे येऊं नये असें असलें, ह्मणजे तो जशा आवाजानें आपला शब्दोच्चार करितो, तसाच शब्दोच्चार बाळासाहेबांनीं केला, आणि त्यांच्यापुढें पडलेलें किल्लीचें पाकीट त्यांनीं उचललें. वसंतराव त्या त्याच्या बोलण्यावर कांहीं बोलला नाहीं. पुनः एकवार त्यानें पद्मातांईकडे कळकळीच्या दृष्टीनें पाहिलें आणि तो चालता झाला. पद्मेनेंही जाते वेळीं त्याच्या डोळ्यास डोळा दिला आणि तिच्या मनांत कांहीं एक चमत्कारिक विचार आला. तीही त्याच्या पाठोपाठ खालीं गेली. ती वसंतरावाच्या मागोमाग जात असतां बाळासाहेबांनीं त्या दोघांकडे पाहिलें, मान हलवली, आणखी आपलें डोकें चोळून त्यांनीं पुनः एकदां आपल्या हातचा चुट्टा तोंडांत धरून धुराचा लोळच्या लोळ बाहेर सोडला.

सुमारें दहा मिनिटांनीं पद्मातांई परत आली तों बाळासाहेबांनीं ती सेफ पुढें ओढून तिच्या कुलुपावरील सील काढून किल्लीचें पाकीट फाडून आंतून किल्ली बाहेर काढली होती. पद्मेची चाहूल लागतांच तिला ते ह्मणतातः—" कां ! इथें बोलणं झालं तें पुरतं नव्हतं झालं वाटतं ! पुनः त्याच्या पाठोपाठ खालीं जाऊन काय हितगुज चालवलं होतं इतका वेळ ? आतां दुसऱ्या कोणाशीं हितगुज करीत बसण्याचं कांहीं कारण नाहीं. आपण आपल्याला काय वाटेल तें करूं. समजलं का ?"

तें बोलणें ऐकतांच पद्मातांईस फार चमत्कारिक झालें असावें असेंच तिच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. बाळासाहेबांनीं तितक्यांत किल्लीनें सेफ उघडून आंतले सर्व कागदपत्र बाहेर काढले. पहिल्या प्रथम त्यांनीं तो मोहोरबंद केलेला लखोटा हातीं घेतला, आणखी आतां त्याच्यावरलीं सिलें फोडून ते आंतला कागद बाहेर काढणार तों पद्मातांईला एकदम काय वाटलें, ती त्यांस ह्मणालीः—

" मला वाटतं दादासाहेब, वसंतराव किंवा आणखी कोणी एखादे दुसरे आबासाहेबांचे स्नेही बोलावून आणून त्यांच्या देखत हा लखोटा जर फोडला, तर बरं होईल. "

तें ऐकून बाळासाहेब किंचित् वक्र व तिरस्कारयुक्त दृष्टि करून तिच्याकडे पाहून कर्कश आवाजानें ह्मणतातः "कां बरं ! त्या लेकांचा काय आहे संबंध यांत ! खरं जर पुसशील तर मला तीं माणसं मुळींच आवडत नाहींत मला त्यांच्याशीं काय करायचं आहे ! आपले आपण मुखत्यार आहोंत. आपण आपली व्यवस्था पाहूं. त्यांचा काय संबंध ? "

पद्मातांईनें तें ऐकलें आणि ती चकित झाली. तिला पुढें काय बोलावें तें सुचेना, ती स्तब्ध बसली. इतक्यांत बाळासाहेबांनीं

तीं सिलें फोडलीं, पाकीट फाडलें, आणि आंतला कागद् बाहेर काढला. तो कागद् फार लांबलचक नव्हता. फुलस्क्यापचा एक संबंध कागद् होता, त्याच्या तीन बाजू भरलेल्या होत्या. बाळासाहेबांनीं तो कादग एकवार इकडून तिकडून उलटून पाहिला. नंतर एकवार आपल्या सभोंवार पाहिलें, आपल्या पत्नीकडे पाहिलें, आणि आपल्याशींच वाचण्यास सुरुवात केली. वाचतां वाचतां प्रथम त्यांस बरेंच हंसूं आलें. नंतर एकदम त्यांचे चर्येवर त्रासाचीं चिन्हें दिसूं लागलीं. नंतर त्यांस कांहीं मजकूर वाचून तिरस्कार आला असावा. तिरस्कारानंतर संताप आला आणि त्यांनीं तो कागद् जोरानें खालीं टाकून दिला, व ते कांहीं तरी विचार करीत स्वस्थ बसले. पद्मा त्यांच्याकडे एकसारखी पहात होती. हा काय प्रकार असावा, याबद्दल तिला कांहींच तर्क होईना. पण तिच्या मनांत एकवार आपल्या नवऱ्यास कांहीं विचारावें असें आलें; परंतु तिचें धैर्य होईना. त्याची मुद्राच मोठी त्रासक आणि क्रूर दिसली. ती मुद्रा पाहूनच तिला भय वाटावयाला लागलें. कांहीं सर्पांची गोष्ट अशी सांगतात कीं, ते व त्यांचें भक्ष्य हीं समोरासमोर आलीं ह्मणजे तें भक्ष्य जिवंत असलें तरी त्याला जागचें हलूं नये असेंच वाटतें. त्याच्या अवयवांची चलनवलनशक्ति नाहींशी होते. डोळे आपल्या शत्रूकडे पाहूं लागतात व कांहीं केल्या त्याच्यावरून निघत नाहींत. त्याचें भय मात्र फार वाटतें व तो आपल्यास आतां गिळंकृत करणार कीं मग? अशी एकसारखी धास्ती लागते. तशीच स्थिति पद्मेची झाली होती.

आपल्या नवऱ्याची चर्या अशी कां दिसते? आपल्या वडिलांनीं शेवटीं लिहिलेला तो कागद् यांनीं पाहून वाचून पहिल्या प्रथम हास्यमुद्रा केली काय, आणि शेवटीं इतकी क्रूर चर्या झाली कां? तिला कांहीं समजेना; आपल्या नवऱ्यानें वाचलेल्या कागदांत एवढा काय मजकूर आहे, तो आपणही पहावा असें तिच्या मनांत आलें. तिनें त्या हेतूनें एकदोनदां हातही पुढें केला, आणि "पाहूं काय आहे त्या कागदांत?" असे शब्द तिच्या ओंठावर आलेही होते, परंतु त्याची ती चर्या पाहून तिला ते उच्चारण्याचें धैर्य होईना. तोच आपल्याकडे तो कागद् टाकील, अशीही तिला आशा होती; परंतु तशींही कांहीं चिन्हें दिसेनात. तो नुसता त्रस्त, क्रुद्ध व सचिंत दिसला. पुनः पुनः चिरूट पेटवी. विजलेला असो, नसो, पुनः पुनः आगकाडी फर्रकन् ओढून तो पेटवी; दोन झुरके मारी. त्याचे डोळे कसेसेच दिसूं लागले होते. त्यांत आणखी त्यांना लाली आली होती. बराच वेळ असा गेला. नंतर तो तिला ह्मणतो: "तूं आतां घटकाभर खालीं जा. मला थोडं स्वस्थ पडूं दे. मी इथें आलों नाहीं तों अगदीं काडमुंगीसारखी चिकटून बसूं नको. मी पाहीन आतां या कागदाचं काय आहे तें. जाव. जाव. हम कहतें हैं जाव."

हे शब्द ऐकतांच व ते उच्चारतांना त्याची ती कशीशीच झालेली चर्या पाहतांच पद्माताई खिन्न व चकित झाली. तो कागद् वाचतांच यांची इतकी वृत्ति बदलली असें त्यांत आहे तरी काय? अशी जिज्ञासा तिच्या मनांत उभी राहिली. परंतु विचारण्याचा तिला धीर होईना. ती नुसती त्याला ह्मणाली:

"आंथरूण बिंथरूण देऊं का घालून? आल्याबरोबर कशाला हें कागदपत्र पहा-

ण्याचं काढलं! सगळी प्रवासाची दगदग झाली असेल, तेव्हां विश्रांति घ्यायचं सोडून कागद पहायचंच काढलं. मग आतां आधीं त्या आंतल्या पलंगावरचा बिछाना नीट करतें. तिथें जाऊन पडायचं. मी हे कागदपत्र उचलून ठेवतें मग."

असें बोलून ती त्या खोलीकडे जाऊं लागली. तों बाळासाहेब कर्कश आवाजानें ओरडून ह्मणतो: "नको. नको. मला आंथरूण बिथरूण कांहीं घालून नको, आणखी त्या खोलींत जाऊंही नको. तुला सांगितल्याप्रमाणें अगदीं खालीं जा. आणखी मग मी हांका मारीन तेव्हां ये. इंग्लंडांतल्या सारखं आतां वागायला शिकलं पाहिजे. नवराबायको असलीं तरी एकमेकांच्या परवानगीशिवाय एकमेकांच्या खोलींत जाऊं नये. ही खोली आतां माझी झाली. आतां मी बोलावीन तेव्हां किंवा आपण होऊन यायचं झालं तर माझी बाहेरून परवानगी विचारून मग यायचं."

इतक्यांत त्या खोलीच्या अर्धवट उघड्या दारांतून कांहीं जिन्नस पद्मानाईला दिसले. ते दिसल्यानेंच काय, ती अगदीं काळवंडल्याप्रमाणें झाली आणि माघारी वळून वेड्याप्रमाणें आपल्या नवऱ्याकडे पाहूं लागली. त्याबरोबर तो एकदम तिला पुढें ह्मणतो: "कां, असं बावळ्यासारखं कां माझ्याकडे पाहूं लागलीस? बायका किती शिकल्या असोत कीं बिनशिकल्या असोत, बावळ्या त्या बावळ्याच. पण तूं 'आतां इथून जा' ह्मणून तुला सांगितलं ना? I can make my own bed–मी आपला मी बिछाना करून घेईन–तूं जा. मला थोडी आतां विश्रांति पाहिजे. आपण दोघेंही शिकलेलीं माणसं, एकमेकांच्या स्वातंत्र्याच्या आड येऊं नये. जेव्हां मला कांहीं लागेल तेव्हां मग मी बोलावीन."

हें बोलत असतांना त्याचें सगळें लक्ष्य त्या सिलें फोडून पाकिटांतून बाहेर काढलेल्या कागदाकडे होतें. पद्मेनें तें पाहिलें. आतां नाहीं मग तरी आपल्याला तो कागद हे वाचावयाला देतील, असें तिला वाटत होतें. आतां तो लखोटा फोडलाच आहे, तर आपण पहावा तरी, अशाबद्दल तिला उत्कंठा झाली. परंतु ती उत्कंठा उघारून दाखवून तो कागद मागून घेण्याचें किंवा आपण स्वतःच उचलून घेण्याचें तिला धैर्य होईना; आणि तो पाहिल्यावाचल्याखेरीज आपण येथून जावें असेंही पण मनांत येईना, त्यामुळें ती घुटमळतच होती. इतक्यांत कोणाची तरी गाडी दाराशीं थांबल्याचा आवाज आला. त्याबरोबर ती खिडकीशीं गेली. गाडी दादासाहेबांची होती. ती पहातांच तिला किंचित् समाधान झालें व ती आपल्या नवऱ्यास ह्मणते: "दादासाहेब आले वाटतं. ह्मणालेच होते काम लवकर आटपलं तर मी इकडूनच येईन. हो. उतरलेच ते गाडींतून..."

तें ऐकतांच बाळासाहेब फारच त्रासून ह्मणाले: "Damn his face जा. जा. मला त्या थेरड्याचं तोंड पहायला नको. तूं आपली खालच्या खालूनच त्यांना कांहीं तरी सांगून लावून दे. जा. नाहीं तर तो वर येईल. I don't want to see the wretched old dotard."

हें शेवटलें इंग्रजी वाक्य त्यानें इतक्या क्रूरपणानें व हात आपटून ह्मटलें कीं, खालून येणाऱ्या दादासाहेबांस तें ऐकावयाला गेलें असेल कीं काय, असा पद्मेला संशय आला. अशा स्थितींत त्यांनीं वर येणें अगदीं चांगलें नाहीं हें तिनें जाणलें व ती

एकदम धांवत बाहेर गेली. दादासाहेब अर्धा जिना चढले होते तोंच ही जिना उतरूं लागली. खोटें बोलावयाचें तिच्या जिवावर आलें. परंतु तिनें काय करावें? ते वर गेले आणि आपला नवरा जर त्यांना कांहीं तरी वाईट शब्द बोलला, तर काय होईल ? असें मनांत येऊन तिनें "दादासाहेब, आपल्याला वसंतरावानं निरोप नाहीं का कळवला? उगीच आपल्याला त्रास झाला. वाटेच्या दगदगीचा शीण आल्यामुळं आतांच डोळा लागला आहे. मला सांगितलं कीं, कोणी आलं तरी उठवूं नको."

दादासाहेबः–ठीक आहे. कांहीं हरकत नाहीं. पण ते कागद बिगद पाहिलेना? किल्ली बरोबर होतीना ?

पद्माः–हो, थोडेसे पाहिले वाटतं. इतक्यांत अगदीं स्वस्थ पडावंसं वाटलं ह्मणून बिछान्यावर जाऊन पडायचं.

"मग ठीक आहे. तुला किंवा त्यांना कधीं लागली जरूर तर निरोप पाठवाल तेव्हां मी आहेच. आतां इथेंच आहेत ना?"

"हो, आतां इथेंच आहेत. या कागदपत्रांची व्यवस्था लागली कीं मग तात्याच्यान् बापूच्या शोधाला जाणार आहेत. एकसारखं तेंच काम कोणीं तरी हातीं घेतल्याखेरीज पत्ता लागायचा नाहीं."

"हो, तेंही खरं. बरं पण वृत्ति ठीक आहेना? पद्मे, तुला एकदां मालीसारखी सुखांत असलेली पाहिलं, ह्मणजे मला मोठा आनंद होईल. जांवईबोवांची वृत्ति ठीक असली, आणखी त्यांची इच्छा असली तर मी कुठें तरी शिफारस करून चांगली जागा देववीन. हुषार आहेत. मनांत आणलं तर वाढत जातील. पण त्यांच्या मनांत आलं पाहिजे. बरं, आतां जातों अं मी. आईला सांग मी आलों होतों ह्मणून."

दादासाहेब जितक्या लवकर जातील तितक्या लवकर जावे अशीच तिच्या मनाची या वेळीं स्थिति झाली होती. दादासाहेबांच्याबद्दल अशी बुद्धि आजपर्यंत तिच्या मनांत कधीं सुद्धां नव्हती. परंतु आज तिला असें वाटलें, कीं आपल्या पतिराजांच्या मनांत कांहीं येऊन जर स्वारी कांहीं तरी वेडेंवांकडें दादासाहेबांस बोलली, तर काय होईल? त्यापेक्षां ते गेले लवकर तेवढें बरें. या विचारामुळें तिला फार वाईट वाटलें. आजपर्यंत ती कधींही खोटें बोलली नव्हती. तें खोटेंही आज तिला दादासाहेबांजवळ बोलावें लागलें हें तिच्या मनास फार खाऊं लागलें–दादासाहेब गेल्यानंतर तिला एकप्रकारें ओझें हलकें झाल्याप्रमाणें झालें!

# प्रकरण ३४ वें.

## पद्मेची स्थिति.



दादासाहेब गेल्यानंतर पद्माताई खालीं आली ती पुनः वर गेली नाहीं ! तिला स्वत:ची स्वतंत्र खोली होती, परंतु माडीचा जिना चढावा असें तिच्या मनांतच येईना. तिच्या चर्येवर विलक्षण काळवंडी आली होती. नवरा आल्यामुळें झालेल्या आनंदानें जो तिच्या चर्येवर तजेला दिसूं लागला होता, जो उल्हास झळकूं लागला होता, तो अगदीं नाहींसा झाला. नवऱ्याचें पत्र आल्यापासून तो येऊन दाखल होऊन जेवणींखाणीं होईपर्यंत तिची वृत्ति जी उल्हासित झाली होती, ती पार मावळून गेल्याप्रमाणें झालें होतें. एखाद्यास वारंवार वारंवार रडूं येऊं लागावें, आणि कांहीं कारणानें तें त्यास दाबून ठेवण्याची अवश्यकता वाटून तें त्यानें दाबून ठेवण्यासाठीं धडपड करावी तशीच पद्मेची अवस्था झाली होती. माडीच्या खालीं ती उतरल्यावर, पुनः माडीवर जाऊं नये इतकेंच नव्हे तर घरांत आंतही जाऊं नये अशीच तिला इच्छा झाली. आईच्याही नजरेस पडूं नये असें तिला वाटलें.

परंतु तिची आई आंतून बाहेर आली, आणि तिनें पद्मेला पहातांच तिला ह्मटलें: "पद्मे, अग तुला वेडबिड तर नाहीं ना लागलं ! खालीं कशाला आलीस ? आतां अगदीं त्यांच्या भोंवतीं भोंवतीं असत जा. त्यांचं मन इतकं इतकंसुद्धां दुखवूं नकोस. खालच्या कामाची तुला कांहीं काळजी नको. मी सगळं तें पहातें. वरून नुसता निरोप पाठवित जा, कीं अमुक पाहिजे आहे ह्मणजे मी लागलीच तयार करून पाठवून देईन. पण त्यांची मर्जी जाईल अशी अगदीं वागूं नकोस. जा. मी आतां ते इथें आहेत तोंपर्यंत चार दिवस कथापुराणाला सुद्धां जायची नाहीं, इथें असेन. पण तूं आपली एकसारखी त्यांच्याजवळ बसून रहात जा, जा ह्मणतें ना ! आत्तां जा वर. आणखी वरून मला सांग कशाला खालीं आली होतीस ती. काय पाहिजे असेल तें मी वर पाठवून देत जाईन. अगदीं कशा ग तुह्मी वेड्या पोरी ! "

आईचें हें बोलणें दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं जर पद्मेनें ऐकलें असतें, तर तिला हंसूं आलें असतें. आपलें व आपल्या नवऱ्याचें चांगलें प्रेम असावें एवढ्याकरितां आपली आई आपल्यास सांगत आहे, असें तिला वाटून आईच्या आपल्यावरील प्रेमाचें तिला कौतुकही वाटलें असतें, परंतु आतां तिची मनोवृत्ति कांहीं चमत्कारिक झाली होती.

तिला आतां कोणी आपल्या नजरेस पडूं नये, कोणाच्या आपणही नजरेस पडूं नये, कोठें तरी एकटेंच जाऊन बसावें, असेंच वाटलें. परंतु आईनें तिला पाहिल्यानंतर तें तिला शक्यच वाटेनासें झालें. वर जाऊन आपण आपल्या खोलींत स्वस्थ पडावें असें तिला वाटलें, परंतु त्या खोलीकडे जाण्यासाठीं जिना चढण्याचें सुद्धां तिच्या जिवावर आलें. तिच्या मनांत कांहीं तरी विचार–फार दुःखद विचार येत होते, आणखी ते कांहीं केल्या तिला बाहेर बोलून दाखविणें शक्य नव्हतें. खालीं बसावें, तर आईची ही अशी हुटहूट, वर जावें तर तसें करण्याची अत्यंत अनिच्छा अशी ती मोठ्या कचाटींत सांपडली. तितक्यांत तिच्या मनांत कांहीं तरी विचार आला. आपण मथुराताईकडे जावें. तेथें मथुराताई नसल्या तरी मुलें असतील. ती बरी होत चाललेली तिची बहीण असेल. तिच्याशीं बोलतांना सहज वेळ जाईल. तितक्यांत मालूताईची तिला आठवण झाली. ती असती तर आपल्याला तोंड उघडण्याला तरी जागा होती; परंतु आतां तोंड दाबून बुक्यांचा मार. अशा प्रकारें तिच्या मनाची चलबिचल चालली असतां पुनः तिची आई तिला ह्मणते: " अग माझं बोलणं तुला ऐकूं नाहींका आलं ? आतां चार दिवस तूं अगदीं खालीं येऊं नको म्हणतेंना ? अगदीं त्यांच्या तैनातीला वर असत जा. त्यांची मर्जी राख. नाहीं तर एवढंसं कुठें चुकशील आणखी पुनः ते आपले चालते होतील. "

एक नाहीं दोन नाहीं. पद्माताई आईला उत्तर ह्मणून देईना आणखी जागची हलेना. उभी होती तेथेंच उभी राहिली. तितक्यांत एक गडी तिच्या नजरेस पडला. तेव्हां ती त्याला एकदम ह्मणाली: " जारे मथुराताई घरीं आहेत का पाहून ये. अन् असल्या तर......... "

" कां कशाला हवी आहे मथुराताई ? आतां काय अडलं आहे तिच्या वांचून तुझं ? कांहीं नकोरे जायला. उलटं त्यांना जाऊन सांग कीं, आतां चार दिवस तुह्मी कांहीं इकडे येऊं नका. जरूर लागली तर निरोप पाठवीन. जा, असा निरोप जाऊन सांग. पद्मे, भारीच बाई तूं वेडगळ ! अग, आतां कुठें कोणाच्या घरीं जाण्याची का वेळ ? यामुळं-या तुझ्या स्वभावामुळं तुझं बिघडलं होतं दुसरं तिसरं तर कांहीं नाहीं. तिकडे जशी अगदीं सांगितला शब्द झेलीत होतीस तशी आतां बाळासाहेबांशीं वाग, तर तुला सुख लागेल, आणखी सगळ्यांना लागेल. अलीकडल्या नवऱ्यांना हेंच हवं असतं. बायको अगदीं... "

तरी पद्मा कांहींच बोलेना. उलट अगदीं गळून गेलेलें माणूस जसें एकदम कोठें तरी मटकन बसतें आणि शून्य दृष्टीनें कोठें तरी पाहूं लागतें किंवा डोळे मिटून घेतें तसेंच पद्मेनें केलें. ओटीवरल्या झोंपाळ्यावर ती बसली. तिच्या आईला तिचें तें करणें अगदीं गैर वाटलें. तिला वाटत होतें कीं, तिनें आपल्या ह्मणण्याप्रमाणें ताबडतोब माघारी जावें. पद्मेनें तसें केलें नाहीं, तेव्हां " तूं हट्टीच आहेस. तुला सांगितलेलं ऐकायला नको, स्वच्छंदानं वागायला पाहिजे ह्मणूनच तुझा बाळासाहेबांना राग येत असेल" अशा अर्थाचें आईचें भाषण एकसारखें सुरू झालें. पद्मेनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु एखादें माणूस हट्टाला पेटावें तसेंच तिच्या आईला होऊन तिनें बोलण्याबडबडण्याचा सपाटा चालविला. हा सपाटा पद्मेला दुःसह झाला. वर

घार आणि खालीं पारधी अशा स्थितींत असणाऱ्या लहान पक्ष्याप्रमाणें तिची अवस्था झाली. आईच्या त्या चमत्कारिक बोलण्याचा तिला अगदीं कंटाळा आला. सरतेशेवटीं तिनें ताडलें कीं, झोंपाळ्यावर बसून आपलें निभावयाचें नाहीं. आईच्या दृष्टीसमोर बसणें उपयोगी नाहीं असा निर्धार करून ती माडीच्या पायऱ्या चढूं लागली. तिला आपल्या स्वतःच्या खोलींत जाण्यास स्वतंत्र मार्ग होता, त्या मार्गानें ती जाऊं लागली. मात्र ज्या खोलींत तिचा नवरा जाऊन निजला असेल त्या खोलीच्या गॅलरींत एक दार होतें त्या दारावरून तिला जाणें भाग होतें. नवरा काय करीत असावा हें जाणण्याची इच्छा तिला झाली. परंतु प्रत्यक्ष जाऊन डोकावून पहाण्याचें धैर्य तिला होईना. 'नको, तिकडे दृष्टीसुद्धां फिरवायला नको' असें तिला वाटलें. ती हळूंच पाऊल न वाजवितां चालली. जें करण्याचें धैर्य नाहीं, इच्छा आहे, परंतु ती दाबून धरणें जरूर वाटतें—तें करण्यासाठीं आपोआप यत्न होतात, हा अनुभव कोणाला नाहीं ? बाळासाहेब काय करताहेत हें पहाण्याकरितां त्यांच्या खोलीकडे डोळा फिरवावयाचासुद्धां नाहीं, तसें पुढें जावयाचें आणि खोलींत जाऊन बसावयाचें, असा पद्मेचा निश्चय. परंतु तो निश्चय टिकला नाहीं. त्या खोलीच्या गॅलरींतल्या दाराकडे तिचे नेत्र आपोआप फिरले. पहाते, तों तिच्या नजरेस काय पडलें कोणास कळे ! ती दचकून मागें सरली आणि मग पुनः धीर करून झटकन् आपल्या खोलीकडे गेली. आंत गेली आणि दार लावणार तों तिचा नवरा एकदम तिच्या मागोमाग आला व रागानें तिला ह्मणालाः "तुला मीं सांगितलं होतं ना, कीं मी हांका मारीपर्यंत वर येऊं नकोस ह्मणून ? मग तूं कां आलीस ? तुझा आज्ञाधारकपणा कसा आहे हें पहाण्याकरितांच केवळ मीं तुला तसा हुकूम दिला होता. मला वाटलंच कीं तूं पुनः वर येणार, आणखी मी काय करतों, काय नाहीं, हें चोरून पहाणार. तुझा माझ्या ठिकाणीं विश्वासच नाहीं. तुझी इच्छा कीं मी एखाद्या पाळीव कुत्र्याप्रमाणें तुझ्या भोंवतीं भोंवतीं गिरक्या घालीत असावं. मला काय वाटतं वगैरे मीं तुला पत्रांत लिहिलंच आहे; परंतु अगदीं अक्षरशः त्याप्रमाणें वागेन असं नको हो समजूं. तुला त्रास दिल्याचं मला वाईट वाटतं, पण तें वाईट वाटणं कायम राहण्याचं तुझ्या हातांत आहे. तूं जर आपली अगदीं दरवेशाच्या अस्वलासारखं मला वागवूं लागलीस तर कसं जमावं ! तें कांहीं नाहीं. तुला मीं खालीं जाऊन बस ह्मणून सांगितलं होतं, तर तूं पुनः मी हांका मारीपर्यंत खरोखर वर यायचं नव्हे. कां आलीस ? जा, पुनः जा. खालीं जाऊन बैस. मी बोलावीन. लागलीच बोलावीन पण आतां आधीं खालीं जा."

पद्मा फारच चमत्कारिक नजरेनें त्यांच्याकडे पाहूं लागली. पुनः त्यानें "जा. जा, आतां मला विनाकारण......"

पद्मा मुकाट्यानें तेथून निघाली आणखी खालीं चालली. इतक्यांत पद्मेला पुनः बाळासाहेबांनीं हांका मारल्या व ह्मटलेंः "घरांत एकदां सगळ्यांनाच हुकूम देऊन ठेव, कीं मीं बोलावल्याखेरीज कोणींही माझ्या खोलींत येऊं नये. किंवा माझ्या जवळून सुद्धां जाऊं नये. पुनः पुनः मी आतां या गोष्टी सांगणार नाहीं. इंग्लंडांतलीं माणसं या कामांत पहावीं. जा, आतां

आणखी पुनः मीं बोलवीपर्यंत इकडे येऊं नका. माझा वेळ मला पाहिजे आहे."

पद्मा अत्यंत कष्टानें तेथून निघून पुनः खालीं आली तों तिच्या भोंवतीं आईची पिरपिर सुरू झाली. "कां आलीस ? तुला काय मीं सांगितलं होतं ? अग अशानं कसं होईल तुझं ! तिथं बसावं. त्यांच्या पाठीमागें लागून त्या पोरांचा तपास लावून घे एकदां. त्यांनीं जर मनावर घेतलं, तर ते एका दोन दिवसांत तपास लावून त्यांना घेऊन येतील. पण तूं जेव्हां हट्ट धरशील तेव्हांच तें होईल."

पद्मा एक चकार शब्द न बोलतां आपली झोंपाळ्यावर जाऊन बसली. तिला असें झालें कीं, आपण जावें तरी कोठें ? एवढें थोरलें घर असून एकांतांत बसावयाचें म्हटलें तर निवांत जागा सांपडेना, याचा तिला फार खेद झाला. आणि त्या खेदाच्या भरांत तिला तिच्या आईचें तें भाषण ऐकूंही येईनासें दिसलें.

ती बराच वेळ झोंपाळ्यावर बसली. तिच्या मनांत विचार चाललेच होते. ते सर्व विचार एका मुख्य विचाराला आनुषंगिक होते हें सांगावयाला नकोच. तिला तेथें बसून कंटाळा आला. तेव्हां ती उठली आणि एकदां मथुराताईला तरी भेटून यावें असें तिच्या मनांत आलें.

कोणी तरी आपल्याला आवडतें असें माणूस भेटावें, त्याच्याजवळ आपण आपलें दुःख ओकलों नाहीं तरी हरकत नाहीं, परंतु ज्यावर आपलें प्रेम आहे असें माणूस आपल्याला भेटावें एवढीच तिला उत्कंठा झाली. ज्याच्यावर आपलें व आपल्यावर ज्याचें प्रेम आहे असें माणूस दृष्टीनें पाहिल्यानेंच मनांतील दुःखें किती तरी सुसह्य होतात. वेळ पडल्यास आपल्या अंतःकरणावरलें ओझें उतरण्यासाठीं हात भार लावण्याला कोणी तरी आहे एवढा विचारच मनाला किती तरी धीर देत असतो !

पद्मा तत्काळ उठली, आणि पदर सांवरून झटकन् घराच्या बाहेर पडली. "अग तूं जातेस कुठें ? जातेस कुठें ?" असे तिच्या आईनें उच्चारलेले शब्द तिला जणूं काय ऐकूंच आले नाहींत. ती निघाली, ती तडक मथुराताईच्या घरीं गेली. मथुराताई नुकत्याच आल्या होत्या. पद्मा आज अशा तिन्हीसांजांच्या वेळीं आपल्याकडे आली हें पाहून त्यांनाही थोडें आश्चर्य वाटलें. पद्मेची येण्याची वेळ नेहमीं तीच असे, परंतु आज तिचा नवरा घरीं आला आहे तेव्हां तिला येण्याला होणार नाहीं असा साहजिकच तिचा तर्क झाला.

पद्मा तेथें आल्यानंतर मथुराताईकडे पहातांच क्षणमात्र तिला असें वाटलें कीं, त्यांच्या गळ्याला मिठी मारून मनसोक्त रडावें आणि मालती येथें असती तर जसें आपण मन मोकळें करून बोललों असतों तसें बोलावें, परंतु तसें तिच्यानें करवेना. मनसोक्त रडण्याचें व बोलण्याचें लांबच राहिलें; परंतु एक शब्दही तिच्या तोंडांतून बाहेर पडेना. ती आपली तडक बबीजवळ गेली आणि तिच्या पाठीवरून हात फिरवीत नुसतीच तिच्याजवळ बसली.

पद्मा बबीच्याजवळ बसून तिला कुरवाळूं लागली. बबीवर तिचें फार प्रेम होतें आणि बबीचीही तिच्या ठिकाणीं इतक्या थोड्या अवधींत फार निष्ठा जडली होती. तिच्या नुसत्या जवळ बसण्यानेंच तिला विलक्षण आराम वाटे. तिच्या सान्निध्यानें आज पद्माताईलाही फार आराम वाटला असावा असें दिसलें.

अशा प्रकारें कांहीं न बोलतां बराच वेळ गेला, तेव्हां मथुरानाईच्या मनांत सहज आलें कीं, "आज तुह्मी अशा कां!" ह्मणून विचारावें. परंतु पुनः तिचा स्वतःचा अनुभव तिच्या पुढें उभा राहिला. कांहीं दुःखें अशींच असतात कीं कोणी त्याविषयीं विचारपूस करूं नये असेंच त्या दुःखांनीं गांजलेल्या माणसास वाटत असतें.

पद्मातांई कांहीं वेळ अशी बसली, नंतर उठली आणि जशी आली तशीच परत गेली. बचीशीं किंवा कोणाशीं कांहीं बोलली नाहीं. तिच्यानें बोलवलें नाहीं हें मथुरातांईनीं मात्र जाणलें.

पद्मा घरीं येते तों वरून अण्णासाहेब गडयास हाक मारून "तिला मी बोलावतों आहे ह्मणून सांग " असें ओढत्या आवाजानें, परंतु मोठ्यानें सांगत होते तें पद्मेनें ऐकलें आणखी ती वर गेली.

तिला पाहतांच अण्णासाहेबांस एकदम प्रेमाचें भरतें आलें आणि ते तिला ह्मणतातः " बराबर. अस्सं वागलं पाहिजे. मी आतां खुष झालों. खूप झालों. खुष. खुऊ-उष झालों. ये, ये, बैस. हा दास तुझा आहे. माय डिअर पद्मा तूं फार सिली. तूं दुपारीं रागावलीस मला ठाऊक आहे. पण तुला राग आणावा राग आणाऽऽवा अशी कांहीं माझी इच्छा नव्हती. "

पद्मेस तो त्या वेळचा त्याचा आविर्भाव, त्या वेळची त्याची स्थिति हीं सर्व इतकीं भयंकर व किळसवाणीं वाटलीं कीं, तिला एक क्षणभरही त्याच्याजवळ उभें राहूं नये असें वाटलें.

# प्रकरण ३५ वें.

## मन मोकळें करून बोलणार !



पद्मताईच्या मनाची विलक्षण चलबिचल झाली हें आतां कोणाच्याही लक्ष्यांत आलें असतें. तिची चर्याच दोन दिवसांत अगदीं बदलून गेली. नवरा येण्यापूर्वी त्याचीं पत्रें आलीं तीं वाचल्या दिवसापासून तो येऊन पोहोंचेपर्यंत जो तिच्या चर्येवर तजेला दिसूं लागला होता, तो पार मावळून गेला. तिला कांहीं एक प्रकारची उद्विग्नता आली आणि तीमुळें तिचें एकंदर वर्तन भ्रांतिवटासारखें दिसूं लागलें. अण्णासाहेब केव्हां अत्यंत प्रेमानें वागत, तर केव्हां अतोनात तुसडेपणा करीत. यामुळें कोण्या वेळीं त्यांची मर्जी कशी असेल, याचें धोरणच तिला लागेना. आईची एकसारखी हुटहूट कीं, 'तूं आतां त्यांच्यापासून क्षणभरसुद्धां दूर होत जाऊं नको.' ती माडीवरून खालीं आली, कीं आईचा 'कां आलीस? तुला कांहीं लागलं सवरलं तर निरोप पाठवीत जा. मी तावडतोब पाठवून देत जाईन. पण तूं त्यांच्यापासून हालत जाऊं नको' असें बोलण्याचा सपाटा चालावयाचा, आणि ती वर गेली, तर अण्णासाहेब केव्हां फार प्रेमांत येऊन, "ये, अशी जवळ ये" असें ह्मणावयाचे, नाहीं तर एकदम तिरसटून "कां आलीस? मीं तुला एकदां सांगितलं होतं ना कीं मीं बोलावल्याखेरीज येत जाऊं नकोस ह्मणून!" असेंही पण ओरडावयाचे. याप्रमाणें खरोखरी चारही बाजूंनीं संकटांनीं वेढलेल्या हरिणीप्रमाणेंच पद्मताईची स्थिति झाली होती. तिच्या मनांत काय काय विचार येत होते, ते तिचे तिलाच माहीत. ते ओकून टाकण्यालाही तिला कोणी माणूस दिसेना. एक वेळां मनसोक्त रडावें असें मनांत आलें, तर तें सुद्धां करण्यास तिला स्थळ नाहींसें झालें. ज्या आपल्या स्वतःच्या खोलींत ती आपल्याला कोंडून घेऊन आजपर्यंत आपल्या मनावरलें दुःखाचें ओझें रडून रडून हलकें करी, किंवा आपल्याशींच विचार करकरून आपलेंच समाधान करून घेई, ती खोली सुद्धां तिला आज पारखी झाली. दादासाहेबांच्या घरीं जावयाची चोरी! वसंतराव येऊन भेटेल हें संभवनीयच नाहींसें आलें. मथुराताईच्या घरीं जाऊन चार घटका बसावें ह्मणजे आपल्यास समाधान झालें तर होईल असें मनांत येऊन ती दोनतीनदां त्यांच्या बिऱ्हाडीं गेली. आपलें अंतःकरण त्या आपल्या नूतन मैत्रिणीजवळ ओकावें असें तिच्या मनांत आलें,

परंतु तेथें गेल्यानंतर कांहींएक न बोलतां न सवरतां तिनें आपलें परत यावें. तिचें तें तसें वर्तन पाहून मथुराताईसही फार विलक्षण वाटलें, परंतु आपण होऊन कसें कांहीं विचारावें असें मनांत येऊन त्या गप्प बसल्या.

पद्माताई तेथें जाई, कांहीं वेळ बसे, मुलांशीं दोन शब्द बोले; मथुराताईशींही कांहीं औपचारिक भाषण करी. नंतर अत्यंत उत्सुक अशा दृष्टीनें तिच्याकडे पाही व तिच्या ओंठापर्यंत कांहीं शब्द येत, तिच्या नेत्रांत अश्रू उभे रहात, आणि एकाएकीं तिचें मन बदलून ती तेथून निघून येई. तीन किंवा चार दिवसांत असें तनिदां झालें. मथुराताईकडे जाईपर्यंत मनाचा विचार जो असावयाचा तो तेथें गेल्यानंतर अगदीं डळमळावयाचा. असा प्रकार चालला होता. एकंदरींत पद्माताईची स्थिति अगदीं एखाद्या भ्रांतिवटासारखी झाली होती. तिच्या मनावर दुःखाचें ओझें फार झालें असावें, काळजीचें दडपण फार पडलें असावें असें कोणाही तिच्यावर प्रेम करणाऱ्या चाणाक्ष माणसास कळलें असतें.

जे अण्णासाहेब आल्या दिवशीं रात्रींच आपल्या मेहुण्याच्या तपासासाठीं जाण्याबद्दल उत्सुक होते; ते चार दिवस झाले, तरी त्याबद्दल कांहीं भाषण करीनात. आणि अण्णासाहेबांनीं शेवटीं लिहिलेला लखोटा व इतर कागदपत्र पाहून सर्व व्यवस्था लावण्याविषयीं अत्यंत उत्कंठित असलेले ते आज चार दिवसांत ते कागदपत्र वारंवार नुसते पहाण्यापलीकडे कांहींही करीत नव्हते. जेवणासमुद्धां खालीं येईनासे झाले. बायकोनें जेवण वर नेऊन यावें. मर्जी लागल्यास त्यांनीं खावें, नाहीं लाग त्यास " आतां मला नको, लागेल तेव्हां तुला निरोप पाठवीन. आतां जेवणही घेऊन जा आणखी तूंही चालती हो. बोलावीन तेव्हां पुनः ये. " असें निष्ठुरपणानें ह्मणावें, पद्मेनें मुकाट्यानें ताट उचलून पुनः खालीं जावें आणि आईचीं बोलणीं ऐकून घ्यावीं. जांवईबोवांच्याबद्दल सासूबाईंना आतां इतकें प्रेम आलें होतें, कीं त्यांनीं आपलें कथापुराणसुद्धां सोडलें. कोण्यावेळीं ते काय मागतील, आणखी आपण काय करून देऊं असें त्यांना होऊन गेलें होतें, परंतु तीन चार दिवसांत ते जेवावयाला खालीं आले नाहींत; तेव्हां त्यांच्या प्रकृतीला बरें नसावें असें त्यांच्या मनांत येऊन पांचवे दिवशीं त्या वर जांवयांच्या समाचाराकरितां जाऊं लागल्या. पद्मेस तें आईचें जाणें मुळींच इष्ट नव्हतें, यामुळें ती तिला जाऊं नको ह्मणून आग्रह करूं लागली. मात्र कां तें कांहीं सांगेना. आईला फारच चमत्कारिक वाटलें; आणि तिनें वर जाऊन जांवईबोवांस भेटून बोलण्याचा आग्रह धरला. इतकेंच नव्हे, तर ती गेलीही. तों जांवईबोवा काय लहरींत होते, एकदम तिच्या अंगावर ओरडून ह्मणाले " कां ? तुह्मी कशाला आलां ? तुमची लेक येत असते तेवढी पुरे. तुमच्यासारख्या बायका माझ्या डोळ्यांसमोर यायला नकोत ह्मणून तर मी वर ताट वाढून आणायला सांगूं लागलों. "

सासूबाई फार चकित झाल्या. आपण काय ऐकतों आहोंत हें त्यांना समजेनाच. त्या त्याच पावलीं खालीं आल्या आणि पद्माताईच्या अंगावर ओरडून ह्मणाल्याः " पद्मे, तुझ्या नवऱ्याला वेडबिड लागलं आहे, का कांहीं कैफ केला होताय्. त्यानं

कायग बाई तरी त्याचं बोलणं ? मला वाटलं कीं......"

"आई, तुला पहिल्यापासून स्वभाव ठाऊक नाहीं का ? ह्मणून तर तुला मी वर कांहीं जाऊं नको म्हणून आग्रहानं सांगत होतें. जें आहे तें ठीक आहे."

सासूबाईंची त्यावर बडबड चालूच होती. ती बडबड आतां लवकर थांबावयाची नाहीं असें मनांत येऊन पद्मताईनें विचार केला, कीं आतां घटकाभर आपण मथुराताईकडे जावें. असा विचार करून ती निघणार तों अण्णासाहेबांनीं तिला वर बोलाविलें आणि ह्मटलें: "आज तीन चार दिवस मीं सर्व कागदपत्र पाहिले. त्यावरून तुझ्या भावांचा पत्ता अगदीं तावडतोब काढलाच पाहिजे असं मला कांहीं वाटत नाहीं. या कागदपत्रांशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. त्यांच्यावांचून कांहीं अडायचंही नाहीं. सध्यां कोर्टातलं काम पाहिलं पाहिजे. तेव्हां आतां मीं एक मुखत्यारपत्राचा मसुदा तयार केला आहे. तो चांगला स्टांपावर वगैरे लिहून आणतों, त्याच्यावर सही कर, उद्यां मी एक मॅजिस्ट्रेट घेऊन येईन. दुसरे दोघे स्नेही घेऊन येईन साक्ष घालायला. असं नको. उद्यां रात्रीं त्या तिघांना जेवायलाच बोलावीन ह्मणजे तें सगळं ठीक जमेल. जेवणाचा बेत मेजवानीसारखा ठेव. समजलीस ? इतकं सुद्धां चुकतां कामा नये. तीं सगळीं माणसं मोठीं आहेत. त्यांची व्यवस्था उत्तम राहिली पाहिजे. काय मी सांगतों ? हो ह्मणत नाहींस ती !"

पद्मेचें चित्त दुसऱ्या कोठें तरी होतें. आपल्या भावाचा तपास करण्याची कांहीं विशेष जरूरी नाहीं असें हे कां ह्मणतात, याचाच तिला अचंबा वाटला; आणि त्या अचंब्यांतच ती अर्धवट गुंग होती. परंतु अण्णासाहेबांनीं तिला वर सांगितल्याप्रमाणें दरडावून विचारल्यावर ती "हो" ह्मणाली, आणि उगीच राहिली.

अण्णासाहेब लागलीच तिला ह्मणतात: "तुला कांहीं करायचं नाहीं. त्यांच्या देखत नुसती सही करायची आणखी तुह्मी या कागदावर सही करतां आहां तो वाचला आहांतना असं त्यांनीं विचारलंच तर 'हो' ह्मणून उत्तर द्यायचं. मी तो कागद नीट लिहिल्यावर तुला देईन वाचायला. आणखी नाहीं दिला तरी पण माच लिहिला आहे तेव्हां तुला वाचलाच पाहिजे असं कांहीं नाहीं. वास्तविक मी तुझा मुखत्यार आहेंच, पण कायद्यामुळं कागद करायला पाहिजे. इतकंच. जा आतां कुठें जायचं तिकडे. मात्र वसंतरावाला किंवा कुणाला या बाबतींत विचारायला जाण्याचं कांहीं कारण नाहीं, मला तें बिलकुल आवडायचं नाहीं. आमच्यावांचून या घरांत पानसुद्धां हालायचं नाहीं असा त्यांना अभिमान झाला आहे तो माझ्या मनांत मोडून टाकायचा आहे. नाहीं तर त्यांना मीं आपण होऊन विचारायला गेलों असतों. पण एकदां त्यांना कळूं दे, कीं तुह्मी काळजी घेणारीं माणसं आहेत आणखी आपली आपली काळजी त्यांना घेतां येते. जा, आतां मला रात्रींचं कांहीं जेवायचं नाहीं आणखी मी आज रात्रीं केव्हां येईन याचा नेम नाहीं. एका स्नेह्याकडे जातों आहें. त्यानं आग्रह केला तर तिथेंच राहीन. मुळींच रात्रीं येणार नाहीं. आज दोन चार दिवस झाले घराच्या बाहेर पडलों नाहीं. तेव्हां आतां जातों चार घटका. उद्यांच्या मेजवानीची मात्र तजवीज नीट कर. आणखी दहा वीस रुपये असले तर दे इकडे. माझी

दुपारपासून किल्लीच कुठें पडली आहे कुणास ठाऊक! मी गेलों म्हणजे मग ती शोधून तूं आपल्यापाशींच ठेव. आमच्या किल्लीची मालकीण तूंच. केव्हांच ती तुझ्याजवळ द्यायला पाहिजे होती, पण 'आतां देऊं,' 'मग देऊं' असं करतां करतां राहिलं. नीट संभाळ हो ती किल्ली. त्या माझ्या थोरल्या ट्रंकमध्यें दोन चारशें रुपये आहेत. मी आलों परत म्हणजे ते काढून देईन. पण सध्यां मला पंचवीस दे. जा."

पद्माताई मुकाट्यानें आपल्या खोलींत गेली व पंचवीस रुपये घेऊन येऊन तिनें ते त्याला दिले. ते घेऊन आपल्या ज्याकिटाच्या खिशांत घालतां घालतां पद्माताईच्या गालाला हात लावून त्यांनीं मोठ्या प्रेमानें म्हटलें:—"You are my darling. You are my dear little treasure. Good obedient Padma." आणि स्वारी मोठ्या आनंदांत घराच्या बाहेर पडली. पद्मा नुसती त्यांच्याकडे पहात उभी राहिली. त्यानें गालाला हात लावून प्रेमानें उच्चारलेले शब्द ऐकतांच तिला थोडें समाधान वाटलें. तिच्या चर्येवरला उद्विग्नपणा एकदम कमी झाला. थोडा आनंद दिसूं लागला, परंतु ती स्थिति फार वेळ टिकली नाहीं. लागलीच तिच्या मनांत विचार आला कीं, आपला नवरा असा लहरीपणा कां करतो? एकदां अतिशय प्रेम दाखवितो, तर पुढल्या क्षणीं अगदीं त्रासल्याप्रमाणें तिरसटपणा करतो. पुनः कांहीं वेळानें अत्यंत प्रेमानें बोलूं लागतो. पुनः 'अगदीं चालती हो. माझ्याजवळ बसूं नको' म्हणून म्हणतो. याला काय म्हणावें? आणि याचा अर्थ काय समजावा? हा विचार येतांच पुनः तिची चर्या चिंतामग्न झाली; आणि ती खालीं आली.

बऱ्याच वेळानें तिच्या मनांत पुनः आलें कीं, आपण मथुराताईकडे जावें. पुनः असें वाटलें कीं, तिलाच चार घटका आपल्याकडे बोलावून आणावें. शेवटीं तिलाच बोलावून आणावें असें ठरवून तिनें तिला बोलावणें पाठविलें. रात्रीचे सुमारें आठ वाजण्याची वेळ. अशा वेळीं आपल्याला यांनीं कशाला बोलाविलें कोणास ठाऊक. असें मनांत येऊन मथुराताई थोडी विचारांत पडली. परंतु पुनः तिला असें वाटलें कीं, पद्माताई उगीच कांहीं तरी लहरीनें बोलवावयाची नाहीं. तिला कांहींतरी तसेंच काम असेल. तेव्हां आपण जावें. म्हणून ती निघाली आणि पद्मावतीकडे आली.

आज मथुराताईला येथें रात्रभर ठेवूनच घ्यावें आणि आपल्या मनांतलें खरें दुःख काय तें तिला सांगावें, आपल्या मनावरलें ओझें उतरावें, हलकें करावें. आतां मथुराताई एकटी येईल. परंतु ती येथें आल्यावर तिच्या भावंडांनाही आपण इकडेच बोलावून घेऊं असा तिनें विचार केला. इतक्यांत मथुराताई आल्या. तिला पहातांच पद्माताईला फार समाधान वाटलें, आणखी त्या एकदम त्यांना म्हणतात: "मथुराताई, तुमची आणखी माझी ओळख झाल्या दिवसापासून मला मालती इथें नसल्याचं तितकं मनांत येईनासं झालं आहे. तुम्ही जवळ असलां कीं मला आपली तिची आठवण होते. आतां आज माझ्या मनांत असं आहे कीं, तुम्ही रात्रीं इथेंच निजावं. मुलांना मी घेऊन येतें. तीं इथेंच निजतील. नाहीं नका म्हणूं. तुमची कुणाची गैरसोय व्हायची नाहीं, मला आपलं मन मोकळं करून तुम्हांला कांहीं सांगायचं आहे. आ-

णखी तें सांगायला वेळ ह्मणजे ही अशीच. दिवसा तुह्मी शाळेंत. संध्याकाळीं सकाळीं मला वेळ नाहीं. तेव्हां रात्रीं राह्यलांत तर स्वस्थपणानं बोलायचं आहे. तुमचा विचार घ्यायचा आहे. वसंतरावाला किंवा कुणाला विचारायला जाईन तर आतां त्यांची भेट होण्याची मुद्दां मुष्किल झाली आहे. ”

“ती कां ! ” मथुरानाईनें तिला सहज विचारलें.”

“कां तें आतांच नाहीं मी सांगत, आधीं मुलांना घेऊन येतें. आणखी मग तीं निजलीं ह्मणजे आपण बोलत बसूं, तेव्हां सांगेन. गड्याला पाठवला, तर येतील का तीं ! का मीच जाऊं ! ”

“तुह्मी नको, आणखी गडी नको. मीच जाऊन येतें त्यांना घेऊन. मी—पण बाई तुम्हांला फार त्रास होईल. पोरं तीं कांहीं गप्प बसायचीं नाहींत. कुलकुल कुलकुल करून त्रास देतील. आणखी मग.”

“आणखी मग काय ! ” पद्मेनें तिला विचारलें.

“आणखी मग आपल्याला असं होईल, कीं कुठून यांना इथें बोलावलं ! ”

“बरं बरं. होऊं द्या. तें तरी कसं होतं तें पाहूं. त्यांतून आज कुणी घरीं नाहीं. जा तुम्ही त्यांना घेऊन तर या. या हो. नाहीं तर आपल्या घरीं जाऊन कडी लावून निजाल. थोडा उशीर लागला, तर पाठोपाठ मी येईन. मला आज फार वाटतं आहे कीं तुमच्याजवळ एकदां कांहीं सांगायचं आहे. अगदीं चटकन् या. पांघरूणं अंथरूणं कांहीं सुद्धां नका आणूं. मी सगळं कांहीं देईन. ”

पद्मातांईचा इतका आग्रह दिसला तेव्हां मथुरातांई आपल्या घरीं गेल्या आणि आपल्या सर्व भावंडांस आपल्याबरोबर पद्मातांईच्या घरीं घेऊन आल्या. आपल्या खोलीला त्यांनीं कुलूप लावून टाकलें. पद्मातांईनीं मुलांची आपल्या खोलींत निजण्याची फार उत्तम सोय केली. मुलें लवकरच निजलीं. त्या दोघी एकट्याच जाग्या होत्या. थोड्या वेळानें पद्मातांई मथुरातांईस म्हणाल्याः

“काय असेल तें असो. आज आपलं मन मोकळं करून तुमच्यापाशीं बोलायची इच्छा झाली. थोड्या दिवसांची तुमची माझी ओळख आणखी मी इतकं आपलं मन मोकळं करून बोललें ह्मणून तुह्मांला कदाचित् काय वाटेल कुणास कळे, असें मनांत येऊन आजपर्यंत मी संकोच करीत होतें, पण आज माझ्या मनाची वृत्ति कांहीं चमत्कारिक झाली आणखी राहवेना ह्मणून मी आपला आज निर्धार करून तुम्हाला आग्रहानें आणल्या.” इतकें बोलून ती कांहीं वेळ थांबली नंतर पुनः ह्मणते: “मथुरातांई, तुम्ही आपल्यालाच या जगांत दुःखी समजत असाल पण मी तुमच्याहीपेक्षां...”

परंतु पद्मा पुढें काय बोलणार तें कोणी तिच्या खोलीचें दार जोरानें खडखडावल्यामुळें मथुरातांईस ऐकूं आलें नाहीं. पद्मेला कांहीं संशय येऊन ती थांबलीच. आणि कानोसा घेऊं लागली तों अगदीं ओढत ओढत अशा आवाजानें पुढील इंग्रजी वाक्य उच्चारलेलें तिच्या कानीं पडलें.

“म म माय् ड् डार्लिंग ओ पान द् डोर आ आय हॅव कम बॅक फॉर यू ! ”

तें ऐकून पद्मेची अवस्था जी झाली ती झाली. ती वर्णन करून सांगतां येणेंच शक्य नाहीं.

# प्रकरण ३६ वें.

## पद्माताई व मथुराताई.



तो आवाज ऐकून पद्माताई अगदीं काळी ठिक्कर पडली. दार उघडावें कीं नाहीं या विवंचनेंत तिचीं पांच मिनिटें गेलीं. बाहेर या गोड सुरांत आपणास कोण हांका मारतें आहे तें तिनें ताडलें आणि त्यामुळेंच हा मनाचा घोंटाळा झाला. हातापायांचे एकसारखे धक्के खोलीच्या दाराला व त्या ओढून ओढून येणाऱ्या आवाजाचेही धक्के तिच्या कानाला बसतच होते. एक क्षणभर पद्माताईच्या मनांत असेंही आलें कीं, आपण दार उघडूंच नये. म्हणजे थोड्या वेळांत स्वारी कंटाळून आपल्या खोलीकडे निघून जाईल, आणखी मग आपण दार उघडून बाहेर जाऊन मथुराताईस आंतून घट्ट कडी लावून घेण्यास सांगून तेथून तिकडे जाऊं; परंतु हें शक्य दिसेना. कारण दाराला विशेषच जोराचे धक्के बसूं लागले. शेवटीं पद्माताईनीं ओरडून सांगितलें कीं, "आपण आपल्या दिवाणखान्यांत चला मी येतें." परंतु नाहीं. स्वारी "ओपन् द डो डो डोअर माय डि डि डिअर" असें एकसारखें ओरडत राहिली. शेवटीं पद्माताईनें मथुराताईस सांगितलें कीं "मी हळूच दार उघडून बाहेर जातें. तुम्ही दार घट्ट लावून घ्या. मग मी पहातें काय आहे तें." असें म्हणून तिनें दाराची कडी काढली आणि ती झटक्यासरशीं बाहेर आली, व दार ओढून घेऊं लागली, तों अण्णासाहेबांच्या मनांत काय आलें, त्यांनीं दारास धक्का देऊन दार आंत ढकललें व बायकोस विचारलें "आंत कोण आहे"? पद्मेनें सांगितलें कीं "आपण कदाचित् घरीं येणार नाहीं, तेव्हां मला सोबत म्हणून मीं आपली एक मैत्रीण बोलाविली आहे," त्याबरोबर "I must see your friend, introduce me to her." असें वाक्य पूर्वीप्रमाणेंच ओढल्या व चाचरल्या आवाजानें त्यानें उच्चारलें व तो आंत घुसूं लागला. मथुराताईनें दार आंतून लावलें होतेंच. पद्माताईनें आपल्या नवऱ्यास म्हटलें, "त्या गरीब बाईला संकोच होईल, आपण हें काय करतां? आपल्या खोलीकडे चला" परंतु तो आपला नादीपणा सोडीना. "Do introduce me to your friend" या शब्दांचा एकसारखा जप त्यानें चालविला. कांहीं केल्या थांबेना. पद्माताईस फारच चमत्कारिक झालें. शेवटीं आतां करावें काय? मथुराताईला दार उघडा म्हणून म्हणावें तरी कसें? इकडे अण्णासाहेबांचें डोकें तर अगदीं तापत चाललें. 'माझी व तुझ्या त्या मैत्रिणीची ओळख झालीच पाहिजे, तूं करून दिलीच पाहिजेस.' असा त्यानें एकसारखा अट्टहास चालविला. 'ती लटपट चालायची

नाहीं. इतके तूं आढेवेढे घेते आहेस, तर ती तुझी मैत्रीण नाहीं दुसरा कोणी तरी आहे. वसंतराव असेल, ' असेंही तो त्या तसल्या चाचरल्या आवाजांतच बडबडूं लागला. व मी आतां येथून एक क्षणभर व पाऊलभर दूर जावयाचा नाहीं असा हटाग्रहच त्यानें चालविला. पद्मातार्इंस 'दे माय धरणी ठाय ' झालें. काय करते बिचारी. आपण आतां जरा असाच हट्ट करून दार उघडविलें नाहीं, तर यांच्या डोक्यांत नसता संशय येऊन काय होईल याचा नेम नाहीं. असल्या भलत्या संशयांनीं फार भयंकर अनर्थ होतात हें तिला पक्कें ठाऊक होतें. तेव्हां तिनें मथुरातार्इंस दार उघडण्यास सांगितलें.

मथुरातार्इंची तरी किती स्थिति चमत्कारिक ! दार उघडावें तर हा गृहस्थ अशा स्थितींत. न उघडावें, तरीं तिकडून पंचाईत. परंतु अनेक प्रसंगांनीं व दुःखांनीं ती अगदीं धीट झालेली होती. या संकटांतून कसें तरी पार पडलें पाहिजे. असा विचार करून तिनें चटकन् दार उघडलें, आपण बाजूला उभी राहिली. अण्णासाहेबांस प्रथम कांहीं दिसेना, तेव्हां ते आंत धडपडून इकडे तिकडे पाहून " Where is your friend ? I must have......... " असें ह्मणत पुढें जाऊं लागले. खालीं मुलें निजलीं होतीं. त्यांच्या अंगावर पाय पडतील ह्मणून पद्मेनें त्यांस खालीं त्या बाईंचीं मुलें निजलेलीं आहेत, असें बजाविलें; इतक्यांत स्वारी जाऊन पद्मेच्या खोलींतल्या त्या पलंगावर बसली व " तुझी मैत्रीण कुठें आहे? आमची तिची ओळख झाली पाहिजे. इंग्लिश लोकांतल्या चाली आपल्यांत आणल्या पाहिजेत. माझ्या मित्रांची आणखी तुझी मी उद्यां ओळख घालून देणार आहें. ते उद्यां जेवायला येणार आहेत. ते माझे मित्र आहेत. त्यांची तुझी ओळख झाली पाहिजे ! आपण बरोबर जेवायला बसूं. आपण सारे एका पंक्तीला बसूं. तूं आपल्या मैत्रिणीला जेवायला बोलाव. We shall have a jolly party ! कुठें आहे तुझी ती मैत्रीण ? कुठें आहे ! " असें बडबडूं लागला.

पद्मातार्इंस त्याच्या त्या बडबडीचा अगदीं वीट आला. शेवटीं त्या अतोनात त्रासून ह्मणाल्या, " त्या आपल्याला पाहून संकोचून दाराआड उभ्या आहेत. त्यांना त्या इंग्रजी रीति माहीत नाहींत. आपण आतां चला इथून आपल्या खोलींत जाऊं."

परंतु या भाषणानें अण्णासाहेबांची जिज्ञासा अधिकच पेटली व तो हंसून—विकटपणें हंसून ह्मणतो, " छे, छे, संकोचाचं कांहीं कारण नाहीं. आपण त्यांना सांगा, त्यांची आमची ओळख झाली पाहिजे. I must know all my wife's friends. या हो. तुह्मी दाराआड कशाला उभ्या राहतां ? हें कांहीं एकुणिसाव्या शतकाच्या अखेरीला योग्य वर्तन नव्हे. या. या. मला दिसत नाहीं, नाहीं तर मी तुमचं स्वागत करायला पुढें आलों असतों. माय डिअर पद्मा, तूं त्यांना दोन गोष्टी सांग, असं करूं नका म्हणावं. मला त्यांची ओळख झाली पाहिजे. अगदीं जरूर पाहिजे. बोलाव, त्यांना पुढं. बोलाव, बोलाव, बोलाव, बोलाव. "

इतकें बोलून तो जागचा उठला व धडपडत दाराजवळ चालला. शेवटीं आपण आतां येथून पळून जाण्यापलीकडे कांहीं दुसरा उपाय नाहीं हें मनांत येऊन मथुराताई दाराआडून पुढें येऊन बाहेर जाणार तों तो दारांत आडवा झाला. त्याची दृष्टि त्यांच्या-

वर गेली. त्या तशाच थबकल्या. आतां हा हात बीत धरतो कीं काय अशी भीति पद्मेस व मथुराताईस दोघींसही पडली. मथुराताई तर एकदम मागें सरल्या. आणखी पद्मताई पुढें झाल्या व म्हणतात: " हें काय हें ? आपण इंग्लंडांत नाहीं. त्या परक्या बाईंना फार संकोच झाला आहे. आतां आपण आपल्या खोलीकडे चलावें. त्या आपल्या घरीं जातील किंवा निजतील. "

परंतु त्यांचें सगळें लक्ष्य आतां मथुराताईकडे होतें. व ते एकदम मोठ्यानें ह्मणाले: " She is an English beauty ! She is not like you ! I like her. O how I like her. Introduce me to her. नाहीं तर माझा मीं होऊनच शेकहँड करून ओळख करून घेईन. इंग्लंडांत असंही चालतं " असें म्हणून तो मथुराताईकडे चालला. त्यांस फारच विलक्षण झालें, परंतु एका दृष्टीनें त्यांस त्यांचें आपल्याकडे येणें इष्टही झालें. कारण तो दारांतून पुढें आला. ती संधि साधून मथुराताईनें झटकन् दार गांठलें व त्या खालीं पळाल्या. आतां हा त्यांच्या मागोमाग धांवतो कीं काय असें पद्मताईस भय पडलें. परंतु त्याच्या जिभेपेक्षां त्याचे पाय शतपट अडखळत होते. यामुळें तें कांहीं त्याला शक्य झालें नाहीं. त्यानें प्रयत्न केला परंतु त्या प्रयत्नांत अपयश येतांच त्याला संताप चढला आणि तो हिंदुस्थानास व हिंदुस्थानच्या रीतीभातीस शिव्या देऊं लागला. शेवटीं त्यानें त्या पलंगावर जाऊन धाडकन् अंग टाकलें आणि दहा पांच मिनिटें बडबड चालतां चालतां त्याला झोंप लागली. तेव्हां पद्मताईचा जीव खालीं पडला. तिनें मथुराताईचीं तीं भावंडें एक एक एक एक खालीं नेवविलीं व त्यांच्यासाठीं अंथरुणेंही खालीं एका खोलींत घातलीं. मथुराताईजवळ तिनें झाल्या गोष्टीबद्दल नानाप्रकारांनीं खेद दर्शविला. कशी तरी सकाळ उजाडल्यावर तुम्ही परत जा. आतां त्यांना झोंप लागली आहे. आतां कांहीं ते उठत नाहींत. असें तीस तिनें पुष्कळ सांगितलें. मथुराताई चतुर होती व तिला पद्मताईची अत्यंत कींव वाटत होती. ती एकंदरींत किती दुर्दैवी आहे हें तिला आतां स्पष्ट समजलें होतें. यामुळें तिनें पद्मताईचें उलटें समाधान केलें. आणि 'मनाला कांहीं वाटूं देऊं नका. मी तुम्हांला मुळींच दोष देत नाहीं, ' असें तिला सांगितलें. पुढें सकाळींच आपल्या भावंडांस उठवून ती त्या घरांतून निघून गेली, तेव्हां पद्मताईच्या मनावरलें फार मोठें ओझें दूर झाल्यासारखें झालें. कारण आपला नवरा निजला आहे, आतां तो उठावयाचा नाहीं असें जरी त्या तोंडानें म्हणत होत्या तरी त्यांना मनांत भय वाटत होतें कीं, उठलाच तर पुनः प्रसंग काय होईल कोणास कळे ! शेवटीं त्या रात्रीं त्यांना एक क्षणभरही झोंप मिळाली नाहीं. त्यांच्या एकसारख्या वरून खालीं, आणि खालून वर अशा खेपा चालल्या होत्या. थोडा वेळ मथुराताईजवळ झाल्या गोष्टीबद्दल खेद वाटून बोलत पुनः एकदां वर जाऊन स्वारी निजलीच आहे कीं जागी झाली आहे, हें पहाण्यास वर जात. न जाणों मधेंच स्वारी जागी झाली आणि आपण जवळ नाहीं, तर हांका मारीत खालीं यावयाची. वर जाऊन स्वारी निजली आहे, घोरते आहे, असें पाहिलें कीं, समाधान व्हावयाचें. परंतु आपली एकंदर स्थिति किती वाईट हें मनांत येऊन फार खेद व्हावयाचा. आपण मागल्या जन्मीं असें पातक तरी काय केलें होतें असें मनांत

येऊन डोळ्यांत अश्रू यावयाचे व त्या अश्रूंचें परिमार्जन झालें तर आपल्या मैत्रिणीजवळ व्हावयाचें असें मनांत येऊन खालीं मथुराताईकडे तिनें यावयाचें. खालीं आलें व मथुराताईस पाहिलें कीं, 'या बिचारीवर काय आपण आज विनाकारण प्रसंग आणला ? ती आपली आपल्या भावंडांना घेऊन घरीं सुखाची निजली असती, तर तिला विनाकारण या यातनांत घातलें. ज्या हेतूनें आपण आपल्या घरीं येण्यासाठीं आग्रह तो हेतु पार कोणी-कडेच राहून, झाला हा असा प्रसंग झाला असें तिच्या मनांत येऊन तिकडूनही खेद व्हावयाचा ! परंतु त्यांतून मथुराताई जेव्हां आपल्या चिऱ्हाडीं मुलां–बाळांना उठवून घेऊन गेली तेव्हां तेवढेंच तिला दुःखांत सुख झालें.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं मेजवानीचा थाट उडावयाचा होता. अण्णासाहेब स-काळीं बऱ्याच उशीरां जागे झाले. परंतु बराच वेळ तसेच अंथरुणांत पडून होते. त्यांचे विचार सगळे गोंधळून गेले असून त्यांची ते जणूं काय नीट व्यवस्था लावीत होते. बऱ्याच वेळानें त्यांनीं आपल्या पत्नीस बोलावून म्हटलें:

"आज ते तिघे जेवायला येणार आहेत संध्याकाळीं. त्यांच्या देखत तुला त्या कागदावर सही करायची आहे. मेजवानीचा थाट उत्तम पाहिजे. आणखी रात्रीं कोण तुझी मैत्रीण आली होती, तिची माझ्याकरितां क्षमा माग. मी आपला इंग्लंडांतल्या रीतीप्रमाणेंच वागायला पहात होतों. हिंदुस्थानांत आलों आहें हें जणूं काय मी विसरलोंच. तेव्हां माझ्या वाग-ण्यांत कांहीं वेड्यासारखं तिला वाटलं असलं, तर तूं आमच्या वतीनं माफी माग, नाहीं तर त्या अजून इथें असल्या, तर मी मागतों............"

वत्सलाताईनें "त्या आपल्या घरीं गेल्या. मी सांगेन त्यांना" असें म्हणून वेळ मारून नेली. नंतर सगळ्या दिवसभर स्वारी कांहीं तरी उद्योगांतच होती, एकसारखे कागद पहात होती, आणि लिहीत होती. 'मी कामांत आहें. विलायतच्या डांकेचीं पत्रें ल्याहायचीं आहेत, तेव्हां आज मी तुझ्या शिकण्याचा उपयोग करून घेणार आहें. तर तूं मी सांगेन त्या मजकुराचीं पत्रें लिही. नाहीं तर मी तोंडीं सांगेन तें तूं लिही. पण माझ्याजवळ तूं असली पाहिजेस. तुझ्यावांचून मला घटकाभरसुद्धां करमायचं नाहीं. चल लवकर चहा वगैरे आण, आणखी ल्याहायाला बसूं. इंग्लंडांतली तुला काय गोष्ट सांगूं ! खरं खरं संसाराचं सुख ते लोक अनुभवतात. नवराबायकोचं खरं प्रेम त्यांच्यांतच. तें 'आयडिअल्' मी घेऊन आलों आहें. आणखी त्या 'आयडिअल्' प्रमाणें आपल्या दोघांचा आयुष्यक्रम करायचा असा माझा निश्चय आहे. तूं मला त्या कामीं मदत केली पाहि-जेस. मी मधेंच एखादवेळ तिरसट्यासारखा वागतों, म्हणून त्याच्यावर तूं जाऊं नकोस, त्यांत कांहीं अर्थ नाहीं. एखाद्याचा 'मूळ स्वभाव जाईना' असं असतं कीं नाहीं, तसंच माझं झालं आहे. इंग्लंडाहून पत्र लिहून जें मीं तुला कळविलं, कीं मला मागल्या सगळ्या गोष्टींबद्दल अगदीं पश्चा-त्ताप झाला आहे, तेंच अगदीं खरं आहे. पण इथें आलों आणखी इकडलं वारं लागून आपलं मधून मधून वेड भरतं. पण, तूं जर तें चार दिवस सहन करून मला शांति शिकवशील तर तें वेड सुद्धां जाईल. आणखी मी खरा खरा तुझा दास होईन. आतां

मी जें बोलतों आहे हें अगदीं नीट विचार करून, खरा पश्चात्ताप होऊन बोलतों आहें. इतर वेळीं वारं भरल्यासारखं जें बोलतों तें तात्पुरत्या वेडांत बोलतों असं समजून चालत जा. त्या वेळीं मला संभाळून जर तूं घेतलंस आणखी चार दिवस काढलेस तर बावनकशी सोन्यासारखा मी झालों म्हणून समज. तुझ्याकडे आहे सारं मला चांगला करण्याचं श्रेय. आणखी आतां काय सांगूं ? मी आपल्याकडून तर खटपट करतोंच. चांगलं होण्याची क्षणोक्षणीं माझ्या मनाची धडपड चालू आहे. पण त्याला तुझं साहाय्य पाहिजे. तूं पुष्कळ इंग्रजी कादंबऱ्या वाचल्या आहेस, तेव्हां बायकांच्या शांतिमुळें आणखी निश्चेमुळें अधमाचा उत्तम झालेल्या पुरुषांचीं उदाहरणं तुला ठाऊक आहेतच त्यातलंच एक माझं कर. " असें म्हणून त्यानें तिला आपल्याजवळ घेतलें आणि अश्रुपाताला सुरुवात केली. त्या त्याच्या बोलण्यानें तिचें अंतःकरण पहिल्यानें त्रस्त, नंतर शंकित पुढें चकित मग विश्वस्त असें होत जाऊन अखेरीस द्रवत चाललेंच होतें. त्या अश्रुपातानें तर तिचें अंतःकरण इतकें द्रवलें कीं, तिच्याही डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

# प्रकरण ३७ वें.

## काय करावें



वर सांगितल्याप्रमाणें बराच वेळ दोघांचें अश्रुमेलन झाल्यानंतर अण्णासाहेब अतिशय मवाळीनें पद्मेस म्हणाले " तूं आतां खालीं जा, काय तुला तयारी वगैरे करायची असेल ती कर. मी आतां कांहीं वेळ कागदपत्र पहातों, आणखी मग जेवण वगैरे झाल्यानंतर आपण चार घटका पुनः बोलत बसूं. " अशा प्रकारें बोलणें झाल्यावर ती खालीं गेली. तिची चर्या त्या वेळीं फार संतुष्ट दिसली. तिनें आपल्या आईला संध्याकाळच्या मेजवानीसाठीं कोणी येणार असल्याबद्दल सांगितलें आणि दोघींनीं काय काय करावयाचें तें ठरविलें. सकाळचीं जेवणें आटपल्यानंतर थोड्याच वेळांत अण्णासाहेबांनीं पद्मेला पुनः कांहीं तरी मोठें समाधानकारक बोलून संध्याकाळच्या तयारीकरितां खालीं लावून दिलें आणि आपण पुनः कागदपत्र पहाण्यांत व पत्रें लिहिण्यांत स्वारी गुंतली. तिसरे प्रहरीं चहा घेतेवेळीं तर त्यांनीं पुनः "पद्मे, माझ्या निरसलपणाचा तिटकारा करूं नको. तुझ्या शांतीनेंच तो माझ्या अंगांतून पार नाहींसा होईल. तुझ्यामुळेंच माझ्या अंगचे सगळे अवगुण मी खरोखर काढून टाकीन. मी आतां घटकाभर बाहेर जातों आहें. आतां येईन तो पाहुण्यांना बरोबर घेऊनच येईन. तूं सगळी चक्क तयारी ठेव. ते दोघेही मोठे विचक्षण आहेत. ‘ शिकलेल्या बायकांना

गृहशिक्षण कांहीं नसतं. त्यांना कांहींच येत नाहीं. भातपिठलंसुद्धां करण्याची त्यांना अक्कल नसते ' असं ते नेहमीं म्हणत असतात. आणखी मी त्यांना नेहमीं मोडून काढीत असतों कीं, " माझी स्थिति तशी नाहीं. मी मोठा सुदैवी आहें. माझी बायको चांगली सुशिक्षित आहे, पण गृहकार्यांत देखील फार दक्ष आहे, तिला स्वयंपाक सुद्धां उत्तम येतो, " आज त्यांना त्याचा अनुभव दाखवायचा आहे. तेव्हां विशेष काळजी घे. "

असें खूपसें बोलून व प्रेमानें तिच्या हनुवटीस धरून हलवून हंसत हंसत स्वारी बाहेर गेली. त्या हंसतमुखाचें प्रतिबिंब पद्मेच्या चर्येत दिसूं लागलें. तिचें मनही थोडेंसें प्रसन्न झालें; आणि त्या प्रसन्न-स्थितींत ती रात्रीसाठीं पदार्थ करण्यांत गुंतली. तिन्हीसांजा झाल्या तेव्हां तिच्या मनांत सहज आलें कीं, आपण मथुरातांईस व तिच्या भावंडांस फराळास बोलवावें. म्हणजे तिचा स्वयंपाक करण्याचा त्रासही वांचेल आणि आपल्यालाही तिची थोडीशी मदत होईल; शिवाय आदल्या रात्रीं झालेल्या प्रसंगाबद्दल आपल्या नवऱ्यास कांहीं तरी वाईट वाटलें वगैरे कळविण्याचेंही राहिलें होतें, तेव्हां तेंही करावें. असा विचार करून ती मथुरातांईच्याकडे जाण्यासाठीं घरांतून बाहेर पडली, तों मथुरातांईच्या त्या घरांतून वसंतराव बाहेर पडून झटकन् समोरच्या रस्त्यानें निघून गेल्याचा तिला भास झाला. 'वसंततराव कोणाकडे गेला असावा ! ' हा प्रश्न अर्थातच तिच्यापुढें उभा राहिला. कारण त्या वाड्यांत एक ती मालकीण, आणखी दुसरी मथुराताई यांखेरीज तर कांहीं कोणी राहत नाहीं. तेव्हां वसंतराव या दोघींपैकीं कोणाकडे आला असावा, यावर तिचा विचार सुरू झाला. दोघींचाही कांहीं त्यांच्याशीं संबंध असेल हें तिला मुळींच संभवनीय वाटेना. परंतु विशेष विचार करण्यांत तात्पर्य नव्हतें. आंत जाऊन दोघींपैकीं कोणालाही विचारलें तर तें समजण्याजोगें होतें.

ती मथुराताईकडे गेली, तों मथुराताई चुलीपाशीं बसून चुलीस पेटवण घालण्याच्या विचारांत असून नुकत्याच बाहेरून आलेल्या मनोहरास म्हणत होती: " मनोहर, जारे पद्माताई आहेत का घरीं तें पहा, आणखी असल्या तर त्यांना म्हणावं कांहीं जरूरीचं काम आहे, तुम्ही इकडे आलां तर पहा. मी तिकडे येण्यापेक्षां तुह्मीच इकडे आलांत तर ठीक होईल. "

मथुराताईचें वर दिलेलें बोलणें अर्धवट झालें असतांच पद्माताई दारांत येऊन उभ्या राहिल्या होत्या. मथुराताईचें तोंड चुलीकडे असल्यामुळें त्यांस त्या दिसल्या नाहींत. मनोहराचीही पाठ दाराकडे असल्यामुळें त्यासही त्या आल्याचें ठाऊक नाहीं. परंतु बची त्या दाराच्या समोरच होती. तिनें त्यांस पाहिलें व ती " या पहा त्याच आल्या आहेत, " असें म्हणणार तों पद्माताईनीं तिला न बोलण्याविषयीं खूण केली. तेव्हां ती आपल्याशींच हंसत गप्प बसली.

मथुराताईनीं पेटवण घालून काडी ओढून लावण्याच्या सुमारास त्यांचें बोलणें संपलें आणि त्या एक वेळ बरोबर पेटतें आहे कीं, नाहीं तें पाहून मनोहरास उद्देशून म्हणतात: " अरे गेलास का ! " तों पद्माताई एकदम त्यांना म्हणतात, " मनोहर नको जायला, आपल्या मनांत मीं यावं असं आत्तां आलेलं कळूनच आलें पहा कशी ती ! "

त्याबरोबर मथुराताई एकदम उठली, आणि हंसत हंसत म्हणते: "चुलबाईशीं हितगुज करीत होतें यामुळें आपण केव्हां आलां मला समजलं सुद्धां नाहीं. बरं झालं आलांत, थोडंसं काम होतं."

"माझं देखील कामच होतं, म्हणून मी आलें. पहिली गोष्ट ही कीं, काल रात्रीं जें झालं तें मनांत ठेवूं नये. आणखी दुसरी गोष्ट ही कीं, मनांत ठेवलं नाहीं, याचा मला प्रत्यय आणून द्यावा."

"माझ्या मनांत कांहींसुद्धां नाहीं. मला त्याचं स्मरण सुद्धां नाहीं. अहो, असं हें चालायचंच. अगदीं कांहीं सुद्धां माझ्या मनांत नाहीं. हें काय भलतंच तुमच्या मनांत आलं! एवढ्याकारितांच का आलां!"

"नाहीं. तुमच्या मनांत कांहींसुद्धां यायचं नाहीं आणखी राह्यचंयू नाहीं हें मला ठाऊकच आहे, पण तें तुह्मी विसरल्याचं प्रत्यंतर मागायला आलें आहे."

"प्रत्यंतर ! प्रत्यंतर काय देऊं !"

"प्रत्यंतर इतकंच कीं, आज रात्रीं तुह्मी सगळीं जेवायलाच तिकडे या. दोघे तिघे स्नेही जेवायला यायचे आहेत तेव्हां वाढायबिढायला आपली मला मदत पाहिजे आहे. आतां चला. कांहीं करायचं राह्यलं आहे तें करूं आणखी मग........."

एखाद्या माणसावर अगदीं भयंकर संकट येऊन कोसळावें आणखी त्यांतून सुटून जाण्याला काय उपाय योजावा तें कांहीं त्याच्या ध्यानांत येऊं नये, अशा स्थितींत जशी त्याची स्थिति होते, तशी हुबेहूब स्थिति या वेळीं मथुराताईची झाली. आदल्या रात्रीच्या अनुभवानें तिला असें वाटलें कीं, पुनः आपण यांच्या घरांत पाऊलसुद्धां घालूं नये. तिनें तसा निश्चयही केला आणि त्यामुळेंच पद्माताईस तिनें आपल्या घरीं बोलाविण्यासाठीं मनोहरास पाठविण्याचा विचार केला होता. साधारणतः तिनें केव्हांही पद्माताईस आपण होऊन आपल्या घरीं बोलाविण्याचें मनांत आणिलें नसतें; परंतु काम तर फार जरूरीचें आणि आपण जाणें तर इष्ट नाहीं, तेव्हां त्यांनाच इकडे बोलवावें असा विचार करून तिनें मनोहरास निरोप सांगितला. तें सर्व एकीकडेच राहून आतां आपल्याला ही बाई बोलावते आहे, तेव्हां आतां काय करावें ? असें तिला मोठें गूढ पडलें. 'नाहीं येत' म्हटलें म्हणजे कृतघ्नता वाटेल. 'येतें' ह्मटलें, तर काय प्रसंग होईल आणखी काय नाहीं, याचा नेम नव्हता.

मथुराताई, गुटमळते आहे असें पाहिलें, तेव्हां पद्माताई तिला म्हणते: "मीं म्हटलं नाहीं कीं, आपल्या मनांत कांहीं राह्यलं नाहीं याचं प्रत्यंतर द्या म्हणून. शिवाय मी आपल्या मदतीसाठीं म्हणून बोलावतें आहे. आई कांहीं वाढयबिढायला यायची नाहीं तेव्हां मला वाढायला मदत पाहिजे.".

मथुराताईनें बराच विचार केला, नंतर म्हणते, "तुम्हांला मदतच पाहिजे तर मी येतें, पण आतां मुलांना आणण्याचा आग्रह करूं नका. मी त्यांना थोडा भात करून घालतें, आणखी मग येतें, अगदीं अर्ध्या पाऊण तासांत येतें. मग किती वेळ लागला तरी हरकत नाहीं."

पद्माताई थोडीशी गुटमळली. नंतर आपणच म्हणाली, "तुह्मी म्हणतां तेंही खरं. मुलांना भुका लागल्या असतील. तेव्हां तसा आग्रह नाहीं मी करीत. होऊं द्या. त्यांना भात करून घाला आणखी लागलींच या. बरं पण मला बोलावूं पाठवीत होतां तें कशाला ?"

" हें एक पत्र कोणी फार जरूरीनं तुम्हांला द्यायला म्हणून माझ्याजवळ आणून दिलं आहे. हें पत्र सात आठ वाजण्याच्या आंत तुम्हांला पोंचवायला सांगितलं आहे. मग त्यांत काय आहे, आणखी काय नाहीं, तें मला कांहीं ठाऊक नाहीं. " असें म्हणून एक पत्र तिनें पद्मातांईच्या पुढें केलें.

" मला द्यायला पत्र ! आणखी तुमच्याकडे आणून दिलं ? कोणीं दिलं ? "

" त्या पत्रांत सगळं कांहीं लिहिलं आहे, म्हणून देणारांनीं सांगितलं. "

" पण ते देणारे कोण ? "

" कोण तें मला सांगतां येत नाहीं. मीं त्यांना विचारलं तों ते निघून गेले. फक्त दारांतून पुनः ' पत्र फार महत्वाचं आहे बरं. तुम्ही दिल्याखेरीज राहूं नका. मी कोण काय, त्यांना पत्र वाचतांच समजेल. मग त्या तुम्हांला सांगतील. ' असं बोलून तो गृहस्थ गेला. तुम्ही येण्याच्या पूर्वीं मिनिटां दोन मिनिटांचीच गोष्ट. " मथुरातांईचें शेवटलें वाक्य ऐकतांच पद्मातांईस एकदम चक्क झाल्याप्रमाणें झालें. वसंतरावाचा या पत्राशीं संबंध असावा असें तिच्या मनांत एकदम आलें; आणि तिनें तें पत्र दिव्याशीं नेऊन पाहिलें. वरचें अक्षर पहातांच तें वसंतरावाचेंच अशाबद्दल तिची खात्री झाली, आणि ती तें तेथेंच फोडून वाचावें कीं काय, असा विचार करूं लागली. पुनः तिला वाटलें कीं ' आतांच वाचूं नये. रात्रीं, कामधाम झाल्यानंतर सावकाश वाचावें.

तोच विचार कायम करून तिनें तें आपल्य हातांत घेऊन व " तुम्ही वाढायच्या बेताला या बरंका " असें मथुरातांईस बजावून ती घरीं गेली. ' आतां वाचायचं नाहीं ' असा बेत तिनें केला खरा, परंतु तिच्या मनांत आतां दुसरा कांहीं विचार येईना. कांहीं करायचें सुचेना. कांहीं बोलायचें सुचेना. तिची ती वृत्ति पाहून आईला फार विलक्षण वाटलें. तोंपर्यंतचा उत्साह एकदम मावळला कसा ? तिनें पद्मेला विचारलेंही कीं, " इतक्यांत असा काय तुझ्यांत फरक पडला, आणखी तूं चिंता करते आहेस कसली ? " परंतु पद्मेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. नुसता दीर्घ उसासा टाकला. आणि म्हटलें: "मंडळी यायची वेळ झाली. मला वाटतं आतां भात वैरावा, नाहीं तर आल्याबरोबर गर्दी व्हायची. "

इतकें बोलून पद्मा लागलीच तो विषय अजीबाद टाळण्यासाठीं म्हणते: " मी वाढायसाठीं मथुरातांईला बोलावून आलें आहें. "

" मथुरातांईला ? " आई एकदम निरसटपणानें म्हणते, " काय मथुरातांईला ? दुसऱ्या एखाद्या सवाष्ण बाईला बोलवायची असतीस. पण तुझ्या काय मनांत आलं हें कुणास ठाऊक ? अन् आज वसंतरावाला नाहीं ग बोलावलंस ? चार पानं झालीं अन् त्यांच्या घरापैकीं कुणाला बोलावलं नाहीं असं कधीं झालं नाहीं. आणखी आज कसं त्यांच्या घरीं बोलावणं धाडलं नाहींस ? "

" नाहीं धाडलं. कोण स्नेही आहेत आणखी काय आहेत ? त्याच्या ओळखीचे नसले, तर त्याला संकोच व्हायचा ? "

इतकें बोलून पद्मावती एकदम तेथून निघून गेली. आपल्याजवळचें तें पत्र आपल्या पेटींत ठेवावें आणि रात्रीं वाचावें, असा तिचा विचार होता. म्हणून ती आपल्या खोलींतल्या पेटींत तें ठेवण्यासाठीं दिवा घेऊन वर गेली. तिनें पेटी उघडली आणि आतां तें ठेवणार तों पत्त्याच्या बाज-

त्या उलट बाजूवरही कांहीं लिहिलें आहे, असें तिला दिसलें. तें तिनें लागलीच वाचलें. तें असें होतें:—" अण्णासाहेब आपल्या मित्रांस घेऊन घरीं जेवायला येण्यापूर्वी हें वाचावें. "

तें वाचतांच ती फारच चकित झाली. अक्षर वसंतरावाचें हें तिनें ओळखलें, तेव्हां आतां पत्र फोडून वाचण्यास विलंब करण्यांत तात्पर्य नव्हतें. तिनें तें तत्काळ फोडलें आणि वाचलें.

" तुला सांगावयाचें तें मी प्रत्यक्ष सांगावयास आलों असतों, परंतु अण्णासाहेबांस आम्ही कोणी तुझ्या घरीं आलों तर खपणार नाहीं. टपालानें पत्र पाठवावें तर तें तुझ्याच हातीं पडेल, याचा भरंवसा नाहीं. तुला आमच्या घरीं बोलावून सांगावें तर तुला येणें शक्य आहे कीं नाहीं कल्पना होईना. म्हणून तुझ्या बोलण्यांत आलेल्या तुझ्या नव्या मैत्रिणीकडून तुला तांतडीनें हें पत्र पोंचविण्याची युक्ति काढली. आज रात्रीं तुला एका कागदावर सह्या करायला अण्णासाहेब सांगणार आहेत, परंतु तूं त्या कागदावर सह्या करूं नकोस. निदान सर्व कागदांत काय लिहिलें आहे, तें वाचून मग काय करायचें तें कर. अंधळेपणानें सह्या करशील तर आपलें व आपल्या भावांचें पुरें नुकसान करून घेशील. मालती इथें असती, तर तिला सर्व मजकूर कळवून तुझ्याकडे लावून दिली असती. हा मजकूर लिहितांना मला फार वाईट वाटतें. तुझ्यासाठीं व तुझ्या भावांसाठीं तुला जागें करणें माझें काम आहे हें मनांत आणून मीं हा मार्ग स्वीकारला आहे. हें पत्र अगदीं वेळेवारी तुझ्या हातीं मात्र पडो. ज्यांच्या हातीं मी देणार आहें त्या देतीलच, पुनः एकदां लिहितों कीं, तूं कोणच्याही कागदावर कागद वाचल्याशिवाय सह्या करूं नकोस.

तुझा भाऊ वसंत."

पत्र वाचतांच पद्मताई फारच चकित झाली. आपली आज कांहीं कागदावर सही घेणार आहेत, हें वसंतरावास कळलें कसें ? याचें तिला फार आश्चर्य वाटलें. कागदावर सही घेणार एवढेंच त्याला कळलेलें आहे असें नव्हे तर त्यांत काय मजकूर आहे हेंही त्याला कळलें असावें हें उघड होतें. आपण सही केल्यास आपला व आपल्या भावांचा घात होण्याजोगें त्या कागदांत काय असणार ? तिला कांहीं तर्क होईना. तिची वसंतरावावर फार भक्ति, त्याच्या विषयीं फार आदर, आपल्या हिताकरितां तो अत्यंत जागरूक रहाणार हा तिच्या मनाचा दृढभाव. तेव्हां त्याला कांहीं तरी तसेंच कळलें असल्याखेरीज तो असें पत्र लिहिणार नाहीं हें उघड होतें. आपल्या पतीला आपल्याबद्दल व आपल्या सर्व माणसांबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला हें तरी त्याला बरोबर कळलेलेंच दिसतें कीं नाहीं ? तसेंच त्या कागदासंबंधानेंही कळलें असावें; आणि म्हणूनच त्यानें एवढें पत्र लिहून अशा द्राविडी मार्गानें आपल्या हातीं पोंचविण्याची तजवीज केली. त्यानें पत्र पाठविलें. आपल्याला वेळेवर मिळालेंही, परंतु आतां पुढें त्या पत्राप्रमाणें करण्याची काय व्यवस्था करावी ? हा विचार तिला पडला. आतां तो विचार करीत बसण्याला तिला क्षणभर ही अधिक वेळ मिळाला नाहीं. ती तें पत्र वाचून पाहून पेटींत ठेवून तशीच तेथें सचिंत बसली. तों मथुराताई खालून वर आल्या; आणि पद्मेस म्हणाल्या, "आपण सांगितल्यापेक्षां घटकाभर आधींच आलें. मनोहरानें भात उकरून वगैरे घ्या-

यचं कबूल केलंन आणखी त्यानंच ‘ मला, जा लवकर जा लवकर ’ अशी गर्दी केली. तोही आज तिकडेच भात खाणार आहे. आपण इथेंच बसून राहिलों आहों म्हणून आई रागावल्या आहेत. ”

मथुराताईंचा आवाज ऐकतांच पद्माताई घाबरल्यासारखी झाली. तिला शुद्धीवर येण्यास क्षणभर अवकाश लागला. यामुळें मथुराताई काय बोलल्या तें तिला समजलें नाहीं. अर्थात् ती कांहीं बोलली नाहीं.

लगेच भानावर येऊन ती ‘ आलों कीं तुह्मी ! चला खालीं’ असें म्हणून उठून ती खालीं जाण्यासाठीं पुढें झाली. दोघींही खालीं आल्या; आणि कांहीं कामाला लागल्या. पद्माताईचें चित्त कामांत नव्हतें हें उघडच होतें. तिचे हात कांहीं तरी करीत होते, आणि तिची ती भांबावलेली स्थिति पाहून तिची आई तिला एकसारखी बोलत होती.

इतक्यांत अण्णासाहेबांची स्वारी आणि त्यांच्याबरोबर आणखी पांचसहाजण लोक आले. ते आल्याबरोबर वर गेले, आणि त्यांनीं पद्माताईला वर बोलाविलें. पद्माताई-वर जातांच तिला म्हणतात, I promised you two guests but I have brought six. Is it not fine of me ? But I know you are a good handsome house-wife. And handsome is that handsome does. ”–( मी दोन पाहुणे येतील ह्मटलें होतें, पण सहा आणले आहेत. आहों कीं नाहीं आम्ही शहाणे ? पण तूं फार चांगली सुग्रण बायको आहेस. सुग्रण ती सुंदर, खरं कीं नाहीं ? ) हे आमचे स्नेही. तुझी व त्यांची ओळख झाली पाहिजे. ” इतकें आपल्या कुटुंबास बोलून ते एका गृहस्थाकडे वळून त्यास म्हणतात “ बरं काय हो मॅजिस्ट्रेटसाहेब, आधीं आतां सहींचं काम उरकून घेऊं या ” सहीची गोष्ट निघतांच पद्माताईला धडकी भरली !

# प्रकरण ३८ वें.

## मन्याबापू आले.



पद्माताईच्या घरीं मेजवानीची गर्दी चालली असतां वसंतराव आपल्या घरीं आपल्या खोलींत फार सचिंतपणें इकडून तिकडे, तिकडून इकडे येरझारा घालीत होता. त्याचा देह त्या खोलींत हिंडत होता, परंतु मन सगळें पद्माताईच्या घरीं वावरत होतें. "आपण लिहिलेलें पत्र मथुराताईनीं तिला पोंचविलें कीं नाहीं? पोंचविलें असलें, तरी तें वेळेवर पोंचविलें कीं नाहीं? वेळेवर पोंचविलें असलें, तरी पद्माताईनें तें वेळेवर वाचलें असेल कीं नाहीं, तिनें वेळेवर वाचलें असलें, तरी त्यांत लिहिल्याप्रमाणें तिच्या हातून होईल कीं नाहीं?" असे अनेक प्रश्न एकामागून एक त्याच्या मनांत उभे राहून तो आपल्याच मनाच्या साह्यानें त्या प्रश्नांचीं उत्तरेंही कल्पीत होता! परंतु कांहीं केल्या त्यास पूर्णपणें–किंबहुना अंशतःही–समाधानकारक उत्तरें कल्पितां येईनात. एक तर तिला पत्र तरी पोंचणार नाहीं,–पत्र पोंचलें, तरी ती वेळेवर वाचणार नाहीं–वाचलें तरी त्याप्रमाणें करण्याची धिटाई तिच्या हातून होणार नाहीं आणि तशी धिटाई झाली नाहीं ह्मणजे सर्वच बिघडून जाणार, असें वारंवार त्याच्या मनास वाटूं लागे. तो आपल्या मनास याप्रमाणें आपणच निराश करून टाकी; आणि अशी निराशा मनांत उद्भवली ह्मणजे आपणच 'पुढें काय होणार,' याबद्दल सचिंत होऊन उसासे टाकी. 'या वेळीं आपली बहीण मालती जर येथें असती, तर फार चांगलें असतें. तिला सारी हकीकत सांगून पद्मेला जागृत करविलें असतें. मालतीला पद्मेकडे वाटेल तितक्यांदां वाटेल तितक्या वेळां जाण्यास कांहीं प्रत्यवाय झाला नसता; आणि त्यामुळें पावलोंपावलीं काय प्रकार चालले आहेत, आणि त्यांचा परिणाम काय होणार आहे हें सर्व निदान पद्माताईच्या कानावर घातलें असतें. तिला कोणतीही गोष्ट करण्याला किंवा न करण्याला धीर देवविला असता. परंतु आतां त्याबद्दल नुसता विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे? सध्यांच्या स्थितींत काय करतां येईल, तें पाहिलें पाहिजे. असा त्यानें आपल्या मनाला एके दिवशीं बोध केला आणि त्या बोधाचें फळच त्याचें मथुराताईच्या घरीं जाऊन पद्माताईस तें पत्र देवविणें होय. त्या पत्राचें पुढें काय झालें हें जाणण्याची त्याला आतां उत्कट इच्छा झाली होती. परंतु क्षणोक्षणीं त्याला असें वाटत होतें कीं, त्या पत्राचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. इच्छा अत्यंत प्रबळ झाली, ह्मणजे ती हटकून आपल्याला इष्ट तें कार्य घडवून आणते, असा अर्वाचीन मानसशास्त्राचा सिद्धांत आहे. त्याप्रमाणें जर खरोखर घडत असलें, तर वसंतरावाच्या इच्छेप्रमाणें खास घडून

यावयाला पाहिजे होतें. तें तसें घडलें कीं नाहीं तें पुढें दिसेलच. परंतु तें दिमेपर्यंत वसंतरावाच्या चित्ताची मात्र फार त्रेधा उडाली होती. पद्मातांईच्या हातून तितका धीटपणा नाहीं झाला, तर पुढें आपण काय करावें? याबद्दल विवंचना करीतच तो हिंडत होता इतक्यांत त्याला असें वाटलें कीं, आपल्या खोलीच्या खिडकीखालून कोणी तरी आपल्याला हांका मारतो आहे. हांका मारणारा माणूस खुल्या आवाजानें हांका मारीत नव्हता. परंतु हांका तर त्यास खास ऐकूं आल्या.

तो खिडकीशी गेला, तेव्हां तर शब्द जास्तच स्पष्ट ऐकूं आला; आणि तो त्यानें एकदम ओळखला असावा, असेंही दिसलें. कारण त्याच्या चर्येवर एकदम आश्चर्य व संतोष झाल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तो त्या खालून हांका मारणाऱ्या इसमाला वरून प्रत्युत्तर न देतां एकदम आपल्या खोलींतून बाहेर पडून खालीं गेला व अगदीं मुकाट्यानें त्या माणसाच्या जवळ जाऊन त्यानें त्याचा हात धरला. त्या गृहस्थाचें लक्ष्य वर खिडकीकडे होतें. आपला कोणी तरी एकाएकीं हात धरला असें पहातांच तो एकदम घाबरला व त्याची बोबडी वळली. आणि तो घाबरल्या मुद्रेनें वसंतरावाकडे पाहून वेडगळपणानें बोलूं लागला. वसंतरावानें त्यास आश्वासन दिलें आणि ह्मटलें: "मन्याबापू तूं असा घाबरतोस कां? इतके दिवस कुठें होतास? तूं मला हांक मारीत होतास ना? चल. आंत चल."

"आंत कोणी नसलं, तर मी येतों. मी आधीं आमच्या घरीं गेलों होतों. पण तिथें कांहीं गडबड चाललेली आहे, पुष्कळ मंडळी जमली आहे; ह्मणून मग मी इथें आलों. वरं या वेळां इथें कोणी नाहीं. आणखी मी तुमच्या कांपाउंडांत शिरलों, तेव्हां कोणीं मला पाह्यलं नाहीं. नाहीं तर मला आतां आंत घेऊन चल."

"चल. मी तर तवढ्याकरितां आलों खालीं. तुझी हांक ऐकली तेव्हांच मला शंका आली कीं, तूं असावास. आणखी मग वरून 'ओ' देण्याच्या ऐवजीं आपला खालीं आलों. चल. अगदीं घाबरूं नकोस. इतके दिवस होतास कुठें? आणखी..."

"इथें बोलूं नका बाबा. आंत चल आणखी मग तुला सगळं सांगतों. मी तेवढ्याकरितां तर निसटून आलों आहें."

वसंतरावानें लागलीच त्या गृहस्थास घरांत नेऊन वर आपल्या खोलींत नेलें. खोलींत जाऊन बसल्यानंतर त्यानें एक लांबसा उसासा टाकला, आणि ह्मटलें:

"वसंतराव, तुझ्या हातांत मी आपली मान द्यायला आलों आहें. कापणार असलास काप; वांचविणार असलास वांचव."

"मन्याबापू, तूं ह्मणतो आहेस तरी काय? तुझी मान तूं माझ्या हातांत द्यायला आलास म्हणजे काय? आणखी तूं दिलीस तर मी कापीन हें संभवनीय तरी आहे का? तूं आतां वेड्यासारखं बडबडूं नकोस. शांत हो. माझ्याबरोबर जेवायला चल, जेव. रात्रभर झोंप घे, तुझं मन शांत झालं म्हणजे मग आपण उद्यां काय बोलायचं तें बोलूं."

"जेवायला चलूं? वा! अरे मला कोणीं पाह्यलं इथें आणखी त्या लोकांना जाऊन सांगितलं तर आतां धरणं येईल ना? मी निसटून कसा तरी आलों आहें. मला कांहीं बाबा त्यांच्या ताब्यांत जायची इच्छा नाहीं. मला आतां सगळा जन्म तोंड लपवूनच काढला पाहिजे. काय करणार? दादाला सोडवून आणायची खटपट केलीस तर पहा."

"अरे, पण मनू " वसंतराव त्याला ह्मणतो: " तूं असं वेड्यासारखं काय बोलतो आहेस! तूं होतास कुठें? कोणाच्या तडाख्यांत सांपडला होतास, तुझा दादा कुठें आहे, आणखी एकंदर प्रकरण काय आहे, तें मला सांग नीट. मग आपण त्याचा विचार करूं. तूं आधीं खरोखरीच माझ्याबरोबर जेव. मग जरा शांत झालास ह्मणजे आपण बोलूं. असं काय करतोस?"

तो गृहस्थ नुसता हंसला; आणि मग म्हणतो: " आणखी माझ्यावर कांहीं तरी लचांड त्या लेंकांनीं आणलं तर...... "

इतक्यांत वसंतरावास त्याची आई जेवण्यासाठीं हांका मारीत आली. त्याबरोबर हा घाबरून म्हणतो: " अरे बोवा मला आपला जाऊं दे. मला कांहीं इथें निर्धोकपणा वाटत नाहीं. "

त्याला आतां काय म्हणावें, तें वसंतरावास कांहीं सुचेना. कांहीं तरी करून त्याला शांत करून, तो इतके दिवस कोठें होता? त्याचा भाऊ कोठें आहे? हें सर्व त्याच्यापासून काढून घेतलें पाहिजे, असें वसंतरावास वाटत होतें. परंतु याला शांत करावें कसें, हेंच त्यास कळेना. शेवटीं त्यानें त्यास थोडें जरबीनें बोलून म्हटलें: "मन्या, मघापासून मी तुला सांगतों आहें कीं तूं वेड्यासारखं करूं नको. मला काय तें सांग. मला काय तें कळलं, म्हणजे मग तुला मी काय मदत करायची ती करीन. पण तूं आपलं वेड्यावेड्यासारखंच करतो आहेस. कोणी तुझ्या पाठोपाठ इथें येत नाहीं, तुला कोणी धरीत नाहीं. तूं स्वस्थ ऐक. मी आहें, दादासाहेब आहेत, तुला काय कोण करतं आहे तें पाहूं दे. तूं आतां मुकाट्यानं जेवायला चल. तुमचा दोघांचा आज आह्मी किती दिवस तपास करतों आहोंत, पण तुमचा पत्ताच नाहीं. आज आयताच आलास. मी आतां सांगतों तें माझं ऐक. तुला इच्छा नसली, तर कोणी सुद्धां तूं इथें आहेस म्हणून कोणाला सांगत नाहीं अन् इथें तुझा तपास करायला कोणी येत नाहीं. चल आतां. "

वसंतरावानें इतकें जरबीनें सांगितल्यानंतर तो तरुण गृहस्थ थोडा नरमला; आणि अगदीं मुकाट्यानें जेवावयाला येण्याचें त्यानें कबूल केलें. वसंतरावानें त्याला जेवायाला नेलें. तो जेवावयाला बसण्यापूर्वी यानें आपल्या आईला व इतर मंडळीला— आपल्या वडिलांना सुद्धां ' तो असा असा एकाएकीं आला आहे. परंतु कोणाला तें कळेल म्हणून भितो आहे. मी त्याला हळूहळू शांत करून त्याच्याकडून सर्व मजकूर काढून घेतों ' असें सांगून ठेविलें असल्यामुळें कोणीं त्यास एका अक्षरानेंही कांहीं विचारलें नाहीं. दादासाहेबांनीं तर त्यास पाहून नुसतें ' कसं काय आहे? ' हें सुद्धां विचारलें नाहीं. मन्याबाच्या मनानें त्यामुळें असें घेतलें कीं, आपणास कोणी ओळखिलें नाहीं. ही त्याच्या मनाची समजूत झाली हें एका दृष्टीनें फार चांगलें झालें.

जेवणें झाल्यानंतर वसंतरावानें त्यास पुनः आपल्या खोलींत नेलें आणि " आतां बोलायची इच्छा नसली तर तूं स्वस्थ नीज. मग काळीं जागा झालास ह्मणजे मग पहातां येईल " असें त्यास ह्मटलें.

मन्याबाची इच्छा तरी तीच दिसली. इच्छा नसली, तरी तो इतका पेंगावयाला लागला कीं त्याला आतां कांहीं सांगणें अगदीं अशक्यच होतें. थोड्याच वेळांत त्याला गाढ झोंप लागून तो घोरूं लागला. एखाद्या लहान मुलासारखीच त्याची अवस्था झाली. वसंतरावाची मात्र स्थिति

अगदीं उलट झाली. मन्याबा येण्यापूर्वी तो पद्मताईच्या संबंधानें विचार करीत येरझारा घालीतच होता. त्यांत आतां याच्या येण्यानें जास्तच काळजी उत्पन्न झाली कीं काय कोण जाणे ! पद्मताईनें तिकडे काय केलें असेल ? तिचें काय झालें असेल ? तिनें आपल्या सांगण्याप्रमाणें सही करण्याचें टाळलें असेल, कीं नाइलाजानें सही केली असेल, काय झालें असेल ? याची त्याला काळजी वाटतच होती; आणि आतां हा आला आहे, तर याची हकीकत काय आहे, याचा भाऊ कोठें आहे, यासंबंधाची काळजी त्यास वाटूं लागली. या पोराच्या मेंदूंत कांहीं तरी कमीपणा झाला असावा असेंही पण त्याच्या मनांत आलें. परंतु हा आतां आयता आपल्याकडे आलाच आहे, तर उद्यांच्या दिवसांत केव्हां तरी त्याच्यापासून सगळी बातमी काढून घेतल्याखेरीज रहात नाहीं, अशी त्यांच्या मनाला पक्की खात्री वाटली. परंतु पद्मताईबद्दलची काळजी मात्र त्याला कांहीं केल्या स्वस्थ पडूं देईना. त्यानें झोंप घेण्याचा यत्न केला, परंतु व्यर्थ. पंधरा मिनिटेंसुद्धां स्वस्थ पडणें त्याला अगदीं अशक्य झालें. होतां होतां त्याच्या मनांत एकदम विलक्षण विचार आला. 'पद्मेचा नवरा आज तिच्यापासून मुखत्यारपत्रावर सही घेणार होता. 'तूं त्यावर सही करूं नकोस' असें आपण तिला लिहिलें. परंतु आपल्या लिहिण्याप्रमाणें तिनें सही करीत नाहीं, म्हणून नवऱ्याला सांगितलें असलें, तर तो काय करील याचा कांहीं नेम नाहीं. तो शुद्ध पशु आहे. रागाच्या सपाट्यांत त्यानें जर तिला मारलें......'

मारण्याचा विचार त्याच्या मनांत येतांच त्याच्या अंगावर शहारे आले; व एकदम त्याला आपण पद्मताईला पत्र लिहून सही करूं नको, म्हणून लिहिल्याबद्दल पश्चात्ताप झाला. तिच्या अंगावर त्या मूर्खानें हात टाकला, तर त्याचा दोष आपल्याकडे, असें त्याच्या मनास वाटूं लागलें. पण नुसता आपल्याकडे दोष येणार असें वाटूनच राहिलें नाहीं, तर मार खाण्याचा अपमान सहन करण्याची पाळी आपण तिच्यावर आणण्याला कारण झालों असें त्याच्या मनांत येऊन त्याचें मन त्याला फार खाऊं लागलें. शेवटीं त्याला असें वाटलें कीं, आपण एकवार सहज तिच्या घराकडे फेरी मारून यावें. कांहीं गडबड असल्यास आपल्याला कळेल; नसल्यास उगीच बाहेरून जाऊन आल्यामुळें डोकें शांत होऊन झोंप तरी लागेल.

हा विचार त्याच्या मनांत येण्याचा अवकाश, कीं स्वारी आपला पोषाख चढवून बाहेर पडलीच. तो तडक पद्मताईच्या घराकडे चालला. पद्मताईच्या घरांत पुढल्याच माडींत मारे हंशा आणि गाणें यांची झिम्मड उडाली होती. तें पहातांच प्रथम वसंतरावास बरें वाटलें. ज्या अनिष्ट अपेक्षेनें तो तेथें आला होता, ती अपेक्षा विफल झाली, याबद्दल त्यास फार समाधान वाटलें. त्या माडींत जो हवजा चालला होता, त्याच्या मुळाशीं काय होतें तें मनांत येऊन त्यास फार फार वाईट वाटलें. परंतु त्याला असें वाटलें कीं, पद्मेनें सही दिली असावी, नाहीं देत असें म्हटलें नसावें—नाहीं तर या वेळीं आपल्याला निराळाच सीन दृष्टीस पडला असता.

असें मनांत येतांच त्याला फार उद्विग्नता आली. आपली व पद्मताईची प्रत्यक्ष भेट झाली असती, तर तिला नवऱ्याच्या म्हणण्याप्रमाणें सही केली असतां काय काय आणि कसे, कसे अनर्थ ओढवतील त्यांचें चित्र

तिच्या डोळ्यांपुढें उभें करतां आलें असतें व कांहीं झालें तरी सही करूं नये असें तिच्या मनांत भरवून देतां आलें असतें असेंही त्याच्या मनांत आलें. आपल्या नुसत्या पत्राचा तसा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तिनें सही केली असावी. न जाणों कदाचित् आपल्या नवऱ्याविरुद्ध आपलें मन कलुषित करण्याकरितां आणि विनाकारण आपलें दोघांचें भांडण लावण्याकरितां यानें ही चिठ्ठी आपल्याला लिहिली असेंही तिच्या मनांत आलें नसेल म्हणून कशावरून ? असाही एक विलक्षण विचार त्याच्या मनांत आला. तीं दोघें नवराबायको; त्यांत अण्णासाहेबानें विलक्षण माया पसरून तिचें मन वश करून घेऊन आपण सर्व करतों तें तिच्या हितासाठीं करतों, कारण तिचें हित तेंच आपलें हित असें भासविणें अगदीं साहजिक; व तसा तिच्या मनाचा एकदां ग्रह झाल्यानंतर मग काय विचारतां ? जो कोणी नवऱ्याच्याविरुद्ध कांहीं बोलेल किंवा सुचवील, तो आपमतलबी ठरावयाचा. तेव्हां आपल्या पत्राचा असा अर्थ होण्याचा व आपल्यावर आपमतलबीपणाचा आरोप येण्याचा त्याला फार संभव वाटला. त्याचेंही मन आतां फार अधू झालें होतें; त्यामुळें हा विचार त्याच्या मनांत येण्याला आणि त्यांत त्या माडींत चाललेल्या त्या धुमश्चक्रींतून विशेष मोठा असा हंशा कानीं पडावयाला एकच गांठ पडली. तेव्हां त्याला असेंही वाटलें कीं, पद्मातांईनें कदाचित् आपलें पत्र आपल्या नवऱ्याला दाखविलें असावें आणि त्या पत्राला न जुमानतां तिनें सही दिली तेव्हां आपला ( वसंतरावाचा ) फजितवाडा झाला असें म्हणून त्यांचा तो विशेष हंशा उडाला असावा. हें मनांत येतांच वसंतरावास फारच वाईट वाटलें. आपण करावयाला गेलों काय आणि झालें काय ! आतां पुनः पद्मातांईच्या समोर जाण्यालासुद्धां आपल्याला तोंड नाहीं असें सुद्धां त्याच्या मनांत आलें.

मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति कांहीं विलक्षण असते. वसंतरावाच्या मनांत पद्मातांईबद्दल फारच आदर व प्रेम असे. मालतीबद्दल जसें त्याच्या मनांत प्रेम होतें, तसेंच किंबहुना त्यापेक्षां कांकणभर जास्त व फार आदरयुक्त प्रेम पद्मेविषयीं त्याच्या मनांत होतें. तिला कोणी दुःख देतो आहे असें त्याला कळलें, तर तो त्या दुःख देणाराचें वाटेल तसें पारिपत्य करण्यास तयार होता. मात्र तसें पारिपत्य करणें त्याला शक्य हवें. तिला अमक्या एका प्रसंगामुळें दुःख होण्याचा संभव आहे असें त्याला कळलें, तर तो प्रसंग टाळण्यासाठीं तो आपल्या प्राणाकडेही पहावयाचा नाहीं, अशी त्याची तिच्या ठिकाणीं निष्ठा होती; आणि तिच्या मनांत आज आपल्याविषयीं अनादर उत्पन्न होण्याजोगी गोष्ट आपण केली असें त्याच्या मनास डाचूं लागलें. मग काय विचारतां ?

तो कांहीं वेळ त्या घरावरून फेऱ्या मारून गेला. एक वेळ त्याला असेंही वाटलें कीं, आपण आंत जाऊन कोण कोण मंडळी जमली आहे तें पाहून यावें; आणि पद्मेची भेट घेऊन तिला आपल्या घरीं कोण आलें आहे तें सांगावें. पुनः त्यास वाटलें आपण गेलों तर तें बरें दिसावयाचें नाहीं; आणि त्यांत आपलें पत्र जर पद्मातांईच्या नवऱ्याच्या दृष्टीस पडलें असलें, तर आपली निव्वळ थट्टा करून घेण्यास,—टर उडवून घेण्यास आपण तेथें गेलों असें होईल, हें त्याच्या मनांत येऊं लागलें. अशी कांहीं मनाची विलक्षण वृत्ति होऊन तो अगदींच वेड्याप्रमाणें इकडून तिकडे हिंडूं

लागला. दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं त्याला जर कोणीं सुचविलें असतें कीं, तूं रात्रीं पद्मातांईच्या घराशीं जाऊन याप्रमाणें पहारा करून डिटेक्टिवाचें काम कर, तर तो तें सुचविणाराची टर उडविता. परंतु आदले दिवसापासून त्याच्या मनाची कांहीं चमत्कारिक वृत्ति झाली होती; आणि त्या वृत्तींत भर घालण्यासारखेंच काय, त्याच्या खोलींत निजलेला तो गृहस्थ आला. तो आल्याचें पद्मातांईस कळविणें हें आपलें अवश्य कर्तव्य, असें त्याच्या मनांत आलें. परंतु पुनः वाटलें कीं, त्याची हकीकत काय ती विचारून घेतल्यानंतर मग कांहीं कळविण्यांत हरकत नाहीं असें आपल्याला दिसून आलें, तर पद्मातांईला सांगावें. नाहीं तर सांगूंच नये तें चांगलें. असा कांहीं विचार करून आणि आंत जाऊं नये असें ठरवून तो परत आपल्या घरीं आला परंतु पहातो, तों मन्याबापू आपल्या अंथरुणावर नाहीं; आणि घरांत तपास करतां तो केव्हां गेला त्याचाही पत्ता नाहीं.

# प्रकरण ३९ वें.

## मन्याबापू गेले.



मन्याबापू नाहींसे झाले, हें पहाण्याबरोबर वसंतरावास फारच विलक्षण झालें. त्याला त्याच्यापासून किती तरी गोष्टी विचारून घ्यावयाच्या होत्या, त्याला किती तरी गोष्टी सांगावयाच्या होत्या, त्या सर्व आतां जेथल्या तेथें राहिल्या. इतके दिवस त्याचा व त्याच्या वडील भावाचा शोध आपण लावीत असतां आपल्या प्रयत्नांस फळ आलें नाहीं, आणि अगदीं अनपेक्षित अशा तऱ्हेनें तो स्वतः येऊन उभा राहिला असतां आपण गाफिल होऊन त्याला हातचें घालविलें, हें मनांत येऊन त्यास फार वाईट वाटूं लागलें. तो आला आहे ही गोष्ट आपण पद्मातांईला कळविली असती, तरी बरें झालें असतें असें एकवार त्याच्या मनास वाटलें, परंतु तो तसा आला असून पुनः कशास कांहीं पत्ता न लागतां नाहींसा झाला हें ऐकतांच तिला फार वाईट मात्र वाटलें असतें; तेव्हां तिला कांहींच कळलें नाहीं हेंच बरें असेंही लागलीच त्याच्या मनास वाटलें.

पोरगा कोणा तरी लुच्चयांच्या तडाक्यांत सांपडला असून त्यांच्या हातून निसटला. परंतु त्यांचा त्याला फार विलक्षण धाक वाटत असला पाहिजे हें त्यास अगदीं उघड दिसलें. इतकेंच नव्हे, तर ते लुच्चे कोण लोक असावेत याचा सुद्धां त्याला संशय आला होता—नव्हे मनाची पक्की खात्री होती, परंतु त्या खात्रीबद्दल पूर्ण पुरावा नसल्याकारणानें त्याला त्यासंबं-

धांत कांहींच करतां येत नव्हतें. त्यानें व त्याचा स्नेही गंगाधर यानें पुष्कळ खटपटी केल्या. परंतु कांहीं थांग ना पत्ता ! हा पोरगा आयता हातांत आला असतां आपण त्याच्यापासून कांहीं बातमी न काढतां त्याला स्वस्थ निजूं दिलें हीच अगदीं चूक केली असें आतां त्याला वाटूं लागलें. परंतु तसें नुसतें वाटून काय उपयोग ? थेंबानें गेलें तें हौदानें येत नाहीं, हीच गोष्ट खरी. आतां पुढें आपण काय करावें? तो कोणत्या तरी गाडीनें कोठें गेला असेल असें मनांत येऊन त्यानें लागलीच स्टेशन गांठलें, परंतु तेथेंही त्याचा पत्ता लागला नाहीं. तथापि स्टेशनावर त्याच्या स्नेह्यांतली कांहीं मंडळी होती, त्यांना त्यानें मन्याबापूचें वर्णन देऊन तो जर कोठें दिसला तर कांहीं तरी करून त्याला थोडा अडवून ठेवून आपल्याला वर्दी द्यावी असें सांगितलें आणि तो परत आला.

त्याला त्या रवंद रात्रीं मुळींसुद्धां झोंप नाहीं. तो आपल्या खोलींत नुसता येरझारत होता. जवळ जवळ पांच सहा तास याप्रमाणें येरझारला. त्याला कांहींएक सुचेनासें झालें. हा पोरगा कोठें गेला असावा, हा एक विचार, किंवा पद्मेनें त्या आपल्या पत्राचें काय केलें असावें हा दुसरा विचार. नव्याण्णव हिश्शांनीं तिला आपल्या पत्रांत कांहीं अर्थ नाहीं, असें वाटून तें आपल्या नवऱ्यास तिनें दाखविलें असेल, आणि मग आपल्या पत्राची त्या मंडळींत टवाळी झाली असेल व तिनें त्या मुखत्यारपत्रावर मुकाट्यानें सही केली असेल असें एकदां त्याला वाटे. असा विचार आला कीं आपण उगाच पत्र लिहिलें असें वाटून तो फार खिन्न होई. पुनः असें वाटे कीं, नव्याण्णव हिश्शांनीं तिनें आपल्या पत्राप्रमाणें वागणूक केली असेल. तिनें कांहीं तरी करून सही करण्याचें टाळलें असेल. निदान आपलें पत्र आपल्या नवऱ्यास तरी खरोखर दाखविलें नसेल.—असा विचार मनांत आला ह्मणजे त्यास किंचित् समाधान होई. परंतु हें समाधान फार वेळ टिकत नसे. कारण सही देत नाहीं असें दिसतांच त्या पशूनें कसें वर्तन केलें असलें पाहिजे त्याचें कल्पनाचित्र त्याच्या डोळ्यांपुढें दिसे. अशी भ्रांतिष्टासारखी त्याची अवस्था झाली होती. पद्मताईच्याकडे काय झालें हें जाणण्याची त्याला इच्छा होती, परंतु ती तृप्त करून घ्यावयाची कशी ? अण्णासाहेब आले त्या दिवशीं तो घटकाभर गेला होता, तेवढ्यांत त्यानें पद्मताईच्या नवऱ्याचें आपल्याबद्दल व आपल्या वडिलांबद्दल काय मत आहे तें सर्व जाणलें होतें, आणि ह्मणून त्यानें तिच्या घरीं पुनः आपण जावयाचें नाहीं असा निश्चय केला होता व आपल्या वडिलांनाही त्यानें सावध करून ठेविलें होतें. अर्थात् तेथें जाऊन आतां शोध करणें कांहीं शक्य नव्हतें.

सबंद रात्र त्यानें याप्रमाणें काढली, परंतु उपयोग काय ? आपल्या खोलींत तासचे तास येरझारून कोठें कामें घडून येतात ? शेवटीं त्याच्या मनांत एक उपाय आला. ज्या तिच्या मैत्रिणीकडून त्यानें तिला आपलें पत्र पोंचविण्याचें काम केलें होतें, तिला भेटून पत्र पोंचतें झालें कीं नाहीं हें विचारावें, ह्मणजे जर कांहीं आपल्याला सांगण्याजोगें तिला कांहीं समजलें असलें तर ती सांगेल. दुसरा कांहीं उपायच नव्हता. तेव्हां तोच विचार त्यानें कायम केला आणि दिवस उजाडतांच त्यानें तिकडे जाण्याचा निश्चय कायम केला. उजाडल्यानंतर बराच वेळ त्यानें जाऊं दिला. सुमारें आठ वाजले. तेव्हां तो मथुरताईच्या

बिऱ्हाडाकडे गेला. तेथें जाईपर्यंत त्याच्या मनाची स्थिति एकंदरींत ठीक होती, परंतु घरांत पाऊल घातल्याबरोबर त्याला असें वाटलें कीं, जिची आपली कांहीं ओळख नाहीं अशा बाईकडे आपण लागोपाठ हेलपाटे घालूं लागलों हें तिला कसें काय आवडेल ? निदान लोक तरी काय म्हणतील ? परंतु असल्या विचारांना मनांत थारा देऊन विनाकारण तर्क वितर्क काढीत बसण्याची ही वेळ नव्हती. ते विचार मनांत येतांच त्यानें दूर झुगारून दिले आणि तो मथुराताईच्या बिऱ्हाडांत गेला. मथुराताई गृहकृत्यांत निमग्न होत्या. त्यानें आंत जातांच अधिकउणा विचार न करतां एकदम त्यांना म्हटलें:

"मी पुनः आज, आपली माझी पूर्वीची मुळींच ओळख नसतां आलों याच्याबद्दल क्षमा करा. पण मीं काल पद्माताईला देण्यासाठीं दिलेलं पत्र तिला पोंचलं कीं नाहीं तें विचारण्यासाठीं आलों आहें. पत्र फार महत्वाचं होतं. तें पोंचलं नसलं तर..."

मथुराताईनीं त्यास तावडतोब उत्तर दिलें:

"पत्र तावडतोब त्यांच्या हातांत गेलं. आपण दाराबाहेर पडलां असाल नसाल, तों त्याच कांहीं कामाकरितां इथें आल्या होत्या. त्यांच्याजवळ पत्र दिलं."

पत्र पोंचलें असेल कीं नाहीं त्याबद्दल त्याला खरोखरी शंका नव्हतीच. मथुराताईजवळ दिलेलें पत्र पद्मेला खास पोंचणार ही त्याची खात्रीच होती. शंका काय ती पुढची. परंतु ती दूर होण्याला काय उपाय योजावा असा विचार करीत तो आपला मुखस्तंभासारखा तिच्यापुढें उभा राहिला. हा गृहस्थ नुसता आपल्यापुढें उभाच काय राहिला आहे असें मनांत येऊन तीही संकोचवृत्तीनें तेथें उभी होती.

'हिला आपण जास्त कांहीं विचारलें तर तें कसें दिसेल; तिला कांहीं माहिती असेल किंवा नाहीं; असली, तरी ती आपल्याला सांगेल किंवा नाहीं !' असे प्रश्न त्याच्या मनांत येऊं लागले. किती वेळ झाला तरी तो कांहीं बोलला नाहीं, आणि आपण काय बोलावें, हें मथुराताईलाही सुचेना. शेवटीं कांहीं तरी बोलून येथून निसटून गेलें पाहिजे असा विचार करून तो मथुराताईस म्हणतो:

"मीं आपल्याला तसदी दिली क्षमा करा. आणखी पद्माताईच्याकडून मला कळवायजोगं कांहीं असलं, तर या मुलाबरोबर मला नुसता निरोप पाठवा म्हणजे मी येईन."

असें जेमतेम कांहीं तरी बोलून तो तेथून चालता झाला. मथुराताईच्या बिऱ्हाडाच्या दारांत तो येतो तों समोरून आंत येतांना त्याच्यापुढें कोण उभें राहिलें ! पद्माताईचा नवरा अण्णासाहेब ! दोघेही एकमेकांस पाहून थबकले ! दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. त्याबरोबर वसंतरावास कसेंसेंच झालें ! आपण त्याच्या बायकोला पत्र पाठविलें तें या बाईच्या मार्फत, असें याला कळल्यावरून तर हा तपास काढावयाला इकडे आला नसेलना, असा विचार क्षणमात्र त्याच्या मनांत धडकला. अण्णासाहेब कपाळास आंठ्या घालून त्याच्याकडे पहात होता. नंतर त्यानें आपल्या चर्येवर स्मित आणलें आणि तो वसंतरावास म्हणतो:

"आपण अगदींच आमच्यावर अवकृपा केली आहे. आमचा समाचार घेत नाहीं, त्यांतही यांच्याकडे येण्याचा आपला परिपाठ असून जवळच्या जवळ येत नाहीं, हें तर फारच आश्चर्य !"

या त्याच्या भाषणांत काय काय खोंची भरलेल्या होत्या हें त्याचें त्यासच ठाऊक,

वसंतरावास त्या भाषणानें फार संताप आला. परंतु त्यानें आपली चित्तवृत्ति शांत ठेवून त्यास म्हटलें: " माझा इथें येण्याचा परिपाठ मुळींच नाहीं. कांहीं कामाकरितां आलों होतों. आपल्या घरीं येण्याचा आम्हांला मुळींच संकोच नाहीं. पण...... "

" पण काय? पण जाऊं द्या. आपण इथें आलां तर त्यांत आम्ही... Look here. I am an England returned gentle man and I have learnt the value of minding one's own business. आपल्या भानगडींत मी मुळींच पडायचा नाहीं. आणखी आपण आमच्या पडायचं सोडलं हें मला फार पसंत पडलं आहे! माझंही यांच्याकडे थोडं काम आहे, म्हणून मी आलों आहें. Good bye! "

असें म्हणून अण्णासाहेबांची स्वारी दोन पावलें पुढें झाली. वसंतरावानें त्यांच्याकडे एकवार पाहिलें आणि तोही तेथून चालता झाला.

तेवढ्या त्या भाषणानें त्याला एवढें मात्र झालें कीं, आपलें पत्र त्याला दिसलें असेल अशी त्याला शंका वाटत होती ती गेली. परंतु मुख्य ज्याकरितां तो आला होता, तें त्यास समजलें नाहीं, याबद्दल निराशा होऊन तो सचिंत असाच परत गेला. मालती आज येथें असती, तर किती चांगलें झालें असतें! असें मनांत आलें. त्याला एकवार असेंही वाटलें कीं, आपल्या आईला पाठवून काय हालहवाल आहे ती पाहून येण्यास सांगावें. परंतु हा मूर्ख घरांत असला तर तिला अपमानकारक कांहीं बोलेल कीं काय याबद्दल शंका आली. तो स्वतः अण्णासाहेबांकडे गेला होता तेव्हांचें त्यांचें वर्तन पाहून त्याला कांहींच अशक्य वाटलें नाहीं, व म्हणून त्यानें आपल्या वडिलांस व मातुःश्रींस पद्मेच्या घरीं कांहीं दिवस न जाण्याबद्दल सुचविलें होतें, आणि त्याप्रमाणें त्या मंडळींनीं केलंही होतें. पद्मेला ती स्थिति इष्टच होती. कारण दादासाहेबांस पहिले दिवशीं जिन्यावरून परतविण्याची पाळी तिजवर आली होती.

पद्मातार्ईनें आपल्या नवऱ्याच्या इच्छेप्रमाणें सहीकरून दिली असावी असें मात्र आतांच्या अण्णासाहेबांच्या वर्तनावरून वसंतरावास खास वाटलें. आणि जर सही करून दिली असेल, तर आतां आपण त्या बाबतींत धडपड करण्याचें कारणच उरलें नाहीं. सही करून दिली असें नक्की कळलें म्हणजे संपलें.—असा शेवटीं त्याच्या मनांत विचार आला. तो विचार येतांच त्याला असेंही वाटलें कीं, आपण आतां त्या दोघां भावांचा तरी शोध लावण्याची धडपड कशाला करीत बसा? आतां ते जाणोत, पद्मा जाणो आणखी अण्णासाहेब जाणोत. आपण तिला सही करूं नको म्हणून सांगितलें हीच चूक केली. नवराबायको एक होणारच. बायकोनें नवऱ्याला मुखत्यारपत्र देऊं नये तर कोणाला द्यावें? आपल्या ठिकाणीं आपण कशाला उगीच धडपड करीत बसून आपल्या चित्ताला ताप करून घ्यावा!

वसंतरावानें आपल्या मनाला अशा प्रकारानें पुष्कळ बोध केला. परंतु मनाचें कार्य मन केल्याखेरीज कसें राहणार? पद्मातार्ईनें आपलें पत्र वाचल्यानंतर त्या मुखत्यारपत्रावर सह्या केल्या नसतील आणि तिनें सह्या केल्या नसल्या कीं हा गृहस्थ संतापानें अगदीं जळून जाऊन तिला छळूं लागणार किंवा लागला असणार. तेव्हां तिला त्या छळांतून सोडवणें हें आपलें काम आहे, हा विचार त्याच्या मनांतून कांहीं

हलेना. या विचाराला त्यानें पन्नास वेळां मनांतून दूर केलें, तरी तो आपला पुनः पुनः उठावणी करावयाचाच, अशा स्थितींत तो तासाभऱ्यानें घरीं आला; आणि आपल्या खोलींत जाऊन आपल्या अंथरुणावर पडला. सबंद रात्र अशा धडपडींत गेल्याकारणानें त्याच्या मस्तकाला अतोनात शीण झाला होता. इतका वेळ सृष्टीच्या नियमाला त्यानें दूर झुगारून दिलें होतें; किंबहुना सृष्टीनें आपल्या नियमाची अंमलबजावणी त्याजवर केली नव्हती. परंतु आतां केली. सुमारें नऊ साडे नऊच्या सुमारास त्याला एकदम झोंप लागली.

ती झोंप तरी स्वस्थ होती काय ? कोठली असणार ! तींतही त्याला पद्माताई, तिचे भाऊ व अण्णासाहेब यांच्यासंबंधाचे देखावे दिसत असावेत, असें त्याच्या चळवळीवरून दिसलें. तो सुमारें एक तासभर निजला असेल नसेल, तों त्याची आई त्याला हांका मारीत आली. पहाते तों तो निजलेला. मऱ्याबापू आला होता, आणखी एकदम नाहींसा झाला. त्याचा शोध लावण्याच्या दगदगीनें झोंप लागली असेल असें समजून तिनें त्याला उठविलें नाहीं. ती तशीच खालीं गेली; तों पद्माताईची आई तिच्याकडे आलेली तिला दिसली. तिला पहातांच ही बाई चपापली. पद्माताईच्या आईचे मनांत वसंतरावाच्या आईबद्दल मुळींच प्रेम नव्हतें. तिला असें वाटे कीं, या बाईच्या नवऱ्यानें आपल्या नवऱ्याला सुधारकांच्या मार्गांत घातलें. यानें आपल्या मुलीला शाळेंत घातलें म्हणून आपल्या पद्मेलाही त्यांनीं घातलें. या बाईच्या नवऱ्यानें आपल्या नवऱ्यास आपल्या मुलांविरुद्ध उठविलें आणि त्यामुळें आपल्या नवऱ्यानें त्या मुलांस घरांतून घालवून दिलें.

तेव्हां ही आपल्या घरीं कधीं यावयाची नाहीं, आणि आज एकाएकीं आलेली पाहतांच कांहीं तरी विशेष कारण असलें पाहिजे असें वसंतरावाच्या आईस वाटलें. तिनें तिचें 'या बसा' म्हणून स्वागत केलें. परंतु ती बाई कोठली बसायला आणखी संवरायला! ती उभ्या उभ्याच एकदम ह्मणते:

"तुह्मी तरी बाई आमच्या घरीं चला, आणखी त्या पोरीला चार शब्द सांगा. रात्रींपासून कोण धिंगाणा! अण्णासाहेब कसलीशी सही मागताहेत आणखी ही कांहीं देत नाहीं. रात्रीं कोणी तिच्या नवऱ्याचे पांच सहा जण सोबती आले होते. त्यांच्या देखत वाटतं ते कसल्या कागदावर सही मागत होते. अन् हिनं कांहीं केली नाहीं. तेव्हां कांहीं फारसं झालं नाहीं, पण ती मंडळी गेल्या वेळेपासून जो प्रकार चालला आहे तो चालला आहे. 'माझा तूं मंडळींत अपमान केलास, आतां मला तुझं तोंड पहायला नको' असं म्हणून स्वारी सकाळींच उठून कुणीकडे गेली. 'बारा वाजतां परत येईन त्याच्या आंत सही करण्याची कबुली झाली तर ठीक. नाहीं तर माझा मार्ग मला आणखी तुझा तुला.' असं त्यांनीं तिला सांगितलं. पुनः स्वयंपाकघरांत माझ्याकडे येऊन मी स्वयंपाक करीत असतांना मला पुष्कळ सांगितलं. सकाळीं चहा नाहीं, कॉफी नाहीं, कांहीं नाहीं; मी तिच्या पुष्कळ पाठीस लागलें आहें, कीं तूं असा वेडगळपणा करूं नको. कसली सही मागताहेत ती देऊन टाक. अहो या लिहिणारणी झाल्याना! त्यांना सह्यान् फया करतां येऊं लागल्याना? म्हणून या पंचायती. आह्मांला सह्यान् फया कांहीं समजत असेल तर कीं नाहीं! आह्मीं आपलं जें जसं कुणी करा-

यला सांगेल त्याला हूं म्हणायचं. मीं पुष्कळ तिला सांगितलं, कीं भलताच हट्ट धरूं नको. सही कसली मागताहेत ती करून आपली त्यांच्या धोरणानं राहत जा. पण छे! उलट तीच मला म्हणाली: 'तुला कांहीं त्यांत समजत नाहीं.' तेव्हां आतां तुम्ही तरी कांहीं तिला सांगायला चला. बारा वाजायच्या आंत तिचं मन वळवूं. नाहीं तर आयते आले आहेत, घराला कांहीं तरी शोभा आली आहे, तर तेही जायचे! पोरं तर कुठें देशोधडीला गेलीं आहेत, त्यांचा पत्ताच नाहीं, माझ्या सगळ्या संसाराचे धिंडवडेन् भंडवडे! एक दिवस कधीं सुख लागलं नाहीं कीं........"

त्या बाईचें बोलणें संपतें केव्हां, आणखी आपल्याला उत्तर द्यावयाला सवड मिळते केव्हां, याचीच वसंतरावाच्या आईला शंका वाटत होती. शेवटीं तिचें बोलणें चाललें असतांनाच ती तिला म्हणाली:

"आपल्याला काय त्यांत समजतं आहे? तिला चांगलं वाचायला ल्याहायला येतं आहे, तेव्हां त्यांत काय वावगं आहे, काय नाहीं तें तिला समजलं असेल म्हणून सही करीत नसेल. आपण काय तिला सांगणार?"

"नाहीं हो तसं नाहीं. म्हणे ज्या कागदावर सही करायची तो कागद मीं वाचून पाह्यल्याखेरीज सही करायची नाहीं." असं ती म्हणते आहे आणखी ते म्हणतात, 'तूं नाहीं केलीस तरी पतकरली. पण सही करण्याच्या आधीं मी तो कागद तुला वाचूं देणार नाहीं. माझ्यावर तुझा इतका कां अविश्वास? तूं एकदां सोडून दहादां वाच. पण वाचल्याखेरीज सही करायची नाहीं असा हट्ट धरणं म्हणजे मी तुला फसवून सही घेतों आहें असं म्हटल्यासारखंच आहे.' हा काय तो वाद. आहे आपला प्रेमाचाच. पण प्रेम प्रेम म्हणतां म्हणतांच भलतंच कांहीं व्हायचंन् विकोपाला जायचं, दुसरं काय? तेव्हां तुम्ही चला. माझ्यापेक्षां तुमचं ती तेव्हांच ऐकेल. जांवईबुवा म्हणतात हिची सही झाल्याखेरीज मला पुढें वसुलीचं वगैरे काम करतां येणार नाहीं. आणखी ही तर सही करीत नाहीं. चला आतां बसूं नका. पहिल्यापासून माझ्यापेक्षां तुमच्याच ठिकाणीं तिची फार श्रद्धा. तेव्हां..."

इतक्यांत वसंतराव वरून खालीं आला. तो आल्यानंतर त्याच्याजवळ पुनः त्या बाईनें प्रारंभापासून सर्व गाऱ्हाणें सांगण्याला प्रारंभ केला. तें ऐकतांच त्याला एकाप्रकारें फार आनंद झाला. पद्मेनें सही अजून तर कांहीं केली नाहीं, हें त्याला खास कळलें आणि त्या समाधानाच्या भरांतच तो त्या बाईला म्हणतो:

"काकू, पद्मा करते आहे तेंच बरोबर. आपण सही कशावर करतों आहोंत तें तिचं तिला कळल्याखेरीज तिनं सही करावी कशी? उद्यां ते दोघे—तुमचा दादा आणखी बापू—आले आणखी त्यांच्या हिताची नाहीं अशी गोष्ट पद्मेच्या हातून होऊन गेली असली, तर मग काय होईल? तेव्हां सही कर म्हणून सांगायला कांहीं आम्ही येत नाहीं. भलतंच कसं बरं सांगावं? शिवाय दादा आणखी बापू दोघेही आपल्याला काय म्हणतील, त्यांचं हित आपल्याला नको का पहायला? ते दोघे लवकरच येण्याचा संभव आहे."

हें शेवटलें वाक्य ऐकतांच म्हाताऱ्या काकूच्या डोळ्यांत एकदम आशेचें तेज दिसूं लागलें आणि ती एकदम वसंतरावास म्हणाली:

" खरंच का माझीं पोरं मला भेटणार आहेत ? तीं आलीं तर त्यांचं तींच पहा-तील मग कशाला आपल्याला कुणाच्या तोंडाकडे पहायला पाहिजे ? "

असें ती म्हणते आहे तों मथुराताईचा मनोहर तेथें आला व पद्मताईच्या आई-जवळ जाऊन त्यांच्या कानांत म्हणालाः

" बापू घरीं आला आहे. तुह्मी लवकर घरीं चला म्हणून पद्मताईनीं सांगितलं आहे. "

ह्मातारीचा हर्ष गगनांत मावेना.

# प्रकरण ४० वें.

## नव्या वहिनीबाई.



कृष्णाजीपंतदादां-चें सहावें लग्न झा-ल्या दिवशींच त्यांचें आधींचें कुटुंब वार-लें, यामुळें आणि मथुराताईचें बिऱ्हाड आपल्या वाड्यांतून हललें यामुळें दिगंबर-पंतांची आणि डॉक्टर भगवंतरावांची भेट होण्याला कांहीं कारण राहिलें नव्हतें. मथुरा-ताईची व त्यांची तर दृष्टादृष्टसुद्धां कित्येक दिवसांत झाली नाहीं. " आपल्या घरांतील पीडा गेली, आतां कुठें कां मरेना जाऊन ! आज नाहीं चार दिवसांनीं कारटीचं कांहीं वेडं वाकडं व्हायचंच, आणखी भांडवल बाहेर फुटायचंच " असे उद्गार त्यांनीं आपल्या कुटुंबाजवळ काढावयाचे आणि " जर ती अवदसा आणखी तीं कारटीं कुठें गेलीं आहेत, त्याचा तपास बिपास लावून त्यां-च्याकडे तूं गेलीस असं मला कळलं, तर माझ्याशीं गांठ आहे, हें ध्यानांत धर " असें तिला बजवावयाचें हा प्रकार चालू झाला. कृष्णाजीपंतदादा व त्यांच्या घरची त्यांची आश्रितमंडळी यांनीं दिगंबरपंतांस " कां पंत, शेवटीं पोरगी हातावर तुरी देऊन गेली ना ? तुह्माला हात टेंकावे लागलेना ? " असें म्हणून चिडवीत. तेव्हां तो वरून जरी " अरे, हातावर तुरी काय देते ? मलाच असं झालं होतं, कीं, काय उपाय करूं आणखी काय नको तिला घरांतून घालवून द्यायला. तो लेंकाचा डॉक्टर रोज रात्रीं अगदीं राज-रोसपणानं यायला लागला. तेव्हां मला वा-टलं हें लचांड एखाद्या दिवशीं काय होईल आणखी काय नाहीं याचा नेम नाहीं. तेव्हां केल्या युक्त्या आणखी त्या साध-ल्याही पण ! ती आतां त्या आबासाहे-बांची घराच्या पलीकडे कुठें राहायला गेली आहे. आतां जाईना का, मरेना का आप-ल्याला काय करायचं आहे ? "

" काय करायचं आहे म्हणतोस, पण कुठें गेली आहे याचा पत्ता काढून आणला आहेस. आबासाहेब रे कोण ? " कृष्णाजी-पंत आपल्या आश्रितांपैकीं एकाकडे डोळे मिचकावून लबाडीनें हंसत हंसत म्हणाले.

" अहो, तो आबासाहेब, त्याच्या त्या पोरीनं कायसं विष घालून तो नाहींका एकाएकीं मारला. त्याच्या प्रेताचा बखेडा

पडला होता, पण त्या डॉक्टर भगवंतरावानं पोलीससुपरिंटेंडेंट, सिव्हिलसर्जन वगैरे दाबादाबी करून विझवलं प्रकरण, तो आबासाहेब. त्याच्या घराच्या पलीकडे कुठें रहाते आहे ती, असं मीं ऐकलं आहे."

" अजून नुसतं ऐकूनच बरा राहिला असशील. पण कायरे, त्या पोरींचा नवरा कायसा इथें आला आहे म्हणे. यायचाच तो आतां ! "

"आपल्याला हो काय ठाऊक दादा ? मीं देखील ऐकलं आहे आला आहे म्हणून. आतां काय त्याची चैन आहे. पोरीनं बापाकडून आपल्याला वाटेल तसं वुइल करून घेतलं आणखी शेवटीं बापाला दिला एक आर्सेनिकचा डोस. अशीं उदाहरणं होतात. तरी या लेंकांचे सुधारकांचे अजून डोळे उघडत नाहींत, सुधारणा सुधारणा म्हणून बोंबलताहेत, याला काय म्हणावं ? त्या तिच्या भावांचा कांहीं अद्याप पत्ता नाहीं. तीं अशींच कारटीं निघालीं आहेत. मला एखाद्या दिवशीं वाटतं, कीं त्या पोरांचा शोध काढून त्यांना सगळ्या हकीकती सांगून सगळं प्रकरण बाहेर आणावं. सांपडलीं पोरं, तर कोर्टांत खर्चायू बिर्चायला पैसे याल कीं नाहीं ? नेहमींप्रमाणें दिढी दुपटीच्या प्रॉमिसरी नोटी करून देत जाऊं. अहो, तो पैसा तरी पुढें चोरपोरच खाणार. मग आपण त्या पोरांना तरी मिळवून यायची खटपट करून कां नये लाटूं ? "

" हेः लेका " कृष्णाजीपंत आपल्या संवईप्रमाणें आपले ते घारे कुत्सित डोळे मिचकावीत म्हणतातः " असल्या धंद्यांत नको आम्हांला घालूं. सरळ एखादा धंदा केलास, तर पाहूं, तुला देऊं लागेल ती मदत. "

" आपले पैसे सगळे किती सरळ मार्गानं आले आहेत ! तेव्हां आतां... ...त्या......पण जाऊं द्या, बोललों तर आपल्याला राग येईल. आधीं आम्हांला जगांत स्नेही थोडे त्यांत आमच्या जिभलीमुळें असे जर जाऊं लागले तर......पण दादा, त्या पोरीला कांहीं चैन पडूं देतां उपयोगी नाहीं. आतां आपल्या डोक्यावर कोणी नाहीं असं तिला वाटून ती फारच शेफारली आहे. तो लेंकाचा गिरिधरपंत तो अगदींच बावळट. त्याला किती सांगितलं, तरी कांहीं उपयोग नाहीं. तो म्हणतो, पुरावा आणा तुमचा काय तो मग मी पाहीन काय करायचं तें. या लेकांना पुरावा पाहिजे. "

" दिगंबरपंत, जरा बेतानं सभोंवार पाहून बोलत जा. तूं कुठें काय बोलशील याचा नेम नाहीं. पण तुला आतां तिच्याशीं करायचंय् काय ? जाईना मरेना, ती दुकान कां घालीना........ "

" त्या तिच्या सत्वशील बापाचं स्मरण होतं हो, दादा, नाहीं तर कशाला मी त्याचा विचार करतों आहें. मी काय युक्ति करून तिला त्या नव्या बिन्हाडांतून हुसकायची तजवीज करूं ? असं मला झालं आहे. आपण आतां यांच्या तडाख्यांतून सुटलों असं तिला वाटूं देतां उपयोगी नाहीं. "

दिगंबरपंतांचें याप्रमाणें बोलणें चाललें आहे, तों कृष्णाजीपंत दादांच्या घरांतून एक तीसबत्तीस वर्षांची विधवाबाई डोकावली, आणि म्हणतेः " वहिनीबाई मघांपासून कसंसंच करताहेत, आणखी आतां तर हातपाय ताणून अगदीं लांकडासारख्या होऊन पडल्या आहेत सकाळपासून त्यांची चर्याच कांहीं चमत्कारिक झाली आहे. "

कृष्णाजीपंतदादा ताडकन् उडी मारून

बसले, आणखी म्हणतात: " अं ? म्हणतां तरी काय ? आणखी इतका वेळ नाहीं मला कुठें सांगितलंत तें. वैद्यबुआंना बोलवून आणारे कोणी तरी. पंत चला, आंत काय आहे तें........ "

तितक्यांत ती विधवा स्त्री ह्मणते: " तुमचे डॉक्टरन् वैद्य बोलवा पाहिजे तर पण मला वाटतं हें बाहेरवशाचं प्रकरण आहे. आधीं त्यांना कांहीं झालं सवरलं तर बोलायच्या नाहींत. आणखी त्यांत कांहीं मनास यायचं नाहीं ! "

असें बोलत बोलत दादा, पंत व दादांचे सर्व आश्रित आंत त्यांची नवीन यजमानीण अगदीं लांकडासारखी होऊन पडली होती तेथें गेले. तों सुमारें पंधरा वर्षांची तरुण स्त्री खरोखरच अगदीं निश्चेष्ट होऊन पडली होती. फक्त एक हात मात्र उडत होता व उचकी लागल्याप्रमाणें आवाज निघत होता.

आमच्या दिगंबरपंतास ज्याप्रमाणें इंग्रजी ज्ञानाची घमेंड होती त्याचप्रमाणें डॉक्टरी वैद्यकी ज्ञानाचीही होती, तेव्हां त्यांनीं जवळ जाऊन वहिनीबाईकडे नीट पाहून व डावा हात उचलून नाडी पाहिल्यासारखें करून म्हटलें:

" दादा, तुमच्या कपाळचं तापत्रय कांहीं चुकत नाहीं. हा हिस्टेरिआ म्हणतात तो आहे ! आपण डॉक्टराला वैद्याला दाखवा पण ही फीट हिस्टेरिआचीच, त्याखेरीज कांहीं दुसरं नाहीं. हा रोग लैंकाचा मोठा हट्टी असतो."

ती विधवाबाई दुसऱ्या एका आश्रित भिक्षुकाकडे डोळे मोडून पाहून कपाळाला आंठ्या घालून मान वेळीत म्हणते: " शंभूभटजी, हें बाहेरवशाचं प्रकरण आहे. याला डॉक्टर कांहीं करणार नाहीं, आणखी वैद्य कांहीं करणार नाहीं. मला सांगितलं तर आतां मी त्या वडाच्या खालच्या राधाबाई देवरुसणीला बोलावतें........ "

" नको, नको. नको " कृष्णाजीपंत एकदम दोनही हात उभारून नकारार्थी हलवीत म्हणतात: " अगदीं नको, या देवऋषिणी का एकदां घरांत शिरल्या म्हणजे मग त्यांनीं वाटोळं केलंच म्हणून समजावं."

त्याबरोबर ती विधवा स्त्री दिगंबरपंताकडे काण्या दृष्टीनें पहात एकदम नाक ओढून मान वेळीत म्हणते " अन् डॉक्टरन् वैद्य काय कमी करतात ? पंत, तुह्मीच सांगत होतां ना त्या डॉक्टर भगवंतरावानं सहाशें रुपये एकंदर घेतले म्हणून ? डॉक्टरां-वैद्यांनीं असे पैसे नेऊन शेवटीं घरांतली लक्ष्मी मारली. आतां पुन: यांना बिचाऱ्यांना......पण आह्मांला काय करायचं आहे. सांगितल्या हुकुमाच्यानं घातल्या भाकरीच्या आह्मी. बोलून चालून पाठराखणीस म्हणून आलेल्या. पण आमचं काय म्हणणं आहे तें एवढंच कीं आमची राधाबाई देवऋशीण फार तर रुपया दोन रुपये घेते–ते ती आपल्या स्वतःला नाहींच हो घेत. असा पैसा घेती, तर तिचा देवरुसपणा चालताच ना. देवाच्या साहित्यासाठीं आपले रुपये लागतात तेवढेच त्या घेतात. मी बोलूं का पंत ? का तुह्माला राग येईल. हा अगदीं सवतीचा वसा आहे ! मला फटकळ म्हणा कीं वेडगळ म्हणा. आणखी त्याचा आतां जर उपाय केला नाहीं तर हें प्रकरण अगदीं चेकाळत जाईल. औषधी उपायानंन्– त्यांत आणखी डॉक्टरी उपायानं भुतं भारी चिडतात...... पण बाई यांना अशाच किती वेळ पडूं द्यायच्या ? वैद्यबोवांना बोलवा, डॉक्टरांना बोलवा,

आणखी आपली सगळ्यांची एकदां खात्री होऊं द्या.

दिगंबरपंत त्या बाईकडे पाहून म्हणतात "रेवतीबाई, अहो तुह्मांला इथें आणलं तेव्हां पहिल्या दिवशीं काय सांगितलं? कीं, तुह्मी एवढ्या तेवढ्या गोष्टीसाठीं परवानग्यान् बिरवानग्यांची कांहीं वाट पहात जाऊं नका. तुह्मांला वाटतंयना हा सवतीचा कांहीं प्रकार आहे म्हणून, बेलाशक कोण देवरुषी देवरुषीण आणायची ती आणा. आह्मी आपले डॉक्टरांचे वैद्यांचें उपाय चालू ठेऊं. दोन्हीकडून जर व्याधीवर मारा झाला तर काय वाईट? अगदीं मी कृष्णाजीपंतदादांच्या देखत सांगतों कीं, तुह्मी आपले तेही उपाय करा" तें भाषण ऐकत असतां रेवतीबाई काण्या डोळ्यानें कृष्णाजीपंताकडे पाहत होत्या. दिगंबरपंत पुढें म्हणतात: "बाकी माझं म्हणणं आहे तेंच आहे कीं हिस्टेरिआचा प्रकार आहे. हा फार दिवस चालायचाच. तुह्मी डॉक्टर आणा कीं वैद्य आणा. नाहीं आणलांत तरी घटका दोन घटकांनीं अगर चार सहा घटकांनीं किंवा चार प्रहरांनीं त्या आपोआप उठतील. फार तर सुंठीचं अंजन घाला डोळ्यांत म्हणजे आतां शुद्धीवर येतील."

"मला वाटतें आपण डॉक्टरांस बोलवावेंनी त्यांचेकडून परीक्षा करवून काय औखद द्यायचें तें द्यावें" शंभूभटजी मध्येंच म्हणाले.

हा यांचा एकंदर ऊहापोह चालला असतां ती बिचारी तरुण मुलगी अगदीं बेहोष होऊन पडली होती. तिचे डोळे मिटले होते. ऊर्ध्व सारखा सुरूच होता. एक हात उडत होता. दांतखिळी अगदीं घट्ट बसली होती. तिला या इकडल्या जगाचें कांहींच माहिती नव्हतें. बराच वेळ झाला, डॉक्टरही येईनात, वैद्यबोवाही येईनात आणि कोणी कांहीं उपायही करीनात. शेवटीं कृष्णाजीपंतदादा म्हणतात: "आतां पुनः त्या डॉक्टराच्या घरीं हेलपाटे घालीत बसण्याचा प्रसंग येतो कीं काय कुणाला ठाऊक! माझ्या कपाळीं मला वाटतं संसाराचं सुख नाहींच."

"असं काय म्हणतां हो दादा" रुंद तोंड करून हंसून दिगंबरपंत त्यांस म्हणतात: "अहो एकामागें एक सहा संसार झाले! दर चार सहा वर्षांनीं नवा संसार आणखी संसाराचं सुख नाहीं, असं काय अभद्र बोलतां? तुमच्याजवळ जोंपर्यंत जहागिरी आणखी पैसा यांची माया तुडुंब भरली आहे, तोंपर्यंत तुम्हांला संसाराची मुळींच काळजी नको. रोज नवा करायचा म्हटलं तरी मुद्दां जमेल!"

रेवतीबाई तें ऐकून पंतांकडे हंसून पहात होत्या. कृष्णाजीपंतदादा म्हणतात:"दिगंबरपंत, तूं अगदींच चमत्कारिक बाबा, केव्हां काय बोलशील आणखी कुठें बोलशील याचा नेमच नाहीं. जा आतां जा, त्या डॉक्टर भगवंतरावांना घेऊन ये. नाहींतर कुणाला बोलावायला पाठव. आपले विचार होतां होतांच इकडे कांहीं व्हायचं..."

"अं: त्यांत काय व्हायचंय् पण आतां आपण डॉक्टर भगवंतरावालाच का बोलवायला सांगणार. जाऊं द्या. दुसरा एखादा बघा. त्याच लेंकाला काय एवढं तेल लागलं आहे!"

अगदीं प्रथमपासून हें यांचें बोलणें चाललें होतें, तें जर कोणीं ऐकलें असतें, तर त्यास हीं सारीं माणसें आहेत कीं कोणी पशू आहेत याची शंका आली असती. माणूस असें एकाएकीं बेशुद्ध पडणें म्हणजे जणूं काय अगदीं साधी सहज घडणारी गोष्ट. त्या गोष्टींत कांहींच काळजी करण्याजोगें नाहीं.

चार घरांतल्या गोष्टींबद्दल जसा सावकाशीनें वादविवाद व्हावयाचा तशाचपैकीं ती गोष्ट असा सर्वांचा समज असावा असें त्या ऐकणारास व पाहणारास वाटलें असतें.

होतां होतां डॉक्टर भगवंतरावांस तांतडीनें बोलावणें पाठवावयाचें ठरून शंभुभटाची रवानगी झाली. कर्मधर्मयोग, डॉक्टर त्याचवेळीं दुसऱ्या कोणा रोग्याची तपासणी करून त्यांच्या घरावरून जात होते. त्यांची गाडी पहातांच शंभुभटांनीं त्यांच्या कोचमनास खुणावून गाडी उभी करविली आणि डॉक्टरांस "कृष्णाजीपंतदादांनीं मला आपल्याला बोलावण्यास पाठविलें होतें. आयतेच आपण दिसलां. आतां तावडतोब आपण तिकडे चला." असें म्हटलें.

डॉक्टर भगवंतराव "काय आहे ? कोण आजारी पडलें आहे" वगैरे विचारीत गाडी कृष्णाजीपंतदादांच्या घराशीं उभी करून उतरले. ते अंगणांत येतात तों दिगंबरपंत सुनके ओटीवरच होते. त्यांनीं त्यांस म्हटलें: "डाक्टरसाहेब, पुनः आलं आपल्याला एक टावकं. नव्या वहिनीबाईंना पछाडलं आहे हिस्टेरिआनं. आमची बबी कशी काय आहे ? आमची मथी कशी काय आहे ? तिकडूनच आलां वाटतं ?.. ..."

डॉक्टर भगवंतरावांनीं कपाळाला आंठ्या घातल्या आणि एकवार अत्यंत तिरस्कारानें त्याच्याकडे पाहून ते त्याला कांहीं न बोलतां शंभुभटास म्हणतात: "कुठें आहेत दादा ? कुठें आहेत वहिनीबाई ? "

शंभुभटानें त्यांस आंत नेलें. डॉक्टरांची काय तपासणी व्हावयाची ती सुरू झाली. दिगंबरपंत आपल्या वैद्यकी ज्ञानाचें प्रदर्शन करीतच होता. त्याची बडबड सारखी सुरू होती. भगवंतरावांनीं त्याला एका अक्षरानेंसुद्धां उत्तेजलें नाहीं. तो त्यांस कांहीं तपासणीच्या कामांत मदत करूं लागला, तर त्यांनीं तिरस्कारपूर्ण डोळ्यांनीं व हातांच्या खुणांनीं लांब राहण्याविषयीं मात्र खुणावलें. त्यांच्या त्या डोळ्यांत मात्र असा कांहीं कडकपणा दिसला कीं दिगंबरपंताची लुडबुडण्याची छाती झाली नाहीं. डॉक्टरांना जें काय पाहिजे होतें तें त्यांनीं त्या बाईला उद्देशून फक्त विचारावें.

सर्व विचारपूस झाल्यानंतर डॉक्टर कृष्णाजीपंतदादांकडे वळून म्हणतात:— "दादासाहेब, आपण श्रीमंत आहां. आपल्याला पैशाला कांहीं कमी नाहीं. आपण या वेळीं या रोगाची काळजी घेतली नाहींत तर हा कांहीं लवकर बरा व्हायचा नाहीं, विकोपास जाईल. आणखी आतांपर्यंत जो प्रकार झाला, तोच पुनः होईल. आपली इच्छा असली, तर मी प्रिस्क्रिप्शन लिहितों पण वहिनीबाईचं कुणी तरी मायेचं माणूस—त्यांची आई म्हणा मावशी म्हणा—असं त्यांच्या शुश्रूषेला आणून ठेवा. आणखी मग त्यांच्या हाताखालीं दुसरं या बाईच्यासारखं कुणी ठेवा. माझ्या सांगण्याप्रमाणें औषधपाण्याची व्यवस्था अक्षरशः ठेवण्याची तजवीज कराल तर मी या कामांत हात घालतों. नाहीं तर तुह्मी आमच्यावांचून चालूं द्या. सकाळीं आह्मी, दुपारीं वैद्य आणखी संध्याकाळीं हकीम, असा प्रकार उपयोगी नाहीं, रोग अगदीं नवा आहे, तोंपर्यंत त्याचा बीमोड केला तर होईल, नाहीं तर होणार नाहीं. तुमचे पैशापरी पैसे जातील..."

कृष्णाजीपंतदादा डॉक्टरांस म्हणतात:— "कां ? आज आमच्यावर अगदीं कडाका उडवतां आहां ? आपल्यावर आमची श्रद्धा, म्हणून तर आह्मीं तावडतोब आपल्याकडे धांव घेतली. हें पहा, आह्मी आपले इतर साऱ्या बाबतींत किती जरी जुन्या मताचे

असलों, तरी डॉक्टरी विद्येवर आमचा भरंवसा आहे. सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत कोणी एक गोरा डॉक्टर होता, त्याचं औषध आमच्या पणजोबांच्या यजमानांनीं घेतलं होतं, त्यानं ते बरे झाले. आमचे पणजोबा आजारी पडले असतांना यजमानांनीं त्या गोऱ्या डॉक्टराचंच औषध दिलं. तेव्हांपासून आमच्या घराण्यांतला डॉक्टरी औषधाचा विधिनिषेध गेला आहे! आपल्या सांगण्याप्रमाणें आह्मी व्यवस्था करतों. मात्र...... "

"मात्र काय?" डॉक्टर भगवंतराव थोडे कठोरपणानें म्हणाले.

"कांहीं नाहीं. लवकर यश घेऊन आह्मांला काळजींतून मुक्त करावं."

"यत्न करणं माझं काम आहे. त्यांत कधीं व्हायची नाहीं."

इतकें बोलून डॉक्टर भगवंतरावांनीं काय उपाय योजायचे ते योजण्याला सुरुवात केली. पहिल्या प्रथम त्यांनीं आधीं 'सर्व फालतू माणसांनीं तेथून चालतं व्हावं' असें बजाविलें. 'रेवतीबाई व दादासाहेब या दोघांनीं मात्र राहावं' असें सांगितलें. त्याबरोबर दिगंबरपंतांच्या अंगाचा तिळपापड उडाला; आणि तो आपल्याशीं व शंभुभटाशीं कांहीं पुटपुटूं लागला परंतु बाहेर गेला.

डॉक्टरांनीं दादासाहेबांच्या त्या नूतन परिणीत वधूला लवकरच शुद्धीवर आणलें; आणि नंतर तिचें आंथरूण कोठें तरी हवाशीर जागेंत घालण्यास व तेथें तिची शुश्रूषा करणाऱ्या एक दोन माणसांखेरीज दुसऱ्या कोणी असूं नये, असें निक्षून सांगून ठेविलें. औषधपाण्याची व्यवस्था सांगितली आणि मुलीची आई, मावशी कोणी तरी तिची खरी कळकळ बाळगणारें असेल असें माणूस तिच्या जवळ आणून ठेवाल तरच फार चांगलें होईल, असें पुनः एकदां बजाविलें व ते निघून गेले. जातेवेळीं दिगंबरपंत त्यांच्या पुढें पुढें करण्यास आला, परंतु डॉक्टरांनीं त्याच्याकडे बिलकुल लक्ष्य दिलें नाहीं.

यामुळें डॉक्टराच्या गाडीचें घरघरणें कानीं पडतांच स्वारी एकदम कृष्णाजीपंत-दादांस मोठ्यानें म्हणते: " काय लेंकाचा माजला आहे! त्याला स्वर्ग दोन बोटं राहला आहे. पण मी वर्म ढतांक्षणीं कसा वरमला. हे लेंकाचे सुधार णवितात, हा तर लेंकाचा एकपत्नीव्रताच भा मिरवितो आहे. नर्मी तुमच्यासारख्यांना—तुह्मी बायको मेली कीं पुनः लग्न करतां म्हणून—हंसत असतो. पण जेव्हां का टोमणा मारला आहे 'आपली मर्थी कशी काय आहे' म्हणून.... "

इतक्यांत आंतून तेथें आलेल्या रेवतीबाई मध्येंच म्हणतात: " अन् तीनतीनदां म्हणाला कीं कोणी तरी मायेचंन कळकळीचं माणूस आणून ठेवा. आह्मी सगळीं वैरी कां आहों? त्याला म्हणावं तूं आपल्या..."

शंभुभट तितक्यांत लुडबुडला: " अन् आह्मांला सगळ्यांना बाहेर जा म्हणून घालवून दिलंन् कीं हो. खरोखर याचं फार प्रस्थ माजलं आहे. वास्तविक यांच्यांतन् दुसऱ्या डॉक्टरांत काय अंतर आहे! आमच्या त्या खरपुडीकर वैद्याला जी रोगपरीक्षा आहे त्याच्या लक्षांशसुद्धां या गुलामाला नाहीं. पण आजकाल जिकडे तिकडे डॉक्टर भगवंतराव! त्यामुळें जरा फार फाजील झाला आहेन् काय. त्यांत आपल्यासारख्या श्रीमंतांचा आश्रय. मग काय विचारतां! पण हा असं टाकून बोलतो त्याबद्दल एकदां मी त्याची कानउघाडणी करीन, आणखी त्याचं सगळं बाहेर काढीन,........"

रेवतीबाई मध्येंच पुनः म्हणाल्याः— " आणखी माझ्याकडे एकसारखं पाहून पाहून म्हणत होता तो कीं कोणी तरी मायेचं आणखी कळकळीचं माणूस आणा. त्याच्या मतें मीं कोणी तरी भाडोत्री आणली आहें. "

" रेवतीबाई, " दिगंबरपंत चेष्टेच्या स्वरानें तिला म्हणाले, " त्यांत त्यांनीं काय बरं खोटं सांगितलं ? खरं बोलले ते, तर कां आपल्याला राग यावा ? काय हो शंभुभट ? आह्मी म्हणतों हें खरं कीं नाहीं ? " नंतर दादासाहेबांकडे वळून पंत त्यासही म्हणतात:

"तुह्मी कांहीं म्हणा पण हा डॉक्टर फार फार उद्धट झाला आहे. दादासाहेब, तुमच्यासारख्या जुन्या मताच्या अभिमान्यांनीं कां हो इतका त्याला आश्रय द्यावा ? वैद्यकीचा अभिमान कां नसावा तुह्मांला ? आपल्याला तुमचं हें करणं अगदीं आवडत नाहीं. तुमच्या एकंदर नांवालौकिकाला कांहीं हें चांगलं नाहीं. सगळे लोक त्याबद्दल टीका करतात. बरं इतका त्याच्यावर तुमचा विश्वास, तर तशा बायका उठवायच्या तरी होत्या यानं ! तुमच्या दोन बायकांना तर औषधं दिलींन् ? काय झाला उपयोग ! पण त्याला तें मथींचं विचारतांच काय चेहरा झाला आहे ! जर त्याच्या अंगीं आह्मांला जाळून टाकायचं सामर्थ्य असतं, तर त्यानं खरोखर आम्हांला जाळून भस्म केलं असतं. दुसरं काय ? आपण चार दिवस गप्प बसलों बोआ, पण पुनः लागणार त्या मथींच्या पाठीमागें. याची नाचक्की करून टाकणार जगांत. आज जातों तपास करीत–तिचं बिऱ्हाड कुठें आहे तें शोधीत. अशा माणसांला असंच पाहिजे ! काय लेंकानं माझ्यावर डोळे गुरकावले ! दादा, पुनः आह्मी याच्या घरीं कांहीं आपल्याबरोबर यायचे नाहीं. मी आतां त्याचान् तिचा पिच्छा पुरविणार. त्या तिच्या हेडमास्तरणीला तर चांगली भारून ठेविलीच आहे ! ती तिला केव्हांन् कुठें खड्ड्यांत घालतां येईल, याची अगदीं वाटच पहाते आहे ! पण त्या गिरिधरपंतापुढें कांहीं चालत नाहीं. तो बाईलबुद्ध्या आहे. त्यानं आपल्या बायकोच्या सांगण्यावरून मला आपल्या घरीं येण्याचं कांहीं कारण नाहीं, म्हणून निक्षून सांगितलंन् कीं हो ! "

तें ऐकून कृष्णाजीपंतदादा हंसले व म्हणतातः " अव्यापारेषु व्यापारं यो नरः कर्तुमिच्छति । स एव निधनं याति कीलोत्पाटीव वानरः ॥ तुला इतका खटाटोप, त्याच्या पश्चात् त्यांच्या घरीं जाऊन........ "

" पुरे, पुरे दादासाहेब, आपण आतां आणखी असलं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपली काय त्यानं शोभा राखली आहे तीही आह्मांला ठाऊक आहे. मीं दिलंय् आपल्याला सांगितल्याप्रमाणें डायरेक्टरसाहेबांकडे निनांवी पत्र पाठवून. त्यांत असं लिहिलं आहे, कीं कांहीं तरी त्याचा परिणाम झालाच पाहिजे. याची इथून बदली तरी निदान झाली पाहिजे. तेंही संधान मी बांधतोंच आहें. कांहीं मास्तरांच्याहीकडून विरुद्ध अर्ज वगैरे करविण्याची तजवीज झाली आहे. कोणीकडून त्याच्यावर देखील काहूर रचून ठेवायचं, असा घाट आहे. "

" काय वाटतील ते घाट घाल. आतां आपल्याला कांहीं तुझ्या ह्या भानगडींत पडण्याची इच्छा नाहीं. तुला उद्योग नाहीं. आयतं खानदेशांतून उत्पन्न येतं आहे. वडिलांनीं तुझी चंगळ करून ठेविली आहे ! "

" आणखी तुमची कोणीं करून ठेविली आहे ? तुमच्या पणजोबांनीं ? आपल्या यजमानाच्या मुंड्या मुरगाळून, त्यांना देशत्याग

करायला लावून त्यांच्या जहागिरी जप्त करवून त्या आपल्या नांवानं करून घेऊन केलो आहे कीं नाहीं तुमची चंगळ!"

शंभुभट व नुकताच एक कारकून आला होता तो, दोघेही आपलीं तोंडें किंचित् हंसरीं करून एकमेकांकडे पाहूं लागले. असला भाषणसमारंभ त्यांस नवीन नव्हता, नेहमींचाच होता.

# प्रकरण ४१ वें.

## रावसाहेब गिरिधरपंतांकडे.



कृष्णाजीपंतदादा व त्यांचे परम मित्र दिगंबरपंत यांचा भाषणसमारंभ झाल्यानंतर दोन किंवा तीन दिवसांनींच दिगंबरपंतांची स्वारी पुनः एकदां रावसाहेब गिरिधरपंताच्या घरीं चहाच्या वेळीं गेली. रावसाहेबांचें कुटुंब तेथेंच बसलें होतें. आजपर्यंत रावसाहेब तडफडत चडफडत, परंतु दिगंबरपंताच्या देखत तेथें बसत नसत. आज ते येण्याबरोबर त्यांनीं आपली बैठक एक बोटभर सुद्धां चळविली नाहीं. उलट त्यांनीं अगदीं क्रुद्ध व तिरस्कारयुक्त दृष्टीनें त्यांच्याकडे पाहून त्यांस स्पष्ट असें सुचविलें कीं, आपण येथें आलां आहांत तसेच परत जाल तरच आपली शोभा आहे. मोरमास्तर तेथें होताच. त्यानें बाईसाहेबांचा रंग पाहिला आणि त्याला वाटलें कीं, दिगंबरपंताचें या वेळीं येथें बसणें कांहीं ठीक नाहीं. त्याच्या मनांत एकवार असें सुद्धां आलें कीं दिगंबरपंतास सुचवून तेथून बाहेर न्यावें. परंतु दिगंबरपंतानें या वेळीं मोरमास्तराकडे पाहिलेंही नाहीं. मोरमास्तर बिचारा विशेषच घाबरला. दिगंबरपंतांच्या नादीं लागून त्यानें मागें एकवार केलेला फाजीलपणा नुकत्या कोठें रावसाहेबीणबाई विसरत चालल्या होत्या. आतांशा आठ पंधरा दिवसांतच कोठें त्या गोष्टीची ओळख रावसाहेबीणबाई देईनाशा झाल्या होत्या. त्यांत आतां हा फाजलभाई येऊन पुनः जर कांहीं झालें, तर पुनः किती दिवस आपल्या डोक्यावर हाणलें जाईल याचा नेमच नाहीं हें त्यास पूर्णपणें दिसून आलें. तेव्हां तो काय करावें या विवंचनेंत पडला. चहासंबंधीं तो जें काय करीत होता तेंही त्याला सुचेना.

रावसाहेब पाटावर बसले होते, वहिनीबाई ऊर्फ रावसाहेबीणबाई पाटावरच होत्या. मुलांनीं पाट घेतले होते. मोरमास्तर नुसता उकीडवा बसून चहाच्या स्टोव्हकडे दृष्टि देऊन मनांत वर सांगितलेले विचार करीत होता. रिकामा पाट तेथें मुळींच नव्हता, एका पाटावर साखरेचें, दुधाचें अशीं भांडीं

आणि चहाचा डबा, चहागाळणी वगैरे चहाचीं उपकरणें ठेविलेलीं होतीं.

दिगंबरपंतदादा जाण्याबरोबर गड्यानें जरी त्यांस रावसाहेब चहा घेत आहेत, आपण हापिसाच्या माडींत बसा असें ह्मटलें, तरी तो आपला चहाच्या त्या ठिकाणापर्यंत घुसला, त्यास पाहतांच रावसाहेबीणबाई व मोरमास्तर यांचे मनांत काय काय विचार आले ते वर सांगितलेच आहेत. मुलांना कांहीं विशेष समजत नाहीं, परंतु त्यांना दिगंबरपंतांची ऐकीव माहिती झाली असल्यामुळें त्यांचेंही मन उल्हसित राहिलें नाहीं, रावसाहेबांनीं त्यांचें आगमन आपण लक्षिलेंच नाहीं, असें दाखवून मुलांशीं बोलण्यांत व चहाचें सामान नीट आहे कीं नाहीं तें पहाण्यांत आपण गढून गेलों आहोंत असें दाखविलें.

मोरमास्तरचे विचार जरी वर सांगितल्याप्रमाणें होते व त्यानें आपल्याकडून दिगंबरपंतास तुह्मी येथें बसूं नका, बाहेर जा म्हणून सुचविण्याचा यत्न केला, तरी एक तर तिकडे त्याचें लक्ष्य गेलें नाहीं किंवा गेलें असून तिकडे त्यानें दुर्लक्ष्य केलें असावें, बहुतकरून ही दुसरीच गोष्ट खरी असावी. कारण दिगंबरपंताचा स्वभावच असा असे कीं, त्याला एखादी गोष्ट आपल्या मनाप्रमाणें साधावयाची असली, तर तो आपला मानापमान गुंडाळून ठेवून वेळीं अति पड घेऊन किंवा चढ करून आपलें काय काम साधावयाचें असेल, तें साधीत असे. आज तो कांहीं तरी हेतूनेंच रावसाहेबांकडे आला असावा. हेतु साधणें हें आपलें मुख्य काम, तेव्हां आपला मागला अपमान किंवा आज झाल्यास तो अपमानही गिळलाच पाहिजे असा त्यांनीं आपल्या मनांत पूर्ण निश्चय केला असला पाहिजे.

आपण केलेली सूचना या खमंग गृहस्थाला समजली नाहीं. आतां हा बसणार असें वाटतांच मोरमास्तराच्या मनांत काय आलें, त्यानें तत्काळ त्यांस म्हटलें: "अहो दिगंबरपंत, तुम्ही कांहीं चहा घेत नाहां कांहीं नाहीं मग इथें कशाला बसतां? बाहेर ऑफिसांत जाऊन बसा. इतक्यांत रावसाहेब चहा घेऊन तिकडे येतील. आपण तिकडेच बसा. तिकडे बोलायला बसायलाय् बरं."

परंतु खमंग दिगंबरपंत जमिनीवरच बैठक मारतां मारतां म्हणाला: "अरे मोरमास्तर, आम्ही चहा घेत नाहीं म्हणतो कोण? जे दिवशीं चहा घ्यावा असं मनांत येतं, ते दिवशीं मुद्दाम चहा घेण्यासाठीं इथें येतों. आह्मांला रावसाहेबांच्या घराखेरीज कोणत्याही ठिकाणचा चहा आवडत नाहीं. घरीं केला तर जमत नाहीं ह्मणून आपला घेत नाहीं. या रावसाहेबांच्या चहामुळें मी इथें येतों आणखी येत नाहीं दोनही आहेत. चहा हवासा वाटला कीं येतों, पण रोज आलों तर घ्यावासा वाटून रोज घ्यायला लागेन आणखी मग संवय लागेल ह्मणून मी येत नाहीं. काय समजलास? अरे आह्मांला ही जर संवय लागली, तर तुला रावसाहेबांच्या घरून काढून आमच्या घरींच ठेवूं." असें ह्मणून दिगंबरपंत आपण केवढा विनोद केला असें वाटून मोठ्यानें हंसला आणि त्या हंसण्यांतच त्यानें एकदम फतकल मारली.

त्याच्या त्या फतकलीबरोबर प्रत्येकाच्या कपाळाला आंठ्या चढल्या. आतां रावसाहेबांस इलाजच नाहींसा झाला, तेव्हां त्यांनीं दिगंबरपंतास "याहो दिगंबरपंत, कांहीं विशेष काम आहे वाटतं! आपण चहा घेणार का? मोरमास्तर, त्यांनाही एक पेला दे."

" हें पहा रावसाहेब, " दिगंबरपंत रावसाहेबांस ह्मणतात, " मीं आतांच ग्रांगितलंना, कीं आपल्या घरीं तेवढा मी चहा घेतों. पण आमची एक गोष्ट ऐका, ा - च्याप्रमाणेंच हीं मातीचीं खापरं टाकून आपण चांगले चांदीचे पेले बशा करवा, देवाच्या दयेनं आपल्याला कांहीं कमी नाहीं, चांदी कांहीं हल्लीं महाग नाहीं. "

" हें पहा पंत, चिनी पेले वापरण्यांत श्रीमंतीचा किंवा चांदीच्या स्वस्ताई-महागाईचा प्रश्न नाहीं प्रश्न आहे सोईचा, यांत चहा कितीही ऊन असला तरी आपला हात भाजत नाहीं ओंठ भाजत नाहींत. पण मी तुम्हांला काय सांगतों आहे हें तुम्हांला का समजत नाहीं! तुमचा आपला उगीच हट्ट आहे झालं. तुमचा हट्ट तर आमचाही आज हट्ट. आमचा हा चहा जर आपल्याला इतका आवडतो म्हणतां तर आम्ही देऊं त्या भांड्यांतच घेतला पाहिजे. नाहीं तर आह्मी देत नाहीं; आणखी...... "

" अरे बापरे! " दिगंबरपंत अगदीं चकित झाल्याप्रमाणें करून म्हणतातः " इतका तुम्ही आज दुराग्रह करणार कीं काय? मग आली पंचाईत. आम्ही तर आज अगदीं चहासाठीं म्हणून आपल्याकडे आलों, आणखी खापरांत चहा प्यायचा नाहीं हा आमचा निर्धार. तेव्हां आतां चहा पिण्याची चटक जिंकते का खापरांत न पिण्याचा निर्धार जिंकतो, हेंच पहाण्याची पाळी आली. आपण कांहीं भलताच आग्रह करणार नाहीं ह्मणा. आपल्या घरीं कांहीं रुप्याच्या भांड्यांना कमी नाहीं. आम्हांला पितळीसुद्धां...... "

" तें कांहीं नाहीं. " रावसाहेब एकदम म्हणालेः " तुमचा निर्धार तसा आमचा निर्धार. आतां या दोन निर्धारांच्या लढाईंत कोणाचा निर्धार जिंकतो पाहूं. "

" छे. छे. छे. छे. " दिगंबरपंत एकदम हंसून उद्गारलेः " आमचा निर्धार आपल्या निर्धारापुढें कसला टिकतो! दुसरं कांहीं कारण नसलं तरी आपलं म्हणणं म्हणून आम्ही त्या पेल्यांत चहा घेऊं. त्यांतून आतां तर जरूर. आणरे बा आण तुझं तें वेलपत्तीनं सजविलेलं खापर. मोरमास्तर, आण. आण. पण आतां तुझं कसं होणार रे! "

या शेवटल्या प्रश्नानें मोरमास्तर दिगंबरपंताकडे जिज्ञासेनें पाहूं लागला. रावसाहेबही 'आतां तर जरूर' या शब्दांनींही थोडेसें अचंबून त्याच्याकडे पाहूं लागले. आपल्या या दोन उद्गारांचा परिणाम काय होतो हें पहाण्याकरितांच काय, दिगंबरपंतांनीं एक भरलेला चहाचा पेला उचलून व त्यांत आपलें नाक खुपसण्याचा बहाणा करून दोघांकडे डोळे फिरविले. दोघांपैकीं एकही जेव्हां कांहीं प्रश्न विचारीत नाहीं असें दिसलें, तेव्हां मग आपणच म्हणतोः " रावसाहेब, आज आम्ही कां आलों हें आलं का ध्यानांत? मघांपासून आम्हांला अगदीं बुचकळ्यांत पडल्यासारखं झालं आहे, कीं आपलं अभिनंदन करावं का स्वतःचं अभिदुःखन करावं? कांहींच समजत नाहीं. अभिनंदन करावं तर आपलं ठीकच आहे. पण आपण इथून गेल्यानं आमच्यासारख्याचा मोठा आधार गेला. हा मोरमास्तर काय आपल्या जागीं दुसरे कुणी येतील त्यांना चिकटेल, नाहीं तर आतां आपल्या नव्या अधिकारावर आपण गेलां, कीं त्यालाही तिकडे न्याल. पण आमच्यासारख्या मंडळीला तर कांहीं तिकडे नेत नाहीं. " तें त्यांचें बोलणें एकून रावसाहेब

एकदम म्हणतातः " पंत, तुम्ही काय बोलतां आम्हांला कांहीं समजत नाहीं बोआ. आमचं अभिनंदन कशाबद्दल करतां आहां ? आहे तरी काय ? "

" काय ! " दिगंबरपंत फार आश्चर्य दाखवून ह्मणतातः " काय ? आपली बढती होऊन आपल्याला दुसरीकडे घातलं हें आपल्याला अजून कळलं नाहीं ! का आपलं उगीच आह्मांला तसं दाखवायचं ?"

" छे. छे. पंत, मला कांहीं सुद्धां ठाऊक नाहीं. आणखी सध्यां बदली होण्याचा संभव सुद्धां नाहीं. मग तुह्मीं काय कुठून बातमी काढली असेल ती खरी. "

" काढली ह्मणजे ! कांहीं पदरची का काढली ? अगदीं अस्सलांतून काढली. अगदीं डायरेक्टरसाहेबांच्या कागदांतून काढली. आपल्याला ती समजली नसेल असं वाटून मीं आपल्याला सांगायला आलों. ती काय बातमी हें जर पूर्णपणानं मीं आपल्याला सांगितलं, तर आपण अगदीं खोटं म्हणाल. पण रावसाहेब आमच्यासारखी त्रिभुवनांत हिंडणारी नारद-मंडळी अगदीं बित्तंबातम्या आणायची ती अगदीं खऱ्याच आणायची. येत्या मार्चमध्यें दक्षिणभागच्या इन्स्पेक्टराची जागा रिकामी होणार ना ! बोला होय का नाहीं तें ? "

रावसाहेब कांहीं बोलले नाहींत.

" कां ? आतां कां बोलत नाहीं ? ही तर बातमी खास कीं ते इन्स्पेक्टर पेन्शन घेणार. बोला, त्यांना एक्स्टेन्शन मिळणार नाहीं. "

" बरं मग ! पुढें त्यांच्या जागीं कोणा हेडमास्तरला घालून आपल्याला हेडमास्तर करावं, किंवा आपल्याला त्या इन्स्पेक्टरच्या जागीं नेमावं, असं प्रपोजल आहे. कोणतं घडणार तो काय तो विचार. बाकी दोहोंपैकीं एक हें होणारच. मिळून आपण इथून जाणार. आह्मांला आपण नाहींसे होणार. हें अगदीं कॉन्फिडेन्शल क्लार्कच्यापासून मला कळलं आहे. कळल्याबरोबर आनंद वाटून नसाच आलों. आपल्याला यांतली कांहीं बातमी असेल असा माझा तर्क होता, प आपल्या चेहऱ्यावरून तसं दिसलं नाहीं, आणखी आपण म्हणतांही नाहीं म्हणून. पण मी सांगतों हें अगदीं खरं आहे. नाहीं ह्मणतां पण आपल्याला ठाऊक असावं... "

" छे. हो. " रावसाहेब एकदम दिगंबरपंताकडे संतुष्ट मुद्रेनें पाहून म्हणतातः " मला यांतली गंधवार्ता सुद्धां नाहीं. माझंन् ऑफिसांतल्या लोकांचं विशेष दळणवळण नाहीं, पण साहेबाला मात्र आमच्या कामाची पूर्ण माहिती—यामुळं कदाचित्—अरे पण दिगंबरपंत तुह्मी जमिनीवरच बसलां आहां. मी आपला एक या नादांत होतों पण मोरमास्तर, तुला गुलामा समजूं नये का रे ? पाट त्यांना द्यायचा. तें चहाचं सामान खालीं काढून ठेवून तो पाट त्यांना द्यायचा, जवळ दुसरा नव्हता तर. अगदीं मूर्ख बोवा मंडळी. कर कर तो पाट रिकामा........ "

" नको. नको. अहो मी काय परका आहें ? वहिनीबाइ आपल्या मला जरा परक्यासारखं लेखतात. कां ? तर मीं त्या मूर्ख पोरीला जरा नीट मार्गावर आणावं. म्हणून...पण जाऊं द्या. आतां आपण तिच्या बाबतींत अगदीं कुणाजवळ भाषण करायचं नाहीं असं ठरविलं आहे. तिच्या बापाचा आमचा फार ऋणानुबंध, म्हणून आपलं मनांत वाटे. बाकी तिचं अकल्याण व्हावं आणखी तीं पोरं भीक मागत जावीं

असं का माझं ह्मणणं आहे ? असं असेल कसं ? वहिनीबाई, तसं कांहीं नाहीं हो. अगदीं तसं कांहीं नाहीं. ''

वहिनीबाईनीं तें बोलणें ऐकतांच एक शब्दही न बोलतां तेथून पाय काढला. त्यांच्या कपाळावरल्या आंठ्या मात्र दूर झाल्या नाहींत. परंतु रावसाहेबांचें त्यांच्याकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. दिगंबरपंतांनीं सांगितलेल्या बातमीच्या नादांत स्वारी गुंग होती. ते मध्येंच दिगंबरपंताला म्हणतातः " पंत, तुम्हीं बातमी आणली त्याला कांहीं आधार नाहीं.-पाटावर बसा हो, असं काय करतां ? नाहीं नाहीं. नीट बसा, नाहीं तर मला वाटेल, कीं आपण आलां तेव्हां आपल्याला पाट आहे कीं नाहीं तें पाहिलं नाहीं म्हणून आपल्याला राग आला आहे. तसा राग आला असला तर एक्स्क्यूज करा. त्या बातमीला अगदीं आधार नाहीं असं मला कांहीं म्हणतां येत नाहीं. पण पाटावर बसा हो. नसला आला राग, तरी बसा. साहेबाचं माझ्याबद्दल इतकं मत चांगलं असेल, असं मला कांहीं कधीं वाटलं नव्हतं. तो आहे आधीं म्हणतात घुम्या. कुणाला आपलं मत कळूंच द्यायचा नाहीं. भेटायला गेलोंन् कांहीं सांगितलं तर हूं हूं करायचा. बाकी आतां तुह्मांला मी सांगतों पंत. आजपर्यंत कुणाजवळ बोललों नाहीं. पण मी ... मार्क करतों आहें कीं माझं कोणतंही प्रपाजल जाऊं द्या, का त्यावर कांहीं कॉमेंट न होतां पास व्हायचं. हें आज मी किती दिवस पहातों आहें. साहेबाला कामाचं अप्रिसिएशन आहे...इतर मंडळी म्हणतात, कीं त्याला कांहीं समजत नाहीं. पण माझी नाहीं हो अशी समजूत ! त्याला सगळ्या डिपार्टमेंटमधला माणूसन् माणूस पक्का माहीत आहे. बाकी तुम्हांला सांगतों हें जर साहेबानंच केलं तरच होणार आ हो. ऑफिसांतली मंडळी त्याला खो च ... घालायची. त्यांना आमची ही पॉप्युल्यारिटी आवडत नाहीं. आणखी त्यांत आह्मी त्यांच्याकडे उंबरठे पुजायला जात नाहीं. ''

" अहो, साहेबांच्या मनांत असल्यावर मग त्यांचं काय चालणार आहे ? " दिगंबरपंत डोके मिचकावीत ह्मणतो, " अन् आपल्या ह्या कॉन्फिडेन्शल क्लार्कचंन् माझं बोलणं झालं त्यांत आपल्याबद्दल ऑफिसांतल्या मंडळीचंही फार चांगलं मत दिसलं. त्यांचं ह्मणणं इतकंच, कीं आपली मास्तरांवर आणखी मास्तरणींवर असावी तशी कदर नाहीं. यामुळें त्यांना जरा वाटेल तसं वागायला फूस मिळते आणखी आतां बोलतों याबद्दल माफी असावी, पण आमच्या या मथीसारख्या मास्तरणी हेडमास्तरणींच्या डोक्यावर बसतात. आतां आपणच पहा......पण माझं तरी कां डोकं खाजवतं आहे ? जें बोलायचं नाहीं म्हणून ठरलं तें कां पुनः पनः पुढें येतं ! ' स्वभावो दुरतिक्रमो ' तें जाऊं द्या. आपल्याला ही बातमी सांगितली ही अगदीं खरी आहे; आणखी आम्हांला त्याबद्दल मनापासून आनंद झाला आहे. तेव्हां आह्मी आपलं सगळं मागलं एका बाजूला सारून आपल्याला ही बातमी सांगायला आलों. आज नाहीं, उद्यां आपल्याला कळेलच. पण आह्मांला कळल्याबरोबर आपल्याला जाऊन सांगावं असं वाटन आलों. ''

" आश्चर्य वाटतंय् बोवा तुमची ही बातमी ऐकून. आश्चर्य ह्मटलं तर तसं आश्चर्यही नाहीं हो. या साहेबांच्या कारकीर्दींत नेहमीं मेरिटला त्याचं ड्यू मिळणार हें मला पहिल्यापासूनच वाटत होतं. बरं चला, पण अजून तुम्ही म्हणतां तें सगळं

घडून यायला अवकाश आहे. काय म्हणतां साहेबाची कॉन्फिडेन्शल नोट आहे का ? हो; अशा नोट्स् कॉन्फिडेन्शलच असायच्या. तुमच्यान् त्या कॉन्फिडेन्शल क्लार्कचा काय संबंध आणखी माझ्याबद्दल बोलणं कशाला निघालं होतं ! तुम्ही कशाला गेलां होतां ? आपलं सांगण्याजोगं असलं तर सांगाहो."

"आमचा त्याचा संबंध काय तो सांगतों. तो आमचा नातेवाईक आहे. आणखी फार मोठा स्नेहीही आहे. आपल्याबद्दल बोलणं निघायचं कारण आपला आमचा स्नेह इतकंच. कशाला गेलों होतों तें मात्र विचारूं नका."

"कां बरं ? इतकं सांगितलंत आणखी तेवढं सांगायला काय झालं ? सांगाच काय तें."

"जाऊं द्या कीं, उगीच कां ाग्रह करतां ?"

"नाहीं. नाहीं. सांगाच."

"अहो कांहीं नाहीं. तो मला सहज रस्त्यांत भेटला तेव्हां त्यानं सांगितलंन् कीं, त्या मथीबद्दल निनांवी पत्रं फार आलीं आहेत."

"तीं काय ?" म्हणून मीं त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला, "घरीं येशील तर मी तुला एक दिवस फाईल आणून दाखवीन. निनांवी पत्रं तिच्यासंबंधाचीं जायला लागलीं तेव्हां त्यांत आहे तरी काय तें पहायची इच्छा सहजच होऊन मी आपला गेलों. त्यानं मला कॉन्फिडेन्शली दाखविलेलीं पाहून वाचून अंगावर शिरारी आली. झालं त्यावरून बोलणीं निघतां निघतां चालले बोलण्याला फांटे फुटत ! मग काय ? आपल्या गोष्टी निघाल्या. आपला आणखी आमचा स्नेह आहे असं त्याला कळतांच त्यानं आपली आम्हांला ही बातमी सांगितली. आम्हांला आनंद झाला, रात्रीं येऊन सांगणार होतों तर म्हटलं मंडळी बसलेली असायची. तेव्हां विचार केला सकाळीं चहाला यावं म्हणजे बरेच दिवसांत चहा मिळाला नाहीं तोही मिळेल. आणखी आपल्याला हें सांगण्याचंही काम जमेल. असा दुहेरी हेतु धरून आलों. आतां आपल्या पाठीमागून जो कोणी गृहस्थ येईल, त्यानं आपलं व्रत चालविलं पाहिजे बोवा !"

"व्रत कसलंन् काय कसलं म्हणा पण काय हो पंत, बरींचशीं निनांवी पत्रं आहेत का काय ? आणखी त्यांत असं लिहिलं आहे तरी काय ?"

"तें कांहीं बोवा इथें सांगण्याजोगं नाहीं. आणखी........"

"नाहीं, पण त्यांत आमचं......"

"रावसाहेब, इथें कसलं हें बोलतां ! आपण ऑफिसमध्यें चला, मी सगळं सांगतों, सध्यां आपल्याला जपलं पाहिजे. जरा कांहीं वांकडं दिसलं कीं तावडतोब शिक्षा करून मोकळे. काय आहे तें सगळं सांगतों."

रावसाहेबांनीं सगळें चहाचें वगैरे एकीकडे सारून ऑफिसची वाट धरली. दिगंबरपंत कांहीं विचार करीत संतुष्ट मुद्रा करून त्यांचे मागोमाग गेले. तेथें त्यांचें बराच वेळ बोलणें झालें. तें घर सोडून जातांना आमच्या दिगंबरपंतांची मुद्रा विशेषच संतुष्ट दिसूं लागली.

---

# प्रकरण ४२ वें.

## थोडी मधली हकीकत.



काय कारण झालें असेल तें तिचें तिला माहीत. परंतु आपला नवरा ज्या कागदावर सही मागतो आहे तो कागद वाचल्याखेरीज सही करावयाची नाहीं याबद्दल पद्मातांईचा अगदीं कृतनिश्चय दिसला. अण्णासाहेबांनीं जे दिवशीं आपले मॅजिस्ट्रेट स्नेही भोजनास आणले होते, त्या दिवशीं तिनें मुकाट्यानें त्या कागदावर सही करण्याचें नाकारलें. त्यांच्या अंगाचा संताप झाला, तो संताप त्यांना मंडळींत बोलून दाखविणें शक्य नव्हतें. त्या वेळीं त्यांनीं फक्त "कांहीं हरकत नाहीं. मी कांहीं आतांच तुला आग्रह करतों असं नाहीं. हे आयते आले होते म्हणून सहज सही घेणार होतों" असें म्हणून ती वेळ मारून नेली. परंतु त्यांच्या अंगाचा तिळपापड उडाला होता. संतापानें त्यांचें अंग थरथर कांपत होतें. त्यांनीं बाह्यतः मात्र अगदीं शांतवृत्ति धरली. मंडळी जेवून नंतर त्यांचा सहपीतिविधि वगैरे व्हावयाचा तो झाला. त्यांत त्यानाही जितका ताव मारावयाचा तितका ताव मारला. परंतु त्यांचें मन अगदीं कावरेंबावरें झालें होतें. मंडळी येथून निघून जाईल केव्हां आणखी आपण आपल्या बायकोचा समाचार घेऊं केव्हां, असें त्यांना झालें होतें. परंतु मंडळी कांहीं लवकर गेली नाहीं, आणि बराच वेळ बसूनही शेवटीं काय त्यांची लहर लागली ते त्यांच्या पाठीस लागले कीं 'आपण सर्वजण नाटकास जाऊं.' अण्णासाहेबांस आतां आपण बाहेर जाणें तर काय परंतु मंडळींनीं क्षणभरही येथें बसणें इष्ट नव्हतें. परंतु पद्मातांईचें नशीब जोरावर असल्यामुळें म्हणा किंवा अन्य कांहीं करणानें म्हणा त्या मंडळींपैकीं मॅजिस्ट्रेट होते त्यांनीं शेवटीं असें काढलें कीं, आमच्याबरोबर तुह्मी येत नाहीं तर आह्मीही इथून जात नाहीं. यानंतर मंडळी आपला पानविधि सुरू ठेवून बसली. एकानें ग्रामोफोन वाजविण्याचा बेत काढला. तोही काढला. आणखी त्यानें अशी एक अक्कल काढली कीं, 'अण्णासाहेब जर इंग्लंडांतून आले आहेत आणि त्यांचे श्वशुर सुधारक होते, तर त्यांनीं आपल्या कुटुंबाकडून येथें येऊन बसून हार्मोनिअम वाजवून दोन पदें म्हणून मंडळींचें मनोरंजन कां करूं नये? सुधारलेल्या समाजांतून ही तर फार उत्तम चाल आहे.' ते सर्व तर झालेले होते यामुळें त्या सर्वांनीं मोठा हंशा करून 'जरूर' 'जरूर' असें ह्मणून टाळ्या पिटल्या. एकानें तर फार कमाल केली. तो आपल्या हातचा ग्लास वर करून धडपडत उठून "A good suggestion! A happy suggestion! A song, a song from Lady Padmatai and good

health to all " असें रेंगाळत बडबडूं लागला.

पद्मावाई खालीं होती. तिला तें सर्व ऐकूं गेलें आणि तिच्या पोटांत धस्स झालें. या पाजी लोकांत जाऊन बसून आतां आपल्याला हा र्मोनिअम वाजवून गाणें म्ह-णावें लागतें कीं काय, असें भय तिला वा-टलें. तिचें भय जास्त वाढण्याला कारण आणखी असें झालें कीं, तिचा नवरा त्यावर कांहीं बोलेना. म्हणून मंडळींनीं त्याला 'तुम्ही जाऊन पद्मावाईला बोलवाच' असा आग्रह चालविला. तो त्या वेळीं पद्मावाईवर क्रुद्ध असल्याकारणानें म्हणा किंवा त्याला मंडळीची सूचना मुळींच पसंत पडली नाहीं म्हणून म्हणा—तो बराच वेळ उठला नाहीं. इंग्रजींत त्यानें त्यांना ' तिला असलां संवय नाहीं. तिला तें बरं वाटायचं नाहीं. ' असें उत्तर दिलें. परंतु तितक्यांत एकानें ' हें उगी-च आहे. हें खोटं आहे. वसंतरावाच्या घरीं तिला मंडळींत बसून पीआनो आणि हार्मो-निअम वाजवून गाणीं गातांना मीं ऐकलं आहे ' असें म्हटलें. इतकेंच नव्हे तर तो गृहस्थ ठासून म्हणाला, ' वसंतरावाला आणखी त्याच्याच कंपनीला तो आनंद कां मिळावा ! Why should the husband and his friends be denied the pleasure of that heavenly music ? '

अण्णासाहेबांचा या भाषणापुढें अगदीं इलाजच नाहींसा झाला; आणि तो मोठ्या नाखुषीनें 'पहातों बोआ तिची मर्जी असली तर ' असें म्हणून खालीं गेला.

वर झालेलें हें भाषण पद्मेनें पूर्णपणें ऐ-कलें होतें; आणि आतां या दुसऱ्या प्रसं-गांतून आपण कशा पार पडणार हें तिला समजेना. तथापि "पहिल्या प्रसंगांतून पार पडण्याला जर आपल्याला धैर्य आलं, तर आतांच्या या प्रसंगाचं काय आलं आहे, ' असें म्हणून ती अगदीं स्वस्थ बसली. मथुराताईला तिनें केव्हांच लावून दिलें होतें. अण्णासाहेब खालीं आला. तिला त्यांनीं हांक मारल्या; आणि ' मंड-ळींच्या मनांतून तूं हार्मोनिअम वाजवून कांहीं पदं म्हणावींस असं आहे. वर चल ' असें अगदीं औपचारिक तऱ्हेनें म्हटलें. पद्मावाईनें ' या मूर्ख दारुड्यांच्या मंडळींत जायचं नाहीं ' असा निश्चय केलाच होता. त्याप्रमाणें तिनें त्याला उत्तर दिलें: " मी अशा मंडळींत अशा वेळीं येत नाहीं "

खरोखर म्हटलें तर अण्णासाहेबाला तिनें यावें असें वाटत नव्हतेंच. ती त्याच्या म्हणण्याप्रमाणें रज गेली असती, तर त्याला बरें वाटलें नसतें. परंतु तिनें ' मी अशा मंडळींत अशा वेळीं येत नाहीं ' असें उत्तर दिलें, तें ऐकतांच त्यांच्या तळपा-याची आग मस्तकाला गेली. तो तिच्याकडे क्षणभर डोळे वटारून पहात उभा राहिला. नंतर त्यानें दांतांनीं खालचा ओंठ चावला; आणि तो "You strumpet, you take pleasure in disobeying me, in insulting me." असें म्हणून संतापानेंच तेथून निघून गेला.

पद्मेला ते त्याचे शब्द ऐकून फार संताप आला. परंतु ती मुकाट्यानें राहिली. अण्णा-साहेब वर गेले. मंडळींनीं ते एकटेच आ-लेले पाहिले, तेव्हां एकदम well शब्दाचें कोरस झालें. अण्णासाहेब शांतपणानें म्ह-णाले: " She is fast asleep, I don't want to disturb her." त्या त्यांच्या भाषणाच्या तऱ्हेंत असें कांहीं होतें कीं, त्यामुळें मंडळींपैकीं कोणासही त्यावर कांहीं बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. फक्त एकच

गृहस्थ "I know; I know what you mean" असें डोळे मिचकावीत ह्मणाला अण्णासाहेबानें त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. नंतर पहांटे तीन वाजण्याच्या सुमारास मंडळीची तहपीठ बंद पडून एक एक, एक एक निघून गेला. त्यांत जे चांगलेच गुंगले होते ते कांहीं न बोलतां गेले; पण मॅजिस्ट्रेटसाहेब फार खमंग होते, त्यांना एका पिपानें सुद्धां कांहीं होणार नव्हतें. ते जातांना अण्णासाहेबांजवळ जाऊन त्यांच्या पाठीवर हात मारून ह्मणाले: "Good luck next time old boy!" आणि चालते झाले. आपल्या या भाषणानें—अगदीं साध्या भाषणानें आपल्या मित्राच्या मनांत काय विचार आले आणि काय नाहीं याची त्यांना कल्पना नाहीं.

अण्णासाहेबाची प्रीतिभक्ति कांहीं कमी होती असें नाहीं, त्यांत बायकोनें आपला अनादर केला, आपल्याला आधीं 'त्या कागदावर सही करतें' असें कबूल करून आयत्या वेळीं मंडळींत तोंडघशीं पाडलें हें पाहून आलेल्या संतापाचें शमन त्याच उपायानें करून घेण्याची लालसा झाली. परंतु तो त्या मॅजिस्ट्रेटप्रमाणेंच त्या कामांत मोठा सहनशील होता. कितीही भरती झाली, तरी अंगावर येत नसे. केव्हां थोडा रंगेलपणा वाटे, केव्हां अगदीं घुमेपणा येई. आज आतां त्याची चित्तवृत्ति रंगेल ह्मणण्यासारखी नव्हती; संतप्त होती. मंडळी जाईल केव्हां या गोष्टीकडे त्याचें चित्त लागलें होतें. आपल्या कुटुंबानें आपल्या इच्छेप्रमाणें सही केली, ह्मणजे मंडळी व आपण वाटेल तसे रंगूं अशा बुद्धीनें त्यानें सर्व सामग्री आणून ठेविली होती. परंतु तीच सामग्री त्याला आतां कोठून आणली असें होऊन गेलें. ती सामग्री इतकी नसती तर त्याचे स्नेही इतका वेळ बसते ना. व वसंतरावानें रस्त्यांतून ऐकलेली त्यांची ती दंगल झाली नसती. ते तेव्हांच निघून गेले असते. गुळाचा खडा जेथें नाहीं तेथें डोंगळे येतात कशाला आणि आले तरी फार वेळ राहतात कशाला? परंतु पद्मा आपल्याला आयत्या वेळीं असें उत्तर देईल हें त्याच्या स्वप्नींही आलें नव्हतें. आपली पत्नी आपल्या पूर्ण कह्यांत, ती मानसुद्धां वर करावयाची नाहीं, आपण जें ह्मणूं तें ती करणार अशीच त्याची पक्की खात्री होती परंतु मॅजिस्ट्रेटनें तिला सहज 'आपण तो कागद वाचला आहेना' असें विचारलें तेव्हां 'मीं नाहीं वाचला' म्हणून तिनें उत्तर दिलें आणि 'वाचीपर्यंत सही करणार नाहीं' असें तिनें वर सांगितलें. तेव्हांपासून अण्णासाहेबांच्या अंगाचा नुसता संताप झाला होता.

मंडळी जाण्याचा अवकाश, त्यानें तिला वर बोलाविलें. ती मुकाट्यानें आली. परंतु तिच्या चर्येवर फार दृढ असा निश्चय दिसत होता. त्यानें तिला "तूं आज माझा किती अपमान केलास? किती नाचक्की केलीस? याची तुला कल्पना आहे का? तूं असं काय ह्मणून केलंस? काय ह्मणून केलंस? बोल" असें अतोनात दरडावून ह्मटलें. पद्माताई कांहीं एक बोलली नाहीं. नुसती उभी होती. त्यामुळें त्याचा संताप अधिकच वाढला. तो मोठमोठ्यानें इंग्रजींत बोलूं लागला. आपण काय बोलतों आहोंत याचा त्याला सुमार राहिला नाहीं मध्येंच त्याला [illegible] मंडळींत येऊन हार्मोनिअम वाजवून गाणें ह्मणण्याचें नाकारिलें हें आठवलें, आणि त्याच्या रागाला मर्यादाच राहिली नाहीं. 'तूं आज माझा उपमर्द—जाणूनबुजून अपमान—केलास तो काय ह्मणून?

What did you mean by...अशा मंडळींत अशा वेळीं येत नाहीं. अशा मंडळींत ह्मणजे काय! Were they not my friends? तूं वसंतरावापुढें ह्मणतेस कीं नाहीं गाणां? त्याच्या स्नेह्यांत तूं वाटेल तशी बसतेस उठतेस कीं नाहीं? मग माझ्याच स्नेह्यांबद्दल काय म्हणून अशी भाषा. वसंतराव कोण तुझा? मी कोण? बोल. बोल. What did you mean by insulting me like that you strumpet! तुला तुझ्या बापाच्या पैशाचा आणखी दोन इंग्रजी शब्द येताहेत त्यांचा फार मद चढला आहे. पण कुणाशीं गांठ आहे हें तूं समजत नाहींस. You d—d harlot........" त्याच्या तोंडून पुढें एक शब्दसुद्धां निघेना. आतांपर्यंत दाबून ठेवलेला संताप—धुमसून धुमसून एकदम भडकणाऱ्या आगीप्रमाणें किंवा संतप्त झालेल्या सर्पाच्या विषमय फूत्काराप्रमाणें—बाहेर पडला.

ती अगदीं शांतपणें सर्व ऐकून घेत होती. परंतु तिच्या अंतःकरणांत शांतता होती काय? कशी असणार? तिच्या डोळ्यांतून अश्रू अत्यंत उष्ण असे एकसारखे वहात होते; परंतु ते तिच्या त्या क्रोधांध पतीला दिसले नाहींत. त्यानें जितकी तिच्यावर अंग पाखडावयाची तितकी पाखडली आणि शेवटीं तिच्या खांद्याला हिसडा मारून ढकलून ह्मटलें:

"नीघ. नीघ इथून. माझ्या डोळ्यांसमोर क्षणभरसुद्धां उभी राहूं नकोस. मी तुला आणखी कांहीं तासांची फुरसत देतों. आज दुपारीं १२ वाजतां मी तुला पुनः बोलावीन. तोंपर्यंत तूं शुद्धीवर आलीस तर बरं आहे. नाहीं तर माझ्यासारखा वाईट मीच. काय करीन तें माझं मलासुद्धां समजत नाहीं."

इतकें बोलून तिला त्यानें पुनः धक्का दिला. ती संतापांतच खालीं निघून गेली.

अण्णासाहेब आपल्या दिवाणखान्यांत पुनः जाऊन कोचावर पडला. आठ वाजेपर्यंत त्यानें कसातरी वेळ काढला. आठ वाजतां त्यानें पोषाख चढविला. सासूबाई ओटीवर बसल्या होत्या त्यांना कांहीं फडफड बोलला आणि घराबाहेर पडला व नीट मथुराताईच्या घरींच गेला. वसंतराव त्याला भेटला तो तेथेंच. हें मागें आलें आहे.

# प्रकरण ४३ वें.

## बबीचें दुखणें.



दिगंबरपंतांचा शेजार सुटल्यापासून मथुराताईचा एक हृद्रोग अगदीं कमी झाला होता. आपण बाहेर गेलों असतां पाठीमागें आपल्या पोरांचें काय होतें आहे कोणास कळे हा जो एकसारखा चिंताविचार तिच्या चित्तांत जागत रहात असे, त्याचा तीक्ष्णपणा पुष्कळ कमी झाला. शिवाय थारेपालटामुळें म्हणा किंवा अन्य कांहीं कारणांमुळें म्हणा, बबीच्या दुखण्यांत बराच पालट पडला आहे असें तिला वाटूं लागलें. त्याचप्रमाणें पद्माताईचें सान्निध्य हेंही कांहीं अंशांनीं तिच्या मनाला थोडीशी स्वस्थता आणण्याला कारण झालें असावें. पद्माताईचीं स्वतःचीं दुःखें आणि काळज्या कमी होत्या असें नाहीं. परंतु त्या दुःखांचें घटका दोन घटका विस्मरण पाडण्याकरितां म्हणा किंवा तिच्या नैसर्गिक परोपकारी स्वभावामुळें म्हणा ती दिवसांतून कितीदां तरी मथुराताईच्या घरीं जाऊन बबीजवळ बसत असे. केव्हां ती त्या दोघां लहान मुलांना आपल्या घरीं घेऊन येत असे. पद्माताईची दुःखस्थिति काय आहे याची कल्पना मथुराताईस थोड्याच सहवासानें समजून आली होती. आपलीं दुःखें बाजूस ठेवून, ही बाई आपल्यावर व आपल्या भावंडांवर इतकें प्रेम करते, तेव्हां हिचे उपकार मानावे तेवढे थोडे असेंही मथुराताईच्या मनांत वारंवार येत असे.

दोन दुःखी जीव एकमेकांच्या आकर्षणानें तेव्हांच एकत्र होऊन परस्परांच्या दुःखांचा परस्परांस विसर पाडण्यास झटत असतात हेंच खरें. दोन सुखी माणसांचा आत्यंतिक सहवास कितीही वर्षे असला तरी तो सहवास दोन दुःखी माणसांच्या सहवासाइतका प्रेमोत्पादी होत नाहीं. समदुःखित्वांत जें प्रेम उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असतें, तें समसुखित्वांत नाहीं. आपल्याला सर्व सुखाचीं साधनें अनुकूल असून केवळ एक गोष्ट—एक मुख्य सुखसाधन—जें प्रेम तें अनुकूल नसल्याकारणानें आपली किती दुरवस्था झाली आहे ! हा विचार पद्मेच्या मनांत वारंवार वारंवार येई. आपल्यावर प्रेम करणारें माणूस जगांत एकही नाहीं. आपलें ज्यांच्यावर अतोनात प्रेम तीं माणसें आपल्या सान्निध्याला नाहींत हें आपलें केवढें दुर्दैव ! असें तिला वारंवार वाटे. मथुराताईला द्रव्याची अनुकूलता नाहीं. परंतु केवढें प्रेमाचें निधान तिच्या हातीं आहे. तिच्या लहान भावंडांवर तिचें प्रेमसर्वस्व आहे आणि तींही तिला

आपल्या आईप्रमाणें समजून तिच्या ठिकाणीं अकृत्रिम प्रेम करतात. त्या दुःखित व दुर्दैवी कुटुंबाचा आधार केवळ परस्पर प्रेमाच्या बारीक परंतु अत्यंत मजबूत तंतूवर आहे, हें तिला क्षणोक्षणीं दिसत होतें. मथुराताईनीं अहोरात्र कष्ट करून—रात्रीं मरमरे तों काम करून—कोणाचें शिवण्याचें—कोणाचें टिपण्याचें—केव्हां कोणाचें दळण्याकांडण्याचेंही काम करून मिळविलेले या पैशांनीं तयार केलेलें जाडें भरडें अन्न आणि मनोहरानें माधुकरींत मिळवून आणलेले तुकडे मोठ्या समाधानानें हंसत खेळत खात असणाऱ्या त्या कुटुंबाकडे पाहून पद्मताईस फार विलक्षण आनंद होई. तें त्यांचें सुख पाहण्यांत केव्हां केव्हां ती आपलें दुःख विसरून जाई. परंतु केव्हां केव्हां आपल्याला अशा सुखाचा लाभ कधींही होत नाहीं आणि होण्याचा संभवही नाहीं याबद्दल तिच्या मनाला अत्यंत खेदही होई. पण त्या खेदांत असूया किंवा मत्सर यांचा गंधही नव्हता. उलट आपण आपल्या दुःखांनीं व त्रासांनीं कितीही गांजलों तरी आपण दृष्टीस पडलों असतां आपल्याकडे प्रेमानें हंसून पहाणारीं हीं चार मुलें व प्रेमानें बोलून दुःख हलकें करणारी यांची ही बहीण एवढींच काय तीं माणसें आहेत हें मनांत येऊनच तिला फार समाधान वाटे. तिनें मालतीस पत्र धाडिलें त्यांत लिहिल्याप्रमाणें खरोखरीच स्थिति होती. मालतीच्याजवळ ज्याप्रमाणें पद्मावती अगदीं मन मोकळें करून बोलत असे, त्याप्रमाणें मथुराताईच्या जवळ अद्यापि कधीं आपलें मन अगदीं मोकळें करून तिनें भाषण केलें नव्हतें. परंतु ज्या गोष्टी मालतीच्या कधीं दृष्टीस पडल्या नव्हत्या, त्या गोष्टी मथुराताईच्या नजरेस प्रत्यक्षच पडल्या असल्याकारणानें आतां शब्दांनीं सांगण्याला कांहीं उरलेंच नव्हतें. शब्दांनीं सांगूनही ज्या दुःखांची व दुःखकारणांची कल्पना कधीं कोणाला येणार नाहीं, तीं सर्व दुःखें या बिचारीला कशा प्रकारें भोगावीं लागताहेत तें तिला प्रत्यक्ष दर्शनानें फार उत्तम प्रकारें समजून आलें होतें. यामुळें केव्हां केव्हां पद्मताई मथुराताईच्याकडे नुसती घटकाभर येऊन बसत असे तेव्हां दोघींचें भाषण असें होतही नसे. दोघी एकमेकींकडे निवळ पहातच बसत. परंतु त्या पहाण्यानेंच पद्मताई आपलें दुःख विसरून समाधान पावून जाई.

ज्या दिवशीं सकाळीं बसंतराव मथुराताईला आपलें पत्र पद्मताईला पोंचविलें कीं नाहीं तें विचारून गेला आणि त्याला अंगणांतच पद्मताईचा नवरा भेटला त्या दिवसाची थोडी हकीकत सांगून पुढें मथुराताईची हकीकत वाचकांस सांगतों. अण्णासाहेबांनीं मथुराताईकडे येऊन तिला म्हटलें:

" तुम्ही माझ्या बायकोच्या मोठ्या मैत्रीण आहां. तेव्हां तिला उपदेशाच्या दोन गोष्टी सांगून मी सांगेन त्याप्रमाणें वागत जा म्हणून उपदेश करा. नाहीं तर मी पुनः तिचें तोंड पहाणार नाहीं. मी तिला आणखी तिच्या आईला हें सांगून आलोंच आहें. पण तुम्हांलाही—तुम्ही फार चतुर आहां, शहाण्या आहां म्हणून तुम्हांलाही-सांगतों. हिचा बाप वारला, त्यानें माझा अनेक प्रकारांनीं उपमर्द केला होता. हिनेंही त्याच्या नादानें माझा फार अपमान केला होता, परंतु तो वारला, आणि इचे मूर्ख भाऊ कुणीकडे देशोधडीला लागले असें कळतांच मी आपले सगळे प्रास्पेक्टस्—इंग्लंडांत माझी चांगली व्यवस्था होती. मला ऑक्सफर्डमध्यें मराठी, संस्कृत व फारशी

शिकवण्या असून माझी चांगली चलती होती. मला या भाषांच्या प्रोफेसराची जागा मिळण्याचा संभव होता. पण मी इच्याकरितां ह्मणून-हला मागल्या सगळ्या अपमानास्पद गोष्टींबद्दल क्षमा करून-मी इकडे आलों इस्टेट चोरांपोरांच्या हातीं जाईल म्हणून तिची व्यवस्था लावायचं मनांत आणलं. आल्याबरोबर हिला मीं नीटपणीं विचारलं, कीं बोआ मी सगळी व्यवस्था ठीकठाक लावणार आहें. तेव्हां मी सांगेन त्याप्रमाणें वागणार ना? वागणार असलीस तर मी या भानगडींत पडतों. नसलीस तर माझा मी परत जातों. तेव्हां मला अगदीं कांहीं बोलली नाहीं. आपण सांगाल त्याप्रमाणें मुकाट्यानं करतें म्हणून उत्तर दिलंन्, आणखी आतां लागली फांटे फोडायला. तुमचीन् तिची चांगली मैत्री आहे. याकरितां तुमच्याकडे आलों आहें. मी आतां बाहेर जातों आहे. तिला काल रात्रीं ज्या कागदावर सही करायला सांगितली आहे, त्या कागदावर मुकाट्यानं सही करायला तयार हो म्हणून तिला सांगा, नाहीं तर माझ्यासारखा वाईट नाहीं. मी संध्याकाळच्या गाडीला पुनः चालता होईन. पुनः या जन्मांत तिचं तोंड पहाणार नाहीं मग बसेल रडत. काय मथुराताई, मी ह्मणतों तें ध्यानांत आलं कीं नाहीं तुमच्या? You are, I believe, her best friend तेव्हां तुमच्यावर तिचा पूर्ण भरंवसा असला पाहिजे. मग पहा बोआ. I have come to you as the last resource. हीं तुमचीं मुलं कां? यांना माझ्याबरोबर इंग्लंडला पाठवीत असलां तर पाठवा. मी त्यांची व्यवस्था लावून देईन. एवढ्या वयापासून तिथें राहून शिक्षण झालं तर आणखी काय पाहिजे! हा तुमचा थोरला मुलगा हुशार दिसतो. Would you like to send him with me? त्याचं कल्याण होऊन जाईल. तुमच्या पाठीमागली काळजी नाहींशी होईल. You are such a pretty little widow तुमच्यावर इतक्या मुलांचा भार पडणं कांहीं चांगलं नाहीं पण असो. तुम्ही माझं एवढं काम करा. मी आतां येऊन तुम्हांला काय सांगितलं तें तिला सांगा. ह्मणजे मग सगळी नीट व्यवस्था लावूं. मला तुमची फार कींव येते. You are such a love-inspiring girl काय तुह्मी एवढं करणार ना? जा आधीं आतां जाऊन करा. ती तुमचं खचित ऐकेल, मला खात्री आहे."

मथुराताई व तिचीं भावंडें त्याची ती एकसारखी चाललेली वटवट ऐकत होतीं. तीं लहान मुलें त्याच्या तोंडाकडे टक लावून पहात होतीं आणि मथुराताई खालीं मान घालून आपल्या पायांकडे पहात होत्या. याची ही बडबड आटपून हा जातो तरी केव्हां असें तिला होऊन गेलें. हा नुसती बडबड करूनच राहतो कीं आणखी कांहीं त्या रात्रींसारखा आचरटपणा करतो, हेंही तिला भय पडलें. मथुराताईस इंग्रजी येत नव्हतें. यामुळें त्याच्या मधून मधून इंग्रजींत बोलण्याच्या लहरींतलीं वाक्यें तिला कांहीं समजलीं नाहींत. त्याची टकळी "काय, तुह्मी एवढं करणार ना?" या वाक्यानें संपली. परंतु तो बूट वगैरे घातलेला तसाच चार पावलें पुढें जाऊन तिच्या अगदीं जवळ गेला व "ठीक आहे. तुह्मी माझ्या इच्छेप्रमाणें कराल अशी माझी खात्री आहे, तेव्हां For the present good-bye" असें ह्मणून तिचा हात धरण्यासाठीं त्यानें आपला हात पुढें केला. त्याबरोबर ती झटकन् मागें सरकली आणि

" आपण बूट बीट घालून पुढें येऊं नका. आह्मी जेवतों खातों निजतों बसतों तिथें बूट घालून कशाला यावं ? मागें व्हा. " असें एकदम ह्मणाली.

मथुरताईंना स्वतःलासुद्धां पाठीमागून असें वाटलें कीं आपल्याला इतका धीटपणा आला कसा ? परंतु त्या माणसाचा आधींच तिला मनापासून राग आलेला होता. आणखी तशांत त्यानें हा असा फार्स केला त्यायोगानें तिला अतोनात तिटकाराच आला. तिनें त्याला उत्तर दिलें व मागें होण्याबद्दल खडकावून सांगितल, त्या वेळची मथुराताईची चर्या मोठी विलक्षण दिसली. अशी दिसली कीं अण्णासाहेबांस खरोखर तिचें भयच वाटलें. तो तिच्या ह्मणण्याप्रमाणें एकदम चार सहा पावलें मागें सरला आणि तिच्याकडे कांहीं चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागला. नंतर त्याच्या मनांत काय वाटलें कोणास ठाऊक ? तो एकदम ह्मणालाः " वा ! तुमच्या रागांतसुद्धां मोठी बहार आहे बोवा. Yes, yes. You are very pretty. You are the prettiest widow I have ever seen–बरं आहे. पुनः येऊं तेव्हां बूट घालून येणारच नाहीं. आतां वसंतराव आला होता त्याच्यासारखाच पोषाख करून येत जाऊं. पण माझा हा इंग्रजी ड्रेस फार चांगला आहे. बरं पण मीं सांगितलेलं माझं काम करायला जातांना ? तुह्मी तिला सांगा ! काय ? Why don't you say yes ? Say yes please and then I shall go तुमच्या शब्दावर माझा भरंवसा आहे. पूर्ण भरंवसा आहे. जा. वसंतरावापेक्षां मी काय वाईट माणूस आहें ? मजवरच कां आपला असा राग ? राग असो कांहीं असो. निदान माझ्याकरितां नाहीं, तरी आपल्या मैत्रिणीच्याकरितां आपण तिला दोन हिताच्या गोष्टी सांगून 'नवऱ्याच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व गोष्टी करीत जा, त्यांत तुझं कल्याण आहे' असं सांगा. तुह्मी फार चांगल्या आहां. मीही खरोखर तसाच चांगला आहें. तुह्मांला अनुभव येईल काय ? करतांना माझ्या सांगण्याप्रमाणें ? बोला म्हणजे मी जातों, आणखी बारा वाजतां परत येतों. तुम्हाला विचारायला काय झालं तें ? तुह्मी कांहीं सांगितल्यानं ती ऐकत असली, तर मी घरीं जाईन, नाहींतर आपला इथेंच तुमच्या इथें दोन दिवस जेवीन, माझीं दुसरीं कामं आहेत तीं करायला हिंडेन, आणखी मग निघून जाईन. "

त्या मूर्खाचें शेवटलें बोलणें ऐकून मथुरताईच्या जीवाचा नुसता थरकांप झाला. हा शुद्धीवर आहे कीं गैरशुद्धींत कांहीं बोलतो आहे ? असें मनांत येऊन तिला वाटलें कीं या वेळीं एकदांच कायतो धीटपणा केला पाहिजे. नाहींतर हें भलतेंच लचांड येऊन बसावयाचें. असा विचार करून ती त्यास संतापानें ह्मणालीः " मी कांहीं आतां तिकडे जाणार नाहीं. आणखी त्यांच्या घरच्या गोष्टींत बोलणार नाहीं. आपण पुनः यायची तसदी कांहीं घेऊं नका." ती चांगला संताप दाखवून बोलली आणि त्यालाही तो दिसला नाहीं असें नाहीं. पण तिकडे लक्ष्य न देतां तो तिला पुनः म्हणतोः "मला ठाऊक आहे आपला हा राग कां आहे तो ? पण तशा रागाचं कांहीं कारण नाहीं. आह्मी आतां जातो, पण पुनः येण्याची बंदी मात्र नसावी. मी आपलाच आहें. " असं जें काय तोंडाला येईल तें बडबडत शेवटीं तो तेथून निघून गेला. मथुरताईला असें झालें कीं, आपल्या शिरावरलें एक संकट गेलें. त्यानं सांगितलेल्या बाबतींत

पश्चात्ताईजवळ आपण एक अक्षरही बोलावयाचें नाहीं असा तिनें निर्धार केला होता. तेव्हां तें करण्यासंबंधानें तिच्या मनांत विचारसुद्धां आला नाहीं. मात्र याच्यापूर्वी एक मिनिटभरच आपल्याकडे आलेल्या त्या वसंतरावाच्या वर्तनाचा आणि याच्या वर्तनाचा विरोध तिच्या मनांत उभा राहिला व त्यावरून कांहीं विचार आले.

परंतु आतां तिला आपल्या मनांत येणाऱ्या विचारांत गढून जाण्यास वेळ नव्हता. कारण उशीर झाला होता यामुळें ती झटझट आपल्या कामाला लागली. मनोहर आपला अभ्यास करीत होता. तोही आपल्या माधुकरी मागण्याच्या उद्योगाला जावें ह्मणून स्नान वगैरे करण्याच्या विचारानें उठला, दुसरीं मुलें भेदरून कोठें गेलीं होतीं तीं पुढें येऊन आपल्या ताईला "हे कोण साहेब आले होते" वगैरे विचारूं लागलीं. त्यांना कांहींतरी उत्तरें देत केव्हांच वेळ निघून जाऊन मथुताईची शाळेंत जाण्याची वेळ झाली. यामुळें घाईघाईनें मुलांना जेवावयाला वाढून व आपण जेऊन मनोहर आल्यावर त्याला कांहीं सांगावयाचें होतें तें बयीजवळ सांगून त्या चालत्या झाल्या. परंतु शाळेंत गेल्यावर त्यांच्यापुढें एक निराळेंच ताट वाढून आलें!

# प्रकरण ४४ वें.

## कसलें ताट वाढून आलें?



मथुराताई वर सांगितल्याप्रमाणें शाळेंत जातात व पहातात तों त्यांच्या वरिष्ठ मास्तरीणबाई आणि त्याच शाळेंतले मास्तर अगदीं दाराशींच उभे राहून एकमेकांशीं कांहीं कुजबुजत आहेत आणि आपल्याकडे पाहून स्मित करून एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पहात आहेत. तें पहातांच मथुराताईच्या पोटांत धस्स झालें. या मंडळींचें हें गालहंसूं आपल्या कांहीं तरी नुकसानीचें दर्शक आहे ही गोष्ट एकदम तिच्या मनांत आली. मास्तरीणबाई दारांत उभ्या राहून आपलें स्वागत करण्याला उत्सुक दिसताहेत तेव्हां आपणास घरीं बसण्याचा हुकूम यांच्या हातीं आला असावा असेंच तिच्या मनांत आलें. काय असेल तें खरें, असें मनांत येऊन ती दाराशीं गेली. तों मास्तरीणबाई नाक वर ओढून डोळे फिरवून आणि लांब चेहरा करून मथुराताईंना म्हणतात: "कशाला येतां आंत मथुराबाई, आमच्या सगळ्या शिफारशी वांया जाऊन आपल्याला सस्पेंड केल्याचा हुकूम आला आहे. मीं आपल्याला कांहीं सांगितलं नाहीं, पण हें प्रकरण आज महिना दोन महिने धुमसतं आहे. प्रत्येक वेळीं माझ्याकडे रिपोर्टाला आलं, कीं मी 'हें सारं खोटं आहे. बाई फार चांगल्या आहेत' असा बिनदिक्कत

रिपोर्ट करीत असें. बरं चला आज नाहीं उद्यां तुम्ही सोडणारच असाल तुमचा पुनर्विवाह व्हायचं ठरलं म्हणजे, तें सरकारच तुम्हाला सोडतं आहे झालं. मग जुळतं आहे कां आपलंनू डॉक्टर भगवंतरावाचं. जमवून टाका एकदां म्हणजे माथा उजळ होईल. चाकरीची जरूर नाहीं. आज तरी काय आहे म्हणा तुम्हांला ! पण उगीच सोंग करावं लागतं तें तरी नको. "

मथुराताई तें भाषण करणाराचा अत्यंत उपरोधिक, दुष्ट व कुत्सितपणाचा स्वर ऐकून अगदीं स्तब्ध झाली. शाळेंतल्या मुली शाळेंत होत्या. अशा वेळीं वास्तविक मास्तरणींनीं आपापल्या वर्गांत असावयाचें, परंतु हेडमास्तरीण बाई मुद्दामच दारांत उभी राहून वर सांगितल्याप्रमाणें उपरोधिक व कुत्सित बोलणें मोठ्यानें बोलत होती. लहान मुलींना ऐकूं जावें हा तर मुळीं उद्देश. शेवटले शब्द तिनें उच्चारले, ते तर मुद्दाम दोन तीन वरच्या वर्गांतल्या मुली दारांत असतांनाच मोठ्यानें उच्चारले व मास्तराकडे पाहून आणखी मोठ्यानें म्हणतेः "कां मास्तर, खरं का नाहीं ! सुधारकांनीं यांच्यासारख्यांची चांगली सोय करून ठेविली आहे कीं नाहीं. ! "

मथुराताईला अतोनात संताप आला. परंतु ती अस्सल कुलीन. तिनें तो तस्सा गिळला आणि त्यांचें तें भयंकर बोलणें आणखी कानीं पडूं नये म्हणून ती शाळेंत आंत जाऊं लागली तों मास्तरीणबाईनीं हात आडवा धरून म्हटलें:—

"कशाला उगीच आंत जाण्याची तसदी घेतां ! मास्तरांना इथेंच दारांत चार्ज द्या म्हणजे तेवढा तरी वेळ तुमचा फुकट जायचा नाहीं. डाक्तरांच्या सगळ्या शिफारशी व्यर्थ जाऊन तुम्हांला हा हुकूम आला आहे. मास्तर, द्या तो त्यांच्या हातांत. "

मास्तरीण इतकें सगळें अत्यंत संताप आणण्याजोग्या उपरोधिक तऱ्हेनें बोललीच, परंतु त्याच्याहीपेक्षां तिनें मौज केली ती ही कीं, मथुराताईच्या डोळ्यांत संतापानें व दुःखानें अश्रु आलेले पाहून आपलाही कंठ अगदीं सद्गदित झाला आहे असें दिसण्यासारखा आवाज काढून व डोळ्यांला पदर लावून लबाडीनें स्फुंदत स्फुंदत म्हटलें: "आतां तुमचा आमचा आजवरचा ऋणानुबंध सरला. आतां आमच्या चहाड्या रावसाहेबिणबाईच्या जवळ सांगून रावसाहेबांचं मत आमच्याबद्दल कोण बिघडवील ! तुमच्यावांचून आमचं कसं होईल !"

मास्तरीण इतका दुःखाचा बहाणा करून लागलीच मास्तराकडे पाहून फिदी फिदी हंसत मास्तरास म्हणतेः "काय मास्तर, आपण आतां अगदीं निराधार झालों नाहीं. बरं ! चला आणखी कुणी यांच्याचसारखा येईल."

नंतर एकदम आवाज बदलून कठोर स्वर काढून व डोळे वटारून आणि नाकपुड्या वगैरे फेंदारून म्हणाली: "हं चला मास्तर, हिच्याशीं चावटपणा करीत बसण्याला आपल्याला कुठें वेळ आहे ! चला हिच्या ताब्यांत काय काय जिनसा होत्या, आणखी काय काय नाहींशा झाल्या, त्यांची यादी तुम्हीं केली आहे, तिच्यावर यांची सही घ्या आणखी नाहींशा झालेल्या जिनसा कां व कशा नाहींशा झाल्या त्याबद्दलचा रिपोर्टही यांच्याकडून घ्या. पोरी यायला लागल्या आहेत, तेव्हां यांची पोरींत शोभा नको. बाकी राहिली आहे काय म्हणा ! "

असें म्हणून एक मुरड मारून व मामेला झटका देऊन मास्तरीणबाई चालत्या झाल्या.

संताप व खेद यांनीं मथुराताईची या

वेळीं इतकी विलक्षण स्थिति झाली होती कीं, पुढें ती मास्तरीणबाई आपल्याला उद्देशून काय बोलते आहे, याचें तिला मुळींच ज्ञान झालें नाहीं. कांहीं संतापानें व कांहीं खेदानें डोळ्यांत अश्रुपूर आल्यानें डोळ्यांपुढें काय चाललें आहे हें सुद्धां दिसेना. एखादा जबर आघात होऊन जसें सारें शून्यवत् व्हावें तसें तिला जिकडे तिकडे शून्यवत झालें. परंतु असें किती वेळ चालणार ! त्या मास्तराच्या कर्कश वाणीनें एकदां ती जागी झाली. मास्तर तिच्या अंगावर ओरडून म्हणालाः " अहो, नुसत्या अशा शुंभासारख्या उभ्या काय राह्यलां ! ही यादी मीं केली आहे पहा इकडे. जे जिन्नस तुह्मीं चार्ज घेतांना तुमच्या स्वाधीन केले त्यांची ही यादी, आणखी ही आज आहेत त्यांची यादी, ज्या जिनसांचा पत्ता लागत नाहीं त्या जिनसांची ही निराळी यादी. तुह्मीं आल्यावर हा हुकूम पाहिला, कीं तुमचं चित्त भानावर राहणार नाहीं हें मनांत आणून मीं आपलीच किल्ली चालवून कपाट उघडून या याद्या केल्या. काय यांतले जिन्नस घरीं भावंडांच्या खेळाबिळाला नेले असतील ते घेऊन या; नसले तर कां हरवले, कुठें गेले त्याचा रिपोर्ट करून द्या. कांहीं तरी करा म्हणजे मी आपला सुटलों. इतके जिन्नस कसे कमी झाले हो ! बाईनला त्याचाच राग आला आहे कीं तुह्मी चांगल्या विश्वासाच्या म्हणून तुमच्या स्वाधीन त्यांनीं सगळं सामान दिलं. किंडरगार्टणच्या चार पेट्या नाहींत. मुलींना शिकवायला द्यायला आणलेलं कापड अर्धं अधिक नाहीं. कशिद्याचं सामान नाहीं. रेशमाचे बिंडे नाहींत. तें सारं झालं काय ! सांगाल कीं नाहीं ! घरीं भावंडांना सदराबिंदरा करायला नेलंत का ! असलं तर होय म्हणा. करूं रिपोर्ट, गेलं फाटलं मुलींनीं हरवलं म्हणून. चला आतां असं करा. बाईच्या खोलीच्या बाहेर जागा आहे तिथें बसा. काय रिपोर्ट करायचा असेल तो करून टाका. तुह्मांला होत नसला तर मी करतों. आणखी दहापांच रुपये दिले तर हरवलेल्या जिनसांच्या ऐवजीं दुसऱ्या कोऱ्या जिनसा आणून ठेवितों म्हणजे कटकट मिटली. "

इतका वेळपर्यंत मथुराताईचें चित्त शून्य होऊन ती अगदीं स्तब्ध उभी होती. परंतु आतां ती चित्ताची शून्यता जाऊन ती जागृत झाली, आणि मास्तरांस म्हणालीः

" सर्व जिन्नस त्या कपाटांत होते. परवांच्या दिवशीं मीं यादीप्रमाणें तपासून घेतले, काल कपाट मुळीं उघडलंच नाहीं. आणखी तुह्मी म्हणतां जिन्नस गेले. कसे जावे ! मी येईपर्यंत तुह्मी थांबला कां नाहींत ! आपली किल्ली कां चालवलीत ! आणखी माझ्या पश्चात् कपाट कां उघडलंत ! "

मथुराताई अशा प्रकारें बोलेल ही मास्तरास कल्पना नव्हती. यामुळें तिचें बोलणें आणि तो आविर्भाव हा पहातांच तो चपापला आणि एकदम म्हणतोः " वा ! तुह्मांला चार्ज देऊन जायला उगीच उशीर लागूं नये म्हणून मीं तुमचं काम करून ठेवलं त्याचं हें फळ वाटतं ! बैस तर मग याद्या करीत आणखी जिन्नस तपाशीत. या याद्या मी फाडून टाकतों. अन् मी तुझ्या पश्चात् तुझं कपाट उघडून याद्या केल्या म्हणून आतां कबूल करीन होय ! आणखी बाई तरी कबूल करतील होय ! चल चल मला चार्ज दे, बाईनीं सांगितलं आहे त्याप्रमाणें. काय दिमाख लावते आहे ! "

मास्तराचे हे शेवटले शब्द मोठ्या स्वरांत आल्याकारणानें शाळेंतल्या बऱ्याच मुली आतां त्यांच्या भोंवतीं जमल्या होत्या. मथुराताईस तें अतोनात वाईट वाटलें आणि येथें मुलींच उभें न राहणें हाच शहापणाचा मार्ग असें वाटून ती मास्तरास म्हणाली: " मी आतां कांहीं करणार नाहीं. तुह्मीं माझं कपाट आपल्याजवळची किल्ली चालवून उघडलंत तेव्हां आतां माझं काम काय राहिलं ? तुह्मी चार्ज घेतलाच. तो हुकूम काय आहे तो या इकडे म्हणजे मी आपली जातें."

" जातें ! अन् चार्ज दिल्याखेरीज ! मग मी तरी हुकूम काय म्हणून तुझ्या हातांत देईन. जा काय वाटेल तें कर. "

मास्तरानें हें फारच मोठ्यानें ह्मटलें. तेव्हां येथें आपण उभें राहूं नये. मास्तरीणबाई यांना येऊन मिळाल्या कीं मोठाच थयथयाट होईल असें मनांत येऊन मथुराताईनें तेथून त्या वेळीं तसेंच जाण्याचा निश्चय केला. चार्जाफार्जाचें मग काय होईल तें होवो असें ती आपल्याशींच ह्मणाली. मास्तर व मास्तरीण दोघेंही अगदीं अविचारी व हलकट आहेत, तेव्हां सगळा मुलींचा घोळका जमवून तमाशा दाखवायला कमी करणार नाहींत हें तिला ठाऊक होतें. आतां या वेळीं आपण येथून निघून जाऊन ताबडतोब काय कशी हकीकत झाली ती रावसाहेबांस कळवावी, असें तिनें मनांत योजिलें आणि तिरिमिरीसारखी ती तेथून तर निघालीच. काय होणार असेल तें होईलच. परंतु मुलींच्या देखत मास्तर व हेडमास्तरीणबाई यांनीं आपल्याला अग तुग करून तमाशा व्हावयाला नको हा तिचा विचार.

ती त्या तिरीमिरीसारखी घरीं आली खरी, परंतु त्या तिरमिरीचा आवेश किती वेळ राहणार ? घरीं आल्यावर त्या लहान भावंडांस पहातांच तिला एकदम रडें कोसळलें. रस्त्यानें येत असतांच तिचें मस्तक भ्रमूं लागलें होतें आणि आपण घरीं जाऊन पोंहचतों कशा असें तिला होऊन गेलें होतें. मुलांना पहाणें हें आपलें नुसतें शेवटचें कारण-केवळ शेवटलें निमित्त होतें.

मथुराताई बाहेरून घरांत आली, तिनें आपल्या धाकट्या भावंडांस पाहिलें आणि त्यांच्याशीं ती कांहीं बोलली नाहीं असें कधींच झालें नाहीं. ती येते आहे असें पहातांच मुलें धांवत जाऊन तिच्या कमरेला मिठी मारावयाचीं. त्याप्रमाणेंच त्यांनीं आज केलें, परंतु मथुराताईनें एकदम त्यांच्याकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहून तिनें त्यांना दूर सारलें व ती बिऱ्हाडांत गेली व तेथें इकडे तिकडे न पहातां तिनें आपलें अंथरूण पसरलें आणि चौघडी तोंडावरून घेऊन पडली. वाटेंत तिच्या मनांत काय काय विचार आले असतील ते परमेश्वर जाणे. आज आपल्याला ताईनें असें काय केलें म्हणून अगदीं चकित व भयभीत झालेलीं मुलें बाहेरच उभीं राहिलीं, बर्यास मध्यंतरीं तापानें पुनः पछाडून तिला अंथरूण धरण्यास लाविलें होतें.परंतु आतां पुनः तिचें किंचित् बरें होतें, तरी तिला अद्यापि उभें राहून दोन पावलें टाकण्याइतकीसुद्धां शक्ति नव्हती. तिचा सर्व कारभार खुरडण्यानेंच चालत असे. ती या वेळीं अर्धवट गुंगींत होती. आंत कोणी तरी आलें आणि इकडे तिकडे वावरलें इतकें नव्हे तर ती ताईची चाहूल असा तिला भासही झाला व त्या भासानें ती इकडे तिकडे पाहूं लागली, तों तिला

कोणी दिसलें नाहीं. हा प्रकार काय आहे असें मनांत येऊन आपलें क्षीणमस्तक उशीवरून उचलून तिनें इकडे तिकडे पाहिलें तरी कोणी कोठें दिसेना, तेव्हां ती आपल्या अंथरुणावर उठून बसली आणि सूक्ष्म दृष्टीनें पुनः तिकडे पाहूं लागली तों ताईचें अंथरूण कोणी पसरून कोणी तरी त्यावर निजलें आहे असें तिला भासलें. कोण असावें तें कांहीं तिच्या ध्यानांत येईना. तिचा थोरला भाऊ तिला विचारून शाळेंत गेला होता. ताईही त्याचप्रमाणें गेली होती. बबीस झोंप लागली असतां खोलींत गडबड करूं नये अशी शिकवणूक रोज चालल्यामुळें तिला झोंप लागलीशी वाटली कीं मुलें बाहेर अंगणांत जाऊन खेळत. तेव्हां घरांतल्यापैकीं कोणी नसावें हें उघड होतें. मग कोण असेल तें पाहिलें पाहिजे असें मनांत येऊन तिनें आपल्या त्या धाकट्या भावंडांना हांका मारल्या. परंतु तिचा क्षीण आवाज कसला बाहेर ऐकूं जातो ! त्या मुलांचें प्रत्युत्तर आलें नाहीं किंवा तीं मुलेंही आलीं नाहींत.

परंतु तिच्या त्या हांकांस दुसरीकडून प्रत्युत्तर मिळालें. मथुराताई चौघडी घेऊन आतल्या आंत रडत होती. मनमुरादपणें डोळ्यांतून पाणी गेल्याखेरीज दुःखित अंतःकरणाला स्वस्थता येत नाहीं. ती आंतल्या आंत आंतल्या आंत पुष्कळ रडली. त्याचा आवेग तिनें बाहेर फुटूं दिला नाहीं. परंतु काय चमत्कार असेल तो असो, बबी आपल्या धाकट्या भावंडांस हांका मारूं लागली तो शब्द तिच्या कानीं पडतांच तिचें आत्मसंयमन पार डळमळलें. तिचा शोक तिला आवरेना आणि ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. तें रडणें ऐकण्याबरोबर बबीसही एकदम कसेंसेंच झालें, तिनें तो आ-

ग आणि ती उठून उभी राह-
' करूं लागली. आजपर्यंत
। ताईला अनेकवार अश्रू
हिलें होतें, परंतु ओक्साबोक्शीं
ही पाहिलें नव्हतें. तेव्हां ति-
ऊन आपण तिला घट्ट मिठी
सांत्वन करावें असें तिला एक-
तेला उभें राहवेना. तेव्हां ती
' खुरडत आपल्या वहिणी-
आणि " ताई, ताई, तूं अशी
आज तूं शाळेंतून लागलीच
ालीस ! " असें तिला विचारूं
त्तर मिळेना तेव्हां तिच्या तोंडा-
चा पदर दूर करण्याचा त्या
। केला परंतु तोही व्यर्थ
ताईनें चौघडी डोक्याखालीं
धरली होती. शेवटीं बबी-
वेना. तीही एकदम मोठ-
के देऊन ओक्साबोक्शीं रडूं
हा प्रकार सुमारें दोन तीन
ठ. आपण आपल्या या भावं-
। मिळण्यासाठीं चांगलेपणानें
हात असतां परमेश्वरानें आप-
प्रकारानें कां जेथें तेथें नाडावें ?
ागल्या जन्मीं पातक केलें,
भोगीत असूं. परंतु या मु-
अर्भकांनींही...पातकच केलें
त्यांच्या सुदैवानें, त्यांच्या पु-
आपल्याला स्वस्थपणानें देव
मिळवून कां खाऊं देत नाहीं ?
ध्यामध्यांत न पडतां, आपलें
आपण बऱ्या अशा प्रकारें
। असतां दुसऱ्याच्या मनांत
ां द्वेष किंवा मत्सर कां उत्पन्न
रीणबाई आणि मास्तर यांनीं
हमीं धुसफूस कां करावी ?

सर्वथैव खोट्या गोष्टी आपल्या ठिकाणीं लादून आपल्याला उपरोधिक कां बोलावें ? आपल्या तोंडचें—नव्हे पांच तोंडांचें—अन्न काढण्याची इच्छा तरी कोणाला कां व्हावी ? असे हजारों प्रश्न तिच्या मनांत आले आणि शेवटीं तिच्या या विचारांतच तिला असें वाटलें कीं, आपण मागल्या जन्मीं केलेल्या पापाचेंच प्रायश्चित्त आपल्यामुळें या मुलांना भोगावें लागत असलें पाहिजे. नसेल म्हणून कशावरून ? तिच्या मनाची त्या वेळीं अशी स्थिति झाली होती, कीं त्याच कल्पनेनें तिला पछाडलें. आपण जन्माच्या दुर्दैवी. तेव्हां आपलेंच दुर्दैव आपल्या सगळ्या माणसांना बाधलें. आपल्या दुर्दैवानेंच आपला पति वारला. आपल्या दुर्दैवानेंच आपले आईबाप वारले आणि आपल्या दुर्दैवानेंच या पोरांचे हाल होताहेत. आपल्या दुर्दैवानें आपली चाकरी गेली. आतां तीं दोन दुष्ट माणसें आपल्यावर चोरीचा आळ आणतील. आपल्या ताब्यांत दिलेल्या जिनसा नाहींशा झाल्या ही हाकाटी त्यांनीं केली कीं, त्या जिनसा आपणच नेल्या असें सिद्ध धरलें जाईल. आपण दरिद्री तेव्हां मुलींच्या कामासाठीं आणलेलें कापड आपणच नेलें असें ठरणार. असा भयंकर आरोप आपल्यावर आल्यास आपण काय करणार ! असे विचार तिच्या मनांत येतां येतांच तिच्या मनांत असाही भयंकर विचार आला, कीं असें जर आहे, आपल्या दुर्दैवामुळें जर आपल्याला व यांना भयंकर दुःख सोसावें लागत आहे तर आपण जीव देऊन मोकळें कां होऊं नये ! किती भयंकर विचार तो ! तो विचार मनांत उभा राहतांच तिचें सर्वांग थरारून गेलें आणि ती एकदम उठून बसली. क्षणभर ती आपल्याजवळ बबी आली असून ओक्साबोक्शीं रडते आहे हें जणूं काय विसरूनच गेली, आणि काऱ्याबावऱ्या सगळीकडे पाहूं लागली. तों बबीनें तिला एकदम मिठी मारून ह्मटलें: "ताई, ताई, ताई, तूं आज असं काय करते आहेस ! माझ्याशीं बोलत कां नाहींस ! तूं अशी कां रडतेस !"

बबीच्या त्या केविलवाण्या व अत्यंत क्षीणस्वरानें विचारलेल्या प्रश्नांनीं मथुराताई शुद्धीवर आली. तिनें बबीकडे टक लावून पाहिलें तिची ती, तें अस्थिचर्म मात्र राहिलेली, परंतु इतक्या दुखण्यानें त्रस्त असतांही आपल्याविषयींच्या प्रेमानें भरलेल्या नेत्रांनीं आपणाकडे पहाणारी मूर्ति पहातांच तिच्या मनांतला तो भयंकर विचार नाहींसा झाला. तिनें बबीस आपल्या दोनही हातांनीं घट्ट कवटाळून धरलें. तितक्यांत बबीनें एकाएकीं पुनः आपल्या त्या क्षीण परंतु प्रेमपूर्ण स्वरानें तिला आणखी ह्मटलें: "ताई, माझं हें दुखणं पुनः पुनः उलटतं, त्यानं काग तुला त्रास आला ? पण ताई, या दुखण्याला मी काय करूं ? माझ्या हातचंही नाहीं. देव मला नेत नाहीं !" मथुराताईच्या कानीं ते शब्द पडतांच हे लहान मुलीचे शब्द नव्हेत, एखाद्या तीव्र शस्त्रानें केलेले आघात, असें तिला वाटलें. मुलगी लहान, तिच्या तोंडून असे शब्द निघतील ही कल्पनासुद्धां मथुराताईस येईना. आपल्या मनांत जीव देण्याची—मरण्याची कल्पना आली, तशीच या पोरीच्याही मनांत कशी कल्पना आली ! हाच विचार तिच्या मनाला डाचूं लागला. ती आपलें पहिलें सगळें विसरून गेली आणि एकदम त्या पोरीला अधिक कवटाळून ह्मणाली: "बबे, हें काय तूं बोलते आहेस हें ? तुझ्या डोक्यांत कोणीं हें देवानं नेण्याचं वेड घातलं ? देव कुठें एवढ्या लहान लहान मुलींना नेत

असतो? असं पुनः बोलूं नकोस. मला फार वाईट वाटेल. वेडी आहे वेडी. कुणीग तुला हें देवानं नेण्याचं सांगितलं?"

"कुणी नाहीं. मला आपलं वाटलं कीं बाबाला त्यानं नेलं, आईला नेलं, तुझ्या नवऱ्याला नेलं, तसं मलाही न्यावं।"

या भाषणानें तर मथुराताई एकदम दचकलीच. इतक्या वयाच्या लहान आणि अज्ञ मुलीला हें बोलणें आलें तरी कोठून? सुचलें तरी कोठून? चची तिच्या वयाच्या इतर मुलींपेक्षां फार हुषार, फार समजूतदार होती आणि केव्हां केव्हां मोठ्या माणसालासुद्धां सुचणार नाहीं असलें भाषण करी. परंतु आजचें हें बोलणें मथुराताईस फारच विलक्षण वाटलें. तें ऐकून ती कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसली. इतक्यांत चची तिला पुनः म्हणतेः "ताई, पण तूं आज इतक्या लवकर शाळेंतून परत कशी आलीस? आज सुट्टी आहे?"

तो प्रश्न ऐकतांच एकदम मथुराताईच्या तोंडून एक लांब असा सुस्कारा आणि पुढें दिलेले शब्द बाहेर पडलेः "हंः आतां कायमचीच सुट्टी झाली!"

चचीला तिच्या बोलण्याचा अर्थ समजेना. ती एकसारखी आपल्या बहिणीकडे टक लावून पहातच राहिली.

काय कारण असेल तें असो. आजपर्यंत या पोरीनें मरणाची गोष्ट काढली नसतां आजच एकाएकीं हिच्या तोंडून ते शब्द निघाले तेव्हां हें भावि गोष्टीचें दुश्चिन्ह तर नव्हे?

# प्रकरण ४५ वें.

## चौघांची भेट.



आपण इतके परिश्रम केले तरी ही पोरगी हातची जाणार का काय, तिचा हा मरणाविषयींचा उल्लेख भावि गोष्टींचें सूचक दुश्चिन्ह कीं काय ! असे प्रश्न मथुराताई आपल्या मनाला विचारीत असतांना तिनें त्या बचीला किती तरी घट्ट घट्ट कवटाळून धरलें होतें. तिला जगांत त्या वेळीं दुसरें कांहीं दिसत नव्हतें. तीं दुसरीं दोन लहान भावंडें आंत आलेलीं तिच्याजवळ आलीं आणि आपली ताई बचीला इतकें जवळ घेऊन असें काय करते आहे म्हणून आश्चर्यच करीत राहिलीं. बाहेरून ताई आली तेव्हां तिच्याजवळ जाण्यास तीं पुढें झालीं असतां त्यांस तिनें रागानें झिडकारिलें होतें. यामुळें त्या मुलांची भावना साहाजिकच अशी झाली कीं, ताई आज आपल्या दोघांवर फार रागावली आहे. या भावनेनें तीं दोघेंही बराच वेळ बाहेर राहिलीं. परंतु आपली ताई आपल्यावर रागावली असतां आपण अशा प्रकारानें बाहेर राहिलों तर ती अधिकच रागावेल, असेंही त्या दोघांपैकीं थोरल्या मुलाला वाटलें. ताईनें अशा प्रकारानें आपणास अगदीं झिडकारल्याचा हा अनुभवही त्यांस बहुतेक नवीन होता. तेव्हां जितका वेळ काढवला तेवढा काढून नंतर तीं मुलें आंत आलीं. त्यांस पहातांच 'आपण यांना विनाकारण झिडकारून पलीकडे सारलें. आपणच यांना अशा प्रकारानें दूर सारलें, तर त्यांना कोण विचारणार !' असाही मथुराताईच्या मनांत विचार आला. पण ती त्या वेळीं बचीच्या भाषणामुळें उद्भवलेल्या विचारांनीं तिचें मन जास्त व्याप्त झालें होतें, यामुळें त्यांनाही जवळ घेण्याचा विचार तिच्या मनांत आला नाहीं.

परंतु तिचें तें बचीला कवटाळणें पाहून आणि आतांची तिची चर्या पाहून, तिचा राग गेला आहे असें त्या मुलांस वाटलें. तीं क्षणभर उभीं राहिलीं. आतां पुनः आपली ताई आपल्याकडे बघेल आणि आपण एकदम तिच्याकडे जाऊं असा विचार थोरल्याच्या मनांत आला. तो आल्याबरोबर त्यानें तो धाकट्याच्या कानांत सांगितला. धाकटा " हंः हंः आपण असें करूं या " असें मोठ्यानें म्हणून दोघे दोन बाजूंनीं आपल्या ताईकडे धांवले. दोघांनीं दोहींकडून—एकानें डावीकडून व दुसऱ्यानें उजवीकडून—तिच्या गळ्याला मिठ्या मारल्या व तिच्या तोंडासमोर दोहींकडून आपलीं तोंडें आणून दोघेंही मोठ्यानें हंसूं लागलीं. बिचाऱ्या बचीचें तोंड ताईच्या कवटाळण्यामुळें तिच्या पदरांत गुरफटलें होतें तेंही दोघांचा हा हंशा ऐकून बाहेर निघालें. त्या चारही तोंडांवर प्रेमप्रेरिताखेरीज दुसरा कोणताही विकार दिसेनासा झाला. दुखण्यानें पिढून पिढून अगदीं

पांढऱ्याफटक झालेल्या बचीच्या चर्येवरसुद्धां थोडेंसें तेज दिसूं लागलें; आणि त्यामुळें ही पोरगी आपल्यास सोडून जाणार कीं काय, हा जो विचार मथुराताईच्या मनांत आला होता तो पार गेला. आपली चाकरी गेली, आतां या पोरांना खायला घालायला काय करावें, वगैरे विचार यायचे, ते मुळींच आले नाहींत; त्या क्षणापुरती ती अत्यानंदांत तल्लीन झाली. तीं चौघेंही त्या प्रेमानंदांत—दुःखाची परमावधि होण्याला कारण असतांही—प्रेमानंदांत-बुडून गेलीं आहेत, हें पाहण्याचें ज्याच्या नशिबीं असेल तो प्राणी धन्य होय; आणि असा प्राणी त्या क्षणींच तेथें आला होता. तो केव्हां आला, हें या चौघांपैकीं कोणासच समजलें नाहीं. तीं दोघें मुलें आपल्या ताईच्या दोनही बाजूंनीं जाऊन तिच्या गळ्याला विळखा घालण्याचा बेत करून पुढें धांवत असतांच पद्माताई त्यांच्या घरांत आली. तिची दृष्टि त्या चौघांवर असतां असतांच तो प्रेमरूप ब्रह्मानंद तिनें पाहिला; आणि असा हा आनंद जगांत आपण अनुभवणें तर राहोच, परंतु आपल्याला पाहण्याला सुद्धां सांपडावयाचा नाहीं, असें मनांत येऊनच कीं काय ती जागच्याजागीं थबकली—तटस्थपणें अगदीं टक लावून पाहूं लागली. या मुलांप्रमाणेंच आपणही मथुराताईच्या गळ्याला मिठी मारून हंसावें, अशी तिला इच्छा झाली. परंतु तसें करणें शक्यच नव्हतें. आपण एक पाऊल पुढें जाण्याबरोबर आपली चाहूल लागून ही मंडळी तेव्हांच भानावर येतील, आणि यांचा हा ब्रह्मानंद पार नाहींसा होईल. तो नाहींसा करण्याचें पाप आपण घेऊं नये, असें वाटून ती तटस्थपणें उभी राहिली. तीही या वेळीं किंचित्—अगदीं किंचित्—आनंदांतच होती. घरीं काहीं तरी मनाला आनंद वाटण्याजोगें घडून ती त्या आनंदांत बचीचा समाचार घेण्यासाठीं म्हणून आली होती. बचीची ताई घरीं आली असेल, अशी तिला कल्पनासुद्धां नव्हती. ती कल्पना असती तर ती याच्यापूर्वी केव्हांच आली असती. घरीं मन्याबापू आला होता, त्याला जेवण्याखाण्याला घालून तिनें त्याला एका खोलींत शांतपणें निजण्यास सांगितलें; आणि त्याचा डोळा लागला असें पहातांच तिला बचीचें स्मरण होऊन ती इकडे आली तों तिच्या नजरेस हा ब्रह्मानंदाचा प्रकार पडला.

परंतु ब्रह्मानंद तरी कोठें चिरकालिक आहे ? निदान प्रेमानंद तरी या जगांत चिरकालिक खास नाहीं. ब्रह्मानंद ज्याला प्राप्त झाला, तो जसा मग दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची पर्वा करीत नाहीं, तसेंच प्रेमानंदाचें तेवढ्या वेळापुरतें असतें. ब्रह्मानंदाची ऊर्मि उतरली कीं पुनः आपलें हें नश्वर जग डोळ्यांपुढें दिसूं लागतें आणि व्यवहारापासून आपण अजून सुटलों नाहीं असें मनांत येऊन सगळाच विरस होतो, तसेंच या प्रेमानंदाचेंही आहे. तो क्षणिक. त्याच्या ऊर्मी उतरल्या कीं, पुनः मनुष्य आपल्या-पुढें वाढून ठेविलेल्या सांसारिक दुःखांकडे वळतो; आणि तसा तो वळला कीं त्याच्या त्या प्रेमानंदाच्या समुद्राला इतकी ओहोटी लागते, कीं तो कधीं अस्तित्वांत होता कीं नाहीं असें त्यास होऊन जातें. हा अनुभव पद्मेस केव्हां केव्हां आला होता. यामुळें तिनें आपल्याकडून त्या चतुर्मुखी प्रेमानंदांत विरस उत्पन्न करावयाचा नाहीं, असा बेत केला आणि ती अगदीं तटस्थ उभी राहिली. असेंही असेल कीं, हा प्रेमानंदाचा देखावा आतां आपल्या दृष्टीसमोरून घालविल्यास पुनः कधीं दृष्टीस पडेल कीं नाहीं

कोण जाणे, तेव्हां पहाण्यास सांपडेल तेवढा पाहून घ्यावा असेंही मनांत येऊन ती तशीच उभी राहिली. परंतु तो देखावा फार वेळ तिच्या नजरेसमोर टिकला नाहीं. बचीला आतां पुनः अंथरुणावर निजविलें पाहिजे, असें मनांत येऊन तिनें आपल्या भावांस दूर केलें; आणि बचीला घेऊन ती उठली. तों तिची आणि त्या सर्वांची दृष्टि पद्मानाईकडे गेली. त्याबरोबर "तुह्मी केव्हां आलां?" असें तिनें पद्मातांईला विचारलें; आणि धाकटे राजश्री एकदम आपल्या वहिणीपासून तिच्याकडे धांवून तिच्या कमरेला विळखा घालून उभे राहिले.

पद्मेनें त्याला धरून उचलतांना ह्मटलें: "मी आतांच आलें. पण तुह्मी या वेळीं इथें कशा?"

हा प्रश्न येतांच मथुरातांईची चर्या एकदम फिरली. तिचें तें प्रेमानंदानें विकसित झालेलें मुख एकदम कोमेजलें, पण तोंडावाटे दुःखाचा सुस्कारा वगैरे कांहीं न निघतां "सांगेन मग" एवढेंच ती ह्मणाली.

पद्मेला त्या तिच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं. परंतु त्याबद्दल जास्त प्रश्न न विचारतां ती ह्मणते: "तुह्मी इथें असाल ही मला कल्पनाच नाहीं. मी आपली बचीच्या जवळ थोडीशी बसण्यासाठीं ह्मणून आलें होतें. तुह्मी आहांत हें ठीकच झालं. संध्याकाळीं मी तुह्मांला येऊन सांगणार होतें. माझा मन्याबापू आला आहे. त्याला जेवायखायला घातलं आणखी तो क्षणभर पडला आहे तितक्यांत इकडे येऊन जावं म्हणून इकडे आलें."

"काय मन्याबापू इकडे आले! आणखी दुसरे?"

"मीं अजून त्याला कांहीं विचारलं नाहीं. तो अगदीं बावरल्यासारखा झालेला दिसला. आईनं त्याला कितीदां विचारलं, पण आईला त्यानं धड उत्तर दिलं नाहीं. तिनं किंवा कोणींच त्याला तें कांहीं एव्हांशीं विचारूंच नये असं त्याला वाटत असावं, असं दिसलं. म्हणून मींच आईला जरा थांबवून धरून त्याला स्वस्थ करायची खटपट केली. जेवल्याखाल्ल्यावर आणखी थोडी विश्रांति घेतल्यावर आपण होऊन तो सांगेल. तिकडे सांगून जायचं कीं बारावाजतां मी येईन. पण अजून ठिकाण नाहीं. तेव्हां मधें एक बचीकडे फेरी मारून यावं म्हणून आलें."

"बरं झालं बाई" मथुरातांई बचीला अंथरुणावर ठेवून म्हणाल्या: "फार बरं झालं. आतां वडील बंधुही एकदां आले म्हणजे तुमच्या ह्मणण्याप्रमाणें सगळं तुम्हांला करायला येईल."

"हो तर काय? मन्याबापूची काय स्थिति झाली आहे म्हणतां! तुह्मीं त्याला पूर्वी पाहिला असता, तरी तुह्मीं त्याला ओळखलं नसतं. मीं ओळखलं नाहीं. कुठें बिचारे दोघेही वणवण करीत होते परमेश्वर जाणे. पण आतां आला आहे. आतां सगळं कांहीं ठीक होईल. माझा अगदीं त्या बाबतींत निश्चय झाला आहे काय करायचं त्याच्याबद्दलचा."

त्यावर मथुरातांई कांहीं बोलल्या नाहींत. परंतु मथुरातांई या वेळीं इथें कशा, हें जाणून घेण्याची इच्छा पद्मातांईच्या मनांत पुनः उठली आणि तिनें पुनः मथुरातांईस तो प्रश्न विचारला. तेव्हां बचीकडे डोळे फिरवून मथुरातांईनें पद्मातांईस असें सुचाविलें कीं, आतां हिच्या देखत आपण विचारूं नका, मग सांगेन.

अशी खूण करून ती बबीस थोपटूं लागली. बबीला तेवढ्या त्या एकंदर गडबडीनें फार श्रम झाले, आणि त्या श्रमांनीं ती लवकरच गुंगली व थोड्याच वेळांत तिला झोंपही लागली. मग त्या दोघी पुनः बोलूं लागल्या. मथुराताईनें पद्माताईस आपण मध्येंच शाळेंतून येण्याचें कारण सांगितलें.

परंतु त्यांस त्या दुर्दैवाच्या गोष्टीसुखाचा अनुभव घेण्यास सोडून आपण पद्माताईच्या घरीं काय चाललें आहे तें पाहूं. पद्माताईनें मथुराताईच्या उंबरठ्यांत पाऊल घालण्याला आणि तिच्या पतीनें तिच्या स्वतःच्या घरांत पाऊल घालण्याला एकच गांठ पडली. तो आला तो मोठ्या कुऱ्यांतच आला; तडक ओटीवरून बूट घातलेला तसाच कर्रकर्र करीत थेट स्वयंपाकघराच्या दाराशीं गेला. सासूबाई तेथें दारांत कांहीं जप करीत बसल्या होत्या. हे राजश्री त्या म्हातारीच्या पुढें उभे राहतांच त्या उठून उभ्या राहून स्वयंपाक घरांत गेल्या. त्याबरोबर यांनींही आपल्या बुटाचे पाय आंत घातले. म्हातारीनें, " हं! हं! मला शिवाल. बूट घालून स्वयंपाकघरांत कुठें येतां ! मला शिवाल " असें मोठ्यानें म्हटलें. बूट घालून हा माणूस स्वयंपाकघरांत येतो आहे हें पाहिल्याबरोबर तिला अतिशय चमत्कारिक झालें. तिचा नवरा—आबासाहेब महासुधारक होता. त्याचें व तिचें सोंवळ्याओंवळ्याच्या बाबतींत मुळींच जमत नसे. परंतु त्यानें कधीं अशा तऱ्हेनें तिच्या दृष्टीनें अत्याचार–तिच्या बाबतींत केले नव्हते. स्वयंपाक घर हें आपल्या कुटुंबाचें राज्य. त्यांत आपण जाऊन दुखवूं नये. तिचे विचार, तिचें सोंवळें–ओंवळें तिला. आपलें आपल्याला. असा विचार ते करीत. यामुळें जांवईबोवांचें हें करणें तिला अगदीं आवडलें नाहीं. पण जांवईबोआला हिच्या किंवा कोणाच्याही आवडनिवडीची मुळींच पर्वा नव्हती. " मला शिवाल हं हं बूट घालून सैंपाकघरांत कुठें येतां ! " या शब्दाची जणू काय त्याला मौजच वाटली. आणि तो आणखी चार पावलें पुढें टाकून तिला म्हणतोः " शिवाल म्हणजे काय ? मी काय कोणी धेड महार आहें कीं काय ? कुठें आहे ती ? काय झाला तिचा विचार ? माझ्या म्हणण्याप्रमाणें करायला तयार नसली तर मी या घरांत आतां पाणीसुद्धां प्यायचा नाहीं. " त्याबरोबर ती म्हातारी एकदम थोडीशी हर्षानें म्हणतेः " आतां तिच्या म्हणण्याप्रमाणें झालंच आहे. आतां काय तिचा आग्रह असायचा आहे ? तिचं म्हणणं होतं तें झालं. मन्याबापू आला आहे. आल्याबरोबर त्याला भूक लागली होती म्हणून जेवून तो क्षणभर पडला आहे. तुमच्याकरितां थांब म्हटलं होतं पण त्याला अगदीं...... "

म्हातारीच्या तोंडचे 'मन्याबापू आला आहे' हे शब्द कानीं पडल्याबरोबर जी अण्णासाहेबांची चर्या झाली आहे ती वर्णन करून सांगणें कठिणच आहे. म्हातारीचे पुढचे शब्द त्याच्या कानांत शिरलेच नाहींत म्हटलें तरी चालेल. एखाद्यास विजेचा आघात झाला असतां जशी त्याची स्थिति होते, तशीच त्याची स्थिति झाली. परंतु क्षणांत तो भानावर आला ! नंतर संतापला आणि म्हणतोः " कुठें आहे तो फाजील लेंकाचा. इतके दिवस कुठें होता ? आणखी आतांच कुठून उगवला ? कुठें आहे तो ? मला सांगा. " असें बोलत बोलत तो म्हातारीच्या अंगावर धांवल्याप्रमाणेंच करूं लागला. म्हातारी फारच घाबरली. याच्या

अंगांतबिंगांत आलें कीं काय, असें तिला वाटलें आणि ती " ही पोरगी कुठें गेली याच वेळीं, हें काय हें ? तो त्या वरच्या तिच्या खोलींत निजला आहे, तुह्मी बाहेर जा. सैंपाकघरांत आतां अन्न सगळं विटाळलं कीं काय ? " असें बडबडत होती. मध्यें तो तिच्या अंगावर ओरडून म्हणतो: "कुठें गेली ती ? कुठें गेली ? हा कारटा आला आहे म्हणून त्या वसंतालान् त्याच्या त्या थेरड्याला सांगायला गेली का ! येऊं द्या, आणखी येऊं द्या त्या दोघांना. आणखी कोण येताहेत ? मी आतां मालक आहें. मन्याचंय् कांहीं चालायचं नाहीं आणखी त्याचे वडील कुठें नरकांत गेले आहेत, ते आले तरी त्यांचंही कांहीं चालायचं नाहीं. कुठें आहे तो कारटा पाहतों कशाला आला आहे तो ! इतके दिवस नाहीं आणखी आतां त्याचं येण्याचं कारणच काय मुळीं ? कुठें आहे तो ? कोणत्या खोलींत निजला आहे ? " असें मोठ्या संतापानें ओरडून तो दाणदाण जिना चढून वर जाऊं लागला. "त्याचे वडील कुठें नरकांत गेले आहेत ते जरी आले तरी " हें वाक्य ऐकल्या वेळेपासून ह्मातारीलाही अतिशय उद्वेग आल्यासारखें झालें. तिच्या तोंडून शब्द निघेना. डोळ्यांत कांहीं उद्वेगानें कांहीं दुःखानें पाणी आलें.

इकडे हे राजश्री जे वर गेले ते बूटचोट हापटून प्रत्येक दाराशीं धडपड करूं लागले व मन्याच्या नांवानें हांका मारूं लागले. शेवटीं या खोलींत नाहींत, त्या खोलींत नाहींत असें पाहून ते आपल्या पत्नीच्या खोलीशीं गेले आणि त्या दाराशीं धक्के देऊं लागले. त्या दारांवर लाथांचाही ते प्रयोग करूं लागले. आंत असलेला बिचारा मन्या अगदीं घाबरून गेला असावा. कारण त्यानें मुळींसुद्धां आंतून प्रत्युत्तर दिलें नाहीं. दार फोडण्यापर्यंत पाळी आली तरी कांहीं नाहीं. दारें प्यानेलचीं. त्यांच्यावर या पशूनें शेवटीं फारच जोरानें लाथ मारली. तों दार कडकन फुटलें. यानें प्यानेल उचकलें आणि आंत पाहिलें तों मन्या पलंगाचे खालचे बाजूस एखाद्या घाबरून गेलेल्या रस्त्यांतल्या कुत्र्याप्रमाणें आपल्या अंगाचा गोळा करून बसलेला दिसला. त्याबरोबर त्या पशूस तिनक्या त्या संतप्त स्थितींतही हंसूं आलें आणि तो मोठ्यानें विकटहास्य करून मन्याला उद्देशून ह्मणतो: " You dirty cur, what is the use of crouching there now ? Come out. Come out and I shall kick you to a paste for having come here at such a critical moment ?" इतकें बोलून त्यानें त्या प्यानेल उचकटून केलेल्या फटींतून हात घालून कडी काढली. दार सताड उघडलें. आणि त्याच्या अंगावर धांवत जाऊन त्याला बुटाच्या लाथेनें डवचलें. मन्या जास्तच पलंगाखालीं अंग चोरून घुसूं लागला. शेवटीं याचा पाय पुरेनासा झाला तेव्हां यानें वांकून हात घालून त्याला बाहेर ओढून काढलें आणि शिव्या, दरडावणी व हिसडे यांचा त्याच्यावर वर्षाव चालविला. तो पोरगा अगदीं घाबरून गर्भगळित झाला होता. इतक्यांत तो सर्व आरडाओरडा ऐकून सासूबाई वर आल्या. तों आपले जांवईबोआ आपल्या चिरंजीवांना कशा प्रकारें वागविताहेत हें त्यांना दिसलें. आईचें हृदय तें. आपल्या मुलाला त्या स्थितींत पाहून तें काय स्वस्थ बसतें ! ती एकदम जांवयाच्या अंगावर ओरडून ह्मणते: "हें काय हें, किती दिवसांनीं पोरगा घरीं आला आहे, त्याला दोन बरे शब्द बोला•

यचे, तें हें काय हें? त्यानं काय केलं आहे तुमचं? त्याच्या घरांत येऊन त्याला..."

"त्याचं घर!" जांवई संतापून उपरोधिक स्वरानें एकदम ह्यातारीला म्हणातात: "त्याचंही घर नाहीं आणखी त्याच्या बापाचंही नाहीं. घर माझं आहे, मी इथं मालक आहें. तुह्मांलासुद्धां देशोधडीला लावीन समजलांत. या कारट्याला आतां इथं येण्याचं कारण काय? कां ह्मणून आला? कुठें होता इतके दिवस? मला कांहीं न सांगतां न सवरतां आलाच कां?"

हें यांचें बोलणें चाललें आहे तों जिन्यावरून कोणी येत आहे अशी चाहूल लागली. जांवईबोआ पहातात तों वसंतराव शांतपणें पायऱ्या चढत आहे आणि पद्माताई खालीं जिन्याच्या पायऱ्यांशीं आहे तें पहातांच जांवईबोआंच्या संतापाचा कळस झाला.

---

# प्रकरण ४६ वें.

## वसंतराव व अण्णासाहेब.



आधीं मद्यानें लाल झालेले अण्णासाहेबांचे डोळे तें पाहून अधिकच तांबडे लाल झाले. आपली बायको वसंतरावाकडे जाऊन त्याला घेऊन आली, असें त्यांच्या मनानें घेतलें. आपण तिला बजावून गेलों होतों कीं बारा वाजतां परत येईन. आलों कीं, तिनें आपण तयार केलेल्या कागदांवर सह्या करावयाला तयार असलें पाहिजे. तशी ती तयार नाहीं झाली तर आपण काय वाटेल तें करूं, वाटेल तिकडे चालते होऊं. त्यासंबंधानें आपल्या मनाचा निश्चय करून सही करण्यासाठीं तयार होऊन आपण घरीं केव्हां येतों, त्याची वाट पहाण्याचें सोडून देऊन ही याच्या—या वसंतरावाच्या घरीं गेली—त्याचा विचार घेण्यासाठीं गेली. इतकेंच नव्हे तर बारा वाजण्याच्या सुमारास मी परत येतों म्हणून सांगितलें तर माझ्याशीं भांडावयासाठीं त्याला घेऊन आली. या संशयानें त्याचें मन अगदीं व्याप्त झालें. त्याचें भान नाहींसें झालें. विलक्षण संताप चढला. आपले सगळे बेत फसतात—मव्याबापूच्या आकस्मिक येण्यानें फसतात असें पहातांच चढलेला संताप वसंतरावास पहातांच दुप्पट झाला आपण काय करतों आहोंत याचा विचार त्याला राहिला नाहीं. तो एकदम दांत ओंठ खाऊन वरून ओरडून इंग्रजींत वसंतरावास म्हणाला: "One step more and I shall kick you down. You have no business to come to my house" (एक पायरी तर आणखी वर चढ कीं लाथ मारून तुला खालीं ढकलून देईन.)

वसंतरावानें एक वेळां वर पाहिलें, आणि तो तिरस्कारानें गालांतल्या गालांत हंसला. मग अगदीं शांतपणानें त्यास म्हणाला,

'It is not *yet your* house' (**अजून** हें घर **तुझें** झालें नाहीं ).

त्या वाक्यातल्या अजून व तुझें शब्दावर **खोंच** होती तिनें अण्णासाहेबांच्या मर्मी आघात केल्याप्रमाणेंच झालें. त्यांतूनही जास्त चीड येण्यास कारण वसंतरावाची त्या वेळची वागणूक. आपण लाथ मारून जिन्याखालीं ढकलून देऊं असा अपमानकारक धाक घातला असतां आणि तसें करण्याला तयार असल्याचा सर्व आविर्भाव आणला असतां हा आपला जिना चढतोच आहे असें पहातांच त्याच्या अंगाचा तिळपापड उडाला. आणि तो त्या खोलीच्या दारांतून जिन्याच्या तोंडाशीं येऊन हात लांब करून उभा राहिला. तो आतां तोंडानें बोलत नव्हता परंतु चर्येनें वसंतरावास " ये तर मग पहातों कसा येतोस तो. " असें म्हणत होता. वसंतरावाचा अगदीं निर्धार झाला होता. तो अगदीं वरपर्यंत गेला, अण्णासाहेबांच्या अगदीं समोर एकच पायरीखालीं उभा राहिला आणि त्यांस इंग्रजींत म्हणाला: "Please move aside. Let me pass I want to see Manyabapu. I must have a talk with him. " ( कृपा करून मला जाऊं द्या. मला मन्याबापूची भेट घ्यायची आहे. मला त्याच्याशीं दोन शब्द बोललेच पाहिजेत. )

आपण लाथ मारून ढकलून देऊं असें निक्षून सांगितलें असतां हा इतक्या नेटानें येतो आहे आणि निश्चयानें बोलतो आहे हें पहातांच अण्णासाहेबांच्या मनानें जरा कच खाल्ली. परंतु तसें बाहेर दिसूं नये म्हणून तो थोडा शांतपणाचा आविर्भाव आणून त्यास म्हणतो: " वसंतराव, उगीच चिडीला प्रकरण नेऊं नकोस. मीं तुला पुष्कळ प्रकारांनीं सुचविलं आतांपर्यंत, कीं तूं माझ्या घरीं आलेला मला खपत नाहीं. तूं येत जाऊं नकोस—आणखी माझ्या भानगडींत पडत जाऊं नकोस; तरी तूं ऐकत नाहींस. आतां मी तुला बजावून सांगितलं कीं, तूं वर येऊं नकोस. तरी तूं आलास, पण मी तुला पुनः बजावून सांगतों कीं, या तुझ्या करण्याचा परिणाम चांगला होणार नाहीं."

वसंतरावानें त्याच्या बोलण्याकडे अगदीं दुर्लक्ष्य करून निश्चयानें म्हटलें: " मला मन्याबापूशीं बोलायचं आहे. तेवढा बोलतों आणखी मग जातों. "

अण्णासाहेबांनीं शर्टाच्या व कोटाच्या अस्तन्या वर सारीत म्हटलें: " तर मग या राजश्री कसे येतां ते. आतां आपला समाचार घेतों. मग जिनं धांवत जाऊन आपल्याला बोलावून आणलं त्या रां...... "

परंतु वसंतरावानें त्याला मध्येंच थांबवून म्हटलें: " मला कोणीं बोलावलं नाहीं. मन्याबापू रात्रीं माझ्या घरीं आला, आणखी मी बाहेर गेलों असतां पुनः तसाच निघून गेला. तो पुनः इथें आला आहे असं मला कळल्यावरून मी इथें आलों. मी त्याच्याशीं दोन शब्द बोलतों, आणखी इथून जातों. "

" मी तुला एक पाऊल वर येऊं देणार नाहीं. एक शब्द कुणाशीं बोलूं देणार नाहीं. तुझ्या खटपटी मीं सगळ्या जाणल्या आहेत. मला दूर ढकलून आपण माझ्या...येच तर आतां कसा पुढें येतोस तो. " असें म्हणून अण्णासाहेबानें दांत ओंठ खाऊन क्रूर मुद्रा केली. हाताच्या मुठी वळून वसंतरावाच्या तोंडासमोर धरल्या.

पद्माताई जिन्याच्या खालच्या पायरीवर एक पाय व दुसऱ्या पायरीवर दुसरा पाय अशी उभी होती. एखाद्या पांढऱ्या फटक

पडलेल्या प्रेताला कशाला तरी धरून उभें करावें तशी ती त्या वेळीं दिसूं लागली. तिचे डोळे ताठ उघडे असून वर जिन्याच्या तोंडाशीं उभ्या राहिलेल्या त्या दोघांकडे लागले होते. त्यांत भय—आतां हें लचांड काय होतें असें मनांत येऊन वाटणारें भय—पूर्णपणें दिसत होतें. तोंड किंचित् उघडें होतें. त्या भयानें ज्याप्रमाणें गालांवरली त्याचप्रमाणें ओंठांची लाली पार नाहींशी होऊन तेही अगदीं फिक्कट दिसत होते.

इकडे वर वसंतराव एक क्षणभर स्तब्ध उभा राहिला. नंतर त्याच्या मनाचा निश्चय झाला आणि त्यानें "मला मन्याबापूला भेटलंच पाहिजे" असें शांतपणें परंतु दृढनिश्चयाच्या स्वरानें म्हणून आपल्या डाव्या हातानें अण्णासाहेबांस दूर सारलें. वसंतराव इतका दृढनिश्चय दाखवील असें वाटलें नसल्यामुळें ह्मणा किंवा वीर्यापेक्षां विचारांचीच किंमत अधिक अशी कल्पना त्याच वेळीं अण्णासाहेबांस सुचली म्हणून ह्मणा, अण्णासाहेब "Ah you coward!" असें म्हणून किंचित् दूर झाला! नंतर "I don't wish to disgrace myself by fighting with a coward" असें म्हणत व वसंतरावाला शिव्या देत उभा राहिला. वसंतराव शांतपणें पुढें झाला. तों म्हातारी मोठ्यानें ओरडून त्यास म्हणाली: "वसंतराव, धर. धर त्याला. जा त्याला घेऊन ये. तो त्या जिन्यांत पळाला." तिनें दाखविलेल्या जिन्याकडे वसंतराव गेला व झटझट जिना उतरला. तो जिना रस्त्यावर उतरणारा होता. वसंतराव अतिशय झपाट्यानें गेला, परंतु रस्त्यावर पहातो तों दोनही बाजूंस कोठें मन्याबापू दिसेना. त्यानें धांवून त्या रस्त्याला दुसरे रस्ते मिळत होते, तेथपर्यंत जाऊन चोहोंकडे पाहिलें. परंतु मन्याबापूचा मुळींच पत्ता नाहीं. तो मोठ्या विचारांत पडला. हा पोरगा रात्रीं आपल्या येथें येतो काय? पुनः नाहींसा होतो काय? पुनः सकाळीं स्वःतच्या घरीं येतो, आणि पुनः पळून जातो काय? तो जर दोन घटका आपल्याला सांपडेल तर आपण त्याच्यापासून सर्व गोष्टी समजावून घेऊं परंतु दोन घटकासुद्धां आपली त्याची भेट होत नाहीं. झाली तेव्हां त्याच्यापासून आपण कांहीं विचारून घेण्याचें केलें नाहीं, सावकाशीनें घेऊं असा विचार करून स्वस्थ बसलों ही केवढी चूक झाली! हा विचार तितक्यांतल्या तितक्यांत त्याच्या मनांत आला. आणि तो त्या पोराच्या तपासासाठीं इकडून तिकडे तिकडून इकडे हिंडूं लागला. आतां एका रस्त्याला जावें, त्याच्या टोंकापर्यंत जाऊन इकडे तिकडे पहावें, पुनः दुसऱ्या रस्त्यावर जावें, त्याही रस्त्यावर इकडे तिकडे पहावें. कोठें त्याचा पत्ता लागेना. तेव्हां निराश होऊन तो परत आपल्या घरीं गेला.

वसंतराव व आपला नवरा यांची मारामारी न होतां वसंतराव मन्याबापूच्या खोलींत गेला व आपला नवरा त्यास शिव्या देत उभा आहे असें पहातांच पद्मानाईच्या मनावरलें भयाचें दडपण उतरलें, आणि ती एक दीर्घ उसासा टाकून जिन्यापासून माघारी फिरली व देवघरांत जाऊन इतका वेळ दाबून धरलेली अश्रु गाळीत बसली.

इकडे अण्णासाहेबास जेव्हां कळलें कीं तो पोरगा त्या खोलींतून रस्त्यावर उतरणाऱ्या जिन्यानें फरारी झाला व त्याच्या शोधासाठीं ह्मणून वसंतराव गेला, तेव्हां तो आपल्या मनांत फार संतोषला. क्षणभर त्यानें कांहीं विचार केला. नंतर तो त्या खोलींत गेला. तेथून त्या जिन्यानें खालीं

जाऊन त्यानें रस्त्यावरलें दार लावून त्यास कडी घातली. नंतर तो आपल्या दिवाणखान्यांत गेला व तेथें त्यानें एक चिठी भरभर लिहिली. ती पाकिटांत घालून व कोनाड्यांतलें एक कुलूप घेऊन तो खालीं अंगणांत आला. अंगणांतून रस्त्यावरल्या दरवाज्याजवळ गेला, नंतर त्यानें गड्याला हांका मारल्या. गडी येतांच त्याच्याजवळ त्यानें ती चिठी दिली व त्याला सांगितलें: "ही चिठी घेऊन मॅजिस्ट्रेट साहेबांच्या घरीं जा. ते घरीं नसले तर ते परत येईपर्यंत बस. संध्याकाळ झाली, नाहीं रात्रीचे दहा वाजले तरी तूं त्या चिठीचं उत्तर आणल्याखेरीज परत येऊं नको. मधें तुला भूक लागली तर हे चार आण्यांचे पैसे घे, त्याची जिलबी शेव घेऊन खा. पण तिथून हलूं नको. जा."

गड्यानें ती चिठी घेतली व तो गेला. चार आण्यांचे पैसे मिळाल्यामुळें त्याला संतोष झाला. तो जातांच अण्णासाहेबांनें दरवाजा लाविला आणि आंतून त्याला कुलूप घालून खिशांत किल्ली टाकून शांतपणें तो पुनः वर गेला. आपल्या दिवाणखान्यांत व खोलींत कांहीं वेळ त्यानें घालविला. त्या वेळांत बाटल्यांचा व ग्लासांचा आवाज झाला; नंतर कांहीं वेळानें त्यानें मोठ्यानें आपल्या बायकोचें नांव घेऊन तिला हांका मारल्या.

पद्मेची आई, बऱ्याच वेळापूर्वी आपल्या पोरास, अण्णासाहेबांस व पद्मेसही वाटेल तसें बोलत होती. विशेषतः आपल्या पोराला आपलेंच घर पारखें केल्याबद्दल आपल्या नवऱ्यास फारच दोष ठेवून उपरोधिकपणानें पद्मेस "तूं; तूं या सगळ्या गोष्टींना कारण आहेस. माझ्याच पोटची तूं खरी, पण सगळी इस्टेट आपल्याला हवी म्हणून तूं त्यांचं मन माझ्या पोरांच्या उलट चिघडवलंस. ते बारल्याबरोबर तूं आपल्या नवऱ्याला बोलावून आणलंस, पोरांना भीक मागायला लावून सगळं गिळंकृत करण्याचा तुझा कावा. पण नवरा कुठें सुयंत्र आहे. चरा खेटरं मारतो आहे. तुला वाटलं तो तुझ्या ओंजळीनं पाणी पिईल. तीं पोरं घरांत असतीं तर आज असे धिडवडे भंडवडे झाले नसते" असें एकसारखें बोलत होती. आजपर्यंत म्हातारी पद्मेला अनेक प्रकारांनीं बोले त्यांत वरील अर्थाचेंही बोले. परंतु पद्मा तें सारें हंसण्यावरी घालवी व "आई, माझा कांहीं संबंध नाहीं. दादा आणखी बापू आले, तर मी त्यांच्या स्वाधीन सगळं नीटपणें करून देणार आहे" असें आपल्या आईस म्हणे. आज मात्र त्या आईच्या शब्दांनीं तिच्या काळजाला घरे पडले. त्यांत "तूं आपल्या नवऱ्याला बोलावून आणलंस, पोरांना भीक मागायला लावून सगळं गिळंकृत करण्याचा तुझा कावा." वगैरे शब्द ऐकतांच ते उच्चारणारी ही आपली आईच काय! असें मनांत येऊन ती आपलें अश्रुप्रवाहानें मलिन झालेलें व अगदीं प्रेतकळा आलेलें मुख वर करून पाहूं लागली. अश्रूंच्या लोंढामुळें तिला कांहीं दिसेना. दोन वाजून गेले तरी पोटांत अन्न नाहीं. यामुळें पोटांत कळमळूं लागलें होतें आणि या सगळ्याचा परिणाम आपण भोंवळ येऊन पडतों कीं काय असें तिला वाटूं लागलें होतें. तोंच नवऱ्यानें मोठमोठ्यानें मारिलेल्या हांका तिच्या कानावर गेल्या आणि विजेचा धक्का बसावा तसें तिला होऊन ती खडबडून उठली.

तें पहातांच म्हातारी संतापून तिला म्हणते: "जा, जा. माझ्या पोराला मारून

धाक घालून पळवून लावलंत आतां पुढें काय करायचं त्याची खलबतं करायला जा. "

पोरगा किती दिवसांनीं अचानक आलेला आपल्या जांवयाच्या माराच्या धाकामुळें पळाला. असें मनांत येऊन म्हातारीच्या मनाची स्थिति फार वाईट झाली होती. यामुळेंच ती आज जो वेडावांकडा विचार मनांत येईल तो बोलून सोडीत होती. या आपल्या बोलण्यानें आपल्या पोरीला फार दुःख होईल. हें तिच्या मनांत सुद्धां आलें नाहीं. तिच्या मनांतला विचार एक. आपला पोरगा आज किती दिवस शोध करतां करतां आला, आणि तो पद्मेच्या नवऱ्यानें माराच्या धाकानें घालवून दिला. आतां पुनः येथें येईल हा संभव नाहीं.

नवऱ्याच्या हांका ऐकिल्याबरोबर पद्मा खडबडून उभी राहिली. आतां तिच्या आईच्या शब्दांकडे तिचें लक्ष्य मुळींच नव्हतें. नवरा हांक मारतो आहे, तर जावें कीं नाहीं ? आणि गेलें तर पुढें कसें वर्तन करावें ? परंतु पहिल्या प्रश्नाचा उलगडा मात्र तिला झाला. आपण वर गेलेंच पाहिजे. नवऱ्यानें खालीं येऊन आईच्या देखत कांहीं बोलणें होणें इष्ट नाहीं. असा निश्चय करून तिनें आपले अश्रु पुसले. तिच्या चर्येवर एक प्रकारचा निश्चय दिसला. आणि तशा स्थितींत जितका शांतपणा दाखविणें शक्य तितका दाखविण्याचा प्रयत्न करीत, ती जिना चढून वर गेली. ती जिना चढून वर येत आहे असें पाहतांच अण्णासाहेब ग्यालरींतून आंत गेला. पद्मा वर गेली. दिवाणखान्याच्या दारांत गेली आणि तेथें दाराच्या एका फळीस टेंकून उभी राहिली.

अण्णासाहेबांनीं तिच्याकडे पाहिलें. दोन मिनिटेंपर्यंत ते कांहीं बोलले नाहींत. नंतर शांतपणाचा आव घालून तिला म्हणतातः " मी विचारतों त्याचीं सरळ उत्तरें दे. आज या सगळ्या भानगडीचा मीं निकाल लावून टाकण्याचा निश्चय केला आहे. मी इंग्लंडांत सुखाचा होतों पण तुझ्याकडे आलों कीं स्वर्गांत पडेन असं समजून आलों; तो विनाकारण या नरकांत येऊन पडलों. त्याच्यापुढें असाच सगळा प्रकार चालायचा असला तर तो निदान माझ्या डोळ्यांदेखत नको. या नरकांत यापुढें माझ्यानं रहावत नाहीं. तुझा माझ्यावर विश्वास नाहीं. माझ्यावर तुझं प्रेम नाहीं. तुझं चित्त दुसऱ्याकडे हें धडधडीत मला दिसतं आहे. बोल. तूं वसंतरावाकडे गेली होतीस कीं नाहीं ? तूं त्याला बोलावून आणलंस कीं नाहीं ? मन्या इथें आला त्याची आणखी त्याची गांठ घालून द्यायचा तुझा बेत होता कीं नाहीं ? तुम्हीं तिघें मिळून मला...... पण मी त्याबद्दल आतांच कांहीं बोलत नाहीं. आधीं मला सांग तूं काय म्हणू—काय म्हणून वसंतरावाला बोलवायला गेली होतीस ? "

पद्मा शांतपणें त्यांना म्हणालीः " मी त्याला बोलवायला गेलें नव्हतें. तो कां आणखी कसा आला मला माहीतसुद्धां नाहीं. "

तें ऐकतांच अण्णासाहेब राक्षसी तऱ्हेनें हंसला, ' तूं खरं बोलशील हें शक्यच नव्हतं ! तुझ्या मतं मी पैशाच्या लोभाला गुंतून तुझ्या या असल्या * * * वर आपल्या इथें राहण्यानं पांघरूण घालावं होय ? मी इतका पाजी आहें असा का तुझा समज आहे ? मी मघाशीं त्याला आणखी तुला त्याच्या पाठोपाठ आलेली पहातांक्षणीं इतका संतापलों होतों, कीं त्या वेळीं मीं त्याच्या अंगावर हात टाकला असता

तर त्याला ठारच मारला असता. पण त्याच्या आधीं तुला—तुला ठार करण्याचा माझा बेत आहे. तसं केल्यानं माझं काय होईल हें मला ठाऊक आहे. पण माझं या जगांत काय आहे ! माझ्या मायेचा कोण प्राणी आहे ! माझ्याकरितां रडणारा जगांत कोणी नाहीं. आणखी मलाही कोणाबद्दल रडायचं कारण नाहीं. तुला ठार मारून सुशिक्षित बायको केल्यानं शेवटीं काय परिणाम होतो हें तरी जगाला दाखवीन. हं काय !...आतां तुला निक्षून विचारतों, तूं माझ्या सांगण्याप्रमाणें त्या कागदावर सही करतेस का नाहीं !..."

वरील भाषणांत फुल्या मारलेले शब्द कानीं पडले तेव्हांच पद्मेला सर्व जग शून्यवत् झालें होतें. ती भोंवळ येऊन पडावयाच्या बेतांत आली. परंतु तिनें दाराची फळी गच्च धरल्यामुळें सांवरली. पडली नाहीं. नवऱ्याचें पुढचें कांहींही भाषण तिच्या कानांत शिरलें नाहीं. ही तिची स्थिति त्याला मुळींच समजली नाहीं. तो खालीं मान घालून एकसारखा बोलत होता. तिच्या डोळ्याला डोळा देऊन बोलण्याचें धैर्य त्याला नव्हतें. आपण तिच्यावर आरोप करतों आहोंत, तो अक्षरशः खोटा आहे, असें त्याच्या मनास पक्कें ठाऊक होतें. तितकी अक्कल त्याला होती. परंतु जो काय वाटेल तो उपाय—आपलें काम साधण्याला उपयोगी पडेल तो उपाय—( मग तो नीचांतला नीच असला तरी सुद्धां करायला सोडावयाचा नाहीं असा त्याचा निश्चय होता. )

वरील बोलणें बोलून तो वर न पहातांच थोडा वेळ थांबला. आपली बायको बोलत नाहीं, कांहीं उत्तर देत नाहीं असें पहातांच त्याला पुनः चीड आली. आतां एकदां शेवटला उपाय करून पहावयाचा असा निश्चय करून त्यानें वर पाहिलें. पद्मा वर सांगितल्याप्रमाणें अगदींच स्तब्ध अशी, दाराची फळी दोनही हातांनीं घट्ट धरून उभी होती. ती कोणत्या स्थितींत उभी होती, हें त्याला समजलें नाहीं किंवा दिसलें नाहीं. आपण इतकें बोललों तरी ही मख्खपणानेंही उभी आहे हें पाहूनच त्याला संताप आला. तशांत त्यानें घेतलेल्या मद्यानेंही त्यांत भर घातली आणि तो एकदम तिच्या अंगावर जाऊन "Why don't you answer ? you whore !" असे शब्द उच्चारीत आपली मूठ वळून त्यानें तिच्या भिवयांच्या मध्यभागीं जोरानें एक ठोसा दिला. ता धाडकन् खालीं पडली.

जो ठोसा त्यानें वसंतरावास मारण्यासाठीं उगारला होता, परंतु त्याला मारण्याचें धैर्य झालें नाहीं फक्त 'जा भेकडा, तुझ्या नादीं कोण लागतो !' अशा अर्थाचें इंग्रजी भाषण करण्याचें मात्र धैर्य झालें तोच ठोसा आतां मोठ्या वीर्यशौर्यानें व बिनदिक्कत आपल्या पत्नीस-बिचाऱ्या पद्मेस त्यानें मारला. परंतु ती पडल्याबरोबर त्याच्या मनांत कांहीं भयंकर विचार येऊन त्याची गाळण उडाली. तो क्षणभर तिच्याकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागला. तेवढ्या पहाण्यानें त्याच्या मनांतील विचार दृढ झालासें दिसलें. त्यानें लागलींच तेथून पाय काढला. आपली टोपी–साहेबी टोपी चढविली व एकदम खालीं येऊन थोरल्या दाराचें कुलूप काढून व तें तेथें फेंकून देऊन त्यानें घराच्या बाहेर धूम ठोकली.

# प्रकरण ४७ वें.

## अण्णासाहेब परत आल्यावर.



अण्णासाहेब थोरलें दार उघडून कुलूप फेंकून देऊन बाहेर जाऊन एखादें मिनीट झालें असेल नसेल तोंच त्यांनीं पूर्वी चिठी देऊन मॅजिस्ट्रेटसाहेबांकडे पाठविलेला गडी परत आला, म्हणूनच बरें झालें. नाहीं तर पद्मताई किती वेळ तशीच निचेष्ट पडली असती, आणि तिचें काय झालें असतें याचा कांहींच अंदाज करतां येत नाहीं. तो गडी आला आणि मॅजिस्ट्रेट साहेबांचें उत्तर सांगण्यांस तडक माडीवर गेला तों आपली तरुण यजमानीण बेशुद्ध होऊन वेडीवांकडी दारांतच पडली आहे, तिच्या डोक्याला कोठें तरी लागून तींतून एकसारखें रक्त वाहत आहे. त्या रक्ताचा पाट वाहत येऊन जिन्यावरून खालीं चालला आहे, असा देखावा त्यास दिसला. तो भयंकर देखावा पहातांच तो एकदम घाबरला व त्यानें अण्णासाहेब, आईसाहेब अशा मोठ्यानें हांका मारल्या. अण्णासाहेब तेथें नव्हतेच. परंतु आईसाहेबांच्या कानीं त्याची ती घाबरलेली आरोळी गेली. तो कां असा ओरडतो आहे याची त्यांस कल्पना होईना. म्हणून आईसाहेबांनीं खालूनच "कांरे ! असा वेड्यासारखा ओरडतोस" असें विचारलें. तेव्हां त्यानें "अहो हें पहा, हें पहा काय झालं आहे तें ! ह्या ताईसाहेब प...पडल्या आहेत, रक्ताचा पाट चालला आहे" असें ओरडून सांगितलें. त्याबरोबर म्हातारी घाबरली व वर गेली, आणि तो प्रकार पहातांच एकदम "त्या मेल्याचंच कृत्य हें" असें मोठ्यानें ओरडली. तिला कांहीं सुचेना. तेव्हां त्या गड्यानेंच तिला 'असं काय करतां ? त्यांना उचलून पलीकडे तरी ठेवूं या, आणखी डोळ्यांला पाणी वगैरे लावून, कांहीं मात्राचित्रा देऊन शुद्धीवर तर आणूं या." असें ह्मणतां ह्मणतांच त्यानें पलीकडला पाण्याचा तांब्या घेऊन पद्मताईच्या डोळ्यांला पाणी लाविलें आणि तिच्या तोंडावरील रक्ताचे ओघळ तो पुसूं लागला. म्हातारी त्याला 'मेल्या तुझ्या हातचं पाणी तिच्या तोंडांत जाईलना, हें काय करतोस' असें ह्मणून आपण पाणी आणण्यासाठीं खालीं गेली ! गड्यानें आपलें काम चालविलेंच होतें, परंतु कांहीं केल्या पद्मताई शुद्धीवर येईनात. शेवटीं त्यानें पुनः त्या म्हातारीस बोलाविलें व सांगितलें कीं, "मी डॉक्टरला तरी बोलावून आणतों, त्यांच्या खोकेंतून रक्त वाहायचं कांहीं बंद होत नाहीं, आणखी त्या शुद्धीवरही येत नाहींत."

म्हातारी तितक्यांत वर आली व त्या गड्याला ह्मणाली, "आधीं मथुराताई असेल तिथून तिला हें सांगून पाठवून दे. आणखी मग डॉक्टराला बोलावण्याला जा." गड्यालाही तें सुचलेंच होतें, त्यानें मथुराताईच्या घरीं जाऊन हकीकत सांगितली

आणि आपण डॉक्टर भगवंतरावांस बोलाविण्यास गेला. डॉक्टर भगवंतराव कोणा रोग्याकडे जाण्यास गाडींत पायच ठेवीत होते. त्यांना गड्यानें हकीकत सांगतांच त्यांनीं 'आधीं आबासाहेबांच्या घराकडे गाडी वळव' म्हणून सांगितलें आणि ते तेथें आले. त्यांच्या पूर्वी दोन तीन मिनिटेंच मथुराताई येऊन त्यांनीं व आईसाहेबांनीं पद्माताईस नीट अंथरुणावर ठेवून डोळ्यांत अंजन घालून शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न चालविले होते व त्या अंजनामुळें ती थोडीशी शुद्धीवरही आली होती. डॉक्टर येईपर्यंत त्यांच्या खोकेंतून रक्तस्राव एकसारखा चाललाच होता. डॉक्टरांनीं येतांच तपासणी वगैरे करून आपले उपाय करण्यास सुरुवात केली, आणि काय झालें, कसें झालें, याबद्दल पूसतपास चालविली होती. कोणासच पक्की कांहीं माहिती नव्हती, यामुळें आईसाहेब मात्र आपले तर्क सांगत होत्या. नवऱ्यानें तिला मारलें असावें, ढकलून दिलें असावें, त्यामुळें ती पडली असावी, अशी त्यांची आक्रोशानें बडबड चालली होती. पहिल्या अंजनानें आणि डॉक्टर भगवंतरावांच्या उपायांनीं पद्माताई लवकरच पूर्णपणें शुद्धीवर येऊन कण्हूं लागली. ती त्या रक्तस्रावानें फार अशक्त झाली होती. तिच्या तोंडांतून शब्द तर राहोच परंतु कण्हण्याचा आवाज सुद्धां फार हळू येत होता. तेव्हां "त्यांना विचारण्याची व त्यांच्यापासून हकीकत काढून घेण्याची ही वेळ नव्हे. आतां तुम्ही कांहीं सुद्धां त्यांना विचारूं नका आणि कांहीं वेळपर्यंत तरी त्यांना शांत पडूं द्या. मी औषध पाठवून देतों, तें द्या. मी पुनः अर्ध्या पाऊण तासानं येतों. आतां फार जपलं पाहिजे. रक्तस्रावानें त्यांना फार हलकपणा आला आहे" असें बजावून व मथुराताईस कांहीं विशेष व्यवस्था सांगून डॉक्टर निघून गेले.

आईसाहेबांच्या तोंडून जावयावर शिव्यांची वृष्टि चाललीच होती. "त्याच्याखेरीज हें कृत्य झालं नाहीं. त्यानंच माझ्या पोराला मारलंन्, त्यानंच हिला मारलन्, आणखी पळून गेला" असें एकसारखें ती म्हणत होती. पद्माताई चांगली शुद्धीवर आली. तिनें तें ऐकलें आणि आपल्या अंगांत जें काय थोडें बळ राहिलें होतें तेवढ्या बळानें तिनें आपला उजवा हात उचलून नकारार्थी खूण तिनें केली. तिनें आपल्या तोंडानेंही "नाहीं. नाहीं." असें दोन वेळां म्हटलें. परंतु तो उच्चार इतका क्षीण होता कीं, कोणाला स्पष्टपणें ऐकूंसुद्धां गेला नाहीं; म्हातारीची बडबड मात्र एकसारखी चाललीच होती. मथुराताईंनीं म्हातारीस पुष्कळ सांगितलें कीं, पद्माताई आतांच शुद्धीवर आल्या आहेत, त्यांना आतां स्वस्थ पडूं द्या. त्यांना थोडासा तकवा आला म्हणजे आपल्याला सर्व कांहीं कळेल. परंतु म्हातारी कोठली गप्प राहावयाला. तिची बडबड सुरूच होती. मन्याबापूला अण्णासाहेबांनीं धोबाड धोबाड धोबाडल्याचें म्हातारीनें पाहिलें होतें. तेव्हां तिला दुसरें कांहीं कसें खरें वाटणार !

डॉक्टर भगवंतरावांनीं लौकरच औषध पाठवून दिलें तें मथुरातांईनीं त्यांच्या सांगण्याप्रमाणें पद्मातांईस दिलें. डॉक्टरही थोड्याच वेळांत परत आले, आणि त्यांनीं खोंकेला पुढें काय उपाय करावयाचे ते केले व बराच वेळ ते तेथें बसले. सुमारें अर्ध्या पाऊण तासानें पद्माताईला जरा तकवा आला. तेव्हां तो आपला तकवा सगळा एकवटून त्यांनीं आपल्या आईस म्हटलें:

"आई विनाकारण कां असं बोलतेस !

कुणीं मला मारलं नाहीं आणखी पाडलं नाहीं. मला घेरी येऊन मी पडलें." पुढें तिच्यानें मुळींच बोलवेना.

इतक्यांत वसंतराव व दादासाहेब आणि त्यांच्या पत्नी अशीं तिघें तेथें आलीं. डॉक्टरांना इकडे पाठवून तो गडी दादासाहेबांच्या घरीं गेला होता, ते दोघे आल्यावर भगवंतरावांचें व त्यांचें इंग्रजींत कांहीं बोलणें झालें. आपला पति वारल्यापासून पद्मातांईची आई दादासाहेबांच्या नजरेस कधींच पडली नव्हती, यामुळें ते आल्याबरोबर ती तेथून उठून खालीं गेली व दादासाहेबांची पत्नीही तिच्या मागोमाग गेली "ही काय म्हणते 'नाहीं' म्हणून. हें त्याचंच कृत्य. त्याच्याखेरीज झालं नाहीं. हें कृत्य कांहीं घेरीनं झालं नाहीं." अशी ह्मातारीची बडबड दादासाहेबांच्या पत्नीस उद्देशून चालूच होती आणि दादासाहेबांची पत्नी तिला "काय झालं, कसं झालं" विचारूं लागली.

दादासाहेब, डॉक्टर भगवंतराव, वसंतराव व मथुराताई ही मंडळी पद्मातांईजवळ बसली होती. मथुराताईही ती मंडळी येतांच उठूं लागली, परंतु एक तर पद्मातांईनें तिचा हात धरला होता, आणि डॉक्टरांनीं तिला 'तुम्ही उठूं नका' म्हणून सांगितलें. तेव्हां तिला तसेंच बसावें लागलें. सुमारें तास दीड तास मंडळी तशीच बसली. तितक्या अवधींत डॉक्टरांनीं आपलें स्टिम्युलंट (तकवा आणण्याचें औषध) पद्मातांईस दोन तीन वेळां दिलें, आणि "आतां कांहीं हरकत नाहीं. पद्मातांईस ताप येण्याचा संभव आहे तेव्हां तो आला, तरी घाबरण्याचें कारण नाहीं, मी देऊन ठेवतों तें औषध मात्र द्या." वगैरे सांगून ते जाण्यास निघाले. वसंतराव व दादासाहेबही उठले. त्या सर्वांनीं झाल्या गोष्टीबद्दल आपल्या मनांत काय कयास करावयाचे ते केलेच. परंतु त्याचा उच्चार मात्र करून दाखविला नाहीं. डॉक्टर, दादासाहेब व वसंतराव तिघेही गेले. दादासाहेबांची पत्नी मात्र तेथेंच राहिली. थोड्याच वेळांत पद्मातांईस झोंप लागली. परंतु त्या झोंपेंत तिला सडकून ताप भरला.

सायंकाळ झाली. मथुराताई पद्मातांईजवळच बसून होत्या. त्यांचा भाऊ मनोहर त्यांच्या शोधाकरितां आला होता त्याला त्यांनीं कांहीं घरांतली संध्याकाळची व्यवस्था सांगून मी आईसाहेबांना येथें बसवून थोड्या वेळानें येतें म्हणून लावून दिलें. इतक्यांत अण्णासाहेब धडधड जिना वाजवीत वर आला. पद्मातांईला तेथेंच निजलेली व मथुरातांईस तिच्याजवळ सचिंतपणें बसलेली पाहून त्यानें एकदम म्हटलें: "What's the matter? My darling, what's the matter?" इथें दिवा कां नाहीं? काय झालं? कायहो झालं मथुराताई?"

असें म्हणत म्हणत तो अगदीं पद्मातांईजवळ गेला, आणि त्यानें पद्मातांईच्या कपाळावर हात ठेविला. मथुराताई एकदम घाबरून उठल्या व जिन्याकडे धांवल्या, तेव्हां अण्णासाहेबही एकदम मोठ्यानें त्यांना म्हणतात: "अहो मला सांगाल तर खरं हें काय प्रकरण आहे तें. हे तोंडाला पट्टे कसले बांधले आहेत? हिचं हें डोकं काय इतकं तापलं आहे? मला वाटतं हिला ताप आला आहे." मथुराताई त्याला कांहीं एक उत्तर न देतां झटकन् खालीं गेल्या. इकडे त्यानें पद्मातांईच्या अंगाला हात लावला आणखी घाबरल्या आवाजानें म्हणतो: "अरे, हिला तर फार भयंकर ताप भरला आहे, काय हो हें? मी एक तास बाहेर गेलों होतों, तेवढ्यांत हें काय झालं हें? बोला बोला. माय डार्लिंग, हें काय झालं? मी गेलों तेव्हां

तूं चांगली होतीस, आणखी हें काय झालं? छे. छे. ही बाटली कसली ठेविली आहे ही? डॉक्टर विक्टर आणले होते का काय? डार्लिंग डार्लिंग पद्मा, अगदींच बोलत नाहींस? दुपारच्या थोड्याशा बोलाचालीचा हा परिणाम काय? मी असा संतापी, आणखी तूं अशी नाजूक. पण माझ्या नुसत्या संतापाच्या बडबडीनं इतका प्रकार होईल ही कल्पना कुणाला? ओ माय डार्लिंग, माझ्याकडे पहा, असं काय हें? माझा तो राग गेला. रागाच्या आवेशांत आपल्या हातून कांहीं भलतंच व्हायचं म्हणून मी आपला निघून गेलों आणखी दोन चार दिवस येणारच नव्हतों. पण तो रागाचा झटका ओसरल्यावर तो कुठला निश्चय राहायला! माझ्या देवीवर मी किती जरी रागावलों, तरी फार वेळ तो राग टिकणार कसा? आणखी फार वेळ मी तिच्यापासून दूर रहाणार कसा?"

पद्मानाईस थोडीशी झोंपेची गुंगी आली होती, ती यांच्या त्या अंगाला हात लावण्यानें आणि मोठ्यामोठ्यानें हांका मारण्यानें उडाली, तिनें एकवार त्याच्याकडे पाहिलें आणि तिचें अंग एकदम थरारलें. तिनें डोळे उघडून आपल्याकडे पाहिलें हें त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. तिचें अंग थरारलें, तें मात्र त्याला समजलें. कारण त्याचा हात तिच्या अंगावर होता. तें जाणतांच तो तिला आणखी म्हणाला: "पद्मे, पद्मे, अशी घाबरल्यासारखी काय करतेस? दुसरं कुणी नाहीं, मीच आहें. तुझी प्रकृति अतिशय नाजुक हें माझ्या रागाच्या भरांत लक्ष्यांत राहिलं नाहीं. त्यामुळें मी तुला बोललों–काय बोललों, तें सुद्धां आतां माझ्या लक्ष्यांत नाहीं. पण त्याचं असं कांहीं होईल हा कांहीं मला अंदाज झाला नाहीं. प्रिये, झाल्या गोष्टीची क्षमा मागायला म्हणून मी आलों. मला लागलींच फार पश्चात्ताप झाला. आणखी इकडे लागलींच येणार होतों, पण तितक्यांत वाटलं कीं तुला शांत व्हायला थोडा वेळ द्यावा म्हणून थोड्या उशीरानं आलों. हें असं कांहीं होईल ही कल्पना सुद्धां नाहीं, पण हे पट्टे कसले बांधले आहेत? पडलीस का काय? तूं फार नर्व्हस. मी रागानं बोललों त्याचा मनावर परिणाम होऊन घेरीबिरी आली वाटतं तुला ... "

त्याची अशी बडबड चाललीच होती आणि तो तिच्या पाठीवरून हात फिरवीत होता. त्याच्या दर स्पर्शास तिचें अंग अगदीं थरारून जाई. थर थर कांपेसुद्धां, परंतु तिनें पुनः डोळे उघडून पाहिलें नाहीं, कीं तोंडावाटे एक शब्दही उचारला नाहीं. त्याची बडबड चालूच होती.

इकडे मथुरानाई खालीं जाऊन त्यांनीं पद्मानाईच्या आईस "अण्णासाहेब वर आले आहेत, आणखी पद्मानाईंना काय झालं काय नाहीं, म्हणून विचारताहेत. आपण वर जा, मी आतां घरीं जातें, " असें सांगितलें. त्याबरोबर म्हातारीला संताप चढला, "आतां जाऊन त्यांची चांगली खोड काढतें, पोरीला मारूनच्या मारून पुनः काय झालं, म्हणून विचारतो आहे का?" असें ती बडबडूं लागली. तेव्हां या बाईनें जाऊन पद्मानाईच्या पुढें कांहीं धिंगाणा घालूं नये. असें मनांत येऊन दादासाहेबांच्या पत्नीनें त्या म्हातारीला "पुरे. पुरे. जरा. इथेंच बसा. किती जरी वाईट असला, तरी बायको अशी आजारी पडलेली पाहिल्यावर कांहीं करीत नाहीं. तुम्ही जरा शांत व्हा. असं संतापून जाऊन काय होणार? हलके हलके

युक्तियुक्तीनंच घेतलं पाहिजे. जाऊंद्या एक अर्धी घटका. मग आपण दोघी वर जाऊं. मघाशीं जरी कांहीं भांडण झालं असलं, तरी आतां तिची स्थिति पाहून त्याला पश्चात्ताप झालाच पाहिजे." याप्रमाणें दादासाहेबांच्या पत्नीनें म्हातारीला बोलून बोलून सुमारें पंधरावीस मिनिटें तर घालविलीं. परंतु म्हातारीचें मन आतां जांवईबोवांबद्दल चांगलेंच कलुषित झालें होतें. ती एकदम दादासाहेबांच्या पत्नीला म्हणाली: "त्याचा मेल्याचा कांहीं हो नेम नाहीं. तो अशा स्थितींत सुद्धां काय करील याचा नेम नाहीं. माझ्या पोराला पलंगाच्या खालून ओढून काढून धोबाड धोबाड धोबाडलंन् आणखी त्या भयानं तें पोर पळालं. त्याला काळीज नाहीं! त्याला आमची सगळी इस्टेट गिळंकृत करायला पाहिजे. वेळ पडली तर तो त्या पोरीला ठारसुद्धां करायला चुकायचा नाहीं. मला जाऊन पोरीजवळ बसलंच पाहिजे. तुम्हीसुद्धां चला. आजची रात्र इथेंच रहा." असें म्हणून तिनें दादासाहेबांच्या कुटुंबासही उठविलें. नाइलाज तेव्हां ती पद्मेच्या आईबरोबर गेली. त्या दोघी जिन्यांतून डोकावून आंत पाऊल घालतात तों त्यांच्या कानावर पुढील शब्द पडले: "प्रिये, तूंही हट्टी आणखी मीही हट्टी. यामुळें अशीं आपलीं भांडणं होतात. पण तूं चार दिवस आपला हट्ट सोडशील, तर मी सुधारेन. चार दिवस माझ्या म्हणण्याप्रमाणें वाग. तुझी ही स्थिति पाहून मला किती किती वाईट वाटतं आहे म्हणून सांगूं ! पण तूं एक शब्द देखील बोलत नाहींस हें काय !" पद्मेकडून तर त्याच्या प्रश्नाचें उत्तर नाहींच आलें, परंतु तितक्यांत सासूबाई आंत आल्या त्या मात्र एकदम णाल्या: "हो तिला मारूनसवरून केवढा मानभावपणा चालला आहे ! अहो तुमच्या या मानभावाच्या करण्या आमच्या लक्षांत आल्या आहेत बरं, उगीच.........."

अण्णासाहेब एकदम आपल्या पत्नीजवळ बसले होते ते उठून उभे राहिले आणि अगदीं दुःखपूर्ण असा आवाज काढून व फार नम्रपणा दाखवून म्हणतात: "आपण जें काय म्हणाल, तें मला ऐकून घेतलं पाहिजे. कारण दुपारीं मीं तिला कांहीं सांगितलं, तिनं कांहीं माझं ऐकलं नाहीं. उलट मला उत्तरं देऊं लागली, तेव्हां मी "असं असेल, तर पुनः मी तुझं तोंड पहाणार नाहीं. आणखी मी आपलं तोंड तुला दाखवणार नाहीं!" असं संतापानं म्हणून चालता झालों. संतापाच्या भरांत आणखी कांहीं वेड्यासारखं बोललों असेन पण त्याचा परिणाम असा होईल ह्याची मला कल्पनासुद्धां नाहीं. झालं बोलून गेलों. घटकाभऱ्यानं मला त्याबद्दल फार वाईट वाटलं. पश्चात्ताप झाला, आतां पुनः हिला तोंड तरी कसं दाखवावं, असा विचार मनांत आला. आणखी इकडे यायचं मनांत असून घुटमुळून वेळ काढला; पण मी गेल्यावर झालं तरी काय ! मला सांगाल तर खरं. मला वाटतं माझ्या वेडगळ बोलण्यानं संतापून हिनं डोकंबिकं तर आपटून नाहीं घेतलं ना ? संतापानं आपोआप चक्कर येऊन जिन्याबिन्यावरून ती नाहींना पडली ! मी गेलों रागारागानं तेव्हां ती दारांत उभी होती या जिन्याच्या तोंडाशीं, तेव्हां मी तिला जरा दूर सारून गेलों इतकंच कायतें. ती माझ्या सारखीच संतापी आहे तेव्हां झालं असेल असं."

अण्णासाहेब बोलत असतां म्हातारी त्याला अद्वातद्वा बोलतच होती. त्यानें आपल्या पोराला मारलेलें तिनें पाहिल्या वेळेपासून तिनें जांवयाबद्दलची भीडमर्यादा

पार दूर जुगारून दिली होती. अण्णासाहेबांनीं तिच्या बोलण्याकडे मुळींच दुर्लक्ष करून आपलेंच वरील बोलणें चालू ठेविलें होतें. परंतु म्हातारी आपल्या बोलण्याला भीक घालीत नाहीं असें पाहून जास्तच नम्रपणाचा व पश्चात्तापानें पोळल्यासारखा आवाज काढून तिला म्हणतो: " आपण जें काय बोलाल तें अगदीं मुकाट्यानं मला ऐकून घेतलंच पाहिजे. माझ्या हातून चूक झाली खरी. पण मीं मारलंबिरलं असं मात्र म्हणूं नकाहो. मी संतापानंन् रागानं किती जरी वेडा झालों, तरी बायकोच्या अंगावर हात टाकण्याचा नामर्दपणा करणारा माणूस नाहीं. तिला विचारा तुम्ही. संतापून मी जायला लागलों, ती दारांत उभी होती एका फळाला टेंकून, तिला जरा दूर ढकललं आणखी चालता झालों. लागलीच पश्चात्ताप झाला, म्हणून परत येणार होतों, तों कसं जावं याची लाज वाटूं लागली, म्हणून इकडे यायची तळमळ लागली होती, तरी तसाच वेळ काढला. पण असा किती वेळ निघणार ? किती झालं तरी ती माझी बायको, आणखी मी तिचा नवरा. तेव्हां गेलोंन् क्षमा मागितली, तरी ती कांहीं आपला राग फार वेळ धरून बसावयाची नाहीं, असं मनाला वाटून मी आपला परत आलों. झालं हें खरं खरं तुम्हांला सांगितलं आहे. याउपर तुम्हांला वाटेल तें तुम्ही म्हणा. मी कांहीं उलटून तुम्हांला बोलायचा नाहीं. हिची ही अवस्था झाली आहे, हीच मला केवढी तरी शिक्षा आहे. यांतून ही बरी झाली म्हणजे मी आपला इथून चालता होईन, पुनः इकडे येणार नाहीं. पण आतां मला कांहीं बोलूं नका. " असें बोलून तो खालीं मान घालून आपल्या पत्नीकडे पाहूं लागला.

तें त्याचें बोलणें इतकें नम्रपणाचें व पश्चात्तापानें होरपळून गेलेल्या माणसाच्या बोलण्यासारखें होतें कीं त्या म्हातारीच्या व दादासाहेबांच्या पत्नीच्याही मनावर त्याचा परिणाम झाला. म्हातारी कांहीं वेळ अगदीं स्तब्ध झाली. बराच वेळ अशा स्तब्धपणांत गेला. नंतर आपली मान खालीं घालून व पद्माताईच्या अंगावर हात ठेवून बसलेल्या अण्णासाहेबांनीं हळूच वर पाहून म्हटलें, " हिला ताप फार चढलेला दिसतो आहे. डॉक्टरला तरी बोलावणं धाडा. तो भाग्या गेला कुठें ? का मी जाऊं ? पण मला आतां हिच्यापासून क्षणभरसुद्धां दूर व्हावंसं वाटत नाहीं. छे, अगदीं हात भाजतो आहे. पहा, आपण पहा. आपण तिच्याजवळ बसा. आणखी कुणाला तरी डॉक्टराला बोलवायला धाडा. त्या मथुराताईच्या भावाला तरी बोलावून आणा. तो जाईल. मला काय तुम्हांला बोलायचं असेल, तें ही बरी झाली म्हणजे मग बोला. तोंपर्यंत हिच्याकडे लक्ष्य देऊं या. ही बरी झाली म्हणजे सगळं कांहीं पावलं. मला दुसरं कांहीं नको. नाहीं तर तुम्ही इथें बसा. मी आतां त्यांना बोलावून आणतों. "

असें म्हणून तो आपल्या बायकोकडे वळून म्हणतो, " पद्मे डार्लिंग, मी डॉक्टरांना बोलावून घेऊन येतों. तूं अगदीं स्वस्थ पड. या तुझ्याजवळ बसतील ! समजलीस. जाऊंना ? तूं अगदींच बोलत नाहींस, त्यामुळें मी अगदीं अगदीं घाबरून गेलों आहें. मला कांहीं सुचत नाहींसें झालं आहे. "

इतकें बोलून तो उठला व आपली टोपी घालून खालीं जाऊं लागला. त्याच्या त्या एकंदर भाषणानें व नम्रपणाच्या वागणुकीनें म्हातारी अगदीं मवाळली. तिचा त्यांच्या-वरला राग मावळला. तो खालीं गेल्यावर ती दादासाहेबांच्या पत्नीस म्हणाली: "अहो, त्यांचा स्वभाव फार मायाळू आहे हो! पण लहरी आणखी एककल्ली. जें आपण म्हणूं, तें झालं पाहिजे. आपण सांगूं तें लोकांनीं ऐकलं पाहिजे. त्याच्यावर कोणी ब्र काढतां कामा नये. झालं, हिचाही स्व-भाव तसाच. हिलाही आपला हेका सोडा-यला नको. कसल्या कागदावर ते सही मागताहेत. ही म्हणते 'मीं वाचून पाहिल्या-खेरीज देत नाहीं सही करून.' त्यांचं म्हणणं: 'माझ्यावर–प्रत्यक्ष तुझ्या नवऱ्यावर–तुझा विश्वास कां नाहीं?' हें काय तें भांडण. या भांड-णाचा परिणाम हा असा झाला आहे. दुसरं कांहीं नाहीं. नसेल, त्यानं मारलंबिरलंही नसेल. नुसता संतापून गेला असेल. ही तरी काय हट्टीनू आकस्ताळी कमी आहे! दोघेंही सार-खींच आहेत. पण आमचा मात्र मधल्या-मधें भोग आहे. दुसरं कांहीं नाहीं. पहाः बायकोची अशी स्थिति झाल्याबरोबर कसा अगदीं गोगलगाईसारखा झाला आहे तो! त्याचं हिच्यावर फार प्रेम आहे, पण..."

म्हातारी असें कांहीं बोलते आहे तों जिन्यावर पावलें वाजलीं. पहातात तों डॉक्टर आणखी अण्णासाहेब. अण्णासाहेब आपल्या घरापासून दहा पावलें जातात तोंच डॉक्टर येतांना त्यांना भेटले. मघांशीं सांगून गेल्या-प्रमाणें डॉक्टर इकडे येतच होते. यांनीं त्यांना पहातांच "मी आपल्याकडेच चा-ललों होतों. आमच्या कुटुंबाला ताप बेसु-मार चढला आहे तेव्हां आपण चला." असें म्हटलें. डॉक्टर गाडींतून उतरले व कपाळाला आंठ्या चढवून म्हणाले: "ताप येणार हें मीं मघांशीं सांगून ठेवलंच होतं. पण दुपारीं पद्माताईला काय झालं? तिच्या कपाळावर खोक कशी पडली? वगैरे कांहीं आपल्याला सांगतां येईल कां?"

"काय सांगूं बोवा!" अण्णासाहेबांनीं पुनः अगदीं करुणस्वर काढून म्हटलें: "मला असं कबूल करायला पा-हिजे, कीं तिची अशी स्थिति होण्याला मीच–मीच अप्रत्यक्ष रीतीनं मुख्य कारण आहें. माझा स्वभाव जरासा तापट आहे. कांहीं बोलाचालीवरून मी तिला रागावून बोललों. तिनं कांहीं मला उत्तरं दिलीं. पुनः मी कांहीं रागाच्या झपाट्यांत वेडंवांकडं बो-लून 'मी–पुनः आपलं तोंड तुला दाखविणार नाहीं, आणखी तुझं कधीं पहाणार नाहीं,' असं बोलून गेलों, त्यामुळें संतापाच्या भरांत तिनं कांहीं तरी केलं. मग डोकं हापटून घेतलं म्हणा किंवा संतापानं डोकं फिरून तिला चक्कर आली म्हणा. तिचा स्वभाव मला पक्का ठाऊक असून असं झालं बोवा. होतो असा वेडेपणा केव्हां केव्हां. काय करावं? पण आतां अगदीं कानाला खडा लावून घेतला कीं पुनः म्हणून तिच्या मनाविरुद्ध असं कांहीं बोलायचं नाहीं. आतां तुमच्या हातांत आहे. नीट तपासा, आणखी वाटलं तर, सिव्हिल सर्जनला आणा. पण तिला एकदां बरी करा. ती बरी झाली, म्हणजे पुनः मी आपली सांवलीसुद्धां तिच्या मार्गांत पडूं यायचा नाहीं. दोघेंही आम्ही संतापी, तेव्हां केव्हां काय होईल याचा काय नेम! इतके दिवस आम्ही आपलीं दोघेंही एकमेकांपासून दूर होतों, तेंच बरं होतं."

अण्णासाहेबांनीं हें सर्व डॉक्टरांस दारांत व जिन्याच्या तळाशीं येईपर्यंत सांगितलें. डॉक्टरांनीं तें मुकाट्यानें ऐकून घेऊन ते वर

आले. त्यांनीं पद्मताईस थर्मामिटर वगैरे लावून पाहिलें आणि "औषध चालू ठेवा व कोणी तरी बायकोमाणूस तिच्याजवळ बसून राहूं द्या." असें सांगितलें. मथुराताई येऊन बसल्या तर फार चांगलं. त्यांना आजाऱ्याची शुश्रूषा करण्याची माहिती फार चांगली झाली आहे. त्या हल्लीं रिकाम्याही झाल्या आहेत. मीं आतां पुनः सकाळीं येईन." नंतर ते अण्णासाहेबांकडे वळून म्हणाले: "विशेष काळजी करण्याचं कारण नाहीं. पण तुम्ही कांहीं तिच्याजवळ बसूं नका."

# प्रकरण ४८ वें.

## दोन तारा.



पद्मताई पक्की आजारी पडली. चार दिवस झाले, पांच झाले, सहा झाले, तिचा ताप कांहीं केल्या हटेना. डॉक्टर भगवंतरावांनीं आपल्याकडून उपाययोजनेची पराकाष्ठा केली, मथुराताईनीं तिची शुश्रूषा करावी अशीही योजना झाली, परंतु त्या योजनेचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ती योजनाच राहिली. कारण अण्णासाहेब क्षणभरसुद्धां आपल्या बायकोचें उसें सोडीनात. ते तेथें बसलेले—कायमचे बसलेले—असतांना मथुराताईंना तेथें बसण्याचा संकोच वाटूं लागला. इतकेंच नव्हे, तर बसण्याचें मुळीं धैर्यच होईना. अण्णासाहेब आपल्याकडून तिला फार आग्रह करीत कीं तुम्ही आणि मी दोघेंही तिची शुश्रूषा करूं. ते म्हणत: "मथुराताई मी इथें असलों काय आणि नाहीं काय, माझा उपयोग कांहीं नाहीं. मी भ्रमिष्ट झालों आहें. तिच्या उशापायथ्याशीं कोठें तरी बसलेलों असलों, तर माझं चित्त कांहीं तरी ठिकाणावर राहील. पण मी इथून हललों तर मला वेड लागेल. मी बसलेला असलों, तर माझा तुम्हांला कांहीं उपयोग होणार नाहीं ही गोष्ट खरी, पण मला तिच्यापासून दूर होतां येत नाहीं. तेव्हां मी असून नाहींसारखाच समजा, आणखी तिची शुश्रूषा करा. ती बरी झालेली मीं डोळ्यानीं पाहिली, ती हिंडूं फिरूं लागली कीं मी इथून चालता होईन. पण ती बरी झाली पाहिजे." असें तो जेव्हां तेव्हां फारच केविलवाणीनें म्हणे. त्याला खराखरा पश्चात्ताप झाला आहे असें कोणासही वाटेल, इतकी त्याची चर्या बदलून गेली होती.

पद्मताईच्या तापाच्या आठवे दिवशीं तर त्यानें एक अशी गोष्ट केली कीं, त्याच्या योगानें त्याची कींव दादासाहेबांसही आली. ते व वसंतराव दोघे बरोबरच पद्मा-

ताईच्या समाचारास आले होते. पद्माताईची प्रकृति ते दिवशीं बरीच बिघडली आहे, असें त्यांस डॉक्टर भगवंतराव यांचेकडून कळलें होतें. दादासाहेबांस आपल्या मुली-प्रमाणेंच पद्मेची काळजी वाटे. यामुळें दिव-सांतून एकदां तरी ते तिच्या समाचारास येत. परंतु अण्णासाहेब आपल्या पत्नीला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊं नये म्हणून तिच्यापर्यंत त्यांस न नेतां बाहेरच्या बाहेर तिच्या प्रकृतीबद्दल काय हालहवाल कळवावयाची ती कळवून मोठ्या दिल-गिरानें लावून देत. आज मात्र त्यानें तसें केलें नाहीं. आज त्यानें दोघांसही आपल्या पत्नीच्या खोलींत नेलें व डोळ्यावाटे घळ-घळां अश्रु गाळून म्हटलें: "दादासाहेब, वसंतराव, आजपर्यंत झालं तें झालं, पण मला आतां यापुढें धीर निघत नाहीं या भगवंतरावांच्या ट्रीटमेंटवरच किती दिवस बसणार ? आतां माझा धीर सुटला. आतां दुसरा कोणी चांगला डॉक्टर पहावा असं वाटतं. आणखी आपली मंडळी चार दिवस इथें येऊन राहूं द्या. आपण, निदान वसं-रावानं तरी इथें येऊन राहावं. मला कांहीं सुचत नाहीं. इतके दिवस ती डोळे उघडून इकडे तिकडे तरी पहात असे. काल रात्री-पासून तेंही नाहीं. ती औषधच घेईनाशी झाली आहे; आणि डोळे उघडूनही पहात नाहीं. बोलण्याचं तर नांवच नको. तिच्या-जवळ आईसाहेबांखेरीज कोणी मायेचं माणूस नाहीं. मथुराताईंना पुष्कळ सांगि-तलं, पण आईसाहेब इथें असल्या तर त्या बसतात. रात्रीं आईसाहेब तिच्याजवळ येऊन निजल्या म्हणजे मग त्या येतात. एकट्या कांहीं बसत नाहींत. नर्स म्हणून काम करायचं, आणखी मग असं करून कसं चालेल ? तेव्हां मला वाटतं कोणी जर धंदेवाली नर्स मिळाली, तर तिला एंगेज करावी. आणखी तिच्या स्वाधीन ही केस करावी. आमचे स्नेही ते डॉक्टर सेवकराम आहेत, ते म्हणाले कीं आपल्या वळणाची एक नर्स आहे. मी आज पांचसहा दिवसांत घराच्या बाहेर पडलों नाहीं. तेव्हां ते सहज इथें आले होते. त्यांनीं हिची तब्यत पा-हिली. प्रिस्क्रिप्शनही पाहिलं आणखी अगदीं नाक मुरडून ते म्हणाले, 'दुसऱ्या डॉक्टरच्या कामांत आपल्याला बोलायची जरूरी नाहीं. पण तब्यत पाहिली त्यावरून, आणखी प्रिस्क्रिप्शन पाहिलं त्यावरून, वाटतं कीं, या केसचं डायग्नोसिस कांहीं नीट झालं नाहीं. भलतंच औषध चालवून भल-ताच प्रकार होतो आहे.'

तेव्हां डॉक्टर बदलावा आणखी नर्सही एंगेज करावी असं मला वाटतं. पण आपल्या सगळ्यांच्या विचाराखेरीज कांहीं करायचं नाहीं असा मनाचा निर्धार केला आहे."

आपल्या बायकोच्या स्वास्थ्याचा भंग होऊं नये म्हणून दादासाहेब व वसंतराव किंवा त्यांच्या घरचें कोणी आलें, तर त्यांस त्या खोलींत सुद्धां जो जाऊं देत नसे, तो अण्णासाहेब अगदीं अश्रु ढाळीत याप्रमाणें बोलून त्यांस एकदम घरीं रहाण्यास येण्या-पर्यंत आग्रह करूं लागला. यामुळें वसंत-रावास फार आश्चर्य वाटलें. दादासाहेबांस तर त्याची ती केविलवाणी चर्या आणि ते अश्रू व ती घाबऱ्या घाबऱ्या आवाजानें सांगितलेली हकीकत ऐकून "बायकोच्या दुखण्यानं बिचारा अगदीं गोगलगाय झाला आहे" असेंच वाटलें, व ते वसंतरावाकडे पाहून म्हणतात: "कायरे वसंत, तुला काय वाटतं ? मला वाटतं डॉक्टर भगवंतरावा-कडून केस काढली नाहीं तरी दोन तीन डॉक्टरांचं कन्सल्टेशन तरी करावं म्हणजे

आपल्या मनाची तरी खात्री होईल. तें डॉ. भगवंतरावालाही बरं पडेल. "

तें ऐकतांच अण्णासाहेब एकदम म्हणतातः "हें पहा, डॉ. भगवंतरावांच्या हातीं यापुढें केस ठेवावी असं मला कांहीं वाटत नाहीं. त्यांच्या ट्रीटमेंटनं कांहीं तरी पीछेहाट व्हायला पाहिजे होती. पीछेहाट तर राहो, पण दररोज पहावं तों वाढती कळा आहे. To tell you the truth, I have no faith in the man's knowledge or experience. He is worse than......पण मी कांहीं अधिक बोलत नाहीं. मी आपल्याला सांगणार होतों तें एवढंच कीं आजपासून मी ट्रीटमेंट बदलणार. मी डॉ. सेवकरामाच्या हातीं ही केस देणार, आणखी त्याच्याचमार्फत ती राणूबाई शिंदे नर्स बोलविणार. आतांपर्यंत झालं तें बस झालं. I can't allow my wife to be slowly......but I won't say any thing more."

दादासाहेब व वसंतराव आले, तेव्हां प्रथम ज्या मवाळीनें व गद्गदित स्वरानें स्वारी बोलूं लागली होती, तो स्वर आतां एकदम बदलला. हें पहातांच दादासाहेब चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. वसंतरावाला मात्र त्यांत कांहीं आश्चर्य वाटलें नसावें असें दिसलें. तो पहिल्याप्रमाणेंच अण्णासाहेबांकडे अंतर्भेदी दृष्टीनें पहात होता. त्याच्या चर्येवर कांहींएक फरक झाला नाहीं.

इतक्यांत अण्णासाहेब पुनः पूर्वीप्रमाणें स्वर काढून म्हणतातः "दादासाहेब, माझा सरोखर अगदीं धीर तुटला आहे. मला कुणाचा आधार नाहीं. मला असं वाटूं लागलं आहे कीं, I am losing this angel–this dear darling wife of mine. मीं तिच्याशीं फार निष्ठुर वर्तन केलं. त्याचा मला किती पश्चात्ताप होतो आहे म्हणून सांगूं. त्यामुळें मला असं वाटतं कीं तिला यांतून वांचविलीच पाहिजे. ती बरी झाली म्हणजे मी तिच्या बंद्या गुलामासारखा वागेन. तुम्ही कोणी नको म्हणाल, तर मी तिच्या वाऱ्यालासुद्धां उभा रहाणार नाहीं. पण या दुखण्याला मी कारण झालों असं माझं मन मला खातं आहे. त्यांतून एकदां तिला वांचवलं पाहिजे. आपल्याला पाहिजे तर सिव्हिल सर्जनला आणा. डॉक्टर सेवकराम आणखी सिव्हिल सर्जन यांच्या मतानं औषध चालूं द्या. पण आहे ही ट्रीटमेंट बदला. पण त्याचं काय म्हणा! त्याच्याबद्दल मी आपल्याला काय म्हणून शिणवतों आहें. मी करतों ती सगळी व्यवस्था. सिव्हिल सर्जनला आणण्याची व्यवस्था करतों. जमेल, तें ठीक जमेल. आपल्याला दोघांनाही त्याच्याबद्दल तसदी मी देऊं इच्छित नाहीं. आपण रोज येऊन चौकशी करून जातां त्याप्रमाणें जात जा म्हणजे झालं. तेवढ्यानं तिला जरा बरं वाटेल. आपण तिला आबासाहेबांच्या ठिकाणीं आहां, म्हणून सांगायचं."

हें सर्व बोलणें चाललें असतां पद्माताई अंथरुणावर अगदीं निपचित पडून होती. वसंतरावाची दृष्टि मात्र तिच्याकडे होती. अण्णासाहेब बोलूं लागला कीं तो त्याच्या चर्येकडे किंचित् वेळ पाहून त्याचा त्या बोलण्याचे वेळीं कोणता रंग आहे हें पाही आणि लागलीच पद्मेकडे दृष्टि वळवी. पद्मा बेशुद्ध नाहीं. आपल्या शेजारीं काय चाललें आहे हें तिला ऐकूं येत आहे. तिला सव समजतें आहे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तिच्या डोळ्यांतून घळघळा पाणी

येतें आहे, असेंही त्याच्या नजरेस आलें. मध्यें एकदां त्याला असा भास झाला कीं, तिनें डोळे उघडून आपल्याकडे पाहिलें. त्याच्या मनांत त्या वेळीं अनेक विचार चालले होते. परंतु त्यांपैकीं एकही विचार बाहेर बोलून दाखविण्याजोगा नव्हता. आंतल्या आंत मनाचा कारभार चाललाच होता. त्यांतच तो एकदम आपल्या बापाकडे वळून म्हणालाः " दादासाहेब, आपण एकदां तिच्याजवळ बसून तिला धीर द्यावा. तिच्याजवळ बसून विचारपूस केली तर तिला थोडं बरं वाटेल. "

दादासाहेब लागलींच पुढें होणार, तों अण्णासाहेब एकदम आडवा होऊन म्हणतो, " नको, नको, तिला स्वस्थ पडूं द्या. आपण इतका वेळ इथें उभं राहून गडबड केली हीच चूक झाली. डॉक्टरांचं म्हणणं असं आहे, कीं तिला बिलकुल त्रास देऊं नये. शिवाय ती बोलत नाहीं—कांहीं नाहीं, तेव्हां आपण तिच्याजवळ जाऊन तरी काय उपयोग ? चला, आपण पलीकडच्या खोलींत जाऊं. "

दादासाहेबांना किंवा कोणाला तिच्याजवळ म्हणून जाऊं द्यावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय दिसला. अर्थात् दादासाहेब पुढें झाले नाहींत. वसंतरावानें एकवार अण्णासाहेबांकडे पाहिलें, नंतर आपण एकदम पुढें गेला; व पद्मेस मोठ्यानें म्हणालाः " पद्माताई, हे दादासाहेब आले आहेत. तुला त्यांना कांहीं सांगायचं आहे ना ? दादासाहेब या. आपण तिच्याजवळ बसा. आणखी पाठीवरून हात वगैरे फिरवून कांहीं तरी बोला म्हणजे तिला बरं वाटेल."

अण्णासाहेब किंचित् चकित झाला आणि कपाळाला आंठ्या घालून खालचा ओंठ चावीत उभा राहिला. त्याचा काय करावें याबद्दल निश्चय होईना, इतक्यांत दादासाहेब तिच्याजवळ गेले व तिनेंही डोळे उघडून त्यांच्याकडे पाहून जणूं काय होतें नव्हतें तें सगळें बळ एकवटून त्यांना म्हटलेंः " दादासाहेब, मला आपल्या घरीं घेऊन चला. आणखी मालतीला एकदां बोलवा. "

हे शब्द अगदीं क्षीण अशा स्वरांत परंतु थोडे जोरानें उच्चारले गेल्यामुळें सर्वांना ऐकूं गेले. त्याबरोबर अण्णासाहेबांनीं एकदम टाळी पिटून आनंदाचा स्वर काढून म्हटलेंः "वाः प्रिये, तूं शुद्धीवर आलीस हें फार चांगलं झालं. मीं मघांशीं दहा पांच वेळां तुला हांका मारल्या परंतु तूं ओच देईनास, डोळे उघडीनास, यामुळें मी अगदीं घाबरून गेलों होतों. तूं जरा बरी हो, मग मी तुला आपण होऊन यांच्या घरीं पोंचती करीन. मालतीबाईंना तर अवश्य अवश्य बोलवा. तिची जिवाची मैत्रीण तिला भेटल्यानं, दुखणं फार लवकर बरं होईल. खरंच दादासाहेब, इतके दिवस आपल्याला कुणाला सुचलं नाहीं. आपण, आपल्या जांवईबोआंना तार करा. मीही त्यांना एकंदर हकीकतीचं पत्र लिहितों पाहिजे तर. पण आपली तार जाऊं द्या. ही इतकी अत्यवस्थ आहे हें आपण नाहीं तर वसंतरावांनीं मालतीताईंना कळविलं असेलच. वास्तविक त्यांनीं आपण होऊनच यावं. पण तसं नाहीं झालं म्हणून काय झालं ! आपण त्यांना सुचवावं. त्याहावं पत्र. प्रिये, मी तुझ्या नांवानं तार करूं का ? मी नाहींतर आपल्याच नांवानं करतों. ओ यसू ही योजना ठीक आहे. अग मग इतके दिवस कां नाहीं यांना नाहीं तर मला सांगितलेंस ! एव्हांना मालतीताई येथें आल्या सुद्धां असत्या. " असें बडबडत

त्यानें भरकन् आपला पत्र लिहिण्याचा साहेबी पोर्टफोलिओ काढला. त्यांतून झटकन एक तारेचा फॉर्म बाहेर ओढला आणि तारेचा मजकूर लिहून तो दादासाहेबांस मालतीच्या नवऱ्याचा पत्ता विचारूं लागला. दादासाहेबांनीं पत्ता सांगितला. तो त्यानें लिहिला, फॉर्म तयार झाला. आणि त्यानें तो घडी करून आपल्या खिशांत घालतां घालतां म्हटलें: " मी स्वतःच ही तार पाठवीन. पण दादासाहेब, आतां आपण तिच्यापासून सगळ्यांनींच उठलं पाहिजे असं म्हणणं भाग आहे. आपल्या त्या जुन्या कल्पना आतां सोडून दिल्या पाहिजेत. रोग्याला अगदीं स्वस्थ पडूं देणं नेहमींच जरूर पण अशा तापाच्यासंबंधांत तर फार फार जरूर. चला. आपण कांहीं काळजी करूं नका. नर्स नाहीं, त्या मथुराबाई इथें बसाव्या तितक्या बसत नाहींत. तरी पण मी अगदीं अहोरात्र डोळ्यांत तेल घालून बसलों आहें. आज आठ दिवस झाले माझा डोळ्याला डोळा नाहीं. काय करूं ! पण झोंप तरी येणार कुठली ! आईसाहेबांच्या आग्रहामुळें मी मधें मधें जाऊन पडतों, नाहीं असं नाहीं. पण मनाला स्वस्थपणा नाहीं, मग झोंप कुठली ! चला उठा, तिला त्या तेवढ्या बोलण्यानं श्रम झाले, पहा कशी निपचित पडली आहे ती. तिची पण आपल्या ठिकाणीं भक्ति फार अं. आपल्या घरीं जावंसं वाटतं आहे तिला. थोडी हलण्याजोगी झाली कीं जा घेऊन. चार दिवस धारेपालट होईल, आणखी मालतीताई इथें आल्या कीं फारच उत्तम. मी दिखील आपल्या तिथेंच येऊन राहीन, आपला कांहीं प्रतिबंध नसला तर, पण खरंच उठा. आतां आपण बाहेर जाऊं. It won't do to disturb the patient to such an extent. झाला एवढ्याच त्रासानं कांहीं तरी अग्रवेशन् होतं कीं काय असं भय वाटूं लागलं आहे. चला. "

त्यानें इतकें म्हटल्यानंतर आतां तेथें बसणें अगदींच गैरवाजवी असें वाटून दादासाहेब तेथून उठले. वसंतरावही त्याच्याकडे कठोर दृष्टीनें व तिच्याकडे करुण दृष्टीनें पाहून तेथून उठला.

अण्णासाहेबांची दृष्टि तर वसंतरावाच्या एकंदर हालचालीवर व चर्येवर एकसारखी होतीच. शेवटीं दादासाहेब व वसंतराव जाण्यासाठीं उठले. जातां जातां दादासाहेब अण्णासाहेबांस म्हणाले: " डॉक्टर भगवंतराव फार हुशार, आणखी काळजीपूर्वक काम करणारा गृहस्थ आहे. त्याला तुम्ही बदलूं नका. आबासाहेबांच्या व आमच्या स्नेह्याचा तो मुलगा. तेव्हां त्याला कळकळही जास्त आहे. त्याला कोणी कन्सल्टेशनला पाहिजे तर बोलवायला सांगा, पण त्याला सोडून दुसरा डॉक्टर आणण्याच्या भानगडींत न पडाल तर चांगलं. "

त्यावर अण्णासाहेबांनीं किंचित् तिरसटपणानें म्हटलें: " पाहूं. पाहूं. मला काय करायचं त्याचा पूर्ण विचार करूनच मी करीन. स्नेह्याचा मुलगा म्हणून जीव कोणी धोक्यांत घालील ! आज आठ दहा दिवस झाले, गुण काडीचा नाहीं. तेव्हां किती दिवस असंच बसवणार ! बाकी आपल्याबाहेर मी नाहीं. पाहूं आणखी एखाद दुसरा दिवस वाट आपण म्हणतांच तर. "

दादासाहेब व वसंतराव दोघेही त्या घरांतून निघाल्या वेळेपासून एकमेकांशीं कांहीं बोलले नाहींत. वसंतरावाच्या मनांत कांहींएक विचार आला आणि त्या विचारानें त्याचें अंतःकरण अगदीं व्याप्त झालें होतें. त्याच्या मनांत आलेला विचार

कांहींतरी भय उत्पन्न करणारा असावा. जातांजातां एक वळण आलें तेथें त्यानें आपल्या वडिलांस कांहीं सांगून तो दुसऱ्या बाजूस वळला. पोस्ट ऑफिसांत गेला व तेथें त्यानें मालतीच्या नवऱ्यास 'पद्माताई अत्यवस्थ आहे, मालतीला अगदीं तावडतोब पाठवा' अशी फार निकडीची तार केली, आणि तो आपल्या घरीं आला. त्याच्या मनांतील विचारांनीं त्यास कांहीं सुचेनासें झालें होतें. तो तीनतीनदां खालीं जाई, वर येई.

एखाद्या घरांत आपलें आवडतें माणूस अडकलेलें असून त्या घरास आग लागावी, त्या माणसास सोडविण्यास आपण प्राण धोक्यांत घालण्यासही तयार असून कोणीकडून आंत शिरावें हें कांहीं केल्या समजूं नये, अशा प्रसंगीं त्या मनुष्याच्या मनाची जी स्थिति होते, तशी वसंतरावाच्या मनाची स्थिति झाली असावी असें दिसलें. तो अगदीं कावराबावरा झाला होता. पद्माताईच्या आजाराच्या भयापेक्षां त्याला ती एका लांडग्याच्या तावडींत सांपडली असून तो तिचा केव्हां बळी घेईल आणि केव्हां नाहीं असें भय जास्त वाटत होतें, असेंच दिसलें. या आजारांत डॉक्टर भगवंतरावाला बदलून दुसरा डॉक्टर सेवकराम आणण्याचा आपला इरादा आणि ज्या नर्सचें त्यानें नांव घेतलें ती नर्स आणण्याचा त्याचा बेत हीं मनांत येतांच त्याला अधिकच भय वाटूं लागलें होतें; आणि या भयाचाच परिणाम आपल्या बहिणीस तावडतोब पाठवून देण्याबद्दल मेहुण्याला केलेली तार होय. ती तार जाऊनही तो तिला पाठवितो कीं नाहीं याबद्दल त्याला शंका वाटूं लागली. मनाची चलबिचल झालेली असली म्हणजे मग प्रत्येक बाबतींत शंका येऊं लागतात. बहीण आली, तरी आपल्या बेतास अनुकूल होईल कीं नाहीं ही शंका पुनः उपस्थित झालीच.

इकडे अण्णासाहेबांनीं डॉक्टर भगवंतरावास "आपल्याकडून आमच्या बायकोची केस काढली आहे" अशा प्रकारचा निरोप पाठविण्याचा विचार ठरवून तसें डॉक्टर पुनः आल्यावर सांगावें कीं आधींच कळवावें, एवढ्याचबद्दल मनाशीं भवति न भवति चालविली होती. शेवटीं पत्र लिहून भगवंतरावांस 'पुनः येऊं नका' म्हणून कळवावयाचें व डॉक्टर सेवकरामास या म्हणून कळवावयाचें, असा विचार ठरवून तो आपला पोर्टफोलिओ घेऊन बसला. परंतु त्याच्या इच्छेला आड येणारें असें तिसरेंच विघ्न उपस्थित झालें. त्याच्या सासूनें असा हट्ट धरला कीं, डॉक्टर भगवंतरावांखेरीज कोणाचेंही औषध मी देऊं द्यावयाची नाहीं. आणखी कोण महारीण नर्स आणणार आहां तिला तर घरांत पाऊलसुद्धां घालूं द्यावयाची नाहीं. जांवईबोवांच्या विक्षिप्तपणामुळें, त्याच्याविषयींचें सासूबाईचें प्रेम ओसरत ओसरत जाऊन "तुमच्यासारख्या बायका मला दृष्टीसमोर नकोत" म्हणून त्यांनीं जे दिवशीं म्हटलें ते दिवशीं तें अगदींच संपुष्टांत आलें. पुढें त्यांच्या मुलाला पलंगाखालून ओढून काढून थोबाडल्या दिवशीं त्या प्रेमाचा द्वेष झाला आणि तो द्वेष मुलीच्या दुखण्यानें शिखरास पोंचला होता. त्यांत भाग्या गड्यानें सहज तिला म्हटलें म्हणून म्हणा किंवा तिच्या स्वतःच्या मनांत आलें म्हणून म्हणा, तिच्या मनानें असें घेतलें कीं, डॉ. सेवकराम हा वाईट माणूस आहे आणि ती नर्स जातीनें महारीण आहे. झालें. मग काय विचारतां? वसंतरावास जें काय पाहिजे होतें तें आयतेंच झालें. कोण माणूस केव्हां कसा उपयोगी

पडतो, याचा नेम नाहीं. दादासाहेबांजवळ अण्णासाहेब जेव्हां तीनतीनदां म्हणत होते कीं, मी डॉक्टर भगवंतरावास नको ह्मणून सांगून डॉक्टर सेवकरामास आणणार आहें, तेव्हां तें भाग्यास रुचलें नाहीं. भाग्याचा डॉक्टर भगवंतरावावर अतोनात विश्वास. त्यांचा त्याला अनेक प्रसंगीं उपयोग झाला होता. तेव्हां त्यांचें औषध बंद करणें त्याला अगदीं गैरशिस्त वाटलें. त्यानें खालीं जाऊन आपल्या ह्मातार्‍या यजमानणीला सांगितलें कीं, "अण्णासाहेब डॉक्टर भगवंतरावांस बंद करून आपल्या दारू पिणार्‍या मंडळींतले डॉक्टर सेवकराम यांना आणणार आहेत, आणखी ती शिंदी म्हणून महारीण नर्स आणणार आहेत. मथुरातांईचा कांहीं उपयोग नाहीं असं ते म्हणतात. आपल्याला आह्मीसुद्धां इकडे तिकडे हिंडलेले खपत नाहीं, कुठें विटाळ होईल, कुठें काय होईल असें म्हणतां आणखी तो कोण जातीचा डॉक्टर आणखी महारीण नर्स, हीं घरांत आलेलीं कशीं खपणार!" असें भाग्याचें बोलणें ऐकतांच म्हातारी उसळली. दादासाहेबांच्या देखत बोलावयाचें नाहीं म्हणूनच तिनें तावडतोब जाऊन आपलें स्वरूप दाखविलें नाहीं. परंतु दादासाहेब आणखी वसंतराव तेथून जातांक्षणींच म्हातारीनें आपल्या जांवयास आपलें उग्र स्वरूप दाखविलें. "कोण डॉक्टरन् कोण नर्स का फर्स तीं कशीं दोघं येतात माझ्या घरीं तें पाहीन." असें चवताळून तिनें त्यांना ह्मटलें. अण्णासाहेबांस जें काम अगदीं सोपें असें वाटत होतें, तें अर्थातच अगदीं कठिण झालें; आणि ते स्तब्ध बसले. सासूबाई वर येण्याच्या वेळाला त्यांचा विचार होऊन ते आपल्या पोर्टफोलिओंतून एक कागद काढून डॉक्टर भगवंतरावांस आपण यापुढें आमच्याकडे येऊं नये म्हणून व डॉक्टर सेवकरामास 'तावडतोब निघून या' म्हणून पत्रें लिहिण्याच्या विचारांत होते. इतक्यांत सासूबाईनीं तडाखा उडविला—असा तडाखा उडविला कीं, अण्णासाहेब चकितच झाला. इतक्यांत मघांशीं उतरून घेतलेला मालतीच्या नवर्‍याचा पत्ता त्यांच्या नजरेस पडला. त्याबरोबर त्यांच्या मनांत कांहीं विचार आला आणि तो कांहींएक न बोलतां एकदम उठून आपली साहेबी टोपी चढवून स्वारी लगबगीनें बाहेर गेली. तो तडक पोस्ट ऑफिसांत गेला आणि तेथें तारेचा फॉर्म मागून घेऊन त्या तारमास्तरास म्हणतो: "थोड्या वेळापूर्वी××पुरला आमच्या माणसानें तार पाठविली काय? ती गेली असली तरच ही दुसरी तार पाठवायची आहे. नाहीं तर पाठवायची जरूरी नाहीं म्हणून विचारतों." तारमास्तरानें भोळेपणानें सांगितलें तार अमक्यानें पाठविली आहे.

अण्णासाहेब तावडतोब त्यास म्हणतो: "ठीक आहे. मी त्यांच्याचकडून पुनः तार करायला आलों आहें." असें ह्मणून पुढील मजकुराची तार लिहिली व अर्जंट म्हणून पाठविली. तारेंतला मजकूर असा होता: "आपल्या पत्नीस पाठविण्याची तांतडी करूं नये. पत्नीची प्रकृति पुष्कळ बरी आहे. सविस्तर पत्र टपालानें मागोमाग पाठवितों." पाठविणाराचें नांव वसंतरावच घातलें आणि स्वारी तेथून निघून घरीं परत आली.

---

# प्रकरण ४९ वें.

## जगणार कीं मरणार ?



**अण्णासाहेबांना** आतांपर्यंत त्या घरांत जें अगदीं कर्तुमकर्तुं अन्यथाकर्तुं शक्ति आपली असें वाटत होतें, त्याला आतां धक्का बसला. डॉक्टर दुसरा आणण्यांत आपल्याला कोणी अडथळा करील हे त्यांच्या स्वप्नांतही नव्हतें; परंतु सासूबाईनीं तें त्याच्या अनुभवास, त्याच्या जागृतींतच आणून दिलें. डॉक्टर सेवकरामास आणून त्याच्याकडून आपल्या बायकोला औषध देववावयाचें हा आपला बेत सिद्धीस जात नाही, परंतु तेवढ्यानेंच आपण हताश होऊन बसण्याचें कारण नाहीं. आपण डॉक्टर भगवंतरावाला तर बंद केलेंच पाहिजे. कांहीं युक्त्या-प्रयुक्त्या करून आपण त्याला बंद केला कीं आपोआप दुसऱ्या कोणा तरी डॉक्टराला आणून औषध द्या असें म्हातारी म्हणेल, असा एक विचार अण्णासाहेबांच्या मनांत आला. आणखी त्यानें त्यावर विचार चालविला होता. तार करून घरीं परत जात असतांना स्वारीच्या मनांत तेच विचार चालले होते. त्या विचारांत गुंग होऊन स्वारी पावलें टाकीत असतांना त्यांचे स्नेही मॅजिस्ट्रेटसाहेब त्यांस भेटले, यांनीं त्यांना पाहिलें नाहीं; परंतु त्यांनीं यांना पाहिलें व हांक मारून "कां आपल्या रंगांतच दंग होऊन कुणीकडे चालली आहे स्वारी ? एखाद्या सिद्ध योग्याप्रमाणें नासिकाग्र दृष्टिच ठेविली आहे !" असा प्रश्न केला. तेव्हां अण्णासाहेब एकदम शुद्धीवर आल्याप्रमाणें होऊन म्हणतात: "कुटुंबाची प्रकृति फार बिघडली आहे, त्यामुळें मन फार अस्वस्थ झालं आहे काय करावं ? आपण भ्याडपणानं हें कसं करावं ? तें कसं करावं असं करीत बसलों, नाहीं तर आम्हांला हात जोडून बसावं लागलं नसतं. आतां दैवगति जेव्हां सुधरेल तेव्हां काम होणार. आपण इतके भ्याड असाल असं वाटलं नाहीं. आणखी पहिल्या पहिल्यानं आपण वाटेल तें करायला तयार आहांत असंसुद्धां म्हणत होतां. तुमच्याबरोबर आम्ही जरा भ्याड बनलों. नाहीं तर केव्हांच बार उडवून दिला असता, पण शक्य नाहीं. लेकानं सगळं इस्टेट नोटांत करून टाकलं, बरं चला पहातों पहातों नाहीं तर जातों आतां पुनः........"

अण्णासाहेबांचें हें बोलणें चाललें असतां स्वारी एकदम थांबली आणि दूर न्याहाळून पाहूं लागली. दूर कोणी तरी त्यांच्या ओळखीचा माणूस चालला आहे असें त्यांना दिसलें. आणि काय त्यांच्या मनांत आलें, मॅजिस्ट्रेटसाहेबांस तेथल्या तेथेंच सोडून स्वारी झपाट्यानें समोर चालती झाली. मॅजिस्ट्रेटसाहेबही त्यांच्याकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहून आपल्या मार्गास लागले. अण्णासाहेब समोर जाऊन त्या रस्त्याच्या टोंकाशीं जेथें एक आडवा रस्ता

गेला होता तेथपर्यंत गेले व त्या आड-रस्त्याच्या डाव्या व उजव्या दोनही बाजूंस पाहूं लागले. त्यांस जो कोणी गृहस्थ इकडून तिकडे गेलासें वाटलें होतें, तो कोठें दिसेना. बऱ्याच लांबपर्यंत त्यांनीं इकडून तिकडे तिकडून इकडे असें निरखून पाहिलें. नंतर उगीच आपल्याला भास झाला असावा अशी आपली स्वतःची समजूत करून घेऊन ते आपल्या घरीं जाण्यासाठीं त्या रस्त्याला लागले. एखाद्या बावचाळलेल्या गृहस्थाप्रमाणें त्यांची स्थिति झालेली दिसली. तो तडक आपल्या खोलींत गेला. तेथें कांहीं वेळ बसला. नंतर बाटल्या काढून त्यांतून त्यांनीं कांहीं यथास्थित पान केलें, आणि आपल्या बायकोच्या खोलींत आला.

पद्मताई स्वस्थच पडली होती. तिच्या उशाशीं तिची आई बसली होती व तिला कांहीं लापशी वगैरे घेण्याबद्दल आग्रह करीत होती तें यानें ऐकतांच हाही तिच्याजवळ गेला व तशाच विनवण्या करूं लागला. याचा आवाज ऐकतांच पद्मताईचें अंग शिरल्याप्रमाणें झालें, आणि अगदीं जवळ जाऊन बसतांच सासूबाई चटकन् उठल्या. त्या उठतांच हा त्यांना म्हणतो: “ ती लापशी पीत नसली, तर दुसरं कांहीं तरी करून आणा. लापशीचाच तिला कंटाळा आला असेल डॉक्टर आले म्हणजे त्यांना विचारूं पाहिजे तर सूप वगैरे कांहीं देऊं का म्हणून ? तुह्मांला डॉक्टर बदलायचा नाहीं तर मी कांहीं आग्रह करीत नाहीं; पण त्यांना तरी नीट परीक्षा करून औषध द्या म्हणून सांगितलं पाहिजेना. ” असें तसें बोलू लागला. आतां हा वठणीवर आला असें वाटून सासूबाई त्याला म्हणतात: “ त्यांना सांगा तुह्मी काय सांगायचं असेल तें, पण ते आज बरेच दिवस आमच्या इथें येताहेत, तेव्हां त्यांचं औषध कांहीं बदलायचं नाहीं आणखी ते कांहीं वावगे नाहींत. आतां तुह्मी इथें बसत असलां तर मी जातें. कांहीं तरी खालचं पाहून येतें. पण वेड्यावेड्यासारखं कांहीं करूं नका. मी खालून आलें ह्मणजे मग जेवायला जा. ”

जांवईबोआंशीं कसें बोलावें आणि काय बोलावें, याबद्दलची त्यांची भीड आतां पार नाहींशी झाली होती. त्या उठून खालीं गेल्या. अण्णासाहेब पद्मताईजवळ एकटेच बसले. जसजसा वेळ होत चालला, तसतसा त्यांच्या भाषणास रंग येऊं लागला व त्यांत करुणरसाचा फारच आविर्भाव होत चालला. “ प्रिये, तूं मला सोडून जाणार कीं काय ? हें काय एकदम दुखणं घेतलंस हें ? हा असा प्रकार होऊन तूं मला सोडून जाणार असं माझ्या नशिबीं असलं, तर माझे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं. तूं लवकर बरी हो. तूं लवकर बरी व्हावीस म्हणून मी दुसरा डॉक्टर पाहूं म्हणत होतों. दुसरा माझा काय हेतु असणार, नर्सजवळ असली म्हणजे रोग्याची व्यवस्था उत्तम लागते हें तुला ठाऊक आहे. मग तूं कां नाहीं आईला सांगून आपली व्यवस्था करून घेत ? त्या मथुराताईला काय नर्सिंगची माहिती ? अजून माझं ऐका...... ”

असें बोलत बोलत त्यानें तिच्या अंगावरून हात फिरविला तों जसें एखाद्याचें भयंकर भीतीनें एकदम अंग थरारून जावें त्याप्रमाणें तिचें अंग थरारलें. तिच्या मनांत ती सावध असून तिला नवऱ्याचें विलक्षण भय वाटत असावें असें दिसलें. तो जवळ नसतांना ती उगीच एखादा दुसरा शब्द बोले तो तर आतां नव्हताच; परंतु आतां

ती डोळासुद्धां उघडून पाहीना. हा एकसारखा तिची मनधरणी करण्याच्या उद्देशानें बडबड करीतच होता. बोलतां बोलतां काय त्याला आठवलें, आणि तो एकदम तिला ह्मणतो: " मी इथें असतांना, आपलं घरदार सोडून तुला त्या वसंतरावाच्या घरीं जाऊन रहावंसं वाटतं ? तूं माझ्या देखत स्पष्टपणानं त्यांना सांगितलंस, कीं मला आपल्या घरीं घेऊन चला म्हणून, तेव्हां आतां याला काय म्हणावं ? तूं तिकडे गेलीस तर मी काय करूं ? मला तुझ्याखेरीज चैन कसं पडेल ? मी जवळ नको असं का तुला वाटतं ? तुला माझा इतका का तिरस्कार आला आहे ? तुला जर माझा इतका तिरस्कार आला असला, तर मग तसं मला कळूं दे. मी आपल्या जिवाचं काय वाटेल तें करतों. पुनः तुझ्या दृष्टीससुद्धां पडायला नको. हो. मग आणखी काय करणार सांग मला तूं फार आजारी आहेस, तुझ्या कपाळाशीं असली कटकट करूं नये, सगळी गोष्ट खरी; पण मला टाकून माझ्या शत्रूच्या घरीं तूं जायला लागलीस तर मी तुला हें असं बोलूं नको तर काय करूं ? धडधडीत, माझ्या देखत तूं त्यांना सांगितलंस, कीं मी तुमच्या घरीं येतें. मला तुमच्या घरीं घेऊन चला. प्रत्यक्ष मी इथें, हें आपलं घर, तुझी आई इथें, आणखी तूं त्यांच्या घरीं जायला निघतेस, तेव्हां मी तुला नको हेंच कीं नाहीं कारण ? मी नको, आणखी तो वसंत्या पाहिजे ? माझ्यावर विश्वास नाहीं तुझा ? पहातों कशी जातेस त्यांच्या इथें ती. सगळ्याच चेष्टा वाटल्या वाटतं ? काय चमत्कार आहे ? मला कांहीं मान नाहीं, अपमान नाहीं, राग नाहीं, लोभ नाहीं, प्रेम नाहीं, द्वेष नाहीं...."

या दर शब्दागणिक त्याचा स्वर अधिक अधिक निष्ठुर व कठोर होत चालला होता आणि तसतसा पद्मावतीवरही त्याचा परिणाम होत चालला होता, तिच्या अंगांत इकडचा हात तिकडे करण्याचें त्राण नव्हतें; परंतु मन चांगलें शुद्धीवर होतें. त्यामुळें हा आतां पुनः आपल्याला मारतो कीं काय असें भय उत्पन्न होऊन याच्यापासून दूर पळून जावें असें तिला वाटलें. हींव भरावें तसें तिचें अंग थरथरूं लागलें. आईला किंवा दुसऱ्या कोणाला हांक मारावी असें वाटलें, परंतु तोंडांतून शब्द निघेना. तिच्या डोळ्यांवर झांपड आली होती. यामुळें ती क्वचितच डोळे उघडी, परंतु आतां एकदम तिनें डोळे ताठ उघडले, तोंच तिला त्याची मुद्राही विलक्षण क्रूर झाली आहे असें वाटलें आणि आपली सर्व शक्ति एकवटून आतां आपण उठलेंच पाहिजे व कोणाला तरी हांका मारल्याच पाहिजेत असा निश्चय करून ती एकदम उठून उभी राहण्यासाठीं धडपड करूं लागली. अर्धवट उठलीच ' आ--आ--आ--अ ई ' असें करून ओरडली परंतु तिच्या अंगांत त्राण मुळींच नसल्यामुळें आणि ती उठूं लागली आहे हें पहातांच संतापलेल्या त्या नरपशूनें "चाललीस कुठें ?" असें खेंकसून आपल्या उजव्या हाताचा रट्टा दिल्यामुळें ती धाडकन् खालीं पडली. ती खालीं पडतांना हा आणखी वर म्हणतो: " आतां तूं मेलीस तरी हरकत नाहीं; पण तूं कशी त्या वसंत्याच्या घरीं जातेस तोच तमाशा पहातों. " आपले शब्द हिला समजण्याच्या स्थितींत ती आहे कीं नाहीं हें पाहण्याची सुद्धां त्याला इच्छा झाली नाहीं. त्याची बडबड सुरूच होती. इतक्यांत कोणी तरी जिना चढून वर येत आहे असें त्याला वाटलें आणि तो एकदम त्या अंथरुणावरून उठून जिन्याच्या

तोंडाशीं गेला. बहुतकरून डॉक्टर भगवंतराव आला असावा. त्याला येण्याचें बंद करण्याला ही संधि चांगली आहे तेव्हां जिन्याशींच त्याला गांठून चार शिव्या देऊन त्याचा अपमान करावा असें त्याच्या मनांत आलें; परंतु तो भाग्या गडी होता. आपल्याकडे कोणी गृहस्थ आले आहेत, असें त्यालाच सांगण्यासाठीं तो आला होता. तो निरोप त्यानें सांगतांच हा त्याच्याच अंगावर दरडावून त्यास म्हणतोः " कोण गृहस्थ आहे ? नांव नाहीं विचारायला तोंड तुला ! " भाग्यानें उत्तर दिलें " मी नांव विचारलं, पण नांवाची जरूर नाहीं, त्यांना ह्मणावं खालीं येऊन जा " असें त्यांनीं मला सांगितलें. अण्णासाहेबांनीं क्षणभर विचार केला आणि म्हटलें " चल आलों. चल हो पुढें " आणि ते खालीं गेले. दारांतच तो गृहस्थ उभा होता. त्याला पहातांच अण्णासाहेब एकदम चपापल्यासारखे झाले. परंतु बाहेर तसें कांहीं न दाखवितां म्हणतातः " ओहो, मला वाटलंच होतं कीं तुह्मी इकडे याल. मघाशीं मी तुम्हांला रस्त्यांत पाहिलं असा मला भास झाला. बरं झालं आलांत. चल वर माझ्या खोलींत खालीं रस्त्यांत कशाला ! " असें ह्मणून अण्णासाहेबांनीं त्यास आपल्या खोलींत वर नेलें. इकडे आपल्या बायकोस आपण रट्टा देऊन पाडलें होतें तिचें काय झालें असेल याची कल्पनाही त्याला नाहीं, मग काळजी कोठली ?

अण्णासाहेब त्या गृहस्थास घेऊन खोलींत जाण्याला आणि डॉ. भगवंतराव येण्याला एकच गांठ पडली. अण्णासाहेब कोठें आहेत, असें विचारीत ते वर आपल्या रोग्याकडे गेले, तो रोगी अगदीं काष्ठवत् होऊन पडलेला. हें काय झालें म्हणून त्यांनीं तपासणी चालविली. आपल्या ब्यागेंतून हुंगण्याच्या शिशा काढून पद्मताईच्या नाकाशीं धरल्या. पलीकडे पाणी होतें तें घेऊन त्यांनीं तिच्या डोळ्यांस वगैरे लावलें. तों ती अर्धवट सावध झाली आणि तिच्या तोंडून पहिले शब्द निघाले ते असेः— "नका हो माझे अशा स्थितींत हाल करूं. मी लवकरच मरेन. कां मला मारतां ? " ते शब्द ऐकून भगवंतराव चपापले आणि पद्मताईस हांक मारून वगैरे पूर्णपणें शुद्धीवर आणण्यास उपाय करूं लागले. ती चांगली शुद्धीवर आली तेव्हां तिला ते म्हणालेः "पद्माताई, तुमच्याजवळ कोणीच कसं नाहीं ? मी आलों तेव्हां कोणीच कसं इथें नव्हतं ? कोणीना कोणी तरी नेहमीं तुमच्याजवळ पाहिजे असं मीं सांगितलं होतं ना ? मी आलों तेव्हां तुम्ही फीट येऊन पडलेल्या होतां; अशा रीतीनं कसं चालेल ? "

डॉक्टरांच्या तोंडून हे शब्द निघावयाला आणि अण्णासाहेब तेथें यावयाला एकच गांठ पडली. त्याला ही संधि पाहिजेच होती. तो एकदम खेंकसून त्यांच्या अंगावर जाऊन इंग्रजींत म्हणतोः " डॉक्टर, लज्जा नाहीं वाटत चोरासारखे लपत छपत येतां ते ? आपल्याबरोबर मला किंवा कोणाला तरी हांक मारायची तें मुकाट्यानं तिच्याजवळ बसलां ? बायकांच्या बाबतींत असंच तुमचं वर्तन असतं वाटतं ? तुह्मांला असं वाटलं काय कीं त्या मथीसारखा हाही बेवारशी माल आहे म्हणून ? चल हो चालता इथून, नाहीं तर......... "

त्या त्याच्या भाषणानें डॉक्टर भगवंतराव अगदीं चपापून गेला. त्याला संताप आला. या पाजी माणसाला धरून चांगल्या दोन मुसकटांत द्याव्या असें मनांत येऊन तो

उभा राहिला व त्याच्या अंगावर गेला. तो त्याचा आविर्भाव पहाण्याबरोबर अण्णासाहेबांची स्वारी घाबरली आणि दोन पावलें मागें सरकली. डॉ. भगवंतरावास पक्कें माहिती होतें कीं, अशा व्यक्ति ' दुबळ्यापुढें ठोक छाती व सबळापुढें खा माती ' असें करणाऱ्या असतात. त्याचप्रमाणें अण्णासाहेबांचें वर्तन झालें. लागलीच त्यांनीं दोन पावलें मागें सरून आपला चेहरा बदलला, भाग्यास व सासूबाईस मोठ्यानें हांका मारल्या व " हिच्याजवळ कां नाहीं कोणी ? हे डॉक्टर आलेले नाहीं कां कोणाला ठाऊक ? " असें म्हटलें. तें त्याचें वर्तन पाहून डॉक्टर विशेषच चकित झाले. अशा व्यक्ति अगदीं भ्याड असतात हा आपला सिद्धांत इतका खरा होईल असें त्यांस मुळींच वाटलें नव्हतें, परंतु हें त्याचें वर्तन पाहून त्यांस त्याचा फार तिरस्कार आला आणि तिरस्कारयुक्त स्मितही त्यांच्या चर्येवर दिसूं लागलें. इतक्यांत अण्णासाहेब त्यांच्याकडे वळून पुनः इंग्रजींत म्हणतात: "मी एक वेळ आपल्याला गय करतों. परंतु आजपासून ही केस आपल्या हातून काढून घेतली आहे. आपण पुनः आमच्या घरीं येऊं नये. मला आपण नको." इतकें बोलून तो पुनः आपल्या खोलीकडे चालता झाला. डॉक्टर क्षणभर अत्यंत करुण दृष्टीनें पद्मताईकडे पहात राहिला. त्या बिचारीच्या डोळ्यांवाटे घळघळां अश्रु वहात आहेत असें त्यास दिसलें. अशा स्थितींत आपण काय करावें ? असें त्याला झालें. नंतर तो खालीं बसून तिला हलकेच म्हणाला: "या स्थितींत तुम्ही दुसरीकडे कुठें जाल तरच बऱ्या होण्याची आशा. माझा आतां नाइलाज आहे. मी जातों. काय झालं तें तुम्हीं ऐकलंच आहे. यापुढें मी इथें कसा येणार ! "

भगवंतराव याप्रमाणें बोलून उठून जाणार तों पद्मताईची आई तेथें आली. तिला पहातांच डॉक्टर म्हणाले: " मेहेरबानी करून यांच्याजवळ कोणी ना कोणी तरी नेहमीं बसून रहात जा. अगदीं हालूं नका तरच या बऱ्या होतील नाहींतर......मी आतां जातों. "

इतकें बोलून ते तेथून भराभरा चालते झाले. त्यांनीं आपली गाडी वसंतरावाच्या घराकडे चालविली. वसंतराव घरींच होता. डॉक्टर व तो चांगले अर्धा पाऊण तास बोलत बसले होते. इकडे अण्णासाहेब आपल्या त्या स्नेह्यास आपल्या खोलींत नेऊन त्यांचें त्याचेंही बराच वेळ भाषण झालें.

खोलींत शिरतांच तो गृहस्थ अण्णासाहेबांस म्हणाला: " आणखी किती दिवस वाट पहायची ? किती दिवस आणखी त्यांना अडकवून ठेवायचे ? एक त्यांतला कुठें निसटून गेला तेव्हां त्याला कोणी तरी चांगला गुरु भेटला तर आपलं सगळं भांडवल बाहेर पडेल. तूं मध्यें आला नसतास तर आम्ही त्यांच्या बहिणीपासून केव्हांच काय घ्यायचं तें घेऊन निकाल लावून टाकला असता. दुसऱ्या उद्योगाला मोकळे झालों असतों. तूं आम्हांला नादीं लावलंस म्हणून इतके दिवस स्वस्थ बसलों. पण मला कांहीं तुझा रंग बरा दिसत नाहीं. आणखी आतां यापुढें त्याला अडकवून ठेवणं सोपं नाहीं. तो धाकटा सुटून गेला तेव्हांच आम्हांला धाक वाटला; पण एक तरी आपल्या तावडींत आहे, त्याला आम्ही दिवसाच्या चोवीस तासांपैकीं दोन ताससुद्धां शुद्धीवर ठेवीत नाहीं. म्हणूनच

तो राहिला नाहींतर इतके महिने अशीं माणसं कुठं छपवून ठेवतां येतात? तरी त्या वसंत्याच्या स्नेही मंडळींचा आमच्यावर वहीम आहेच. आह्मी त्यांचे बाप होऊन राहिलों आहोंत, ह्मणूनच इतके दिवस निभलं...काय? बोलत नाहींस तो, आम्ही एकसारखी वटवट करतों आहोंत आणखी तूं आपला नुसता मठ्ठासारखा बसला आहेस. तुझ्या हातांत कांहीं नाहीं..."

अण्णासाहेब त्यास एकदम म्हणाला: "अरे बाबा, कांहीं नाहीं कां म्हणतोस? आतां मीच बिनबोभाट सगळ्या इस्टेटीचा मालक होणार आहें. आणखी महिनाभर फार तर कशी तरी कळ सोसा. मग त्या लेकांना खुशाल सोडून द्या."

"महिन्याभरानं काय होणार आहे? तुझी बायको याच्यापुढें तूं म्हणशील त्या कागदावर सही करील अशी भ्रांति तुला आहे वाटतं?"

"तिच्या सहीची गरजच रहाणार नाहीं अशी स्थिति येणार आहे."

"ती कशी?" तो गृहस्थ मोठ्या जिज्ञासेनं विचारूं लागला.

"तिच्या मरणानें. ती आतां महिनाभर सुद्धां जगणार नाहीं."

"आणखी जगली तर?"

"जगते कशी! मी तिला जगूंच देणार नाहीं." त्या दुसऱ्या गृहस्थाच्या अंगावरसुद्धां कांटा उभा राहिल्याप्रमाणें त्याचें अंग थरारलेंसें दिसलें.

---

# प्रकरण ५० वें.

## मालती आली.



मालतीच्या नवऱ्यास वसंतरावाची तार पोंहोंचली. ती तार आली त्या वेळीं तीं दोघेंही नवरा बायको मोठ्या आनंदानें गोष्टी बोलत बसलीं होतीं. आपल्याला इकडे येऊन बरेच दिवस झाले, तेव्हां आतां एक महिन्या-पंधरा दिवसांची रजा घेऊन आपण आपल्या गांवीं जाऊन यावें अशा गोष्टी मालतीनें काढल्या होत्या. तिचा नवरा तिला म्हणत होता कीं, " आपली दोन तीन महिन्यांची हक्काची रजा घेण्याची तयारी झाली आहे; परंतु मला तशी रजा मिळण्याइतकी माझी नौकरी झाली नाहीं. " मालती तें ऐकून किंचित् स्मित करून आपल्या नवऱ्याकडे पाहून "कांहीं तरी कुणीकडच्या कुणीकडेच संबंध जोडून बोलायचं. " असें ह्मणाली व हातांत एक गुलाबाचें फूल होतें तें तिनें आपल्या नवऱ्याकडे झोंकलें.

असा त्यांचा विनोद चालला आहे, तों इतक्यांत तारवाला तार घेऊन आला. तार कांहीं ऑफिशिअल कामाची असेल असें समजून-कारण अशा तारा रोज येत असत—साहेबांनीं ती तार घेतली व पलीकडे टेबलावर ठेविली; परंतु तितक्यांत मालतीला काय वाटलें तिनें ती तार हातीं घेऊन " पाहूं कसली आहे ती. " असें ह्मणून फोडली आणि मजकूर पहातांक्षणींच आपल्या नवऱ्यास ह्मटलें: " पद्मताईची प्रकृति फारच बिघडली असली पाहिजे. त्याखेरीज अशी तार वसंतराव पाठवायचा नाहीं. आपल्याला यायला होत नसलं तरी मला जाऊंच द्या. गाडी यायला अजून दोन तास आहेत. ताबडतोब तयारी केली, तर जातां येईल." तिच्या नवऱ्यानें ती तार हातीं घेऊन वाचून पाहिली. पद्मावतीबद्दल त्याच्याही मनांत आदर फारच होता. यामुळें आणि तिचा व आपल्या बायकोचा विलक्षण स्नेह आहे हेंही त्याला ठाऊक होतें. यामुळें त्यानें तेव्हांच अनुमोदन दिलें. तिच्याबरोबर एक पट्टेवाला द्यावयाचें ठरविलें आणि तयारी करण्याविषयीं सांगितलें. तयारी चालली असतां अर्थातच पद्मावतीच्या दुर्दैवाविषयीं, तिच्या पतीच्या पाजीपणाविषयीं, तिच्या भावांच्या गाढवपणाविषयीं, अशा गोष्टी चालल्या होत्या. शेवटीं जेवणखाण होऊन मालती व तिचा नवरा स्टेशनावर गेलीं. मालतीला त्यानें गाडींत बसविलें. मालतीनें त्याला प्रकृतीला जपण्याविषयीं सांगितलें. त्यानें मालतीला गेल्याबरोबर मला सविस्तर पत्र लिही वगैरे बजाविलें, आणि थोड्याच वेळांत गाडी चालू झाली.

साहेब मालतीला पोंचवून घरीं परत आले, तों आणखी एक तार आली आहे असें त्यांच्या शिपायानें सांगितलें. त्यांस काय वाटलें. त्यांनीं " असूं दे. ऑफिशि-

अल कामाची असेल ती माझ्या टेबलावर नेऊन ठेव, मग पाहूं. " असें ह्मटलें. बायकोला इतकें निकडीनें तिच्या भावानें बोलाविलें, तेव्हां खरोखरच पद्मावतीची प्रकृति अत्यवस्थ असावी. ही जाऊन पोंचेपर्यंत बिचारी राहून हिची तिची भेट व्हावी ह्मणजे झालें. असें वाटून तो आपल्या बिछान्यावर पडला. त्याच्या मनांत पद्मावतीच्या, तिच्या नवऱ्याच्या, तिच्या एकंदर मंडळीच्या चरित्राबद्दलचे नाना विचार आले. आणि त्या विचारांच्या भरांत केव्हांच त्याला झोंप लागली. मग पाहूं ह्मणून टेबलावर ठेविलेला टेलिग्राम तेथल्या तेथेंच राहिला.

दुसरे दिवशीं सकाळीं उठल्यानंतर चहापाणी वगैरे झालें, आणि टपाल आलें, तेंही शिपायानें टेबलावर ठेविलें. तें पहाण्यासाठीं स्वारी टेबलाजवळ गेली तेव्हां त्यांनीं तो टेलिग्राम पाहिला. तों त्यांत 'पद्माताई बरी आहे, कुटुंबाला पाठविण्याची जरूरी नाहीं.' असा मजकूर, तो वाचतांच प्रथम त्याला रात्रींच हा टेलियाम वाचला असता तर बरें झालें असतें. चार दोन स्टेशनेंच मालती गेली असेल इतक्यांत परत बोलाविलें असतें, असें वाटलें. पुनः वाटलें कीं "कांहीं नाहीं गेली आहे तें ठीक झालें, पद्माताई बरी असली तरी ही भेटून येईल, चार दिवस एकत्र राहतील" असा विचार करून त्यानें त्यासंबंधाचा विचार मनांतून घालवून दिला आणि तो आपलें टपाल फोडण्यांत गुंतला.

मालतीनें तो टेलिग्राम वाचल्या वेळेपासून तिच्या जीवाला अगदीं एकसारखी हुरहूर लागून राहिली हें साहजिकच होतें. पद्मावतीचा नवरा परत येईपर्यंत पद्मावतीचीं पत्रें तिला जात, तीं दुःखमय गोष्टींनीं भरलेलींच. आबासाहेब वारल्यानंतर तर कांहीं विचारण्याचीच सोय नाहीं. पुढें अण्णासाहेब परत आल्यावर एक किंवा दोनच पत्रें काय तीं सुखाचीं व समाधानाचीं होतीं; परंतु अण्णासाहेबांचें खरें स्वरूप जसजसें बाहेर पडत चाललें, तसतसें त्यांच्याबद्दल सुखासमाधानाचें लिहिण्यास कांहींच नाहींसें झालें आणि पुढें पुढें तर आपल्या नेहमींच्या कर्मदशा लिहून बिचाऱ्या सुखांत असलेल्या आपल्या मैत्रिणीला कां दुःख द्यावें असा विचार करून पद्मावती मालतीला सविस्तर पत्रें लिहिनाशीच झाली. प्रथम प्रथम तीं पत्रें नुसत्या खुशालीचीं झालीं. नंतर "तुझें पत्र पावलें, माझें ठीक आहे. नवलविशेष कांहीं नाहीं." इतकीं त्रोटक पत्रें जाऊं लागलीं, अशीं त्रोटक पत्रें कां येतात याबद्दल मालतीला आश्चर्य मात्र वाटलें नाहीं. कारण वसंतरावाकडून तिला किंवा तिच्या नवऱ्याला आठदहा दिवसांनीं एखादें तरी चांगलें सविस्तर पत्र जाई. मालतीला त्या पत्रावरून पक्कें कळलें कीं, नवरा घरीं आल्यापासून पद्मावतीला फार त्रास होऊं लागला आहे. तेव्हां पत्रें लिहिण्यास स्वस्थपणा सुद्धां मिळत नसावा. आपण लहानपणीं कशा आनंदांत होतों, आपल्या काय काय गोष्टी चालत आणि आपल्या दोघींची स्थिति किती भिन्न झाली. पद्मेला कोणत्याही गोष्टीची— सुख होण्यास लागणाऱ्या गोष्टीची—उणीव नाहीं, तेव्हां ती आजन्म सुखीच रहाणार असें आपण व आपल्या मैत्रिणी ह्मणत होतों परंतु हें काय भलतेंच झालें. तिचा जीव सुद्धां सुरक्षित राहतो कीं नाहीं याबद्दल शंका वाटूं लागली. असें मनांत येऊन मालती अगदीं विषण्णचित्त होऊन गाडींत बसली होती. गाडीचा वेग दुपटीनें कां करीत नाहींत असें तिच्या मनांत तीन-

तीनदां येई. तिच्या मनाच्या घाईनें जरी गाडीनें घाई केली नाहीं, तरी ती आपली वेळेवर ठिकाणीं येऊन पोंचली. वाटेंत एका स्टेशनावर तिनें वसंतरावास 'आपण निघालों आहों, आणखी अमक्या वेळीं स्टेशनावर येऊन पोंचूं.' अशी तार केली होती, त्यामुळें वसंतराव स्टेशनावर आला होता. वसंतरावानें मालतीस उतरून घेतलें व तो तिच्या सामानाची व्यवस्था पहात होता. इतक्यांत त्याला आपल्याजवळून पद्मावतीचा नवरा व दुसरा तो मुंबईस पाहिलेला दाढीवाला माणूस हे गेलेले दिसले ते पुढें गेले आणि हा त्यांच्याकडे पहातच राहिला. मालतीला हा काय पाहतो आहे हें कळेना. वसंतराव त्या दोघांकडे पहातच राहिला. तो दाढीवाला एका डब्यांत शिरला. अण्णासाहेब त्याच्याशीं बोलत उभा होता. वसंतरावाच्या मनांत काय विचार चालले असतील ते असोत, तो अगदीं स्तब्ध उभा होता. हमालानें सर्व सामान उचलून बाहेर नेलें आणि मालतीनें 'दादा, चलतोसना?' असें म्हणून त्याचें कोंपर हलविलें. तेव्हां तो शुद्धीवर आला आणि पहात पहात बाहेर गेला. मालतीला पद्मेच्या घरीं जाण्याची घाई झाली होती. ती घोड्याच्या गाडींत बसतांच आपल्या भावास म्हणाली: "मला आतां तूं आधीं पद्मताईच्या घरीं घेऊन चल. तिला एकदां डोळे भरून मला पाहून घेऊंदे. तिच्याशीं दोन शब्द बोलूं दे; मग मी घरीं येईन."

वसंतरावानें रुकारार्थी नुसती मान हलविली. तो आपल्याच विचारांत गर्क होता. मालतीनेंच गाडीवाल्यास पद्मताईच्या घराकडे आधीं गाडी घे म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें गाडी त्या बाजूस गेली. पद्मताईच्या घराशीं उभी राहिली आणि मालती खालीं उतरून आईस "काकू, काकू, पद्मताई कुठें निजली आहे" असें विचारीतच ती स्वयंपाकघराकडे गेली. काकू तेथें नव्हत्या. त्या वरच पद्मेजवळ होत्या. मालतीनें लागलीच जिन्याचा रस्ता पकडला. पद्मताईचे कान अतिशय तिखट होते म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा, पद्मेनें मालतीचा आवाज ऐकला व ओळखला असावा तिची चर्या एकदम प्रफुल्लित झाली व जिन्यावर पावलें वाजूं लागतांच तिचे डोळे त्या तेथल्या दाराकडे लागले. मालती इतक्यांत त्या दारांत आली. आणि इकडे तिकडे पाहूं लागली तों 'मालुताई, आलीस?' असे क्षीण स्वरांत उच्चारलेले शब्द तिच्या कानीं पडण्याला आणि तिची दृष्टि पद्मताईच्या चेहऱ्यावर पडावयाला एकच गांठ पडली. ती वेळ सकाळचे साडेसात आठ वाजण्याची होती. या वेळीं रोग्यास देखील थोडीशी हुशारी वाटत असते. त्यांत मालतीला पहातांच पद्मेच्या चर्येवर विशेष समाधान दिसूं लागलें. इतकें सगळें जरी झालें, तरी पद्मेची ती स्थिति व ती चर्या पाहून मालतीस फारच मोठा धक्का बसल्याप्रमाणें झालें. गेल्याबरोबर आपण तिला घट्ट मिठी मारूं असें जें तिला उत्कंठेनें वाटत होतें, तें जेथल्या तेथेंच राहिलें. पद्मताई अतिशय आजारी—अत्यवस्थ आहे आणि म्हणून आपण इतक्या लांब आलों आहों हें जणूं काय ती जिना चढतांना विसरूनच गेली होती. तिला तें घर पहातांच आपल्या लहानपणची आठवण झाली. परंतु पद्मताईची स्थिति पहातांच तो क्षणभर झालेला विसर पार गेला. ती पद्मताईच्या जवळ जाऊन तिनें आपल्या दोनही हातांनीं तिचें तोंड आपल्याकडे वळवून पाहिलें तों त्यां-

तून एकसारख्या अश्रुधारा वहात होत्या. पद्मातांईची ती स्थिति पाहून मालतीस कसें-सेंच झालें; तिच्या अंगावर शहारे आले आणि तिच्याही डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तशा त्याच स्थितींत त्या दोघीजणी बसल्या. मथुराताई तेथें नुकत्याच आल्या होत्या आणि तेथें असलेलें औषध वगैरे ठेवण्याचें टेबल साफ करीत होत्या व त्यांच्याकडे मालतीचें लक्षही गेलें नाहीं, आणि गेलें असतें, तरी तिची त्यांची ओळख नसल्यामुळें त्यांनीं तिला ओळखलें-ही नसतें. पद्मेच्या पत्रांतून काय तिच्या-संबंधाचे उल्लेख केलेले होते त्यामुळें तिची माहिती मात्र तिला झाली होती. परंतु या वेळीं तिला दुसरें कोणी दिसत नव्हतें. आणि दुसऱ्या कोणाचें तिला स्मरणही नव्हतें. काकू त्या वेळीं तेथें नव्हत्या. त्या काठें शेजारच्या दुकाना गेल्या होत्या. त्यामुळें पद्माताई व मालती यांस स्वस्थपणें बराच वेळ एकमेकींकडे पहाण्यास व आपापल्या दृष्टीवाटे एकमेकींचीं अंतःकरणें एकमेकांना समजावून घेण्यास अवकाश सांपडला. अशा स्थितींत त्या दोघी बराच वेळ बसल्यानंतर पद्मेनें क्षीण आवाजानें म्हटलें, " मालुताई, तूं आलीस, आतां मला फार समाधान झालं. माझा जीव तुझ्या भेटी-करितां घोंटाळत होता. "

"मला दादाची तार आल्यावर मीं दोन ताससुद्धां जाऊं दिले नाहींत. आणखी इथें आलें ती घरीसुद्धां गेलें नाहीं. स्टेशनावरून तडक इथें आलें. पद्माताई, इतकी तुझी अवस्था होईपर्यंत तूं कां बरं वाट पाहिलीस ? याच्यापूर्वीच मला कां पत्र लिहिलं नाहींस ? ही इतकी कशानं तुझी अवस्था झाली ! " असें बोलतां बोलतां मालतीची दृष्टि मथुरातांईवर गेली. मथुराताई त्या दोघींकडे पहात उभ्या होत्या. मथुरातांईना पहातांच मालतीच्या मनांत एकदम असें आलें कीं, ज्या गरीब स्त्रीबद्दल आपल्याला पद्मातांईनें लिहिलें होतें ती च ही असावी. तसें मनांत येतांच ती एकदम उभी राहिली व त्यांचेजवळ जाऊन म्हणाली: " आपली व माझी ओळख प्रत्यक्ष नाहीं, परंतु हिनं पत्रांत आपल्याबद्दल इतक्या हकीकती लिहिल्या आहेत कीं जणूं काय आपलीनू माझी दहा पंधरा वर्षांची ओळख आहे असं मला वाटायला लागलं आहे. पद्मातांईला काय होतं आहे, हिची अवस्था खरोखर अशी कशानं झाली हें मला तुम्ही सांगा. मी तिला आतां विचारीत नाहीं. आणखी तिला सांगतांही येणार नाहीं..

असें मालतीचें बोलणें चाललें आहे, तों काकू तेथें आल्या. त्यांस पहातांच मालती एकदम त्यांच्याजवळ गेली आणि त्यांस म्हणाली, " काकू, पद्मातांईची इतकी स्थिति झालेली मला कळविली नाहींत याला काय म्हणावं ? मला कांहीं म्हटल्या कांहीं सुगावा नाहीं. परवां संध्याकाळीं दादाची तार आली आणखी वाचल्याबरोबर मी लागलीच निघालें. एक क्षणभर कांहीं उशीर केला नाहीं. आतां इथें आलें म्हणून बरं झालं. काकू, आतां तुम्ही हिला आमच्या घरीं पाठवा, मी तिला घेऊन जाणार. ही अगदीं बरी होईपर्यंत मी इथून जाणार नाहीं. आणखी झाली बरी कीं हिला मी आपल्याबरोबर तिकडे घेऊन जाईन. पण पुढचं पुढें. आतां सध्यां हिला तुम्ही माझ्या इथें पाठवा. पाठवतांना ? पाठवूं का कुणाला तरी मेणा नाहीं तर डोली आणायला ? नाहीं तर मी आपली इथें येऊन राहतें. मी आहें, या मथुराताई आहेत, तुम्ही आहां,

हिला लवकर बरं करूं. पाठवूं आणायला मेणा ? पण मी काय वेडी ! बाहेर खालीं वसंतरावदादा तसाच गाडींत बसून राहिला आहे. मी आपली आलें वर आणखी तें सगळंच विसरून गेलें, पण..." असें म्हणून ती रस्त्यावरल्या खिडकींत गेली. पहाते तों गाडी तेथें उभी आहे, आंत वसंतराव मात्र नाहीं. गाडीवाल्यानें सांगितलें: "वसंतरावदादा मघाशींच कुठें कामाला म्हणून निघून गेले." तें ऐकतांच मालतीला असें वाटलें कीं, आतांच पद्मेला घेऊन जावें आणि तिनें तसें ह्मटलेंही. तिची ती आतुरता आणि लगबग आणि चिंता पाहून सगळ्यांस मोठें कौतुक वाटलें. तार जातांक्षणीं उत्तरहिंदुस्थानांतल्या कोठल्या ठिकाणाहून तावडतोब निघून आली यामुळें तिचें पद्मातार्ईवर विलक्षण प्रेम होतें असें स्पष्ट दिसलें. काकूंनीं तिला "हो हो. आतांच तूं आली आहेस तेव्हां जरा एखादा दिवस विश्रांति तरी घेशील, मग काय करायचं तें कर. तुझ्याइतकी तिची काळजी घेणारं दुसरं आहे कोण ? मी ह्मातारी झालें, अगदीं भांबावून गेलें आहें. आतांशा किती दिवसांत देवाला गेलें नव्हतें. आजच सकाळीं काय माझ्या मनांत आलं, मी मथुराताईंना इथें बसायला सांगितलं आणखी गेले. दोन दिवस झाले. परवां रात्रींपासून जांवईबुवा कुठें गेले आहेत त्यांचा पत्ता नाहीं. पण एका दृष्टीनं तें बरंच झालं. त्यानं जसा कांहीं आमचा उच्छाद मांडला होतान्. पोरीचं दुखणं अर्ध अधिक त्याच्यामुळें वाढलं तो जर पहिल्यासारखा कुठें जाईल तर ही बरी होईल, नाहीं तर कांहीं बरी व्हायची नाहीं. आल्य:पासून एकसारखा त्रास देतो आहे. आणखी ही तर कांहीं त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागत नाहीं; पण काय त्याच्या मनांत परवां रात्रीं आलं कीं कुणी त्याच्याकडे आलं होतं त्याच्याबरोबर कुठें तरी गेला आहे. आम्ही दोघी आपल्या आळीपाळीनं बसतों. रात्रीची मी असतें. दिवसां या बाई येऊन बसतात. मध्यें यांच्याचमागें लागला होता म्हणे; पण आज दोन दिवस स्वारी कुठें तरी गेली आहे. आह्मीं कांहीं शोधाला पाठविलं नाहीं. आतां असंच. याल तर या, न याल तर चांगलेच. हो कुठवर आतां सोसायचं ! वाईट शब्द तोंडांत येतात, उच्चारूं नयेत. माझाच जांवई, पण मेल्याचीं लक्षणं अगदीं खोटीं. माझ्या मन्याला किंग विनाकारण थोबाड थोबाड थोबाडलंन् ते दिवशीं. बरं पण माले, तूं चहाबिहा तरी घेतलास का ?......"

"असूं द्याहो काकू, चहाचं काय आलं आहे! माझ्या पद्मातार्ईला बरं करण्याचं काय तें मला सांगा मी खरोखरीच तुमच्या इथें राहतें. नाहींतर माझ्या घरीं पाठवून द्या. तिला औषध कोणाचं चाललं आहे? आपल्या त्या डॉक्टर भगवंतरावाचं-चना ? ते चांगले आहेत. मथुराताई, आपल्या वहिणीला त्यांनींच बरं केलंना ! पद्मातार्ईनीं लिहिली होती त्याबद्दलची सगळी हकीकत. त्यांच्याच औषधानीं हिलाही गुण येईल."

मालती आली त्या वेळेपासून अशी तिची एकंदर लगबग चालली होती. तें पाहून पद्मा इतक्या दुखण्यांत असून आश्चर्य पावली. मालतीच्या शांत स्वभावांत इतक्या थोड्या अवकाशांत विलक्षण फरक पडला असें तिला वाटलें. येथून नवऱ्याबरोबर जाईपर्यंत तिच्या अंगीं इतकी चळवळ आणखी इतकी लगबग नव्हती. परंतु आतां पाहिली तों कोण चळवळ आणि कोण लगबग ! ती चळवळ पाहून पद्मातार्ईनें

तिला आपल्याजवळ बोलाविलें व तिला खालीं बसण्यास सांगून हळूच ह्मटलें: "मालुताई, तूं माझ्याजवळ थोडीशी बस. आई आणील तो चहा घे, आणखी आपल्या घरीं जा कशी. सगळ्यांना भेटून मग ये पुनः. मग इथें वाटेल तर रहा नाहीं तर मी तुझ्याबरोबर तुझ्या घरीं येईन. पण आधीं घरीं जा. सगळ्यांना भेट. थोडीशी विश्रांति घे........ "

"विश्रांति !" मालती एकदम ह्मणाली: "मला काय झालं आहे विश्रांति घ्यायला ? तूं बरी हो ह्मणजे माझी सगळी विश्रांति मला मिळाली. तूं यायचं कबूल कर ह्मणजे मी घरीं जाईन. "

पद्माताईनें हंसून ह्मटलें: " मला घेऊन मग जा ह्मणून मी तर दादा..." इतकें ती बोलते आहे तों " Well my darling Padma, कसं काय ! तीन दिवस आह्मी गेलों होतों त्या दरम्यानची काय हकीकत आहे ! " असे शब्द त्या मंडळीच्या कानावर आले आणि अण्णासाहेब दारांत एकदमच येऊन थडकले. दारांत येतांच त्यांची दृष्टि मालतीवर गेली आणि तो एक क्षणभर दचकल्यासारखें होऊन मागें सरकला. मालतीला त्यानें पुष्कळदां पाहिलें होतें. मालतीची त्याची थोडेंबहुत बोलण्याइतकी ओळख होती. मालती येऊं नये अशी आपण तजवीज केली असतांही येथें ती आली कशी याचें त्याला आश्चर्य वाटलें. पहिल्या तारेच्या पाठोपाठ आपण तार पाठविली असतां त्या तारेचा उपयोग कां झाला नाहीं हें कांहीं त्याच्या लक्ष्यांत येईना. ती आली हें पाहून त्यास फार वाईट वाटलें, थोडा रागही आला. परंतु तसें बाहेर कांहीं न दाखवितां मालतीकडे पाहून "हो हो, Who is this young angel ! कुठून कुठून ही देवता आली ! आपली मैत्रीण आजारी पडली असं कुणी कळवतांक्षणीं आलां वाटतं ! बरं झालं बोआ, आमची एक काळजी निवारण झाली. डार्लिंग पद्मा एकसारखी आपली आठवण काढीत होती. आपण आल्यापासून तिच्या चर्येवर फरक पडलेला दिसतो आहे. मला परवांच्या दिवशीं रात्रीं एकाएकीं मोठ्या जरूरीच्या कामाची तार आल्याकारणानं मी न सांगतां निघून गेलों; नाहीं तरी माझा तसा कांहीं उपयोग नव्हता. तो आज त्या कामांतून सुटलों. आतां तुह्मी आलां आहां, आतां तर मी पुनः कुठें कामाकरितां गेलों तरी चालेल. तुह्मांला वाटलं तर हिला आपल्या घरीं घेऊन जा. तिला इथल्यापेक्षां तिथें बरं वाटेल. तुह्मी आलां आहां, वसंतराव आहेच. तें ठीक जमेल. " वसंतरावाचें नांव घेतांना त्यानें मुद्दाम पद्मेच्या चेहऱ्याकडे वांकड्या दृष्टीनें पाहिलें. परंतु पद्मेनें डोळे मिटून धरले होते. तिच्या कपाळाला आंठ्या मात्र पडलेल्या दिसल्या.

त्याच्या त्या बोलण्यावर मालती हळूच मोठ्या विनयानें ह्मणाली, " पद्माताईला चार दिवस पाठविलं तर आह्मी तिची चांगली शुश्रूषा करूं. काकू तिथें येऊन राहतील, या मथुराताईची आह्मी सोय करूं..."

" ठीक आहे, ठीक आहे. आमची मात्र सोय करण्याचं तुह्मी बोलत नाहीं. नका करूं. कुणीकडून तिला बरं करा ह्मणजे झालं. आमच्या बायकोची सगळ्यांला काळजी आहे, आणखी आह्मांला नाहीं, हाच कीं नाहीं त्यांतला अर्थ लोक काढणार ! पाहूं त्याचं. मी उगीच तिरसटून बोलतों आहे असं नकाहो समजूं. आपण इतक्या लांबून इतक्या तांतडीनं आलां

यावरूनच आपलं आमच्या कुटुंबावर प्रेम आहे हें दिसत आहे. तरी पण आपली बायको अशा स्थितींत दुसऱ्याच्या घरीं ठेवायची आणखी आपण दुसरीकडे कुठें तरी जायचं हें दिसायलाच किती चमत्कारिक दिसतं. पण आम्ही बोलून चालून विक्षिप्त, आमचं नांव कानफाटे म्हणून पडलेलं, तेव्हां आमच्या बाबतींत वाटेल त्यानं वाटेल तें म्हणावं....... "

अशा तऱ्हेनें अण्णासाहेबांनीं वाटेल तशी चर्पटपंजरी चालू ठेविली होती. आपण काय बोलतों आहोंत हें त्याला समजत नव्हतें असें नाहीं. मालती येऊं नये म्हणून आपण शिताफी केली ती शिताफी कांहीं कारणानें म्हणा व्यर्थ गेली. मालती तर आली. ती आल्यानंतर आपल्या मैत्रिणीच्या जवळ अहोरात्र बसून राहणार किंवा मैत्रिणीस आपल्या घरीं घेऊन जाणार हें त्याला वाटतच होतें. मालती आल्यास आपलें तिच्यापुढें कांहीं चालावयाचें नाहीं, असें त्याला भय वाटत होतें. आपल्या बायकोस मालतीच्या घरीं जाऊं द्यावयाचें नाहीं, हें एक आपण आकांडतांडव करून टाळूं; परंतु मालती आपल्या घरीं राहिल्यास ती अहोरात्र आपल्या बायकोच्याजवळ बसून राहील आणि आपल्याला कांहीं सुद्धां गडबड करतां येणार नाहीं, हें भय त्याला विशेष वाटलें. आबासाहेब आणि दादासाहेब यांच्या घरांतील लहानापासून मोठ्यापर्यंत सर्व माणसांना एकमेकांच्या घरीं राहाण्यास जाण्यास कांहींसुद्धां संकोच वाटत नसे आणि पद्मा इतकी आजारी असतां मालतीस तर कांहींच संकोच वाटावयाचा नाहीं हें तो पक्कें जाणून होता. यामुळें त्याला फार भय वाटलें. परंतु तोही कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता. तसा प्रसंग आलाच तर काय करावयाचें तेंही त्यानें ठरवून टाकलें होतें.

# प्रकरण ५१ वें.

## जांवईबोवा आले.



**मा**लती दूर उभी राहून त्याचें तें बोलणें नुसतें ऐकून घेत होती. मथुरताई तेथून झटकन् निघून गेली पद्मावती डोळे मिटून स्वस्थ पडली होती. तिला मोठी आशा उत्पन्न झाली होती कीं, आज दोन दिवस आपला नवरा आला नाहीं आणि आतां मालती तर आली आहे, तेव्हां आज उद्यां आपणाला दादासाहेबांच्या घरीं नेतील, आणि आपण तेथें गेल्यावर या त्रासापासून मुक्त होऊं, आपला नवरा आतां आपल्याशीं प्रेमानें वागूं लागेल, त्याच्या स्वभावांत कांहीं फरक पडेल, हें आतां तिला जागेपणीं तर काय परंतु स्वप्नांतसुद्धां शक्य वाटेना. आपण जर याच्या तडाक्यांतून सुटलों नाहीं—आपल्याला जर कोणीं सोडविलें नाहीं, तर आपला केव्हां एखादे दिवशीं कसा घात होईल याचा नेम नाहीं असें तिला पक्कें वाटलें. आपला पति कसाही असला तरी तो आपला पति. त्याचें इंग्लंडाहून आलेलें पत्र—आबासाहेब वारले असें कळतांच त्यानें पाठविलेलें पत्र—वाचून आज नाहीं उद्यां त्याला आपल्याविषयीं प्रेम वाटूं लागेल व तो आपल्यास नीट वागवील अशी आशा तिला वाटूं लागली होती. आणि इंग्लंडाहून आल्यानंतर पहिल्या पांच चार दिवस त्यानें जें वर्तन केलें, त्यामुळें त्या आशेला अंकुरही फुटले. परंतु तेवढे चार पांच दिवस गेल्यावर त्याचें खरें स्वरूप जसजसें प्रकट होऊं लागलें तसतशी प्रथम तिला शंका आली, नंतर भय वाटूं लागलें आणि नंतरच्या सर्व अनुभवांनीं तिला असें स्पष्ट दिसून आलें कीं, आपल्या नवऱ्याचा सर्व डोळा आपल्या इस्टेटीवर आहे. ती इस्टेट हातीं येण्यासाठीं तो आपला जीवसुद्धां घेण्यास कमी करणार नाहीं. किंबहुना आपला जीव घ्यावा, असाच त्याचा हेतु आहे हें तिला स्पष्ट दिसूं लागलें. अशा स्थितींत तिला असें सुद्धां वाटूं लागलें कीं, आपण मेलों तर फार चांगलें होईल. आपण या सर्व तापत्रयांतून सुटूं. परंतु आपले भाऊ एकदां घरीं येऊन ते घरांत सुखानें नांदत आहेत आणि त्यामुळें आपल्या आईला आनंद होत आहे, हें एकदां डोळ्यांनीं पहावें, या आशा तंतूवर तिनें इतके दिवस काढले होते. मन्याबापू एके दिवशीं एकाएकीं आलेला तिच्या नजरेस पडला, तेव्हां तिला फार समाधान झालें. आपला अर्धा हेतु सफल झाला असें तिच्या मनास वाटलें, परंतु अण्णासाहेबानें त्याला मारून घालविल्यामुळें तो पुनः नाहींसा झाला, हें पहातांच तें समाधान पार नाहींसें झालें. त्या दिवसापासून तिला असें वाटलें कीं, आतां आपल्याला आपले भाऊ कधीं भेटणें व ते आले ह्मणजे जें

आपण करूं म्हणून म्हणतों तें करणें शक्यच नाहीं. त्यानंतरच्या अण्णासाहेबांच्या एकंदर वागणुकीनें तिला तर स्वतःच्या जीवालासुद्धां अपाय होण्याची भीति वाटूं लागली. इतकेंच नव्हे तर खरोखर आपल्याला एकदम मरण यावें, अशी इच्छा तिला होऊं लागली. परंतु ' मालतीला बोलावून आणा आणखी मला आपल्या घरीं घेऊन चला ' असें ज्या दिवशीं तिनें दादासाहेबांस सांगितलें, त्याच्या आदल्या दिवशींच मथुराताईनें ती तिच्याजवळ एकटीच असतांना कांहीं सांगितलें. तें ऐकल्यापासून तिच्या मनांत स्वतःचा जीव रक्षण व्हावा अशी इच्छा पुनः जागृत झाली. जर आपण येथून गेलों, आपल्या नवऱ्यापासून दूर झालों, तरच आपला जीव रक्षण होईल असेंही तिला खास वाटूं लागलें आणि नवऱ्याचा क्रूरपणा जों जों अधिक अनुभवास येऊं लागला तों तों त्याच्यापासून दूर जाण्याची इच्छा अतिशय उत्कट झाली. मालतीला तिनें पाहिल्याबरोबर तर तिला असें वाटलें कीं, ही आपली जीवनदात्रीच आली. आतां आपण हिच्या घरीं जाऊन राहूं, आणि नीटपणें औषध वगैरे घेऊन बऱ्या होऊं. ज्या कारणानें आपण जीवरक्षणाची इच्छा करूं लागलों, तें कारणही नीटपणें पार पडेल असें तिला फार वाटूं लागलें. परंतु मालती आपल्याला नेण्याची तांनडी करीत असतां आणि आपण तिला ' तूं आल्यासारखी घरीं तरी जा, मग मला नेण्याची व्यवस्था कर, ' असें म्हणत असतां एकाएकीं अण्णासाहेब दत्त म्हणून उभे राहिलेले पहाण्याबरोबर तिच्या काळजाचें पाणी झालें. मालती आपल्याला घेऊन जाईल हें यांनीं जाणलें आहे, तेव्हां आतां मीं न जावें म्हणून हे आकांडतांडव करतील, आणि आपल्याला येथेंच खितपत पाडतील. आतां यांच्या हातून सुटण्याला एकच मार्ग. तो मार्ग म्हणजे ते ज्या कागदावर सही मागत आहेत त्याच्यावर सही करणें होय. दुसऱ्या कोणत्या उपायानें सुटका झाली नाहीं तर तोही उपाय करावयाचा. सही करून द्यावयाची, आणि येथून निसटावयाचें, असेंही तितक्यांतल्या तितक्यांत तिच्या मनांत आलें. परंतु तें फार वेळ टिकलें नाहीं.

पद्मेच्या मनांत असे विचार चालले असतां अण्णासाहेबांची मागील प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें बडबड चाललीच होती. मालती दूर उभी राहून ती सर्व ऐकत होती; आणि काकूही तिरस्कारपूर्ण दृष्टीनें त्यांच्याकडे पहात होती. तिला असें झालें होतें कीं, ही जांवयाची ब्याद घरांतून जाते कशी ? तो जितका वेळ घराच्या बाहेर असेल तितका वेळ जरा स्वस्थतेनें जाई. दोन तीन दिवस तो कोणीकडे गेला होता, तर पद्मेच्या दुखण्याकडे व औषधोपचाराकडेच निर्वेधपणें त्यांना मन देण्यास सांपडलें. परंतु हा तेथें येतांच तें सारें बदललें. त्याची कचकच सुरू झाली. शेवटीं त्या म्हातारीच्यानें राहवेना. ती एकदम त्याला म्हणाली: " दुसरं कांहीं नाहीं. तुमच्या या कचकचीकरितांच ती जाते आहे आणि मी तिला पाठविणार आहें. तुम्ही जवळ असतांना ती कांहीं बरी व्हायची नाहीं. मी पाठविणार तिला. काय म्हणतां, काय करतां पाहीन. माले, जा तूं मेणा नाहीं तर डोली घेऊन ये. आणखी आतां तिला घेऊन जा. पाहूं दे मला हे काय करतात तें. आणखी येतांना वसंतरावाला बरोबर घेऊन ये. हा काय त्रास मेला. यांनी—यांनीं हिला मारून मारून ती अशी

आजारी पडली आहे. दुसरं कांहीं तिचं दुखणं नाहीं. तशांत आणखी काल डॉक्टर भगवंतरावांनीं मथुरताईना सांगितलं आहे, तें जर खरं असलं तर हिला आतां जपलंच पाहिजे. हिला दोन अडीच महिने गेले असावे, असा त्यांचा अंदाज आहे. आणखी मलाही पण तसंच वाटतं..."

म्हातारीच्या तोंडून हे शेवटले शब्द बाहेर पडले न पडले तों अण्णासाहेबांची चर्या एकदम चमत्कारिक झाली. जसा एखादा धक्का बसावा आणि एखाद्याची स्थिति व्हावी तशी त्याची स्थिति झाली. परंतु तितक्यांतल्या तितक्यांत तो मोठ्यानें हंसून म्हणतोः "O my darling, is that really so? मला फार फार आनंद झाला. बोल, बोल, प्रिये, ही गोष्ट खरी आहे का? ठीक ठीक. मग तर मी तुला आतां अतिशय जपणार. आतां एक क्षणभरसुद्धां विसंबणार नाहीं."

असें म्हणून तो पद्मताईच्या अगदीं जवळ जाऊन तिची हनुवटी हालवून तिला प्रेमानें कुरवाळूं लागला. आपल्या समोर दुसऱ्या दोघी स्त्रिया उभ्या आहेत, त्यांच्या देखत हा आचरटपणा आपण करतों आहोंत, त्याची त्याला लाजसुद्धां वाटली नाहीं. तो निर्लज्जपणें तिच्या तोंडाशीं तोंड नेऊन पुनः पुनः "प्रिये, प्रिये, सांग, मला सांग. काकू म्हणतात ही गोष्ट खरी का? O my darling, you don't know how greatly delighted I am." असें म्हणूं लागला. त्या दोघींना संकोच वाटला. पद्मताईला लाज वाटली. तिनें आपलें सर्व बळ एकवटून आपल्या क्षीण हातानें त्याचा हात तोंडाजवळून दूर केला आणि "हें काय हें" असें म्हणून आपलें तोंड दुसऱ्या बाजूस वळविलें. त्याच्या तोंडाची तिला घाणही आली असावी असें तिच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें. पण करणार काय बिचारी. तो निर्लज्ज तसाच लघळपणा करीत तेथें बसला.

आतां पद्मावतीला तावडतोब नेण्याची आशा मालतीस राहिली नाहीं. नवऱ्याबरोबर त्याच्या चाकरीवर गेल्या वेळेपासून कोणाही पुरुषाशीं बोलण्यात तिला संकोच वाटेनासा झाला होता. कारण तो ज्या प्रांतांत गेला होता, त्या प्रांतांत तीं दोघें साधारण साहेबासारखींच वागूं लागलीं. हिला इंग्रजी येत असल्यामुळें साहेबांशीं, मडमांशीं वगैरे ओळख होण्यास वेळ लागत नसे व ती ओळख चालण्यानें वाढण्यासही अडचण पडत नसे. कोणीही गृहस्थ आला तर कारणपरत्वें किंवा कोठें मेजवान्या, पार्ट्या वगैरे असल्या, तर त्या प्रसंगीं बोलण्यासवरण्यास ती संकोच धरीनाशी झाली होती. परंतु अण्णासाहेबाचा तो अवतार, आणखी त्याचें तें बोलणें, त्याची ती चर्या, हीं सर्व पहातांच तिला अगदीं कसेंसेंच झालें. त्याच्याशीं एक शब्दसुद्धां बोलूं नये किंवा त्याचा ऐकूं नये असं तिला वाटलें. सध्यां तरी निदान येथून जावें असा शेवटीं तिनें निश्चय केला. ती जाण्याला निघाली, त्या उद्देशानें जिन्याकडे गेली, तों अण्णासाहेबाची स्वारी पटकन् उठली, आणि तिच्या व जिन्याच्या मध्यें उभी राहून तिला म्हणालीः "आपण आलांत केव्हां? आपल्या यजमानांची प्रकृति कशी काय आहे? वगैरे कांहींच कुशल प्रश्न विचारले नाहींत, याबद्दल माफी असावी. आपल्याबरोबर कोण आहे? खालीं गाडी उभी आहे ती आपलीच ना? आपल्याला मी पोंचवायला येतों. आपल्याला चहा तरी कोणीं दिला का?" असे एका पाठीमागून एक प्रश्न सारखे नि-

घत होते. त्या प्रश्नांचा मालतीला कंटाळा आला. परंतु वाट त्यानें अडविल्यामुळें तिला पुढें होतां येईना. त्याचा लघळपणा सुरूच होता. मालतीनें त्याला एक शब्दानेंही उत्तर दिलें नाहीं. ती नुसती कपाळाला आंठ्या घालून उभी होती. शेवटीं अण्णासाहेबाच्या मनांत काय आलें, तो आणखी दोन पावलें पुढें झाला आणि हात पुढें करून 'चला, चला मी आपल्याला पोंचवतों' असें ह्मणत मालतीचा हात धरूं लागला.

"नको. नको. आपण नको मला पोंचवायला. मी एकटी जाईन." असें म्हणून मालती तिरस्कारानें मागें सरकली. चाललें होतें त्याचा प्रतिकार करण्यास असमर्थ अशी पद्मावती हें नुसतें पहात होती. त्यामुळें मनांत संताप आणि अंगांत ताप सडकून चढत होता. "हें काय हें, तिला आपल्या घरीं जाऊं द्या." असें त्या त्वेषांत ती ह्मणाली. परंतु ते शब्द तिच्या तोंडांतून पुरतेपणें बाहेर पडलेही नाहींत. ओंठांतल्या ओंठांतच गुळमुळले. सासूबाईही त्याला पुष्कळ बोलल्या; परंतु तो कांहीं केल्या हलेना. तोंडानें बडबड चालूच होती. "अहो, विलायतेस चार वर्षें राहून आलेल्या नवऱ्याची तुह्मी बायको, मीही विलायतेस राहून आलेला. तेव्हां तुमच्यासारख्या लेडीजूशीं कसं वागलं पाहिजे, हें मला समजतं आहे. आपल्यासारख्या लेडीजूना एस्कॉर्ट अवश्य पाहिजे. तो मी आपल्याला देणार आहें. त्यांत काय वावगं आहे? या म्हातारीला या आपल्या इंग्लंडच्या चालीरीति काय माहिती? या इंग्लंडांतल्या लेडीजूप्रमाणें मी असा आपल्या हातांत हात घालून आपल्याला पोंचवतों. आपल्या घरांपर्यंत नाहीं तर गाडीपर्यंत तरी पोंचवितों. आपण असा संकोच कां करतां? संकोचाचं कांहीं कारण नाहीं. आपल्यासारख्या लेडीजूनीं कांहीं संकोच करायचं कारण नाहीं. या. या. या."

असें म्हणून त्यानें आणखी दोन पावलें पुढें घालून तिच्या हातांत हात घालण्याचा हेतु साधलाच. तीही फार संतापली. परंतु नुसत्या संतापण्यांत अर्थ नाहीं म्हणून नितक्यांत प्रसंगावधान ठेवून तिनें त्याचा हात झिडकारून टाकून पटकन् जिना गांठला व एखादी चपल हरिणी जशी डोंगरावरून तडातड उड्या मारते त्याप्रमाणें ती जिन्यावरून तडातड उड्या मारीत खालीं गेली आणि आपल्या गाडींत जाऊन बसली व तिनें गाडीवाल्यास घराकडे गाडी नेण्यास सांगितलें. न जाणों हा आपल्या पाठोपाठ जिन्यावरून येऊन आपल्याला पकडील असें भय तिला वाटलें. परंतु तसें करण्याचा त्याचा हेतु नव्हताच. त्याच्या मनांत मालतीनें आपल्या घरीं पुनः येण्याचें मनांतसुद्धां आणूं नये, येवढीच तजवीज करावयाची होती, म्हणून त्यानें आचरटपणा केला. त्याला पक्कें ठाऊक होतें कीं, आपण अशा तऱ्हेनें वागलों ह्मणजे ती येथें रहाण्याचें मुळींच मनांत आणणार नाहीं आणि आपण आतां घराच्याबाहेर पाऊलसुद्धां घातलें नाहीं, एकसारखे बायकोच्या उशापायथ्याशीं बसून राहिलों, कीं तिला येथून नेणेंही अशक्य असें त्यांना दिसेल. असा पक्का विचार करूनच त्या दुष्टानें मालतीला भिवविण्यासाठीं तसें फाजीलपणाचें वर्तन केलें. मालती गेली, तेव्हां तो खुष झाला, आणखी सासूबाईस म्हणतो: "कांहीं चहाबिहा द्या कीं, इतका कां जांवयाचा कंटाळा करूं लागलां? चहासुद्धां द्यावासा वाटेना कां आह्मांला? असं काय आपलं घोडं मारलं आहे आह्मीं? बरं आहे. चहाच्या ऐवजीं

आह्मी आपलं रोजचंच पेय पिऊं. तें त्याच्याहीपेक्षां उत्तम. नका देऊं चहा." असें बडबडत तो आपल्या खोलींत गेला व तेथें आपल्या त्या पेयावर ताव मारीत बसला.

इकडे म्हातारीच्या जीवाचा अगदीं संताप झाला. तिला असें वाटलें कीं, कोणी जर याला मानगूट धरून घालवून देतील या घरांतून तर फार बरें होईल. पण हें शक्य कसें? ती विचारी आपल्या मुलीजवळ गेली. पहाते तों पद्मेच्या डोळ्यांतून पाण्याचे प्रवाह चालले आहेत. म्हातारीच्याही डोळ्यांला पाणी आलें, आणि ती पद्मेच्या अंगावर हात ठेवून स्वस्थ तिच्याकडे पहात अश्रु गाळीत बसली.

इकडे मालती आपल्या घरीं गेली. वाटेंत तिच्या डोक्यांत दुसरा तिसरा विचार नाहीं. 'पद्मेच्या घरीं आपण जाऊन रहाणें शक्य नाहीं. पद्मेलाच इथें आणण्याची अति तांतडीनें तजवीज केली पाहिजे. त्या लांडग्याच्या हातून तिला सोडविली पाहिजे.' हें तिला आतां पक्कें दिसलें. परंतु तें साधावयाचें कसें, याचाच काय तो विचार. ती घरीं पोंचतांच तिनें पहिली चौकशी केली, ती आपला भाऊ वसंतराव घरीं आला कीं नाहीं, याबद्दलची होय. वसंतराव अद्यापि आला नव्हता. परंतु मालती त्याची चौकशी करते आहे तोंच तो आला. त्याला पाहिल्याबरोबर मालती त्याला म्हणतेः "दादा, तूं फार विचारी आणखी युक्तिवान् आहेस. काय वाटेल तें कर आणखी पद्मातांईला आपल्या घरीं आणायची युक्ति काढ."

मालती घरीं आली. तिला आपल्या आईजवळ जाऊन किंवा वडिलांकडे जाऊन त्यांना नमस्कार करण्याची सुद्धां आठवण झाली नाहीं. पद्मेची सुटका कशी होईल, आणखी किती लवकर करतां येईल ? हा एक विचार तिच्या डोक्यांत घोळत राहिला.

तिनें वसंतरावाला वरीलप्रमाणें सांगतांच वसंतरावं तिच्या घाईबद्दल वगैरे चेष्टाच करावयाचा; परंतु वसंतराव आतां पूर्वीचा राहिला नव्हता. त्याचा गमती स्वभाव पार नाहींसा झाला होता. त्याच्या चर्येवर आनंदीपणाचा अंशसुद्धां दिसत नसे. चिंतेनें—फार प्रबळ अशा चिंतेनें—त्याच्या मनांत राज्य सुरू केल्यामुळें तिचा शिक्का त्याच्या चर्येवर अगदीं ठळकपणें दिसूं लागला होता. मालतीचें तें बोलणें ऐकून तो शांतपणें तिला म्हणालाः "मालुताई, मी त्याच विचारांत आज कित्येक दिवस आहें. आतां तूं आली आहेस. तेव्हां आतां तें साधेल. पण आधीं तूं स्वस्थ हो. सगळ्यांना भेट. चहापाणी घेऊं आणखी मग शांतपणानं त्याचा विचार करूं."

मालतीनें त्याप्रमाणें केलें. वडील मंडळीस नमस्कार करण्याचें व इतरांना कुशल प्रश्न करण्याचें वगैरे झाल्यावर ती व वसंतराव दोघेंच वसंतरावांच्या खोलींत चहा घेण्यास बसलीं. चहा घेतांना तिनें आपण पद्माताईच्या घरीं गेल्यापासून काय काय झालें तें वसंतरावाला सांगितलें व शेवटीं ती त्याला म्हणाली, "पद्माताईच्या तिथें मी जाऊन राहणं तर अगदीं अशक्य. तो दुष्ट कोण्या वेळीं काय करील याचा नेम नाहीं. तेव्हां पद्माताईलाच आपल्या घरीं आणून ठेवलं पाहिजे. इथें येऊन तो काय करणार आहे ? पण हें साधायचं कसं ? हें जर साधलं नाहीं तर ती झुरून झुरून मरणार."

"माले, नुसती झुरून झुरून कां म्हणतेस ? तिला तो पाजी विष घालूनसुद्धां मारील. संधि साधून गळा दाबूनसुद्धां मारील. मला त्याबद्दल यत्किंचित्सुद्धां शंका

नाहीं. तेव्हां तिला होईल तितक्या लवकर एक दोन दिवसांतच तिथून काढून आणली पाहिजे. माले, मीं तुला पत्रांत सगळ्या गोष्टी लिहिल्या नाहींत; पण आबासाहेबांनीं आपली सुतळीच्या तोड्यासुद्धां सगळी इस्टेट पद्मातार्इच्या नांवानं केली आहे. आपल्या दोघां पोरांना एक दमडीच्या कवड्यासुद्धां ठेविल्या नाहींत. हें त्याला कळल्याबरोबर त्यानं एक आपल्या नांवाचं देणगीपत्र करून त्याच्यावर मॅजिस्ट्रेटाच्या देखत सही घ्यायचा बेत केला. पद्मातार्इला आपण कशावर सही करतों आहोंत हें कळूं द्यायचं नाहीं हा आग्रह तो धरणार, हें मला कसं तरी कळलं. कसं कळलं तें मी सांगेन तुला मग केव्हां तरी. तें मला कळल्याबरोबर स्वतःच मी पद्मातार्इकडे जाऊन सांगणार होतों, कीं तूं त्या कागदावर सही करूं नको. पण तिच्या घरीं जाण्याची आम्हांला त्यानं बंदी केल्याप्रमाणेंच झालं होतं. मीं त्या बंदीलाही भीक घातली नसती, पण माझ्या जाण्यानं पद्मातार्इलाच त्रास होणार म्हणून मीं आपली एक लहानशी चिठ्ठी लिहून ती मथुरातार्इकडून तिच्याकडे पोंचती केली. तिचा परिणाम झाला. पद्मातार्इनं कागद वाचल्याशिवाय सही करायची नाहीं, असं साफ सांगितलं. आणखी तेव्हांपासून त्याचं डोकं फारच भडकलं आहे. कायद्यानं आतां असं आहे कीं, तिनं त्याला देणगीपत्र करून दिलं तर एक त्या पैशाचं तो वाटेल तें करूं शकेल, नाहीं तर ती मेली म्हणजे तिचा वारस म्हणून त्याच्याकडे मालकी येणार. तेव्हां आतां तो ती मरण्याचा प्रयत्न करणार, तिच्या त्या दोघां भावांना कुठें तरी अडकादून ठेवण्यांत त्याचा हात आहे, अशी माझी पक्की खात्री आहे. मला सुगावा लागला आहे. पण आधीं आतां पद्मातार्इची व्यवस्था लाविली पाहिजे, मग त्यांचा तपास लावूं. जो क्षण जातो आहे तो फार महत्त्वाचा आहे. आतां तूं आली आहेस, तेव्हां तूं हरतऱ्हा करून तिला घेऊन जाशील हें त्याला समजतंच आहे. तेव्हां तें घडण्याच्या आंत तिचा निकाल करण्याला तो प्रवृत्त झाला तर मला आश्चर्य वाटायचं नाहीं. तेव्हां आतां फक्त एक उपाय आहे तो तूं केलास तरच साधेल, दुसऱ्या कोणाला साधणार नाहीं. पण तो साधायला तुला आणखी एकदां तिच्या घरीं गेलं पाहिजे. थोडा धीटपणा केला पाहिजे. आणखी लबाडी केली पाहिजे."

"ती कोणती ?" मालतीनें मोठ्या आतुरतेनें विचारलें.

"तूं करायला सिद्ध झालीस तर सांगतों. ती लबाडी खचित साधेल. आणखी आज रात्रीं आपण पद्मातार्इला घरीं घेऊन येऊं. तो तुझ्या अंगाला हात लावील, आणखी असं बोलेलन् तसं बोलेल, याबद्दल भय बाळगून मात्र चालायचं नाहीं. तो आपल्या तसल्या फाजीलपणाच्या वागणुकींत तुम्हाला भिवावयाला पहातो दुसरं कांहीं नाहीं. तो तसा भ्याड आहे. तसा अंगचटीस येतोसाच वाटलं, तर तुझ्या शिपायाला बरोबर घेऊन जाऊन तिथें दारांतच उभा करून ठेव म्हणजे झालं. काय आहे का कबूल ?"

"पण लबाडी कायन् कशी करायची ती मला आधीं सांगशील तर खरी."

"लबाडी अगदीं साधी. आणखी तो महामिकिल आहे; पण अशा साध्या लबाडीनंच फसला तर फसायचा. धीटपणानं यत्न करायचा आहे. तूं आतां पुनः चार घटकांनीं तिथें जा आणि असं सांग कीं, "आम्ही हिला नेत कांहीं नाहीं. पण तिच्या

शुश्रूषेसाठीं मी इथें राहणार. " असें सांगून पद्मेजवळ बसून रहा. त्यानं कांहीं फाजील-पणा केला तर तो सोस, हंसण्यावारी घालव, आणखी संधि साधून पद्मेला सांग कीं, " कसल्या कागदावर आपल्याला सही पाहिजे आहे ती मी देतें. आपण मॅजिस्ट्रे-टला घेऊन या. सही दिल्यावर तरी मला चार दिवस मालतीच्या इथें जाऊं द्या. असं आपल्या नवऱ्याला म्हण. " ती तसं म्हणाली तर तो कदाचित् पहिल्यानं कांहीं नाहीं होय म्हणेल. पण एकंदरींत त्याला आनंदच होईल. तसा झाला म्हणजे तो मॅजिस्ट्रेटला आणायला जाईल. दरम्यान मी मेण्याची वगैरे तजवीज ठेवतों. तो घराच्या बाहेर पडून वळणाला वळला, कीं आपण लगबग करून पद्मातांईला घरीं घेऊन येऊं. इथं एकदां ती येऊन पडल्या-वर मी आहें नू तो आहे पाहून घेतां येईल. मला आणखी कांहीं गोष्टी साधायच्या आहेत, त्याही मी साधल्या तर पाहीन. नाहीं सा-धल्या तरी कांहीं मोठीशी पंचाईत नाहीं. आधीं तिचा जीव धोक्यांत आहे तो वांचवूं दे; मग दुसऱ्या गोष्टी पहातां येतील. लो-भिष्ट माणसाला धरायला लोभाचंच जाळं पाहिजे. तें पसरलं तरच तो त्यांत सांपडेल. सही देतें, असं एकाएकीं पद्मा म्हणाली, तर त्याला आश्चर्य वाटायचं नाहीं. तूं आली आहेस तेव्हां आतां तुझ्या घरीं जाण्याला सांपडावं, आपण आड येऊं नये म्हणून ही आतां कबूल होते आहे. तेव्हां आपण आतां ही संधि घालवूं नये असंच त्याच्या मनांत येईल, आणखी तो तावडतोब जाईल. तो गेला कीं आपलं काम झालंच. लबा-डाशीं लबाडी केल्याखेरीज पद्मेला सोड-वायला दुसरा मार्ग नाहीं. पण हें सगळं तुझ्यावर अवलंबून आहे. तूं धीटपणा केला पाहिजेस. भ्याडपणा करतां उपयोगी नाहीं. तो घराच्या बाहेर पडला कीं पुढली लग-बग माझ्याकडे लागली. "

मालती तें स्वस्थपणें ऐकून घेत होती. बराच वेळ स्वस्थ बसल्यावर ह्मणते, "पद्मा-ताईच्या जीवापेक्षां अधिक काय आहे ? तूं सांगतोस त्याप्रमाणें मी करतें, काय होईल तें होईल. वाघाच्या तोंडांतली शेळी सोडवायला त्याला दुसरं कांहीं तरी आमिष दाखवलंच पाहिजे. "

झालें ठरलें. हा योजलेला उपाय धीट-पणानें करावयाचा असा दोघांनींही निश्चय केला. दुपारचीं जेवणें झालीं आणि दादा-साहेबांना विचारून मालती पुनः पद्माव-तीच्या घरीं गेली. आपल्या नवऱ्यानें असें वर्तन केल्यानंतर आतां मालती आपल्या-कडे कसूची येते आहे ? अशी निराशा पद्मेस वाटून पद्मा' पडली होती. तिची आई खालीं कांहीं करीत होती, तिचा नवरा आपल्या खोलींत " पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा " करीत बसला होता. यामुळें माल-तीस पद्मेच्या जवळ बसून तिला वसंत-रावानें सांगितल्याप्रमाणें " तूं त्या कागदा-वर सही करून देतें म्हणून अण्णासाहे-बांना ह्मण " असें पद्मेला तिनें सुचविलें. तें ऐकतांच पद्मा आश्चर्यानें मालतीकडे पाहूं लागली. परंतु मालतीनें तिला ' वसंतरावा-नेंच असें करण्यास सांगितलें आहे ' असें सांगितलें. तेव्हां ती ' करतें ' असें म्हणाली, हें सर्व जमलें. मालती मग अवांतर कांहीं बोलूं लागली तों काकू वर आल्या. मालती पुनः इतक्या लवकर आली हें पाहून त्यां-नाहीं आश्चर्य वाटलें. ती बहुतकरून मुळींच येणार नाहीं असें त्यांनाही वाटलें होतें. परंतु दोघींचें प्रेम अतोनात. तेव्हां सगळें कांहीं विसरून ती आली असें सम-

जून काकूंनीं मालतीला ह्मटलें: " बरं झालं बाई आलीस, तुझ्या येण्यानं तिला खरोखर बरं वाटेल. आतां बसा दोघीजणी खुशाल बोलत. मी खालीं थोडं काम राहिलं आहे तें करतें. मधेंच कांहीं लागलं तर मला हांका मार. " असें म्हणून काकू पुनः खालीं गेल्या. अण्णासाहेब आपल्या तंद्रींत थोडे पहुडले. गोष्टी जुळून येऊं लागल्या म्हणजे झपाझप जुळून येतात. पद्मा-ताईला व मालतीला स्वस्थपणें बोलण्याला वाटेल तितका वेळ मिळाला. सुमारें दोन तासांनीं अण्णासाहेबांची स्वारी जागृत होऊन बाहेर आली. मालतीला पहातांच तोही आश्चर्यचकित झाला. ती पुनः निदान इतक्या लवकर तरी येईल असें त्याला ही वाटलें नव्हतें. परंतु आपलें आश्चर्य बाहेर न दाखवितां तो तिला म्हणाला: " आतां आपण इथेंच रहा चार दिवस. आपलं आणखी हिचं प्रेम किती आहे तें मला ठाऊक आहे. तेव्हां आपण आल्यामुळें खरोखर ही लवकर बरी होईल. ठीक झालं आपण आलां तें."त्याचें तें बोलणें ऐकून मालती क्षणभर स्वस्थ बसली. नंतर एकदम म्हणाली: " हिला आमच्या घरीं न्यायची परवानगी दिलीत, तर फार सोईचं होईल. "

अण्णासाहेब तें ऐकतांच विकट हास्य करून ह्मणाले: " तिला इथून नेणार ? तें काय म्हणून ? तिची आई आहे, मी आहें, हीं काय तिच्या मायेचीं माणसं नाहींत ? आमच्या हातून काय तिची व्यवस्था राहात नाहीं ? अन् तिला आपल्या घरीं पाठवून आम्हीं काय करावं ? मला बोलावतां तिथें राहायला मग चला आह्मी दोघंही तिथें येतों."

मालती धीटपणानें त्यांस म्हणाली: "हो आपणही या. जसं हें घर तसंच तें घर. आह्मी या दोन घरांत कधींच भेदभाव मानला नाहीं, आणखी याही मंडळींनीं मानला नाहीं. बायकांचं दुखणं आणखी काकू घरांत एकट्या. आमच्या इथें आली तरी काकू येतीलच. आई आहे, मी आहें, मथुरातांईना आह्मी आपल्या घरांत दोन खोल्या देऊन तिथेंच बिऱ्हाड देणार आहों. म्हणजे त्यांची मदत होईल...... "

" वा ! आपण तयारी तर सर्व ठीक केली; पण मला कांहीं बोआ तुमच्या इथें येऊन राहणं शक्य नाहीं. मी कधीं येऊन राहणार नाहीं. आणखी माझ्या बायकोला अशा दुखण्याच्या स्थितींत मी आपल्यापासून दूर ठेवणार नाहीं. "

" मग मर्जी आपली. पण तिची इच्छा फार आहे. मी आलें आहें खरी, पण मी एकटी इथें येऊन राहून कसं होणार ! माझ्या घरीं जी इतर माणसांची मदत मिळेल ती इथें कुठली मिळणार ? आई इथें राहायची नाहीं, मथुराताई यायच्या नाहींत, खरोखर तिची इच्छा फार आहे माझ्या घरीं यायची. "

" तिची इच्छा आहे ? असेल. माझी एखादी इच्छा असली तर ती कधीं मानते आहे तर मीं तिची मानावी. यःकश्चित् एका कागदावर नुसती सही कर म्हणून सांगितलं तर तेवढं तिनं मानलं नाहीं. मग मी तरी एवढी तिची इच्छा कशाला मानवी ! विचार तिला अशी गोष्ट झाली का नाहीं ? मीं एका कागदावर नुसती सही कर म्हणून सांगितलं ती मॅजिस्ट्रेटच्या देखत करायला पाहिजे म्हणून मॅजिस्ट्रेटला बोलावलं. तो आला आणखी हिनं साफ नाहीं म्हणून सांगितलं ! हा केवढा माझा अपमान. केवढा माझा उपमर्द ! माझ्यावर हिचा विश्वास किती आहे हें पहाण्यासाठीं मीं नुसतं हिला म्हटलं कीं, हा कागद आधीं न वाचतां मात्र सही कर. विचारा कीं तिला मी म्हणतों तें खरं का खोटं तें. "

# प्रकरण ५२ वें.

## पद्मा गेली !



मालतीनें तें त्यांचें बोलणें शांतपणें ऐकून घेऊन ह्मटलें: "विचारलं. आपण बाहेर येण्याच्यापूर्वी माझं आणखी तिचं त्याबद्दलच बोलणं झालं. तिला आतां त्याबद्दल फार पश्चात्ताप झाला आहे. झाल्या त्या गोष्टी विसरून आपण पुन: जर मॅजिस्ट्रेटला बोलावून घेऊन याल तर ती आतां सही करून द्यायला तयार आहे. मग तर झालंना ? आज आतां मॅजिस्ट्रेटसाहेबांना घेऊन या. ती सही करून देते आहे. "

मालतीचें तें बोलणें ऐकतांच अण्णासाहेबांचा चेहरा एकदम प्रफुल्लित झाला. ही संधि खूप चांगली आहे. मालतीच्या घरीं जाऊं देण्याच्या आशेनें ही सही करील खरीच. असें त्याच्या मनास खास वाटलें; परंतु तसें बाहेर न दाखवितां तो लागलीच कपाळास आंठ्या घालून म्हणाला: " छे. आतां काय उपयोग ! बुंदसे गयी तो हौदसे नहीं आती. ती वेळ गेली. एकदां समजलं कीं तिचा माझ्यावर विश्वास नाहीं. मी तरी दुसरं काय मागत होतों ! नुसतं मुखत्यारपत्र सही करून मागत होतों. मुखत्यारपत्र आहे. असं सांगून केवळ आपल्यावर किती हिचा विश्वास आहे हें पहाण्यासाठींच ' तूं हें न वाचतां सही कर ' म्हणून आग्रह केला. मला वाटत होतं, कीं हिचा आपल्यावर विश्वास नाहीं त्याचा पडताळा मला तिच्या उत्तरानं आला. माझे स्नेही आले होते त्यांच्या देखत हिनं साफ नाहीं सही करीत म्हणून सांगितलं, असा अपमान कोणता नवरा सहन करील ? पण मीं गय केली. अन् आतां तर काय ती आजारीच आहे तेव्हां आतां त्यासंबंधानं बोलायचंच नाहीं. आतां ती बरी झाल्यावर पाहूं. "

" पण आतां जर ती सही करून द्यायला तयार आहे, तर कां तुह्मी नको म्हणतां ? आतां माझंन् तिचं बोलणं झालं, तिनं अगदीं कबूल केलं आहे. तेव्हां आतां आपण कांहीं विनाकारण विलंब करूं नये. आपल्याला सही मिळाली म्हणजे आपल्याला पुढच्या उद्योगाला लागायला सांपडेल, आह्मी तिला घरीं घेऊन जाऊन तिच्या औषधपाण्याची तजवीज करूं. मागला राग कांहीं धरूं नका. आपले कोण मॅजिस्ट्रेटसाहेब असतील त्यांना घेऊन या आणखी कोणी साक्षीदार म्हणून सह्या करायला हवे असले, तरी त्यांना घेऊन या म्हणजे...... " अण्णासाहेबांस तें ऐकून फार आनंद झाला, आपण अगदीं अपेक्षा

केली नाहीं अशा तऱ्हेनें आपलें काम होतें आहे; जी मालती येऊं नये म्हणून आपण उलट तार पाठविली, तीच मालती आल्यामुळें आपलें काम होतें आहे. आणखी काय पाहिजे ? असें मनांत येऊन त्यानें असा विचार केला कीं, आतां अधिक ओढून धरूं नये. आपला कार्यभाग करून घ्यावा. परंतु हा आपला विचार एकदम बाहेर न दिसूं देतां तो म्हणतोः "तुह्मीच म्हणतां आहां म्हणून मी अधिक कांहीं बोलत नाहीं, पण हिनं सही दिली, तरी मी हिला आपल्यापासून दूर करूं इच्छीत नाहीं मला तिच्या प्रकृतीची काळजीच नाहीं असं सारं जग म्हणेल."

"मग आपल्याला आमच्या घरीं येऊन राहायला कोणी नको म्हणतं आहे का काय ? येऊन रहा. आमच्या घरीं हिला नेल्यानं थारेपालट होईल. आमच्यासारखीं चार माणसं जवळ असल्यामुळं तिला जरा बरं वाटेल. आपण काय चोवीस तास तिच्याजवळ बसून राहाणार आहां ? ती बरी व्हायला खरोखर आमच्या......"

"खरं, तें एका दृष्टीनं खरं. बरं आहे, माझी हरकत नाहीं. पण हिला आपल्यापासून दूर करायची कल्पनाच बोआ कशीशी वाटते. मग काय म्हणतां ? मॅजिस्ट्रेटसाहेबांना घेऊन येऊं ? वास्तविक त्यांची जरूरी नाहीं. हिनं सही केल्यावर मी त्यांचा त्या कागदावर "समक्ष सही केली" म्हणून घरींसुद्धां शेरा घेऊन सही घेईन."

हा नवीनच बूट त्यानें काढल्याबरोबर मालती चपापली. हा आतां असाच आग्रह धरून बसतो का काय याचें तिला भय वाटलें. त्यामुळें ती तावडतोब म्हणालीः "छे. छे. थोडक्यासाठीं त्यांना तरी खोटं काम कशाला करायला सांगायचं ? इथें घेऊन या म्हणजे तेव्हांच काम होणार आहे." अण्णासाहेब त्यावर लागलीच म्हणालाः "छे. छे. खोटं काम करण्याची गोष्ट नव्हे. खोटं मलासुद्धां अणुभर खपत नाहीं. मी आपलं सहज म्हटलं. बरं आहे कांहीं हरकत नाहीं. आतां चार वाजले आहेत. मी तडक जाऊन त्यांना ऑफिसांत गांठतों. तिथें बसून राहून ऑफिस सुटतांच त्यांना घेऊन येतों. त्यांना चहा वगैरे इथेंच देऊं."

असें आनंदून म्हणून तो उठला व कपडे घालण्यास आपल्या खोलींत गेला. संकेताप्रमाणें मालतीनें आपला शिपाई वसंतरावाकडे पाठवून दिला. अण्णासाहेब थोड्या वेळांत फुल ड्रेस करून आला आणि म्हणालाः "बरं आहे, तुम्ही इतकी हमी घेतां आहां तर मी जातों. आणखी त्यांना घेऊन येतों."

"आणखी आह्मी हिला आमच्या घरीं नेण्याची तयारी करतों. करूंना ?" मालतीनें हा प्रश्न विचारतांच अण्णासाहेबानें तोंड वाईट केलें आणि म्हणतोः "पहा बोआ. मी तिच्यापासून दूर राहून कसं होईल तें ? पण तिची मर्जी आहे, आणखी तुमचा आग्रह आहे, तर मी कांहीं तुमच्या आड येत नाहीं. डार्लिंग पद्मा, तुझी खरोखरीच इच्छा आहे का यांच्याकडे जायची ? बरं बरं. मी नाहीं नाहीं ह्मणत. पण मी तिथें राहायला येईन हो. मला कांहीं चैन पडायचं नाहीं. माझे पंचप्राण तुझ्याजवळ आहेत. मी इतर नवऱ्यांसारखा नाहीं. बरं तर मी जातों."

असें म्हणून तो बाहेर पडला. मालतीचें व त्याचें इतके सगळें बोलणें चाललें असतां पद्मा अगदीं स्वस्थ पडली होती. मालती इतक्या धीटपणानें आपल्या नवऱ्याशीं

बोलत होती हें पाहून तिला मनांत फारच आश्चर्य वाटत होतें. मालती फार भित्री असे. परंतु आज तिच्या भाषणावरून त्या भित्रेपणाचा टिपूस सुद्धां तिच्या ठिकाणीं दिसला नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपला खरा बेत कळूं न देतां साळसूदपणा दाखवून बोलत आहे हें मनांत येऊन पद्मा आपले नेत्र उघडून तिच्याकडे मोठ्या कौतुकानें पहात राहिली. तितक्यांतल्या तितक्यांत तिच्या मनांत असेंही आलें कीं, आपण आपल्या नवऱ्याला फसवीत आहों हें बरें नव्हे, ती फार पापभीरु होती. मालतीही फार पापभीरुच होती. परंतु लांडग्याच्या तावडींत सांपडलेली शेळी सोडवावयाला लबाडीखेरीज दुसरा कांहीं मार्ग नाहीं. सरळपणा करून प्राणघाताखेरीज दुसरा कांहीं परिणाम व्हावयाचा नाहीं हें पद्मेला तर पक्कें वाटलें होतें आणि मालतीला तर वसंतरावानें सर्व गोष्टी उघडच करून सांगितल्या होत्या.

मालती आतां विचार करीत बसली नाहीं. तिनें मथुराताईच्या साहाय्यानें पद्मावतीला चटकन् नेण्याची तयारी चालविली. इकडे वसंतराव मालतीचा शिपाई निरोप केव्हां येतो याची चातकासारखी वाट पहात होता. निरोप आल्यावर एक क्षणभरसुद्धां विलंब होतां उपयोगी नाहीं म्हणून त्यानें एक मेणा आधींच घरीं आणूनही ठेविला होता. मालतीनें धीटपणानें आणि हें कसें बोलूं, तें कसें बोलूं, असा विचार न करतां जर सर्व कांहीं आपण पढविल्याप्रमाणें पार पाडलें तर आपल्या इच्छेप्रमाणें सर्व व्यवस्था जुळेल अशी त्याची खात्री होती. मोठा मिस्किल लुच्चा असतो, तो अगदीं सोप्या युक्तीनें केव्हां केव्हां फसतो. कां कीं, त्याच्या युक्तिबाज डोक्यांत सोप्या युक्त्या येतच नाहींत आणि लोभी माणूस तर फारच सहजगत्या फसतो. त्याला जी गोष्ट साधावयाची असते ती साधते आहे असें दिसतांच त्याच्या डोळ्यांना इतर गोष्टी दिसत नाहींशा होतात. दुधावर झांप टाकण्यासाठीं टपलेल्या मांजराला बाजूनें किंवा मागून कोणी बडगा घेऊन आपल्यास हाणण्याला आला आहे हें दिसतच नाहीं. अशीच स्थिति पद्मावतीच्या त्या दुष्ट नवऱ्याची होईल. आपली बायको अगदीं एकदम सही करण्यास कबूल कशी होते आहे हा प्रश्न त्याच्या मनांत आला, तरी त्यांत त्याला लबाडी दिसणार नाहीं. आपण तिला मालतीच्या घरीं जाण्याची परवानगी देऊं या आशेनें ती कबूल झाली असली पाहिजे असेंच त्याला वाटणार. आपण मॅजिस्ट्रेटकडे गेलों असतां हिला पळवून नेतील हें त्याच्या मनांत येण्याचा संभव नाहीं अशी वसंतरावाच्या मनाची कल्पना होती. मालतीकडून शिपाई येतांच ती आपली कल्पना खरी झाली म्हणून त्यास आनंद झाला व धीरही आला. त्यानें एका क्षणाचाही विलंब लाविला नाहीं. तावडतोब मेणा व गाडी घेऊन तो पद्माताईच्या घरीं गेला. तेथेंही त्यानें बिलकुल वेळ व्यर्थ जाऊं दिला नाहीं. पद्मेला एका ईझीचेअरवर बसवून दोघांतिघांनीं उचलून खालीं आणून लागलीच तिला मेण्यांत घातलें. उशा वगैरे नीटनेटक्या करून तिला आरामशीर निजविलें. मेण्याचीं दारें लाविलीं आणि मेण्याच्या एका बाजूस आपण व दुसऱ्या बाजूस शिपाई असे दोघे दोहोंकडे उभे राहून मेणा चालविला. गाडींत मथुराताई, काकू व मालती अशा बसल्या. भाग्या गड्यास घरास कुलूप लावून आपल्याकडे येण्यास सांगितलें. सारांश, जितकी

तांतडी शक्य तितकी करून त्यानें आपला बेत पार पाडला. वाटेंत कांहीं विघ्न न येतां पद्मा मालतीच्या घरीं येऊन पोंचली. वसंतरावानें आपल्या घरीं एक खोली पद्मेसाठीं तयार करून तेथें एक बिछाना करून ठेवविलाच होता. रोग्याला लागणाऱ्या सर्व वस्तूही जेथल्या तेथें मोठ्या टापटिपीनें ठेविल्या होत्या. पद्मा घरीं येतांच तिला पहिल्याप्रमाणें पुनः ईझिचेअरवर बसवून अलग माडीवर त्या खोलींत नेलें आणि बिछान्यावर निजविलें. खोली फार चांगली हवाशीर होती, आणि वर सांगितल्याप्रमाणें सर्व व्यवस्थाही फार चांगली होती. तें पहातांच पद्मातांईला फार समाधान वाटलें. तिच्या चर्येत लागलाच फरक पडला. आपण जिवानिशीं सुटलों. आतां येथें आपल्याला कांहीं सुद्धां त्रास होणार नाहीं असें तिच्या मनास वाटलें. अत्यंत प्रेमळ असा भाऊ संकटांत पडलेल्या आपल्या बहिणीच्या रक्षणासाठीं जसा दक्ष राहील तसा वसंतराव आपल्या रक्षणासाठीं दक्ष राहील असा तिच्या मनाला पूर्ण विश्वास होता. आतां आपण निर्धास्त झालों. आतां आपल्या त्या निर्दय पतीला वसंतराव आपल्याजवळ सुद्धां येऊं देणार नाहीं असें तिला पक्कें वाटलें. आणि तिच्या डोळ्यांतून आनंदाचे व समाधानाचे अश्रु घळघळां वाहूं लागले. मालतीलाही अतिशय समाधान झालें. रचना केली ती इतक्या सुयंत्रपणें पार पडेल असें तिला वाटलें नव्हतें. वसंतरावाच्या मनांत जरी सगळें आपल्या इच्छेप्रमाणें होणार असें खात्रीनें वाटत होतें, तरीही त्याला काय होईल, कसें होईल, असें मधून मधून क्वचित् भय वाटेच. परंतु सर्व कांहीं निर्विघ्नपणें झालें. आतां तो येऊन काय दंगा करतो तें पहाण्याचेंच राहिलें. त्यानें कांहीं केलें, तरी आतां पद्मेला आपण त्रास देऊं देणार नाहीं, तिची व त्याची दृष्टादृष्टसुद्धां होऊं देणार नाहीं. हा त्याच्या मनाचा पूर्ण निर्धार होता.

इकडे अण्णासाहेब मोठ्या खुषींत मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या कचेरींत गेला. तेथें जाऊन त्यानें त्यांना आपण कां आलों वगैरे सांगितलें. त्यांनीं मी ऑफिसचें काम आटपतांच येतों, आपण पुढें व्हा म्हणून म्हटलें. परंतु याला कोठला धीर! यानें त्यांना म्हटलें: "आपलें काम आटपूंद्या, मला एखादें वर्तमानपत्र असलें तर द्या. मी वाचीत बसतों." असें म्हणून टेबलावरील टाइम्स पत्राचा अंक घेतला. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं ठीक आहे म्हणून आपले हातचें काम पुढें चालविलें. त्यांचीं कामें आटपावयाला जवळजवळ दीड तास लागला. नंतर ते म्हणाले: "आपण आतां घरीं जाऊन चहा वगैरे घेऊन जाऊं" परंतु अण्णासाहेब लागलीच त्यांला म्हणतात: "चहा वगैरे तयार असेल आमच्या इथें. मला एवढं का धोरण नाहीं ? आल्याबरोबर आपल्याला चहा लागेल, तेव्हां तो तयार करून ठेवा म्हणून मी सांगूनच आलों. पहा आतां कसा थाट असेल तो. आमच्या कुटुंबाची एक फॅशनेबल मैत्रीण आली आहे. ती थाट करून ठेवील. ती एका सिव्हिल सर्व्हंटाची बायको आहे. तिला सगळी फॅशन माहीत आहे. आपण चला, म्हणजे झालं, मीं टांगा देखील आणला आहे." असें म्हणून त्यानें मॅजिस्ट्रेटास घाई लाविली.

दोघेही टांग्यांत बसले, आणि पद्मातांईच्या घराशीं आले, तों घराचें पुढचें दार लाविलेलें असून त्याला कुलूप ! तें पाहून अण्णासाहेबास क्षणभर वाटलें कीं आपण घर तर चुकत नाहीं ! परंतु दुस-

त्याच क्षणीं सर्व रंग काय झाला असला पाहिजे तें त्याच्या ध्यानांत आलें आणि त्याच्या अंगाचा तिळपापड उडाला. मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या ध्यानांत कांहींच आलें नाहीं. ते त्याच्या तोंडाकडे पहात राहिले. आपण मॅजिस्ट्रेटला आणण्यासाठीं म्हणून घरांतून बाहेर जातांच आपल्या बायकोला त्या मंडळीनें येथून नेलें असलें पाहिजे, हें अण्णासाहेबांस उघड उघड दिसलें. संतापानें तो अगदीं वेडा झाला. परंतु आतां नुसता संताप भडकून काय उपयोग होता? तो अगदीं शांतपणाचा आव घालून टांग्यांतून उतरून मॅजिस्ट्रेसाहेबांस म्हणतोः " आपण थोडी दिरंगाई केली म्हणून हा असा प्रसंग आला. असो. त्या मंडळींनं या वेळीं विश्वासघात केला आहे खरा. आतां उपयोग काय ! आतां आपण जा याच टांग्यांत. माझं मी पुढें काय करायचं तें पाहून घेतों. "

मॅजिस्ट्रेटसाहेबांस त्याचे बोलण्याचा कांहीं अर्थ समजेना. यानें आपल्याला तांतडीनें बोलाविलें काय ? आपण आलों काय ! चहाची तयारी आहे. फॅशनेबल चहा तयार असणार असें हा बोलला काय ! आणि इथें येऊन पहातों तों दाराला कुलूप काय ? हा प्रकार आहे काय, असे प्रश्न त्यानीं आपल्या स्वतःलाच विचारले आणि शेवटीं ते अण्णासाहेबांस म्हणतातः "आतां असं करा, तुम्हीच आमच्या इथें चला; चहा वगैरे घ्या, हें काय गौडबंगाल आहे तें मला स्वस्थपणें सांगा, आणखी मग पुढें काय तुम्हाला करायचं असेल तें करा. "

अण्णासाहेब संतापांतच होता. तो झट्कन् त्यावर म्हणालाः "छे. छे. छे. तें कांहीं नाहीं. मी आतां याचा काय तो निकालच करणार. आपण जा. माझ्या सगळं कांहीं लक्षांत आलं आहे. या शिकलेल्या बायका असंच करायच्या. नवऱ्याला सोडून दुसऱ्याकडे जायच्या. मला ठाऊक आहे ती कुठें गेली आहे ती. पण मी याचा सूड उगवल्याखेरीज कधीं रहायचा नाहीं. चांगला सूड घेईन. अगदीं चांगला सोळा आणे सूड घेईन."

हें त्याचें सर्व बोलणें मॅजिस्ट्रेटसाहेबांना उद्देशून नव्हतें. तें आपल्या स्वतःशींच होतें असें म्हटलें तर विशेष खरें होईल. तो असा आपल्याशींच आणि रस्त्यांत मोठमोठ्यानें ओरडून बोलत आहे हें पाहून रस्त्यानें जाणारीं येणारीं माणसें तेथें थांबून काय आहे तें कळण्यासाठीं या दोघांकडे पाहूं लागलीं. तेव्हां आतां याला तेथें उभें राहूं देणें चांगलें नाहीं. निदान आपण तरी याच्याबरोबर येथें उभें राहूं नये असा विचार करून मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं त्याला बळेंच गाडींत घातलें आणि " जरा शांत व्हा. मग आपण पुढें काय करायचं त्याचा विचार करूं. रस्त्यांत उभें राहून लोकांना तमाशा करून दाखविण्यांत काय अर्थ आहे ! " असें बोलून त्याला ते घरीं घेऊन गेले. घरीं गेल्यावर चहा झाला. त्यानंतर थोड्याच वेळांत आणखीही कांहीं पान सुरू झालें. तेव्हां अण्णासाहेबांची स्वारी रंगांत येऊन म्हणतेः " काय, चमत्कार आहे ! मी आपणा स्वतःला अगदीं वस्ताद समजतों, आणखी आहेही. पण माझ्या डोळ्यांत किहो त्या दोघींनीं धूळ टाकली. त्या काय धूळ टाकतात म्हणा, पण त्या घसंत्यानं हें सगळं कारस्थान रचलं असलं पाहिजे खरं. त्यानं आपल्या वहिणीला इथें आणून तिला पढवून आमच्या बायकोला मधवून सगळा व्यूह रचला. मला अणुभर शंका आली नाहीं. फसलों. फसलों सपशेल फसलों खरा । बरं लेका मला फसवलंत

पण याचं उट्टं सोळा आणे काढीन. ती थेरडी देखील गेली वाटतं. त्या भाग्याला त्यांनीं असंच मथवलं. आतां माझे सगळे कपडे, ट्रंक्स, सगळं सामान तिथें राहिलं. सगळे कागद राहिले ते कसे ताब्यांत येतील. तुमची आह्मांला एवढी तरी मदत द्या, स्नेहाचा उपयोग एवढा तरी करा. कुणी तरी एक पहारा करण्यासाठीं डिटेक्टिव्ह ठेवा. माझी आतां अशी समजूत आहे कीं, तो लेंकाचा वसंत्या केव्हां तरी लपून तिथें येऊन तेवढं तें बुइल एकदां उपटून नेईल. त्याच्या मनांत आमची बायको, आणखी ती तिची इस्टेट दोनही लाटायचीं आहेत. पैकीं बायको लाटलीच. आतां बुइल तेवढं हातीं आलं कीं, आह्मांला धाब्यावर बसविणार. या अंगावरल्या कपड्यानिशीं गुलामांनीं मला बाहेर लावून दिलं आहे, माझे सगळे कपडे, माझे सगळे कागद, सगळं सामान, सगळे पैसे, सगळं कांहीं आंत अडकून राहिलं आहे. आतां करूं काय मी तें सांगा आधीं. नाहीं तर जाऊन आतां धोंडा घालून तें कुलूप फोडून टाकतों आणखी सामान काढून आणतों. तें बुइल राहिलं आहे आंत तें तेवढं हातीं लागलं पाहिजे. तें जर माझं माझ्याजवळ असतं, तर मीं बाकी कशाची पर्वा केली नसती. मला काय करायचं आहे. मी राजा आहे. मला कशाची पर्वा नाहीं. इतकंच नाहीं पण......" बोलतां बोलतां स्वारीचें मद्यपान सुरूच होतें आणि त्याचा परिणामही आतां त्यांच्या बोलण्यावर वगैरे होऊं लागला होता. शेवटीं शेवटीं तर तो काय बोलतो आहे आणखी काय नाहीं त्याचा त्याला स्वतलाः तरी अर्थ कळतो आहे कीं नाहीं असें होऊन तो जोरानें उठला व "आतां त्या लेकाच्या घरीं जाऊन त्याच्याशीं मारामारी करतों सोडीत नाहीं. त्याचं टाळकं फोडून टाकतों. हा कोण हा ? कोण ? माझ्या बायकोला आपल्या घरीं नेऊन ठेवणारा हा कोण ? अन् तेंही माझ्या पश्चात्. मला फसवून बाहेर पाठवून. हा माझा केवढा अपमान ! मला ह्मणतात सही करायला ती तयार आहे. मॅजिस्ट्रेटाला घेऊन या. आणखी मी मॅजिस्ट्रेटसाहेबांना—आपल्याला—घेऊन जातों तों हा प्रकार ! तिला नेली तरी कशी ? का ती घरांतच असून मला फसवण्यासाठीं उगीच बाहेर कुलूप आहे ? का ती आजारीच नाहीं आणखी लबाडीचं ढोंग, सोंग करून मला फसवलं. नाऊ माय फ्रेंड, तुह्मीं मला या कामांत मदत केली पाहिजे. कम् आमच्याबरोबर चला, आपण तें दाराचं कुलूप फोडून टाकून आपलं सामान काढूं. आपण कालच बॉंबेहून चार बाटल्या आणल्या आहेत. चला, आपण त्यांचा समाचार घेऊं. चला. चला. चला. अगदीं नाहीं ह्मणूं नका, तुह्मांला आनंद होईल. माझं ऐका. कम् कम् माय फ्रेंड." असें बडबडत तो उठूं लागला, परंतु धड उभें राहवतें कोठें ? उठतां उठतांच धाडकन् खालीं पडला.

# प्रकरण ५३ वें.

## बुडल गेलें.



त्याची ती अवस्था पाहून मॅजिस्ट्रेटसाहेबांस त्याची कींव आली व त्याचें हंसूंही आलें. त्या रात्रीं त्यांनीं त्याला आपल्या घरींच ठेवून घेतलें. एकंदर प्रकार काय झाला असावा हें त्यांच्या लक्षांत आलें. त्याच्या या अशा स्थितींत त्याला दादासाहेबांच्या घरीं जाऊं देण्यांत अर्थ नाहीं, हें त्यांस उघड दिसलें, तेव्हां तेथेंच जेवावयाला घालून त्यांनीं त्याला निजविलें आणि मद्यपानाच्या अतिरेकानें तोही बडबडण्यापलीकडे कांहीं करण्यास असमर्थ असल्यामुळें बडबड करीत व आपल्या बायकोस व वसंतरावास शिव्या देत आपोआप झोंपीं गेला.

दुसरे दिवशीं सकाळींच त्याची धुंदी उतरली आणि आदले दिवसाच्या सर्व हकीकती त्याच्या मनांत आल्या. परंतु आतां तो संतापाच्या किंवा मद्याच्या कैफांत नव्हता. संतापानें आपला डाव कांहींही साधावयाचा नाहीं; साधला तर अन्य उपायांनींच साधेल इतका विचार करण्याजोगी त्याच्या मनाची स्थिति झाली होती. मॅजिस्ट्रेटसाहेब अद्यापि उठून आले नव्हते. हा निजला होता तेथें एकटाच होता. यामुळें याला स्वस्थपणें विचार करण्यास सांपडलें. अण्णासाहेबांचें आतांपर्यंतचें चरित्र ज्यांनीं वाचलें आहे, त्यांस त्याचें सर्व रहस्य कळून चुकलेंच आहे. तेव्हां तें आतां शब्दांनीं अधिक वर्णन करून सांगत नाहीं. त्यांच्या कृतींचें वर्णन येईल त्यापेक्षां तें नुसत्या वर्णनानें अधिक स्फुट होईल असें नाहीं.

अण्णासाहेबानें आपल्या मनाशीं पुष्कळ विचार केला. नंतर कांहीं एक विचार पक्का करून तो तेथें असलेल्या लिहिण्याच्या टेबलाजवळ गेला आणि एक नोटपेपर घेऊन त्यानें शांतपणें एक पत्र लिहिलें. तें पत्र संपतांच पुनः वाचून पाहिलें, एका पाकिटांत घातलें, त्यावर पत्ता लिहिला व नीट बंद करून तें आपल्यापुढें ठेविलें आणि तो त्याच्याकडे तटस्थपणें पहात बसला. त्याच्या मनांत काय विचार चालले होते, ते त्याचे त्यासच माहिती. विचार करतां करतां तो एकदम उठला, त्यानें आपले कपडे घातले, तें पत्र खिशांत घातलें आणि बाहेर जाण्याच्या विचारानें तो निघाला, तों मॅजिस्ट्रेटसाहेब दारांत आले. त्यांनीं त्यास "कुठें चाललां, चहा घेतल्याखेरीज जायचं नाहीं" वगैरे ह्मटलें. त्यामुळें तो थांबला. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं चहा वगैरे आणवून तो पीत असतां त्याला "तुह्मी आतां दंगा वगैरे करण्याचा विचार सोडून द्या. त्यांत शहाणपणा नाहीं आणि त्यापासून तुम्हांला फायदा नाहीं. सामोपचारांनीं आणि युक्तीनं काय होईल तें खरं" असा बोध केला,

अण्णासाहेबांनीं त्यांस विलक्षण शांत पणा दाखवून ह्मटलें: "तुम्हांला त्याची काळजी नको. मी आतां अगदीं शांतपणाच धरला आहे, इतकंच नव्हे तर मी आतां इथें राहातसुद्धां नाहीं. पुढल्याच बोटीला पुनः युरोपांत जातों. माझं तिकडे कसंही चालेल. फक्त माझे कपडे आणखी माझे कागद् व सामान मला मिळालं पाहिजे. तें मी एकवार मागणार, त्यांनीं दिलं तर ठीकच आहे, नाहीं तर दुसरे कपडे मुंबईस करीन, आणखी जाईन. परंतु आतां तंटाबखेडा करण्याच्या भानगडींत मी पडणार नाहीं. कपडे तो गृहस्थ देणार नाहीं हें अगदीं उघड आहे. तुमच्याशीं बोलतां बोलतां मला आतां एक युक्ति सुचली आहे. तेवढी आपण कराल, तर फार चांगलं होईल. मी रिकामा तमाशा करूं नये अशी आपली इच्छा असली तर आपण वसंतरावाला तावडतोब चिट्ठी पाठवून बोलावून आणा आणि त्याला माझे कपडे वगैरे देण्याबद्दल सांगा. जसा माझा, तसा त्याचा व आपलाही स्नेह आहे. सामोपचारानं त्यानं ऐकलं नाहीं, तर त्याला सांगा कीं, मी आपल्यापुढें कांहीं वेड्यावांकड्या मजकुराची फिर्याद् देणार आहें. निदान मग मीं तसं केलं, तर माझ्यावर आपला दोष येऊं नये. एवढी कामगिरी करून आपण जर एक तासभर त्याला इथें गुंतवलात, तर माझं काम होईल. मी पुनः तुमच्याकडे कधीं येणार नाहीं, गांवांत रहाणार नाहीं. पण एवढं माझं काम करा. नाहीं तर मी खरोखर वेड्यावांकड्या मजकुराची फिर्याद् देणार, अन् तीं आज देणार. मला तर अब्रू नाहींच; पण ज्यांना अब्रू आहे त्यांना तरी ती राखण्याची काळजी कितपत आहे तें पाहूं. माझं तुमच्याजवळ कांहीं मागणं नाहीं. त्याला बोलावून आणून माझं सामान मला द्यायला सांगा. मला दुसरं कांहीं नको. त्याला तुम्हीं बोलावून आणून मी कोणत्या पल्ल्यापर्यंत जाणारा माणूस आहें हें सांगितलंत म्हणजे सारं कांहीं जमेल. मी आतां इथें बसत नाहीं. तो इथें आला म्हणजे मला आपल्या क्लबांत निरोप पाठवा, आणखी आपण त्याला एक तासभर कसाबसा अडवून ठेवा म्हणजे माझं काम मी करतों. मी सांगतों असं पत्र लिहा म्हणजे तो खास येईल." असें म्हणून त्यानें कांहीं मजकूर इंग्रजींत सांगितला, मॅजिस्ट्रेटसाहेबांसही तें योग्य दिसलें. कारण वसंतरावानें अण्णासाहेबाला अशा प्रकारें फसविलें याबद्दल त्यांना जरी मौज वाटली तरी बरें वाटलें नव्हतें. त्यांनीं त्याच्या सांगण्याप्रमाणें लागलीच वसंतरावास पत्र लिहिलें. त्यांत प्रारंभीं एवढेंच लिहिलें होतें कीं; "दादासाहेब व आपण यांच्यासंबंधानें वेडींवांकडीं विधानें करून मूर्खपणाची फिर्याद् देण्याचे विचारांत अण्णासाहेब आहेत. अशी फिर्याद् होऊं नये अशी माझी मनापासून इच्छा आहे. आपला व माझा स्नेह ध्यानीं आणून मी हें पत्र लिहीत आहें. आपण जर कृपा करून पंधरा मिनिटें मला येऊन भेटाल तर मी आपल्याला कांहीं फार महत्वाच्या गोष्टी सांगेन. त्या ऐकून घेतल्यानंतर आपल्याला योग्य तें आपण करालच, आपल्याला व आपल्या घरांतील बायकामंडळींना फौजदारी कचेरींत जाण्यायेण्याची पाळी येऊं नये एवढ्याचकरितां मी यांत पडण्याचें मनांत आणून आपल्याला हें पत्र लिहीत आहें. पत्र पावतांच यावें. सर्व ठीक होईल." अशा मजकुराचें पत्र लिहून त्यांनीं आपल्या माणसाबरोबर वसंतरावाकडे पाठविलें.

वसंतरावाचे हातीं पत्र येतांच त्यानें तें फोडून पाहिलें आणि पहिल्या सपाट्यास त्याच्या चिंध्या केल्या. परंतु क्षणांत काय त्याच्या मनांत आलें, त्यानें शांतपणें विचार केला. आपल्या स्वतःला जरी कांहीं वाटलें नाहीं तरी ज्या ज्या माणसांचा त्यांत संबंध येणार, त्यांच्या त्यांच्या मनाला काय वाटेल याचा विचार केला पाहिजे असें त्याच्या मनांत आलें. मॅजिस्ट्रेटसाहेब काय म्हणताहेत हें ऐकून घेण्यांत तर कांहीं बिघडत नाहीं. तो अण्णासाहेबांचा स्नेही असला तरी कांहीं पदवीचा मनुष्य आहे. केवळ कांहीं तरी बहकणार नाहीं. निदान तो कांहीं म्हणूं लागला, तरी त्याप्रमाणें ऐकणें न ऐकणें आपल्या हातचें आहे. थोडक्यांत मिटण्याजोगें असलें तर पाहावें असा विचार करून वसंतराव मॅजिस्ट्रेटसाहेबांकडे गेला. तेथें जातांच मॅजिस्ट्रेटनीं तो आल्याबद्दल अण्णासाहेबांस गुप्तपणें कुचांत निरोप पाठविला.

अण्णासाहेबांस निरोप जाण्याबरोबर अण्णासाहेब तडक निघाला तो दादासाहेबांकडे गेला. दादासाहेब घरींच होते. त्यांनीं अण्णासाहेबांची भेट घेतली. दादासाहेबांच्या समोर जातांच अण्णासाहेबानें त्यांस फारच नम्रपणें नमस्कार केला आणि ह्मटलें: " झाल्या गोष्टीबद्दल मला कांहीं बोलायचं नाहीं, माझी आतां हात जोडून आपल्याला विनंति एवढीच आहे कीं, माझ्या ट्रंका आणखी माझं सामान त्या घरांत अडकलं आहे, तेवढं माझं मला तावडतोब मिळावं. तेवढं मिळालं म्हणजे मी एक घटकाभर सुद्धां या गांवांत रहात नाहीं. मी अंतःकरणपूर्वक आपल्याला सांगतों कीं, माझ्या मनांत आतां दुसरं तिसरं कांहीं नाहीं. माझ्यापाशीं आतां हे अंगावरले कपडे तेवढे काय ते राहिले आहेत. बाकी सगळे तिकडे अडकले आहेत तेवढे द्या. आपण म्हणाल कीं, वसंतरावाला येऊं द्या म्हणजे देतों. तर तसं मात्र सांगूं नका. त्याचं माझ्याविषयीं फार वाईट मत आहे, मलाही त्याच्यासंबंधानं फार त्वेष आला आहे. त्याची माझी दृष्टादृष्ट व्हावी असं मला कांहीं वाटत नाहीं. झाली तर बरं होणार नाहीं. मी दुसरं कांहीं मागत नाहीं. माझे कपडे आणखी माझं सामान द्या. दोघे गडी द्या. मी पांच मिनिटांत आपलं सामान घेतों आणखी चालता होतों. सुतळीच्या तोड्याला सुद्धां हात लावायचा नाहीं. बस्. आणखी एकवार तिची भेट—दुरून भेट—पण तीसुद्धां नको. मग तर झालं ? माझे कपडे द्या. मला एक क्षणभर आतां या गांवांत राहावंसं वाटत नाहीं. मी तरी अब्रूचाच माणूस आहें. "

दादासाहेबांस त्यानें बोलण्याला अवसरच ठेविला नाहीं आणि एकंदर बोलणें इतकें नम्रपणें व सद्गदित स्वरानें चालविलें होतें कीं, दादासाहेबांस त्याची कींव आली व त्यांनीं त्यास शेवटीं म्हटलें: "ठीक आहे, ठीक आहे. मी तुमच्याबरोबर गडी देतों, तुम्ही आपले कपडे घेऊन जा. कपड्यांला कोण नाहीं ह्मणेल ! आणखी बायको तरी तुमचीच आहे परंतु तिला अगदींच तिथें बरं वाटेना तेव्हां इकडे आणली. ती जरा बरी झाली, कीं पुनः..."

"पुढचं पुढें" अण्णासाहेब त्यांस एकदम मध्येंच ह्मणतात: " पण सध्यां माझे कपडे देववा. आपले चिरंजीव घरीं नाहींत तोंपर्यंत मला बाहेर जाऊं द्या. त्यांना पाहिलं कीं माझा राग मला आवरणार नाहीं. आणखी मग काय होईल याचा नेम नाहीं. मी दुसरं कांहीं उपटून नेईन असं आप-

त्याला वाटलं, तर आपण आमच्याबरोबर चला. मी आपलं स्वतःचं सामान फक्त नेतों. मला दुसरं कांहीं नको, आणखी इतकं मी अगदीं हात जोडून आपल्याजवळ मागत असतांनाही आपल्याला मान्य नसलं, तर मग माझा नाइलाज आहे. मग मला काय देव बुद्धि देईल ती देईल. आपण काय तें एक मला सांगा. "

दादासाहेबांच्या मनावर या बोलण्याचा विशेषच परिणाम झाला आणि त्यांनीं भाग्याला व आपल्या घरच्या एका गड्याला बोलावून सांगितलें कीं, " त्यांच्याबरोबर जाऊन आबासाहेबांच्या घरच्या दाराचं कुलूप काढून यांचे कपडेलत्ते आणखी सामान यांना काढून नेऊं द्या " दादासाहेबांचें तें बोलणें ऐकतांच भाग्या चटकन् दादासाहेबांस ह्मणाला: " पण वसंतराव साहेबांनीं मला सांगितलं आहे कीं, मी स्वतः त्या घरीं येईपर्यंत कुणाच्या सांगण्यावरून कुलूप उघडूं नकोस ह्मणून. तेव्हां...... "

भाग्याचें बोलणें ऐकतांच अण्णासाहेब एकदम दादासाहेबांना म्हणतात: "पाहिलंत आपण ? मी म्हणतों त्याचा आला पडताळा ! वसंतरावाच्या मनांत मीं या कपड्यानिशीं बाहेर पडावं. मला दुसरे कपडेसुद्धां मिळूं नयेत. आपली तशीच मर्जी असली, तर मी जातों. पुढचं पुढें पहातां येईल. "

दादासाहेब एकदम त्याला म्हणतात, " वसंतरावाचं काय ऐकतां ? जारे जा. भाग्या, आधीं जाऊन यांचं यांना सामान दे. वसंतरावानं तुम्हांला विचारलं, तर मीं तुम्हांला सांगितलं, म्हणून सांगा जा. यांचे यांना कपडे आणखी सामान घेऊंद्या. जा, आतां इथें उभे राहूं नका. " तें ऐकतांच भाग्या पुढें झाला. खालीं टांगा–ज्या टांग्यांत अण्णासाहेब आले तो–उभा होताच, त्यांतच त्यांनीं भाग्याला घेतलें आणि दुसऱ्या गड्यास पायीं येण्यास सांगून ते निघून गेले. भाग्याजवळ किल्ली होती. त्यानें दाराशीं जातांच कुलूप काढलें. अण्णासाहेब तडक आपल्या खोलींत जाऊन पटकन् आधीं आपलें लिहिण्याचें पातडें ( पोर्टफोलिओ ) त्यांनीं आपल्या हस्तगत करून घेऊन त्यांतून विशिष्ट कागद काढून आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांत घातले. नंतर भराभरा आपले कपडे त्यानें उचलले, ट्रंकांत भरले आणि आपलें सर्व सामान घेऊन त्यानें टांग्यांत नेऊन ठेवण्यास सांगितलें. टांग्यांत सामान ठेवल्यावर तो आंत बसला नंतर त्यानें मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या घरीं लिहिलेलें व आपल्या खिशांत घातलेलें पत्र बाहेर काढून त्याच्या पाकिटावर दोन ओळी लिहिल्या. भाग्यास हांक मारली. त्याच्याजवळ तें पाकीट दिलें आणि ' हें तूं आपल्या यजमानणीस अगदीं एकीकडे दे. कुणाच्या देखत देऊं नको ' म्हणून सांगितलें. त्याला बक्षिस एक रुपया दिला आणि पुनः एकदां "तूं आपल्या यजमानणीजवळ, ती अगदीं एकटी असतां हें पत्र दे" म्हणून त्यास बजावून त्यानें टांगा चालविण्यास सांगितलें. टांगा स्टेशनावरच नेला. यापुढें गांवांत राहावयाचें नाहीं असा त्यानें खरोखरच निश्चय केला होता कीं काय कोण जाणें! तो मॅजिस्ट्रेटसाहेबांसही विचारण्यास गेला नाहीं.

इकडे मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं वसंतरावाशीं साळसूदपणाचीं बोलणीं चालविलीं: "तुम्हीं त्या गृहस्थाला अशा रीतीनें वागविलें हें बरं केलं नाहीं. त्यानं बायको ताब्यांत मिळण्याबद्दल फिर्याद लाविली किंवा आणखी कांहीं भलताच आरोप आणून

फिर्याद दिली, तर तुह्मी काय कराल? अमूची हानि केवढी होईल? तुम्ही निदान त्याला अशा रीतीनं फसवायचं नव्हतं. तो फार चिडला आहे. त्याच्या बायकोची काळजी त्याला नाहीं का!"

वसंतरावानें मॅजिस्ट्रेटसाहेबांचें सर्व बोलणें ऐकून घेऊन सांगितलें कीं "पद्मताईच्या जीवाला खास कांहीं तरी अपाय होणार अशी आमच्या मनाची पक्की खात्री झाली नसती, तर आम्ही इतक्या पल्ल्यावर गेलों नसतों. परंतु अशाच कांहीं गोष्टी आमच्या नजरेला आल्या कीं त्यावरून तो पद्मा-ताईच्या जीवाचा घात करण्याला प्रवृत्त झाला आहे, अशी आमच्या मनाची खात्री झाली. त्याच्या हातीं आबासाहेबांचं मृत्युपत्र लागलं आहे. त्यांत तिला सगळी इस्टेट दिलेली आहे, हें त्यानं पाहिलं आहे. आतां एक हिनं आपण होऊन त्याला देणगीपत्र करून दिलंन् तर त्याला ती इस्टेट मिळणार. नाहीं तर ही मेली तर तिचा वारस म्हणून मिळणार. ती कांहीं याला देणगीपत्र करून द्यायला तयार नाहीं, इतकंच नाहीं पण आपल्या दोघां भावांना भीक मागायला लावून आपण आपल्या बापाच्या इस्टेटीवर चैन मारायची अशी तिची मुळींच इच्छा नाहीं. भावांचा तपास लागून त्यांची चांगली व्यवस्था करायची अशी तिची इच्छा आहे. परंतु त्या मूर्खांचा कांहीं केल्या पत्ता लागत नाहीं. त्यांना अडकवून ठेवण्यांत याचा कांहीं तरी हात असावा अशी माझी समजूत आहे. अजून पक्का तपास लागत नाहीं......"

वसंतराव याप्रमाणें बोलत असतां मॅजि-स्ट्रेटसाहेब मध्येंच म्हणाले: "आपण सांगतां हें सगळं ऐकून मला फार आश्चर्य वाटतं बोआ! तसं जर असेल तर आपण केलं हें अगदीं बरोबर. पण तो आतां इथून मुळींच निघून जातो ह्मणतो आहे, तर आपण त्याला त्याचे कपडे आणखी सामान कां देत नाहीं? तेवढं द्या ह्मणजे मग..."

"अहो कपडे द्यायला आमची का ना आहे? पण त्यानं मृत्युपत्र तेवढं तिचं तिच्या स्वाधीन करून द्यावं म्हणजे झालं. तें तो घेऊन बसला आहे. आपण तेवढं त्याच्या-पासून घ्यावं म्हणजे मी कपडे आपल्या घरीं त्याच्या सामानासह आणून देतों."

"मृत्युपत्र त्याच्याजवळ आहे? आणखी असलं म्हणून तो तरी काय करतो त्याचं? असलं, तर असलं. असेना चार दिवस त्याच्याजवळ."

"तें कां म्हणून? तो अगदीं उलट्या काळजाचा गृहस्थ आहे. काय करील तें घेऊन आणखी काय नाहीं याचा कांहीं नेम नाहीं."

"पण काय करील असा तुमचा तर्क आहे? मला तर कांहीं वाटत नाहीं..."

"हें कांहीं सांगायला येत नाहीं. काय वाटेल तें करील अशी माझी समजूत आहे."

"तुमचा आपला त्याच्यासंबंधाचा नु-सता वाईट ग्रह आहे झालं. त्याचाही तुम-च्याबद्दल असाच आहे. दोघेही एकमेकां-बद्दल उगीच......."

"तें जाऊं द्या. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतां मला आपण ज्याकरतां बोलावलं त्याचं काय तें सांगा. त्यांचे कपडे द्यायचे, सामान द्यायचं एवढ्याचकरितां असेल तर आपण माझ्याबरोबर चला. आपल्या स्वाधीन सा-मान करतों. त्याच्या सामानाशीं आह्मांला काय करायचं आहे?......"

"मी कशाला तसा मध्यें पडूं?" मॅ-जिस्ट्रेटसाहेब एकदम म्हणाले: "मी नाहीं त्यांत पडत. त्याला बोलावून आणतों

तोन् तुम्ही—तोही माझा स्नेही आपणही माझे स्नेही, कुणीकडून भलतंन् सलतं होऊं नये. दोन्ही घराणीं अब्रूदार. तेव्हां वेडा-वांकडा तमाशा होऊं नये. दुसरा कांहीं माझा हेतु नाहीं. मी म्हणतों यांत कांहीं वावगं असलं तर तसं सांगा. ''

यावर अशाच प्रकारचीं कांहीं भाषणें करीत करीत मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं वसंतरावास चांगला दीड तास बोलण्यांत गुंतविला आणि शेवटीं त्याला ह्मटलें: " आतां तुमचं म्हणणं ऐकून घेतलं आहे. तो इतक्यांत येईल. त्यालाही चार गोष्टी सांगून शांत करीन आणखी मग तुम्हांला निरोप पाठवीन. तेवढे त्याचे कपडे आणखी त्याचं सामान त्याला द्या ह्मणजे झालं. मग आपलं काय त्याला करायचं असेल, तें तो करील, तुम्हाला काय करायचं असेल, तें तुम्ही करा. पण सध्यां त्याच्या म्हणण्याप्रमाणें त्याचं सामान देऊन टाका. ''

वसंतराव त्यांला लागलींच म्हणाला:— " आपली तशी ना नाहीं. सामान आतां ह्मटलंत तर आतां देतों. पण तुम्हांला जसा तो अगदीं गरीब वाटतो तसा तो आहे असं मात्र समजूं नका. ''

इतकें बोलून वसंतराव तेथून निघाला. वर सांगितलेलें संभाषण बराच वेळ चाललें होतें. मॅजिस्ट्रेटसाहेबांचा हेतु वसंतरावास बराच वेळ अडकवून ठेवण्याचा होता हें वाचकांस ठाऊकच आहे, तो त्यांचा हेतु पूर्णपणें साधला. वसंतरावास तशी कांहीं शंका आली नाहीं. मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या घरून निघून तो आपल्या घरीं गेला, तों त्याला कळलें कीं, अण्णासाहेब दादासाहेबांकडे आले व त्यांचें त्यांचें बोलणें होऊन त्यांनीं भोळ्याभावानें त्याचें सामान त्यास काढून देण्यासाठीं भाग्यास त्याचेबरोबर पाठविलें. तें कानीं पडतांच त्याच्या मनांत आलें कीं, आपल्याला अण्णासाहेबानें चकविलें. दादासाहेबांच्या मनांत त्या बुइलाची गोष्ट आलीच नाहीं. माणूस आपले कपडे मागतो आहे, तर ते देण्याला काय अडचण आहे? असें त्यांच्यासारख्याच्या मनांत सहजच आलें. हें मनांत येऊन व दादासाहेबांनींच जी गोष्ट केली, तीबद्दल काय बोलावयाचें? असेंही मनांत येऊन, वसंतराव गप्प बसला. परंतु अण्णासाहेब अजून आपलें सामान भरीत असला, तर आपण त्याला पद्मातांईच्या घरीं गांठून त्याच्यापासून तेवढें बुइल काढून घेऊं असा विचार करून तो तावडतोब पद्मातांईच्या घरीं गेला. परंतु अण्णासाहेब आपलें सामान घेऊन केव्हांच चालता झाला होता. अण्णासाहेबानें सामान नेलें याबद्दल वसंतरावास मुळींच कांहीं वाटलें नाहीं. आपण दिरंगाई केल्यामुळें त्यानें बुइल नेलें याबद्दल फार वाईट वाटलें. त्याची एवढी पक्की खात्री झाली होती कीं, अण्णासाहेब बुइल नाहींसें करून टाकणार नाहीं. नाहींसें करून त्याचा कांहींच फायदा नव्हता. तथापि बुइल त्याच्या हातींच राहिलें याबद्दल त्याला वाईट वाटून तो परत आला.

घरीं येण्याबरोबर त्याची बहीण त्याला भेटली आणि तो व ती दोघें पद्मातांईच्या खोलींत गेलीं. तेथें पहातात तों पद्मातांई एकसारखी अश्रु गाळीत आहे व तिच्या हातांत एक पत्र तिनें चुरमळून धरलें आहे. या दोघांकडे तिचें लक्ष्यही गेलें नाहीं.

# प्रकरण ५४ वें.

## मालतीच्या घरीं आल्यावर.



मालतीनें भर दिली, आणि पद्मेचें स्वतःचें मन अगदीं क्षीण झालें होतें, यामुळें नवऱ्यास अशा प्रकारें फसवून आपण मालतीच्या घरीं जाऊन राहावें असें मनास पक्कें वाटून पद्मा मालतीच्या घरीं आली खरी; आल्यानंतर तिला आपण आतां कांहीं वेळ तरी त्रासांतून सुटलों म्हणून किंचित् काळपर्यंत थोडेंसें समाधानही वाटलें, परंतु ती समाधानाची मनःस्थिति फार वेळ टिकली नाहीं. त्या दिवशीं पूर्वरात्रीला तिला थोडीशी स्वस्थ अशी झोंपही आली. परंतु मध्यरात्रीनंतर थोड्याच वेळा‍त कांहीं चमत्कारिक स्वप्न पडून ती एकदम जागी झाली, आणि तिच्या मनाची स्थिति पार पालटली. आपण केलें हें कांहीं चांगलें केलें नाहीं, लबाडी केली, फसवेगिरी केली, फार अनुचित कर्म केलें असें तिच्या मनाला खाऊं लागलें. आणि आदल्या दिवसांत जो काय एकंदर प्रकार घडला, तो अथपासून इतिपर्यंत तिच्या मनांत उभा राहिला. जी मालती पहिल्यापासून इतकी मित्री, त्या मालतींत इतक्या थोड्या अवकाशांत इतका फरक कसा पडला? इतका धीटपणा तिच्या अंगीं कसा आला? जी कोणाच्या पुढें दोन शब्दसुद्धां बोलायला अगदीं कांकूं करावयाची ती एकदम इतक्या धीटपणानें आपल्या नवऱ्याला फसविण्याच्या उद्देशानें इतकें खोटें बोलायला कशी तयार झाली? तयार झाली इतकेंच नव्हे तर तिनें तें सर्व नाटक बरोबर करून पारही पाडलें. हें एकंदर झालें तरी कसें? आपल्याला त्या वेळीं या लबाडीचा कसा तिटकारा आला नाहीं? असे एक नाहीं, दोन नाहीं, किती तरी विचार तिच्या मनांत घोळूं लागले. आणि तिला वारंवार वाईट वाटूं लागलें, तें आपण लबाडी केली याबद्दलचें होय. त्या विचारानें तिला पुनः सकाळपर्यंत झोंप आली नाहीं. तिची आई तिच्यापासून जवळच निजली होती, मालती पलीकडे निजली होती. न जाणों कोण्या वेळीं काय लागेल तेव्हां दिवा असावा, म्हणून एका कोपऱ्यांत दिवा बारीक करून व उजेड डोळ्यांवर येऊं नये म्हणून त्यावर पडदा लाविला होता. यामुळें त्या खोलींत पुष्कळ अंधार, आणि अगदीं थोडा उजेड अशी स्थिति झालेली होती. अशा तऱ्हेची परिस्थिति दुःख किंवा चिंता उत्पन्न करणाऱ्या विचाराची उपज व वाढ करण्याला फार अनुकूल असते. पद्मेच्या मनांत तसल्या विचारांची आतां गर्दी उडून गेली आणि सर्व विचारांचें पर्यवसान आपण लबाडी केली. आपला बचाव करण्यासाठीं कां होईना पण लबाडी केली हें बरें केलें नाहीं, फार अनुचित केलें या विचारांत होत होतें. सकाळपर्यंत तिला त्या विचारांनीं झोंप

येऊं दिली नाहीं. परंतु तिनें कोणासही उठविलें नाहीं, आपल्याकरितां दुसऱ्या कोणाची झोंपमोड काय म्हणून करावी ? असें तिच्या मनांत आलें, आणि त्या आपल्या पश्चात्तापाच्या व दुःखद विचारांतच चूर राहण्यांत तिला एकप्रकारें बरें वाटलें. एखाद्या कोंपऱ्यांत किंवा अंधाऱ्या खोलींत भूत आहे अशी मनाची खात्री झाली म्हणजे भित्रें माणूस तेथून पळून जाऊं इच्छितें. पळूंही लागतें. परंतु त्या कोंपऱ्याकडे वारंवार पहाण्याचा आणि आपण समजतों तें भूत अजून तेथें आहे कीं नाहीं तें जाणून घेण्याचा त्याला मोह पडतो, तो मोह तोडवत नाहीं. तशीच स्थिति कांहीं दुःखविचारांचीही आहे. ते विचार मनाला दुःख देत असतात. ते नकोसे वाटतात. त्यांच्यापासून आपण दूर पळावें असें वाटतें. परंतु त्यांची एक प्रकारची मोहनीही आपल्या मनावर पडते, आणि थोडा वेळ जरी ते आपण दूर सारले, तरी पुनः पुनः ते जणूं काय आपल्या मनांत आहेत कीं काय हें पहाण्याचा मोह पडतो, दुःखद विचारांखेरीज ज्यांच्या मनास दुसरें कांहीं क्वचितच शिवलें असेल, अशा पद्मेसारख्या दुर्दैवी प्राण्यांस तर हा वर सांगितलेला अनुभव घटकोघटकीं येतो.

पद्मेनें मध्यरात्रींपासून सकाळपर्यंतचा काळ झोंपेवांचून काढला. अर्थात् तिच्या मनावर त्या तेवढ्या वेळांत ज्या विचारांनीं राज्य केलें, त्यांनीं आपली दुःखमुद्रा तिच्या मुखावर ठोकलीच. आदले दिवसाच्या कष्टांनीं श्रमलेली व आपण रचलेला व्यूह निर्विघ्नपणें सिद्धीस गेला म्हणून समाधानलेली मालती मात्र सबंध रात्र अगदीं गाढ निजली होती. ती सकाळीं उठतांच पहिल्या प्रथम आपल्या मैत्रिणीकडे पाहूं लागली तों ती टकटकीत डोळे करून वर तक्तपोशाकडे पहात आहे असें तिला दिसलें. तिच्या चर्येवर आदले रात्रीं अवशीस जो तजेला व जें समाधानही दिसत होतें तें आतां दिसत नाहीं हेंही तिला घटकन् दिसून आलें आणि तिनें एकदम पद्मेस म्हटलें:

"पद्मा‌ताई, तूं केव्हां जागी झालीस ? मला तर बाई काल कशी सुखाची झोंप आली. केव्हां झोंप लागली, तें समजलं सुद्धां नाहीं. पण तूं केव्हां जागी झालीस ? मला कां नाहीं हांक मारलीस जागी झालीस तेव्हां ? तूं कीं नाहीं आतां अगदींच एकटी अशी आपल्याशीं विचार करीत बसत जाऊं नकोस. किती वेळ झाला तुला जागें होऊन सांग पाहूं."

पद्मेनें बळेंच स्मित केलें आणि म्हटलें: "केव्हां तरी झालें असेन त्याच्याशीं काय आहे ? आधीं नेहमींच मला झोंप कमी आणखी त्यांत मी दुखणेकरीण. तरी या रात्रीं मला पुष्कळ झोंप आली. पण मालुताई, कुणी रात्रीं येऊन कांहीं दंगा करून नाहींना गेलं ?"

"कुणी आलं नाहीं, आणखी गेलं नाहीं. आतां इथें येण्याची प्राज्ञा काय आहे त्यांची ? आतां तुला त्यांचं वारं सुद्धां वसंतराव लागूं देणार नाहीं. माझंन् त्याचं रात्रींच बोलणं झालं."

इतकें बोलून मालतीनें तो विषयच बदलला. पुढें आतां औषधपाण्याच्या व्यवस्थेचें काय करावयाचें त्याबद्दल बोलणें काढलें. मथुराताईंना आपल्या घरांत जागा देऊन त्यांनी तिच्याजवळ सदोदित असतां येईल अशी तजवीज करण्याचें बोलणें झालें; नंतर पद्माताईचे प्रातर्विधि उरकण्याला तिनें तिला मदत केली आणि पुनः तिचें अंथरूण झाडून झटकून घालून

तिला सुखशय्या करून दिली. पुनः थोडेंसें इकडलें तिकडलें सुखासमाधानाचें बोलणें बोलून ती " आतां मी अर्ध्या तासांत परत येतें. मग डॉक्टर भगवंतरावांना बोलावून आणून पुढचा काय विचार करायचा तो करूं " असें म्हणून मालती तेथून गेली. मधें एकदां दूध वगैरे घेऊन येऊन पद्मेला तें आलेंबळें पिण्यास लाविलें. थोडासा वेळ गेला कीं, ती मध्येंच थोडी येई, थोडीशी बसे, बोले पुनः कांहीं कामासाठीं जाई असें चाललें होतें.

याच दरम्यान अण्णासाहेबांनीं मागल्या प्रकरणांत सांगितलेला प्रकार करून मॅजिस्ट्रेटसाहेबांकडून वसंतरावाला बोलावणें केलें व आपण येऊन दादासाहेबांशीं गोड गोड बोलून आपलें सामान व तें बुड्ढें घेऊन स्वारींनीं पोबारा केला. आणि भाग्या गडी तें त्यांनीं आपल्या यजमानणीजवळ देण्यासाठीं दिलेलें पत्र घेऊन घरीं परत आला. घरीं येतांच आपली यजमानीण उठली आहे कीं नाहीं हें पाहून उठली असून एकटीच असली तर चटकन् तें पत्र आपण तिच्याजवळ देऊन टाकावें असें त्याला वाटलें. त्याप्रमाणें तो पद्मताईच्या खोलींत गेला आणि कर्मधर्मसंयोगानें तेथें त्या वेळीं मालती नसल्यामुळें त्यानें चटकन् तें पत्र तिच्याजवळ दिलें.

आतां असें कांहीं पत्रचित्र येईल हें पद्मेच्या मनांत आलें नव्हतें. परंतु पत्र हातीं पडतांच तिच्या जीवाचा थरकांप झाला, आणि तें वाचण्याविषयीं उत्कंठाही झाली. तिनें आपल्या थरथरणाऱ्या हातांनीं तें फोडलें आणि ती तें वाचूं लागली. परंतु अगदीं पहिली ओळ वाचतांच तिच्या छातींत एकदंम धडकी भरल्यासारखें झालें. तें पत्र पुढें वाचूं नये असें वाटलें, पण तें हातांतून सुटेना, डोळ्यांपुढून हलेना. यामुळें पहिल्या दहा पंधरा ओळी तिनें कशा तरी वाचल्या. पुढें तर तिला कांहींच वाचवेना. डोळ्यांनीं दिसेनाच. डोळ्यांतून एकसारखे अश्रू वाहूं लागले. हुंदके येऊन ते आतां बाहेर पडतात कीं काय असें झालें आणि इतक्यांत मागल्या प्रकरणीं सांगितल्याप्रमाणें मालती व वसंतराव दोघें तेथें आलीं.

पद्मा आपल्या शोकावेगांतच असल्याकारणानें तिनें प्रथम यांस पाहिलें नाहीं. वसंतरावानें तिची ती स्थिति पहातांच तो तिच्याकडे डोळे लावून दूरच थबकून उभा राहिला. पंधरा वीस मिनिटांपूर्वी आपण येथून गेलों, तेव्हां ही अगदीं स्वस्थ असतां इतक्यांत हिच्या हातीं हें काय मिळालें आणि त्यांत हिला इतकें शोकव्याप्त करण्याजोगें आहे काय, हें न कळून मालतीही थोडा वेळ तिच्याकडे पहात स्तब्ध उभी राहिली. परंतु लागलीच तिच्या अंगावर हात ठेवून "पद्मताई, पद्मताई हें तूं काय करते आहेस? अशी काय तुझी एकाएकीं स्थिति झाली? हें काय तुझ्या हातांत आहे पाहूं? " असें म्हणून तिच्या हातांतून तो कागद घेण्यासाठीं तिनें आपला दुसरा हात पुढें केला. त्याबरोबर पद्मेनें झटकन् तिचा तो हात मागें सारून तो कागद आपल्या अंगांतल्या पोलक्याच्या खिशांत घालीत घालीत म्हटलें: " नका. नका. तुम्ही कुणी त्या पत्राकडे ढुंकूनसुद्धां पाहूं नका. माले, तूं आणखी वसंतराव माझ्याकरितां कोणकोणत्या संकटांत आपल्याला घालून घेणार? नका. नका. मला तुम्ही आपली माझ्या घरीं परत पाठवा. जें काय व्हायचं असेल, तें माझं तिथें होऊं द्या. माझ्याकरितां तुम्हांला शीण कां? त्रास कां? मला इकडे आणण्यासाठीं तुम्हीं किती यातायात केलीत? पण तशी आणून

आणखी किती संकटं आपल्यावर ओढून घेणार ? मला आतां तुम्हीं इथें ठेवूं नका. मी अतिशय दुर्दैवी आहे. आणखी माझ्या दुर्दैवामुळें माझा–माझाच नाहीं, पण माझ्याशीं ज्यांचा ज्यांचा म्हणून संबंध येईल त्यांचा त्यांचा नाश व्हायचा आहे. देवानं आतां मला लवकर नेलीन् तरच बरं आहे. पण माझा भोग सरला नसला तर तो तरी कुठून मला नेईल ! माले, तो नाहीं मला नेणार. कारण तो जिथें मला नेऊन सोडील, तिथल्या दुसऱ्या माणसांनासुद्धां माझ्यामुळं फार त्रास होईल ! मी खरंच सांगतें, अगदीं खरंच सांगतें. मला तुम्हीं आणलीत तशी परत नेऊन सोडा. माझं काय व्हायचं असेल तें तिथें होऊं द्या. काय होणार आहे तें माझं मला दिसतं आहे !"

पद्मा या वेळीं इतकी क्षुब्ध झाली होती कीं, बोलतां बोलतां तिचें सर्वांग थरथर कांपूं लागलें होतें. मालतीनें ताडलें कीं, हिला हिच्या नवऱ्यानें कांहीं तरी पत्र लिहिलें असून तें हिच्या हातीं नुकतेंच आलें असावें. परंतु ती वेळ हिला पत्र कोणीं दिलें, केव्हां आलें, याबद्दल चौकशी करण्याची नव्हे. तिला शांत करण्याची होती. म्हणून मालतीनें आधीं तिच्याजवळ जाऊन तिच्या कपाळावर हात ठेवून तिला म्हटलें: "पद्माताई, पद्माताई, तुझी प्रकृति कोण्या थराला गेलेली आणखी तूं इतका उद्वेग करून कां घेतेस ? जरा शांत हो. आम्हीं तुला इथें आणली आहे, ती तूं अगदीं बरी झाल्याखेरीज परत पाठविण्याकरितां का आणली आहे ? आमचं काय वाटेल तें नुकसान होऊं दे; नाहीं तर आमच्यावर संकट येऊं दे. आम्हीं कांहीं तुला आतां......"

इतका वेळ अगदीं स्तब्धपणें पद्माताईकडे पहात व तिचे ते शब्द ऐकत दूर उभा राहिलेला वसंतराव एकदम तिच्या पाठीशीं गेला आणि मालतीचें हें वर दिलेलें बोलणें चाललें असतां मध्येंच ह्मणाला: "तुझी ही अशी अवस्था झाली आहे, याहून भयंकर असं दुसरं संकट आमच्यावर येणार तरी कोणतं ? तुझी प्रकृति बरी होऊं दे, मग माझ्यावर हजारों संकटं येऊन कोसळलीं तरी मी भीत नाहीं. पण तूं आतां शांत हो. या उद्वेगानं तुला पुनः ताप चढेल. आणखी दुखणं अनावर होईल. माझं काय हवं तें जरी झालं तरी मी आतां तुला अशा स्थितींत कांहीं इथून जाऊं देणार नाहीं. तुला संकटांपासून दूर ठेवणं, तुला वांचवणं हेंच माझं या जन्मांतलं कर्तव्य. त्यापायीं मला जरी मृत्यु आला तरी मी तो मोठ्या आनंदानं पतकरीन, पण..."

हें सर्व बोलतांना वसंतराव प्रथम फार क्षुब्ध झाला होता व शेवटीं शेवटीं अत्यंत सद्गदित होऊन 'पण' या शब्दापुढचे शब्द त्याच्या ओंठाबाहेरही आले नाहींत. त्याच्या डोळ्यांच्या पापण्यांवर अश्रुबिंदु दिसूं लागले. बोलवेनाच तेव्हां तो अगदीं स्तब्ध राहिला. त्याची त्या वेळची मुद्रा आणि त्याची ती एकंदर स्थिति पाहून मालती चकित झाल्याप्रमाणें त्याच्याकडे पाहूं लागली. पद्मेच्याही मनावर त्याच्या भाषणाचा परिणाम होऊन तीही अगदीं स्तब्ध झाली. तिघेंही बराच वेळ अगदीं स्तब्ध बसून राहिलीं. कोणी कोणाकडे पाहीनासुद्धां. शेवटीं वसंतराव शांत होऊन हळूच पद्माताईस ह्मणतो:

"पद्माताई, मीं डॉ. भगवंतरावांना आतां बोलावलं आहे. त्यांना ती युरोपियन डॉक्टरीण बरोबर घेऊन येण्याविषयींही मीं

सांगितलं आहे. तेव्हां आतां अगदीं स्वस्थ चित्त कर, मनांत कांहींसुद्धां आणूं नकोस. तूं थोडी बरी झालीस, कीं मी तुझ्या भावांना पृथ्वीवर असतील तिथून हुडकून आणीन. तूं अगदीं काळजी करूं नकोस."

पद्माताईच्या अंगांत प्रथम जी बोलण्याला वगैरे शक्ति आली होती ती आतां पार नाहींशी झाली. ती आतां अगदीं थकली म्हणून म्हणा, किंवा तिच्या मनांत दुसरे कांहीं विचार आले म्हणून म्हणा, पद्मा अगदीं स्तब्ध राहिली. मालतीच्याही मनांत कांहीं विचार येऊन तीही तशीच स्तब्ध राहिली. तें सगळें त्रिकूट असें एकमेकांकडे किंवा कोणीकडे तरी बघत किती वेळ तरी स्तब्ध बसलें असतें; परंतु डॉक्टर भगवंतरावांनीं आपल्या येण्यानें त्यांची स्तब्धता मोडली. ते आल्यानंतर थोड्याच वेळानें त्यांनीं बोलाविलेली डॉक्टरीणही आली. मालतीच्या मदतीनें डॉक्टरणीनें तपासणी करावयाची ती केली. नंतर डॉक्टरणीचें व डॉक्टरांचें कांहीं बोलणें होऊन डॉक्टरानींही तपासणी केली व डॉक्टरीण निघून गेली. तपासणी झाल्यावर डॉक्टर व वसंतराव बराच वेळ एकीकडे बोलत बसले होते. डॉक्टरांनीं वसंतरावांस स्पष्ट सांगितलें कीं "आपण पद्माताईंना इथें आणलं हें फार चांगलं झालं; पण एवढ्यानंच संपलं नाहीं. त्यांना क्षयाची भावना झाली आहे. पहिली स्टेज आहे. या वेळीं जर विशेष काळजी घेतली व शुश्रूषा केली, तर हा रोग पुढें वाढणार नाहीं. इतक्या जलद याचा उद्भव झाला कसा याचं मला मोठं आश्चर्य वाटतं आहे. पण उद्भव झाला आहे ही गोष्ट अगदीं निःसंशय आहे. त्याच धोरणांनीं मी आतां प्रिस्क्रिप्शन देणार आहें. पण काळजीची शुश्रूषा ठेविली पाहिजे तुह्मीं. आणखी निष्काळजी मन ठेवलं पाहिजे यांनीं; तर आह्मांला यश आलं तर येईल. नाहीं तर सगळी खटपट व्यर्थ जाईल. मी थोडं निर्भीडपणानं बोलतों आहें. पण आतां निर्भीडपणानं बोलणं जरूरच आहे, म्हणूनच बोलतों आहें. मला तर त्यांत आणखीही कांहीं कॉम्प्लिकेशन होईल असं भय वाटतं आहे पण तें स्पष्टपणानं सांगायला यायला अजून एकदां दोनदां निरनिराळ्या वेळीं तपासणी करून पाहिली पाहिजे."

डॉक्टर भगवंतराव ह्याप्रमाणें बोलत असतां वसंतराव स्वस्थ ऐकत होता. आपण पद्माताईची शुश्रूषा अगदीं उत्तम प्रकारानें ठेवूं. परंतु तिचें मन निष्काळजी ठेवणें कोणाच्या हातचें आहे! आपण कितीही तिला सांगितलें, तरी तिच्या मनांतल्या गोष्टी—तिच्या मनाचा हृद्रोग थोडाच नाहींसा होणार आहे! त्यांत आणखी सकाळीं जो प्रकार त्यानें पाहिला; तो प्रकार मनांत उभा राहतांच त्याला तिचें मन निष्काळजी होण्याचा अगदींच संभव दिसेना; तथापि त्यानें डॉक्टर भगवंतरावास तसें कांहीं बोलून दाखविलें नाहीं. त्यांचें बोलणें चाललें असतांना "ठीक आहे, ठीक आहे" असें म्हणून त्यांच्यापासून प्रिस्क्रिप्शन घेऊन त्यांस जाऊं दिलें.

पुढें मालतीचें व त्याचेंही त्यासंबंधानें बराच वेळ मोठ्या गंभीरपणें बोलणें झालें. जो वसंतराव याच मालतीची नेहमीं चेष्टा करीत असे, कधीं तिच्याशीं सरळपणानें बोलावयाचाच नाहीं. सदा चेष्टेचें व चिडविण्याचें भाषण करावयाचा, तो आतां तिला फार शहाणी, धीट, हुशार, धोरणी असें समजून तिच्याशीं खोल विचाराच्या गोष्टी बोलूं लागला. त्या दोघां बहीणभावंडांचें पद्मेच्या ठिकाणीं अतोनात प्रेम. पद्मेला सुखांत ठेवणें—तिला होणारें दुःख दूर क-

रणें—हें आपलें कर्तव्य आणि तें आपण केलें पाहिजे हें दोघांस मनापासून वाटत होतें. त्यांतून पद्मेचा नवरा अशा प्रकारचा माणूस आहे आणि त्या बुड्लाच्या पायीं तो पद्मेच्या जीवावरही उठण्याचा संभव आहे, हें जेव्हां वसंतरावाच्या मनांत आलें तेव्हां त्याच्या मनानें तर असेंच घेतलें, कीं आपण पद्मेला जर तिच्या नवऱ्यापासून दूर केलें नाहीं; तर पद्मेचा जीव तो पाजी माणूस खचित घेईल. त्याची धनतृष्णा तृप्त होण्याला तिच्या जीवाचा बळी त्याला मिळालाच पाहिजे आणि तो बळी घेण्याला तो अणुरेणुभरही कमी करणार नाहीं. हें जेव्हां त्याच्या मनास खात्रीनें वाटलें तेव्हां त्यानें मालतीला बोलावून तिच्या मनांत पक्कें भरवून दिलें कीं, अशा प्रसंगीं लबाडी केल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. ठकाशीं सरळपणानें वागत राहिल्यानें ठकाला पश्चात्ताप कधींच होत नाहीं; तो चांगल्या माणसाच्या सरळपणाचा फायदा करून घेण्यास कधीं कमी करीत नाहीं; याच न्यायानें अण्णासाहेब वागणार. तो आपला हेतु पार पाडण्यासाठीं बिचाऱ्या पद्मेच्या जीवाचा होईल तितक्या त्वरेनें बळी घेणार, कधीं सोडणार नाहीं; आणि त्या लांडग्याच्या तोंडून त्या बिचाऱ्या हरिणीला सोडवावयाचें असलें, तर त्या लांडग्याला निराळें आमिष दाखवूनच फसविलें पाहिजे. असा त्यानें पूर्ण विचार करून त्यानें मालतीला अनुकूल करून घेतलें. मालतीला त्याची ती युक्ति अगदीं मान्य झाली. तिचा आपल्या भावावर पूर्ण विश्वास, त्याच्या चतुरतेबद्दल तिची पूर्ण खात्री, आणि पद्मेवर जीवपाड प्रेम, यामुळें असें कसें करावें किंवा आपल्याला इतकें कसें साधेल याबद्दल तिनें शंका सुद्धां उद्गारून दाखविली नाहीं. आणि सर्व यथास्थित पार पाडलें हें वाचकांस माहीत आहेच.

त्या दोघां बहीणभावंडांनीं असेंही ठरविलें कीं, मथुराताईला आपल्या घरांत बिऱ्हाड द्यावें म्हणजे तिला आश्रय मिळून तिचा पद्माताईस फार उपयोग होईल. मथुराताईला त्याप्रमाणें त्यांनीं बोलावून आणून आपल्या वाड्यांत बिऱ्हाड करण्याबद्दल आग्रह केला. मथुराताईनें "माझ्या पदरीं चार मुलं, त्यांत एक मुलगी अगदीं आजारी, शिवाय मुलांची जात, खोड्या वगैरे करतील, तर आपल्याला त्रास होईल, तेव्हां मी आपली आहे तिथें बरी आहें. आपण म्हणाल तेव्हां मी हजर आहेंच" असें पुष्कळ म्हटलें; परंतु मालतीनें ऐकलें नाहीं. पद्मेच्या देखत तिला आग्रह केला. "तुमचीं भावंडं तीं आमचीं भावंडंच असं आम्ही समजतों, तुम्ही मुळींच त्याबद्दल कांहीं मनांत आणूं नका" असें स्पष्ट म्हटलें, तेव्हां शेवटीं मथुराताईनेंही त्यांचें म्हणणें कबूल केलें. परंतु मालती तिच्या नुसत्या कबुलीवर स्वस्थ बसली नाहीं. स्वतः तिच्या घरीं जाऊन पहिल्या बिऱ्हाडाच्या मालकिणीला 'आम्ही यांना आग्रह करून नेतों आहोंत, तुमचा महिना भरला नसला, तरी महिन्याचं पुरं भाडं देऊं' वगैरे सांगून तिनें आपलीं माणसें लावून मथुराताईचें बिऱ्हाड आपल्या घरीं मागल्या सोप्यांतील दोन तीन खोल्या रिकाम्या करून त्यांत ठेविलें।

# प्रकरण ५५ वें.

## मधल्या पांच महिन्यांत.



**शरीररोग** हटविण्यासाठीं जितके म्हणून उपाय शक्य तितके सगळे मालती, वसंतराव, मथुराताई व इतर मंडळी यांनीं चालविले होते. परंतु पद्माताईच्या दुखण्याची पीछेहाट म्हणून होईना. डॉक्टर भगवंतरावांनीं आपल्याकडून जितकी म्हणून शर्थ करावयाची तितकी केली. परंतु त्यांनाही तिच्या दुखण्यानें गुंगवून टाकलें. ती मनांतल्या मनांत कुढते, आणि त्यामुळें तिच्या रोगाला मागतें पाऊल लागत नाहीं असें मनांत येऊन तिला केव्हांही एकटें म्हणून असूं द्यावयाचें नाहीं, असा सर्वांनीं निश्चय केला होता. कोणी ना कोणी तरी एकजण तिच्या उशा–पायथ्याशीं बसून रहावयाचेंच. मालतीनें आपला सर्व काळ तिच्या शुश्रूषेंत घालवावयाचा असा निश्चयच केला होता. यामुळें ती अगदीं अवश्य अशा गोष्टी करण्यापुरतीच तिच्यापासून दूर जाई आणि तिच्याजवळ असतांना तिचें मन रमावें, म्हणून जे जे कांहीं उपाय करावे असें तिला सुचे ते ते उपाय ती करीत असे. केव्हां एखादें सुंदर कादंबरीचें पुस्तक वाचून दाखवावें, केव्हां वर्तमानपत्रांतील बातम्या वाचून दाखवाव्या, केव्हां हार्मोनियमवर एखादें सुंदर पद वाजवून गावें, केव्हां फोनोग्राफ लावून तो ऐकवावा; परंतु सर्व प्रयत्न अगदीं व्यर्थ झाल्याप्रमाणें होत. पद्माताई कांहीं बोलत नसे; तिच्या तोंडावर स्मित सुद्धां दिसत नसे, मग हास्याची गोष्ट कशाला ? एकंदर साऱ्या गोष्टी तिला विषवत् वाटून जशी मनुष्याची वृत्ति व्हावी तशी वृत्ति तिची झालेली होती. जवळ माणूस बसलेलें असलें, तरी तासानुतास ती त्याच्याशीं कांहीं बोलावयाचीच नाहीं. डोळे मिटून स्वस्थ पडावयाची. फार तर मधून मधून एखादा दीर्घ सुस्कारा टाकावयाचा. ‘ असें कां करतेस ? ’ असें कोणीं विचारलेंच, तर मोठ्या कष्टानें “ कांहीं नाहीं. ” “ उगीच ” अशीं त्रोटक उत्तरें द्यावयाचीं. मधेंच ती उठावयाची आणि मालतीला अगर मथुराताईला म्हणावयाची: “ तुह्मी किती दिवस माझ्या अशा खस्ता खाणार ? मला आपलं माझ्या घरीं नेऊन टाका झालं. ” सगळ्यांत मोठें भाषण कधीं केलेंच तर तें हें. असें एखादे वेळ ती बोलली म्हणजे मालती तिला ह्मणे, “ तूं बरी झाल्याखेरीज मी इथून कुठें जायची नाहीं. मला तूं बोलावलंस, मी ताबडतोब आलें, ती तुला बरी करण्याकरित ना ? मग तशी बरी हो म्हणजे कसल्या आल्या आहेत खस्तान् कसलं काय ? ”

डॉक्टरांनींही जितकी आपली अक्कल चालविणें शक्य तितकी चालवून नानाप्रकारचीं औषधें व इंजेक्शनें उपयोजून पाहिलीं; परंतु कांहीं केल्या त्या रोगाची

पोचेहाट म्हणून होईना. तेव्हां त्यांचें म्हणणें एकच पडे कीं "तुम्ही यांचं मन स्वस्थ ठेवण्याबद्दल जितकी काळजी घ्यायची तितकी घेत नाहीं. तें स्वस्थ झालं कीं रोग पंधरा दिवसांत हटेल. त्यांतून आणखी त्यांची स्थिति विशेष कडक औषधं देण्याची नाहीं हें मोठं लचांड आहे, तथापि आपण आपली आशा कांहीं सोडीत नाहीं."

डॉक्टरांनीं जरी वरून आशा सोडीत नाहीं असें म्हटलें, तरी एके बाजूस वसंतरावास सांगितलेंच कीं "पद्माताई या दुखण्यांतून वांचतील हें मला संभवनीय दिसत नाहीं. बाळंतपणाचे दिवस भरेपर्यंत जर त्या जगल्या तर बहुतकरून बाळंत होतांनाच त्यांचा अंत होईल. पण बहुतकरून ती वेळ येणंच कठीण दिसतं. आणखी याला कारण खरोखर त्यांचं मन. त्यांच्या मनाला कांहीं तरी फार भयंकर दहशत बसली आहे किंवा काळजी लागलेली आहे. ती दहशत आणखी काळजी कमी झाली तर प्रकृति सुधारण्याची आशा; नाहीं तर आशा नाहीं."

वसंतरावाला त्या दहशतीची आणखी काळजीची बरोबर कल्पना होती कीं नाहीं कोण जाणे; परंतु तो डॉक्टर भगवंतरावांस म्हणालाः "काय काळजीनं दहशत असेल ती आपल्याला माहीत आहेच. तो तिचा दुष्ट नवरा नुसता राक्षस आहे, त्याची तिला दहशत. तो काय करील आणि काय नाहीं असं तिला एकसारखं वाटतं आहे. तो आपल्या मरणाची इच्छा करतो आहे. तो आपल्याला एखादे दिवशीं येऊन मारून टाकील, अशी दहशत तिला वाटत असावी अशी माझी समजूत आहे. त्याला फसवून आम्हीं हिला इथें आणलं, आणखी दादासाहेबांना थापा मारून तो आपलं सामान घेऊन गेला. त्या दिवसापासून त्यानं पांच सात पत्रं तिच्या नांवचीं लिहिलीं, पण मीं तीं तिच्या हातीं जाऊं दिलीं नाहींत. तशींच न उघडतां ठेऊन दिलीं आहेत. पण तिला वाटत असावं कीं, त्यांचं कांहीं तरी पत्र यायचं. म्हणून ती नेहमीं विचारीत असते कीं, 'माझं एखादं पत्र आहे का ?' पण मी साफ तिला 'कांहीं नाहीं' म्हणून सांगतों. नाहीं म्हणून सांगितलं, कीं तिला समाधान होतं का दुःख होतं कांहींच समजत नाहीं. असा कांहीं प्रकार चालला आहे. तुम्ही उपाय चालूं द्या, आम्ही काय शक्य ते उपाय करून तिची शुश्रूषा करतोंच आहों. तें एक रत्न आहे, परंतु त्याचा...... "

वसंतरावाच्यानें पुढें कांहीं बोलवेना. तो थोडा वेळ थांबला. नंतर डॉक्टरांना म्हणतोः "त्याला लेकाला मुंबईला गेल्याला आज पांच महिने झाले, पण काय त्याचे डावपेंच चालले आहेत कांहीं समजत नाहीं. गंगाधर आणखी त्याचे दोघे स्नेही त्याच्यानं त्याच्या भावाच्या पाळथीवर आहेत. पण तो एका इंग्लिश हॉटेलांत राहला आहे. तिथें जेवणखाण चैनी चालली आहे. मधेंच एखादा-दुसरा दिवस किंवा चार दिवस कुठें नाहींसा होतो. पुनः आला कीं पुनः चैन सुरू आहेच. कांहीं तरी कुठें त्यानं लग्गा साधला आहे त्यावर म्हणा, किंवा इथून कांहीं उपटून घेऊन गेला आहे त्यावर म्हणा पण रहातो मोठ्या थाटांत; काय खटाटोपांत आहे, तें मात्र कांहीं समजत नाहीं. मला इथून जातां येत नाहीं. कारण हिची ही अशी अवस्था. अशा अवस्थेंत हिला टाकून मी गेलों तर ठीक नाहीं. मी असा आपला शुंभ बनलों आहे, कांहीं उद्योगधंदा करीत नाहीं म्हणून दादासाहेब

आपल्या मनांत काय ह्मणत असतील, पण मला हिच्यापासून दूर जाववतच नाहीं......"

डॉक्टर भगवंतरावांनीं त्याचें तें बोलणें ऐकून त्याच्याकडे एकदां अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें व कांहीं बोलावें असें त्यांच्या मनांत येऊन ओंठावर शब्दही आले असावे. परंतु ते तितकेच आटपून धरून त्यांनीं दुसरेंच कांहीं बोलणें काढलें. एक नवीन उपाय ब्रिटिश मेडिकल जर्नलमध्यें एकानें सुचविला आहे. त्याचा उपयोग झाला तर पाहूं असें कांहीं बोलून त्यांनीं वेळ मारून नेली आणि ते थोड्या वेळानें गेले.

पद्माताई कोणाजवळही एक दोन शब्दांखेरीज जास्त बोलत नसे. नुसती डोळे मिटून पडून राही हें वर सांगितलेंच आहे; परंतु याशिवाय ती आणखी एक तिसरी गोष्ट करी. तिनें आपल्या उशाशीं एक लहानशी क्याशबॉक्स ( लोखंडी पेटी ) ठेविली असून तिची किल्ली तिनें आपल्या गळ्यांत घालून ठेविलेली होता. ती पेटी उघडून तींतून एक लखोटा ती केव्हां केव्हां आपण एकटी असतांना काढी आणि त्यांतील पत्र काढून वाची. हें पत्र संबंध वाचण्याइतका वेळ तिला सांपडेच असें नाहीं, केव्हां केव्हां अर्धवट वाचलें नाहीं तोंच कोणाची तरी चाहूल लागली तर ती तें चटकन् आपल्या पोलक्याच्या खिशांत ठेवी. तें पत्र काय आहे तें मला पाहूं दे असें मालतीनें तिला अनेक वेळ म्हटलें, परंतु तिनें तिला दाखविलें नाहीं. इतकेंच नव्हे तर एके दिवशीं त्या पत्राबद्दल बोलणें निघालें असतां अतिशय गंभीरपणानें ती मालतीस म्हणाली: "मालुताई, तुझं माझ्यावर अगदीं निष्कपट प्रेम आहे. तुला सांगतें कीं, पुनः तूं माझ्याजवळ हें पत्र पाहण्याची कधींसुद्धां गोष्ट काढूं नकोस. मला झोंप लागली असतां हळूच पेटी नेऊन उघडून पहाण्याचा विचार तुझ्या कधीं मनांत येईल तर तो क्षणभरसुद्धां येऊं देऊं नकोस. दुसऱ्या कुणीं तसं करायचं मनांत आणलं, तर त्याला तसं करूं देऊं नकोस. फार तर काय माझ्या हातांत किंवा इथें अंथरुणावर अगदीं उघडं पडलेलं तुझ्या नजरेस पडलं तरीसुद्धां त्यातलं एक अक्षर वाचूं नकोस. तूं तें वाचलं आहेस किंवा दुसऱ्या कुणीं वाचलं आहे, असं माझ्या मनाला जे दिवशीं खात्रीनं वाटेल ते दिवशीं—त्या क्षणीं मी प्राण सोडीन, असं पक्कं समज."

पद्मा किती दिवसांत तरी इतकें एकदम बोलली नव्हती. यामुळें एवढ्या या बोलण्यानें तिला अनोनात दमल्यासारखं झालें आणि ती अगदीं निपचित पडली. चांगली पंधरावीस मिनिटें निपचित पडली असावी; तेवढ्या अवकाशांत मालती तिला कांहीं बोलली नाहीं; तिनें स्वस्थपणें तिचें बोलणें ऐकून घेतलें मात्र ती चकित झाली.

पद्मेच्या मनांत जितकें बोलावयाचें होतें तितकें सगळें अजून संपलें नव्हतें असें स्पष्ट दिसलें. थोडा वेळ विश्रांति घेऊन ती एकदम पुढें म्हणते: 'मी मेलें म्हणजे माझ्याबरोबर हें पत्र आणखी दुसरीं माझ्या घरच्या पेटींत जितकीं पत्रं आहेत, तेवढीं सगळीं जाळून टाका. त्यांतलीं बहुतेक पत्रं तूं पाहिलीं आहेस पण हें पत्र पाहूं नको. पहाणार नाहीं, जाळून टाकीन असं मला वचन दे.' इतकें म्हणून ती टक लावून मालतीकडे पाहूं लागली. त्या तिच्या पहाण्यांत किती तरी अर्थ होता. वचन दिल्याखेरीज आपण आतां ऐकणारही नाहीं असा तिचा निश्चय दिसत होता. मालतीनें पाहिलें कीं, ही वेळ हिच्याशीं वादविवाद घालण्याची

नव्हे. तेव्हां तिला ती चट्कन् म्हणते: "तूं मागशील तसलं वचन देतें. पण तूंही मला एक वचन दे कीं, हें पत्र किंवा दुसरीं कोणतींही मागलीं पत्रं पुनः वाचणार नाहीं. तूं असं वचन देत असलीस, तर मी तुला हें असं वचन देतें. हीं पत्रं पुनः पुनः वाचण्यानंच तुझी ही अशी स्थिति झाली आहे."

पद्मेनें मालतीपासून हें उत्तर अपेक्षिलें नव्हतें. यामुळें तें ऐकतांच ती अगदीं स्तब्ध झाली आणि तें बोलणेंच बदलून ती एकदम मालतीला म्हणते: "तूं आतां मला माझ्या घरीं पोंचवून दिलंस तर काय होईल? जाऊं दे माझं काय व्हायचं असेल तें तिथें होऊं दे, तुम्ही तरी माझ्या खस्ता किती खाणार..." परंतु तिच्यानें पुढें बोलवेना. हें पाहून मालती तिला म्हणाली, "तूं आतां आर्धा स्वस्थ पड कशी. आतां एक अक्षरसुद्धां अधिक बोलूं नको. तुझीं तीं पत्रं मी पहाणार नाहीं, कुणी पहाणार नाहीं, पण तुलाही पाहूं देणार नाहीं. साप अंगावर पडला म्हणजे तो दूर झुगारूनही देववत नाहीं, आणखी त्याचं भय तर एकसारखं वाटतं, तशी तुझी स्थिति झाली आहे. तो एकदां झुगारून दिलास कीं तुझं मन अगदीं साफ होऊन तूं बरी होशील. मी आतां ती तुझी पेटीच उचलून कुलुपांत घालून ठेवतें."

तें ऐकतांच पद्मेनें चट्कन् ती पेटी आपल्याजवळ ओढून घेऊन घट्ट धरली आणि ती चमत्कारिक दृष्टीनें आपल्या मैत्रिणीकडे पाहूं लागली. इतक्यांत वसंतराव कांहीं कारणानें तेथें आला. त्यामुळें त्या दोघींचें तें बोलणें तितकेंच राहिलें. पद्मा मात्र एकदम वसंतरावाकडे पाहून म्हणाली: "त्या दोघांचा कांहीं पत्ता नाहींना? तूं त्यांचा शोध लावणार होतास तो कधीं?"

वसंतराव त्यावर एकदम तिला म्हणाला: "शोध लागण्याचा संभव आहे म्हणूनच मी आज मुंबईला जाणार आहें. पण तुझी ही अशी प्रकृति पाहून मला जाववत नाहीं."

"मुंबईस?" पद्मा एकदम त्याला म्हणते: "दुसरं कुणी मुंबईसच असायचंना? तर मग तूं मुंबईस जाऊं नको, अगदीं जाऊं नको. तुझ्या कोणा मित्राकडून लागला शोध तर पहा; पण तूं जाऊं नको. अगदीं हात जोडून सांगतें, तूं इथून जाऊं नको."

तिच्या त्या बोलण्यानें वसंत अत्यंत चमत्कारला व थोड्या वेळानें म्हणतो:

"कां बरं? मी गेल्याशिवाय होणार नाहीं. मी जाऊन एक आठ दिवस राहायला पाहिजे म्हणजे आतां काम होणार आहे."

"आठ दिवस! आठ दिवस!" पद्मा दम टाकून म्हणते, "छे छे! तूं मुंबईस आठ तासमुद्धां राहूं नको. मुळीं जाऊंच नकोस."

आतां तर पद्मा अगदींच थकली. इतकी थकली कीं, तिला एकदम घेरी आल्याप्रमाणें झालें. तेव्हां तें बोलणें तितकेंच राहून ती मंडळी तिला शुद्धीवर आणण्यासाठीं झटूं लागली.

त्या दिवसानंतर तर पद्मा पुनः कधीं त्या पत्रासंबंधीं किंवा दुसऱ्या कशासंबंधानेंही विशेष बोलली नाहीं. त्या दिवसाच्या दुसरे दिवशीं तर तिला तेवढ्या त्या बोलण्यानें व क्षुब्धतेनें इतका थकवा आला कीं, तिला हालचालसुद्धां करवेना आणि तापही वाढला. तो ताप दोन दिवसांनीं राहिला; परंतु त्याच्यामुळें अशक्तपणा वाढला. तिच्या दुखण्यांतला एकंदर विशेष हाच होता कीं, एकवार कांहीं तरी कारणानें अशक्तपणा आला कीं तो पुनः कमी म्हणून व्हावयाचा नाहीं. जो अशक्तपणा आला तो पुनः कांहीं कारणानें वाढेपर्यंत कायमचाच असावयाचा.

# प्रकरण ५६ वें.

## इतर गोष्टी.



**दिगंबरपंत** मध्यंतरीं आपल्या जमिनी वऱ्हाडांत होत्या तिकडल्या वसुलाकरितां गेले होते. दुसऱ्या हजार गोष्टी जरी त्यांच्या डोक्यांत असल्या तरी कुळांपासून खंडाची वसुली करण्याचे हंगामाचे दिवस आले कीं मग त्यांस त्याखेरीज कधीं कांहीं सुचावयाचें नाहीं. किंबहुना त्यांना दुसऱ्या कोणास तरी त्रास देण्यांतच आनंद वाटत असल्यामुळें आणि कुळांस पैशाकरितां त्रास देण्याचा आनंद सर्व आनंदांपेक्षां फारच मोठा असल्यामुळें, पद्मताईच्या नवऱ्याच्या भानगडींत पडून तिला त्रास देण्याचा व त्याच अनुषंगानें आपल्या जुन्या स्नेह्याची मुलगी मथुरताई इलाही त्रास देण्याचा आनंद सोडून देऊन, स्वारी आपल्या जमिनीच्या गांवाकडे गेली होती. जमिनींत कांहीं उत्पन्न झालेलें असो नसो, ती जमीन करणाऱ्या कुळंब्यांच्या पोराबाळांची उपासमार होत असो, किंवा कांहीं आकस्मिक कारणांनीं त्यांची हानि झालेली असो, काय वाटेल तें संकट जरी त्यांच्यावर कोसळलेलें असलें, तरी दिगंबरपंतांचें वार्षिक संकट त्यांच्यावर जाऊन कोसळावयाचेंच. आणि तसें तें कोसळलें म्हणजे त्यानें निधड्या छातीनें आपलीं सर्व इतर संकटें व दुःखें एका बाजूस सारून आपलें हें वार्षिक संकट निवारण केलेंच पाहिजे. प्रत्येक कुळंब्यानें याच्या खंडाची रक्कम तयार करून दिलीच पाहिजे. हे गेल्याबरोबर ती रक्कम तयार असली, तर यांनीं त्यांच्यापासून सुमारें दहा रुपये तरी अधिक हबकावयाचे. कां ? तर " आह्मी तुझ्या इथें आठ दहा दिवस पाहुणचार घेतला असता तर तुला इतका खर्च आमच्याप्रीत्यर्थ लागलाच असता. " दिगंबरपंत कोण्या कुळाकडे गेले कीं त्यांचा कच्चा खर्च ते त्या ठिकाणीं राहींपर्यंत त्या कुळानेंच करावयाचा. आणि ते त्या ठिकाणीं रहावयाची मर्यादा म्हणजे नांवाला एवढीच कीं आपली रक्कम हातीं येईपर्यंतची. ' नांवाला ' असा शब्द वापरण्याचा हेतु एवढाच कीं, वस्तुतः ती मर्यादा नव्हती. यांचें पाऊल दारांत पडतांक्षणीं जरी त्यानें रुपये हातावर टाकले, तरी हे दोन चार दिवस तेथें राहून त्याच्यापासून शिधा–सामग्री, तूप वगैरेवर यथास्थित उपस्या मारावयाला कमी करावयाचे नाहींत. त्यानें लेकानें तावडतोब रक्कम दिली, तेव्हां यंदां त्याची चांगली चंगळ झाली असली पाहिजे मग आपण तरी कां ठरलेल्या खंडावरच तृप्त व्हावें ! असें म्हणून त्याच्यापासून निघेल

तितकें काढावयाचें हा त्यांचा बाणा असे. बरें एखाद्याला तातडतोब रक्कम देतां आली नाहीं तर हे धरणें धरून त्याच्या घरीं बसावयाचेच, त्याच्या तेथें असेपर्यंत सगळा कच्चा खर्च त्यांचा चालावयाचा आणि आपली रक्कम हातीं येईपर्यंत काय सांपडेल तें लांबविण्यासही यांनीं कधीं कमी करावयाचें नाहीं. गाद्या, गोधड्या, रजया भरून आणावयाच्या. सारांश, त्या कुळाला त्यांनीं असें सतावून सोडावयाचें कीं, हा बामण आपल्याला जिवानिशीं सोडून आपला रस्ता धरतो कधीं, असें त्यास होऊन जाई. रक्कम तांतडीनें देणारा आणि रक्कम देण्यांत दिरंगाई करणारा दोघांनाही यांच्यापासून सारखाच त्रास आणि तसा त्रास देण्याचें कारण काय तर एकानें रक्कम अगदीं तयार करून ठेविली तेव्हां त्याला खूप नफा झाला असला पाहिजे, मग आपण खंडावर आणखी कांहीं तरी त्याच्यापासून कां लाटूं नये ? आणि रकमेला उशीर लावणारानें आपली विनाकारण खोटी केली, तेव्हां त्याच्यापासून दंड म्हणून काय सांपडेल तितकें अधिक कां लाटूं नये ! एवंच उपटेगिरीशीं त्यांचा कारभार होता.

त्यांचीं कुळें त्यांना शिव्याशापाचें माप घालीत, परंतु तसें माप घेण्यांतच स्वारीला मोठा अभिमान वाटावयाचा; इतकेंच नव्हे, तर शिव्या-शाप देणारावर रागावून, संतापून त्याच्यापासून इतरांपेक्षां दिढीदुपटीनें ऐवज उकळावयाला एक चांगलें कारण सांपडलें म्हणून त्यांस आनंद होई. एकंदरींत कूळ नाठाळ असो किंवा सढळ असो, दिगंबरपंतांना कुळास त्रास देण्यांतच फार आनंद होत असे. आपल्या जमिनीच्या गांवीं जे काय चार दोन महिने जातील ते त्यांस मोठे सुखाचे. कुळांच्या जीवावर यथास्थित तूपदूध मारायला सांपडे आणि पोतडी भरायला सांपडे. आपल्या कुळाला त्रास देण्याच्या ज्या त्यांच्या रीति असत त्या सगळ्यांचा उल्लेख करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. त्या रीति कशा असतील त्याची थोडीबहुत कल्पना मथुराताईंना त्रास देण्याच्या ज्या त्यांच्या रीति वाचकांस माहीत झाल्या आहेत, त्यांवरून होणार आहे. तेव्हां त्या रीतींनीं आपल्या कुळांस जितका त्रास द्यावयाचा तितका देऊन स्वारी पुनः परत आली एवढेंच सांगून ठेवतों.

दिगंबरपंतांची स्वारी जे दिवशीं परत आली, तेच दिवशीं लागलीच आपल्या श्रीमंत स्नेह्यांच्या येथें गेली आणि त्यांना म्हणतात: "अहो, ती मथी म्हणे त्या दादासाहेबांच्या घरीं जाऊन राहिली ! तिथें म्हणे तिला त्यांनीं बिऱ्हाडाला जागा दिली, आणखी तिला कायशी त्या पद्मेच्या शुश्रूषेला म्हणून ठेविली आहे ! कृष्णाजीपंतदादा, आतां तुमच्या डॉक्टर भगवंतरावाला सांगा म्हणावं गेली चिखलांत रुतलेली गाय तुमच्या हातची. तुमच्यापेक्षां चांगला श्रीमंत असा गृहस्थ तिला त्या चिखलांतून काढण्यास मिळाला. काय पहा तिचं नशीब आहे. ती करणार, एखाद् दिवशीं ती पुनर्विवाह करणार. तिची सरकारी नोकरी जावी म्हणजे ती कांहीं तरी ताळ्यावर येईल असं समजून खटपट केली. तों तिला चांगलाच आश्रय मिळाला. तीं पोरं बरीं हुशार आहेत. त्यांची हुषारी पाहून त्यांच्या शिक्षणाची व्यवस्थासुद्धां ते दादासाहेब करतील, आणखी...... "

" पण दिगंबरपंत, तुझ्या कां इतकं एकदम पोटांत दुखायला लागलं बाबा ? आतां ती कांहीं तुझ्या बिऱ्हाडांत नाहीं, कांहीं

तुला तिचा उपद्रव नाहीं. ती पुनर्विवाह करो, कीं आणखी कांहीं करो. तुझा कांहीं त्यांत संबंध आहे का आतां? मोठा विघ्नसंतोषी आहेस खरा बोवा तूं " कृष्णाजीपंतदादा डोळे मिचकावीत मिचकावीत त्याला ह्मणतात.

त्याबरोबर दिगंबरपंत उसळून प्रत्युत्तर करतातः "विघ्नसंतोषी ! आपल्यापेक्षां अगदीं कमी. आमचा विघ्नसंतोषीपणा आपल्यापेक्षां फार निराळा. जिथें कुठें कांहीं सरळ चाललं असेल-तिथें आपला संबंध असो, नसो, कांहीं तरी विघ्न उत्पन्न झालं कीं आपल्याला अत्यंत आनंद. कुठेंही कुणाच्या कामांत विघ्न आलं, असं वर्तमानपत्रांत ऐकलं, तरी आपल्याला त्यापासून आनंद. अशी कांहीं माझी स्थिति नाहीं. समजलांत ! तेव्हां उगीच आपल्याकडे मोठेपणा घेऊन, आम्ही अगदीं हलके असं या आपल्या आश्रित मंडळींना वाटण्यासाठीं बोलूं नका."

कृष्णाजीपंतदादांनीं तें ऐकतांच ते मोठ्यानें घोड्याच्या खिंकाळण्याच्या धर्तीवर हंसले व त्या हंसण्याच्या भरांतच त्याला म्हणतातः "बरं, पण त्या आबासाहेबांच्या जावयाला गांठून तूं काय करणार होतास ? त्याचं काय झालं ? तें नीट जमायच्या आंतच........."

"अहो त्या लेकांनीं त्यालाही फसवून इथून हांकून दिलं म्हणे." दिगंबरपंत एकदम आश्चर्यचकित होऊन म्हणालाः "तो कायसा ह्मणे मुंबईस आहे, मी आतां त्याच नादीं लागणार आहें. सांगेन तुह्मांला काय योजलं आहे तें !"

इकडे मुंबईस अण्णासाहेब एकटाच एका बड्या हॉटेलांत आपल्या खोलींत चिरूट ओढीत ईझीचेअरवर बसला होता. त्याच्या मनांत कांहीं तरी विचार-फार गंभीर असे विचार-चालले होते. त्यास कांहीं एका बाबतींत काय करावें तें सुचत नसावें असें स्पष्ट दिसलें. इतक्यांत एक नोकर तेथें येऊन त्यानें त्यास कोणाच्या नांवाची चिठ्ठी दिली. ती वाचण्याबरोबर अण्णासाहेबांनीं कपाळाला आंठ्या घातल्या, नंतर हिंदुस्थानींत त्या नोकरास ह्मटलेंः "आच्छा आना दो."

नोकर खोलींतून बाहेर गेला व लागलीच एक दाढीवाला तेथें आला. त्यास पाहतांक्षणीं अण्णासाहेबांनीं अगदीं हास्यवदन करून त्यास ह्मटलेंः "ये, तात्या, तूं आमच्याकरितां किती तसदी घेतोस, हें मनांत येऊन त्याच्याचबद्दल मी विचार करीत होतों "

तो दाढीवाला गृहस्थ तिरस्कारानें हंसून ह्मणतोः "नुसता विचार आज तूं पांच सात महिने करतो आहेस. विलायतेहून आलास आणखी तुझी माझी भेट झाली तेव्हांपासून आपण विचार चालवला आहे. पण त्या विचाराला काय फळ आलं, त्या फळाचा आस्वाद कांहीं आम्हाला आपण अजून लाभूं दिला नाहीं. भेट झाली कीं भाषण अघळ पघळ. पण भाषणावर... "

"तुला सगळ्या गोष्टी बरोबर ठाऊक असून कां बरं उगीच तीनतीनदां असं बोलतोस ! मी तुझ्या अंगावर त्याला कांहीं पडूं देत नाहीं. आणखी जेव्हां तुमच्या सगळ्यांच्या उपकाराची फेड करायचा प्रसंग येईल, तेव्हां तुमच्या कल्पनेच्या बाहेर फेड करीन."

"हो, असं आज किती महिने आम्हांला सांगत आला आहेस. पण आतां ती मंडळी ह्मणते, यापुढें आमची कांहीं नुसत्या आश्वासनावर स्वस्थ बसण्याची सोय नाहीं, आणखी

इच्छा नाहीं. तुम्ही आपल्या ताब्यांत पाहिजे तर त्याला घ्या. नाहीं तर आम्ही काय करायचं तें करूं. वास्तविक तूं मध्यें आला नसतास, आणि आम्हांला आशा दाखविली नसतीस तर, आम्ही या भानगडींत पडलोंच नसतों. त्या भाबड्या पद्मेकडून केव्हांच रुपये उपटून त्याला जाऊं दिला असता, पण तूं आम्हांला जास्त आशा दाखविलीस आणखी आम्ही त्या आशेला गुंतलों, त्यामुळें इतके दिवस व्यर्थ गेले. आतां पैशाची सोय कर. नाहीं तर तुझा आमचा कांहीं सवदा जमत नाहीं असं समजून आम्ही आतां त्याचा निकाल आम्हीं पहिल्या प्रथम करण्याचं ठरविलं होतं तसा करून टाकणार. आज हें निर्वाणीचंच काय तें आपल्याला सांगायला आलों. तूं आतां भेटला नसतास तर तुला भेटल्याखेरीज काय तें करून टाकलं असतं. असे एकएका कामाकरितां आठ आठ आणखी दहा दहा महिने लागायला लागले तर आमचं कसं होणार."

अण्णासाहेब त्याचें तें बोलणें नुसतें ऐकून घेत होते. काय उत्तर द्यावें तें सुचलें नाहीं म्हणून त्यांनीं आपल्याजवळच्या टेबलावरील ग्लासांतल्या पाण्याचा एक घुटका घेतला आणि अगदीं विझत आलेल्या चिरूटाचा त्यावर एक झुरका मारून त्यास पुनः जागृत केलें. नंतर त्यांस काय वाटलें, ते झट्कन् उठले, त्यांनीं पलीकडे ठेविलेला दुसरा एक ग्लास घेतला, त्यांत एका उंच बाटलींतलें तांबूस पाणी घातलें, नंतर त्यांत सोडावाटर ओतलें आणि तें त्या दुसऱ्या गृहस्थाच्या पुढें करून ह्मटलें: "मी तुला हें प्रथमच द्यायला पाहिजे होतें, परंतु विसरून गेलों याबद्दल माफी असावी. आतां घे आणखी शांत होऊन काय तो आपण विचार करूं."

"विचार काय करायचा आहे त्यांत? तुझा विचार कांहीं कधीं कायम व्हायचा नाहीं. तुझी बायको मरायची आशा जर तुला आहे, तर तूं हें लवकर करणार कसा? तुला पूर्ण मालकी मिळण्याचा संभव आहे ती तूं सोडून या असल्या फंदांत पडशील कसा? हें काय आम्हांला धडधडीत दिसत नाहीं. तेव्हां आम्ही तुझा नाद सोडून देऊन आम्ही आपले काय थोडेंबहुत आम्हांला लाभेल तेवढ्यावरच संतुष्ट राहून दुसऱ्या कामाला लागूं. आमची पहिली उडी असली कांहीं नव्हतीच. पण तूं आल्यापासून थोडी अधिक आशा उत्पन्न झाली, दुसरं काय? पण आतां नाहीं, माझे ते दुसरे स्नेही तर म्हणाले, "आत्तांच्या आतां जाऊन निकाल करून ये." तेव्हां निकाल करण्यासाठीं म्हणून आलों आहें, मग काय करतोस? का मी आपल्या मार्गाला लागूं? तूं आणखी ते काय वाटेल तो गोंधळ घाला. हे दोघेही ज्या वेळीं असे आमच्या तावडींत सांपडले तेव्हां आम्हांला फक्त येवढीच आशा होती कीं, दादासाहेबांना आणखी पद्मेला कांहीं अब्रूची चाड असली तर त्यांना सांगून कांहीं रक्कम अधिक घेऊन त्यांना सोडवून नेऊं द्यावं, नाहींपेक्षां खोटा चेक केल्या......"

अण्णासाहेब मोठ्यानें हंसून म्हणतात: "त्या थापा माझ्याजवळ नको मारूं. तशा थापा मीं पुष्कळ ऐकल्या आहेत, आणखी..."

त्यांच्या भेटीला आलेले गृहस्थ एकदम मध्येंच म्हणतात: "खरं आहे तें. तूं आमचा अशा कामांतला गुरु नव्हे परमगुरु, परात्परगुरु—कोण म्हणशील तो गुरु आहेस. वयानें

माझ्यापेक्षां धाकटा, पण या कामांत माझ्या गुरूचा गुरु. पण सध्यां पुढें काय करायचं तेवढं सांग. आतां आमच्या मनांत कांहीं तुझ्या थापांवर स्वस्थ बसायचं नाहीं. तुझ्या थापांवर स्वस्थ बसतां बसतां एक आमच्या हातून निसटला. दुसरा अगदीं शुद्धीवरच नसतो..."

"तुम्ही त्याला कधीं शुद्धीवर येऊंच देत नाहीं ह्मणाना......" अण्णासाहेब मध्येंच हंसत हंसत उपरोधिकपणें म्हणाले.

"वाटेल तें ह्मण तूं आम्हांला आ-णखी आम्ही तुला कितीही उपरोधिक-पणानं बोललों तरी त्यांत कुणी कुणाचा राग मानण्याचं कारण नाहीं, पण तें असो. तूं इथें आल्यानंतर विनाकारण फाजील आशा आह्माला लाविलीस तिच्यापायीं उ-गीच इतके दिवस काढले. आतां तुझ्या नादीं लागून आपलं नुकसान करून घ्या-यचं नाहीं असा निश्चय झाला आहे. का-रण आमचं सगळंच गमावण्याची वेळ यायची. पोलीसचा डोळा आमच्यावर आहेच...... "

"आणखी तो काय आजचाच आहे ! तो कायमचाच आहे. त्यांना भारून ठेवून तर तुमच्या या गमजा चालल्या आहेत, नाहीं तर चालत्या कशा ! "

"तसं का होईना ! आम्ही आतां तुम्ही म्हणाल त्याला हो म्हणतों. परंतु एक ध्या-नांत धरा, कीं आतां आम्ही इथून गेलों कीं तुमचे नाहीं. आज आम्ही त्याला घेऊन तिकडे नेऊन त्या वसंतरावाच्या स्वाधीन करणार, आणखी आमचं जेवढं त्या चेका-बद्दल घेणं आहे तेवढं घेणार. यापुढें आ-म्हांला थांबण्याची सोयच नाहीं. तुमच्या आशेवर बसण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आम्ही काय करायचं बोलायचं तें बोलून आम्ही आपलं काम उरकून घेऊं. "

अण्णासाहेब फार संतापले. परंतु संतापून काय उपयोग होता ! समोर त्यांची पत्नी नव्हे ती, तो त्यांच्याच जातीचा स्वार्थपटु गृहस्थ होता. त्याला त्यानें आजपर्यंत थापा मारमारून थांबवून धरलें होतें. परंतु आज "आतां यापुढें आपण थापांवर जीव धरणार नाहीं" असें निक्षून सांगण्यासाठींच तो आला होता. अण्णासाहेब आपल्या हातून पत्नी गेली हें पहातांच त्रासून संतापून मुंबईस आले.

वाचकांनीं ताडलेंच असेल, कीं आपले मेहुणे कोठें आहेत हें त्यांस पक्कें माहिती होतें आणि त्यांनीं तेथें कांहीं दिवस रहावें म्हणजे आपला कार्यभाग आपणास चां-गला साधतां येईल असें वाटून त्यांनीं या लोकांशीं संधान बांधून आपल्या मेहुण्यांस तसेंच पुढें अडकावून ठेवण्याची तजवीज केली इतकेंच नव्हे, तर त्याबद्दल ते त्यांना पैसे वगैरे देत. परंतु आतां पुढें तसें जमणें शक्य नाहीं असें दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्या-मुळें आज त्यांचे ते साथीदार अण्णासाहेबां-कडे आले होते.

अण्णासाहेबांचें कारस्थान काय होतें हेंही आतां वाचकांनीं ताडलें आहेच. आ-पल्या सासऱ्यानें आपल्या मुलीस आपल्या सर्व जिनगीची सर्वस्वी मालकीण केली आहे, असें त्यांस वाटून त्यांनीं असा घाट घातला, कीं आपण तिच्याकडून आपल्या नांवानें सारें करून घेऊन तें सर्व निकालास लावून रोकड करून पॅरिसमध्यें जाऊन रहावें. परंतु त्यांना तें साध्य झालें नाहीं तेव्हां ते तें बुइल घेऊन मुंबईस आले. मुंब-ईस आल्यानंतरचा त्यांचा बेत असा होता, कीं आपल्या मेहुण्यांस गांठून त्यांस असें सां-गावें, कीं तुमच्या बापानें तुम्हांला एक

कपर्दीकही ठेविला नाहीं; सगळें आपल्या बायकोच्या नांवानें ठेविलें आहे. तेव्हां तुम्ही मला सगळ्या इस्टेटीचा अर्धाअधिक भाग बहाल कराल, तर तें बुइल आपण जाळून टाकूं म्हणजे पद्मेला कांहीं आपला हक्क सांगतां येणार नाहीं. तुमचे तुह्मी मालक—आपल्या बापाचे वारस म्हणून मालक—होऊन तुम्हाला सगळी इस्टेट मिळेल. परंतु येथें आल्यावर त्या थोरल्या मेहुण्याची विचित्र स्थिति पाहून त्यांना असें वाटलें कीं, आपण इतक्यांतच गर्दी करूं नये. दुसरा तो मन्या कोठें गेला आहे त्याचा तपास लावून आणून काय करावयाचें तें ठरवावें. त्यांच्या मनांत पुष्कळशी अशीही आशा होती, कीं आपली बायको मध्येंच मरेल. ती तशी मेली, तर तिचे वारस म्हणून आपल्यालाच या बुइलाप्रमाणें सर्व कांहीं मिळेल. म्हणून तो दुष्ट आपल्या बायकोच्या मरणाची वार्ता आज नाहीं उद्यां येईल आणि आपला कार्यभाग होईल, या आशेवर बसून राहिला होता. बायकोच्या आजारी स्थितींत घरांतून जें काय त्याला लांबवावयाला सांपडलें, तें त्यानें लांबविलें होतें; यामुळें त्याला पांचसहा महिने मुंबईस ऐटींत काढण्यास सांपडले. परंतु आतां ती पुंजीही संपत आली. तेव्हां आतां काय उपाय योजावा तें त्याला कांहींच सुचेना. तो निराश झाला, हताश झाला. बायकोच्या क्षीण अशा मनःस्थितीचा फायदा घ्यावा म्हणून त्यानें पत्रप्रेषणाचे—अत्यंत मर्मभेदी अशीं पत्रें पाठवून तिचें मन आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्याकडे वळविण्याचे-प्रयत्न सुरू केले. परंतु त्या प्रयत्नांसही कांहींच यश आलें नाहीं. त्याला त्याच्या त्या पत्रांचीं उत्तरें आलीं नाहींत. तीं पत्रें तिच्या हातीं गेलींच नसावीं. तिच्यावर पहारा करीत राहिलेल्या त्या त्या दोघां बहीणभावंडांनीं तीं तिच्यापर्यंत जाऊंच दिलीं नसावीं असें त्यास पक्कें वाटलें. तेव्हां शेवटीं आतां काय करावें या विचारांत तो आज गर्क होता, इतक्यांत तो दाढीवाला गृहस्थ येऊन त्यांचा दोघांचा वर दिल्याप्रमाणें संवाद झाला. त्या दाढीवाल्याचें तें शेवटलें वाक्य ऐकल्यानंतर अण्णासाहेब त्याला म्हणालेः “ मला आणखी आठ दिवसांची मुदत द्या. इतके दिवस थांबले तसे आणखी आठच दिवस. तो मन्या लेंकाचा सांपडता, तर ही मुदत मीं तुमच्याजवळ मागितली नसती. तुम्हीं आम्हीं केव्हांच सगळा कारभार उरकून टाकला असता. आतां मी एकवार गांवीं जाऊन येतों, आणखी तुम्हांला तुमच्या श्रमाचा मोबदला आणखी तुमचं मागणं—सगळं कांहीं बरोबर व्यवस्थित करून टाकूं."

“ आतां आठ दिवस तर काय, पण आठ मिनिटं, आठ सेकंदं म्हटलंत तरी थांबणार नाहीं. नुसत्या मुदतीनं काय होतं आहे ? तुम्हाला कोणी तिकडे विचारीत नाहीं. तुमची नापत झाली आहे. आम्हाला या बातम्या कळल्या नाहींत, असं समजूं नका. तुमचेच भाऊबंद आम्ही आणखी आमचे तुम्ही. आम्हांला विश्वासांत घ्याल, तर आपण सगळं काम अगदीं बेमालूम करूं, पण तुम्हांला लोभ फार. सगळं एकट्यानं गिळंकृत करण्याचा तुमचा बेत. बायकोलाय् नाहीं, मेहुण्यांनाय् नाहीं. त्यांनीं भिक्षा मागावी आणखी आपण तिकडे पॅरिसन् लंडनन् चैन करावी. कां असंच कीं नाहीं ? बोला. आतां कां नाहीं बोलत ? ”

अण्णासाहेब त्यावर कपाळाला आंठ्या घालून त्रासून म्हणालेः “तुमचीं हीं असलीं बोलणीं ऐकून घ्यायला कांहीं आम्हीं तुम्हांला बोलावलं नाहीं. तुम्हांला वाटलं तर

आठ दिवस वाट पहा, नाहीं तर चालते व्हा. आणखी माझ्या म्हणण्याप्रमाणें जर वाट पहाण्याचं कबूल करीत असलां, तर शेवटचा उपाय काय करायचा तो तुम्ही आम्ही एकविचारानं करूं. हाही माझा उपाय थकला तर मग तुमचा मार्ग तुम्हांला अगदीं मोकळा आहे. आमचा मार्ग आम्ही पाहतोंच आहों. हो कीं नाहीं काय तें तावडतोब सांगा. ”

“ वा ! आजचा रंग जरा फार जोराचा दिसतो आहे. आठ दिवसांच्या मुदतींत आपण काय करणार तें आम्हांला सांगा. त्यांत कांहीं शक्यता आहे असं आम्हांला दिसून आलं तर......... ”

“ तर बीर कांहीं नाहीं. हो म्हणा नाहीं तर आपली वाट धरा मलाही आतां इथें नुसत्या माशा मारीत बसण्याचा कंटाळा आला आहे. सोक्ष मोक्ष करून टाकणार. आतां जास्त वाटाघाट नकोच. तुम्ही नुसते गप्प बसा. आहे ती स्थिति राहूं द्या, म्हणजे झालं. तुमची मला मदत नको मसलत नको. ”

“ बरं, पण थांबलों आम्ही तर काय आम्हांला फायदा ? ”

“ तुमचं मागणं आहे, त्याच्या दिडीची–दुपटीची रक्कम. ”

“ ठीक आहे. द्या प्रामिसरी करून. ” तो गृहस्थ अगदीं जोरानें बोलला. अण्णासाहेबानें लागलीच एक आपल्या पोर्टफोलिओमधला जाडसा कागद घेऊन त्याच्यावर कांहीं लिहून तिकीट लावून त्याच्यावर सही करून त्याच्या अंगावर तो कागद टाकला आणि त्यास जाण्यास सांगितलें. तो गृहस्थही कांहीं विनोदात्मक बोलून तेथून निघाला.

तो गेल्यावर अण्णासाहेबांनीं एक कागद घेऊन त्याच्यावर कांहीं लिहिलें, नंतर कॉलबेल वाजवून नोकरास पाचारण केलें आणि तो येतांच त्याच्यापुढें तो कागद व दोन रुपये टाकून ‘ही तार करून ये आणि आम्ही आज रात्रीं गांवीं जाणार, तेव्हां तावडतोब आमची तयारी कर ’ म्हणून बजाविलें. गाडीवर जाण्याची वेळ होईपर्यंत स्वारी तेथेंच चिरूट ओढीत येरझारत होती. वेळच्या वेळीं हॉटेलच्या नोकरानें चहा वगैरे आणून ठेविला, परंतु यांना किती वेळ तरी त्याचें स्मरणच नाहीं. यांचें चहापान झालें असेल असें समजून तो गडी जेव्हां भांडीं नेण्यासाठीं आला. तेव्हां स्वारी भानावर आली व कसाबसा झटझट चहा त्यांनीं घेतला. संध्याकाळचें जेवण याप्रमाणेंच त्यांनीं आपल्या खोलींत घेतलें, आणि ते गाडीवर चालते झाले. सकाळच्या प्रहरीं वसंतरावाच्या दारांत त्यांचा टांगा येऊन थडकला. तो पहातांच घरांतला गडी पुढें आला. त्यास पहातांच अण्णासाहेबांनीं जोरानें त्यास म्हटलें: “ माझं सामान काढून या टांगेवाल्याला ही अधेली दे. आणखी आधीं दादासाहेबांना मी आल्याबद्दलची वर्दी दे. वसंतरावालाही सांग. चल. आटप. मी थोरल्या दिवाणखान्यांत जाऊन बसतों. तिची प्रकृति कशी काय आहे ? ”

असें बोलत बोलत स्वारी तडक जाऊन दिवाणखान्यांत बसली आणि आपली चिरूटाची पेटी काढून तींतून एक चिरूट काढून पेटवून त्यावर झुरके मारण्याचा सपाटा सुरू झाला. इतक्यांत वसंतरावाचे वडील तेथें आले. ते आल्याबरोबर स्वारी उठून उभी राहून व चटकन चिरूट विझवून त्यांस म्हणते: “ मीं पत्रं लिहिलीं तर मला उत्तरं नाहीत. दुरून दुरून शोध करावा, तर असं

कळलं, कीं तिची प्रकृति दिवसानुदिवस अधिकाधिकच खराब होऊन ती आतां जगत नाहीं अशी स्थिति झाली आहे. शेवटीं माझ्यानं राहवेना म्हणून मी मुठींत नाक धरून इथें आलों आहें. मला बायकोबद्दल कांहीं प्रेम नाहीं काय? ती मरणाच्या दारीं बसली असतांही मला तिचं दर्शन किंवा तिच्याशीं भाषण होऊं नये असा मीं अपराध तरी काय केला आहे? आपणच या बाबतींत विचार करा. मीं आतां शेवटीं असा निश्चय केला आहे कीं आतां इथें आलों आहें, तर इथून हलायचं नाहीं. आपली तिच्यावर माया, आणखी माझी कांहीं नाहीं? अहो ती माझी प्रत्यक्ष बायको ना? दादासाहेब, मी आपल्यापुढें इतकं अमर्यादेनं बोलणं बोलतों याच्याबद्दल क्षमा करा. पण मी काय करूं तें सांगा. आज जवळ जवळ सहा महिने झाले, मी तुमचं काय होतं आहे तें होऊं द्या म्हणून गप्प बसलों. पण काल माझ्या स्नेह्याकडून मला तार आली, कीं तुमचं कुटुंब आठचार दिवसांची सोबतीण आहे. तेव्हां...''

अण्णासाहेबांच्या तोंडून पुढें शब्द उमटेना; इतका त्यांचा कंठ सद्गदित झाला. तें पाहून दादासाहेब त्यांस म्हणतात: "अहो, आपण येऊं नये, तिच्याशीं बोलूं नये, असं आमचं कसं बरं म्हणणं असेल? आपण आलांत, तर त्यांत आम्हांला संतोषच आहे. आमच्याकडून आम्ही तिची अतोनात काळजी घेतों आहोंत. पण दुखण्याला पीछेहाट कशी ती नाहीं. तिच्या मनावर कांहीं तरी काळजीचं मोठं थोरलं ओझं—एखादं मोठं दडपण बसलेलं असावं तसं झालेलं आहे. त्यामुळें कोणत्याही औषधाचा गुण म्हणून नाहीं."

"त्या टोणग्या भगवंतरावाचीच ट्रीट्मेंट चाललेली आहे ना? मग गुण कसा येणार? मला कधींच त्याच्याबद्दल कॉन्फिडन्स नव्हता; पण तुम्ही मला फसवून हिला इकडे आणून हांकूनच दिल्याची अवस्था केलीत, तेव्हां आपण तरी गम खाऊन तुमचं तुम्हांला काय तें करूं द्यावं असा निश्चय करून डोळ्यावर कातडं ओढून निघून गेलों. मला इतका संताप आला होता, कीं त्या भरांत माझ्या हातून एखादं वेडंवांकडं कृत्य सुद्धां झालं असतं. पण मीच म्हणून कांहीं बोललों नाहीं. गम खाल्ली. आणखी गांव सोडून चालता झालों. सांगा, सांगा माझ्याइतका गम खाणारा जगांत तुम्हाला दुसरा सांपडेल का? सहा महिने बोललों नाहीं. प्रत्यक्ष माझी बायको. तिला तिचं असं कोणी नाहीं, मला माझं असं जगांत कोणी नाहीं. तिला मी कीं मला ती. पण ती तुम्हांला अनुकूल यामुळें मीं गम खाल्ली. आंतड्याला पडलेले पीळ ज्याचे त्याला माहीत, तुम्हांला काय माहीत? तुमच्या जांवयाशीं तुम्हीं असं वर्तन केलं असतं का? तुम्हांला जर ती आपल्या मुलाची बायको व्हावी असं वाटत होतं तर कोणी तें घडवूं नका म्हणून सांगत होतं? पण आतां............ ''

तें त्यांचें बोलणें ऐकून दादासाहेबांस फार वाईट वाटलें व त्यांनीं कानावर हात ठेवून त्यांस म्हटलें: "शिव! शिव! हें काय हें बोलतां? कांहीं विचार करा."

परंतु त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून अण्णासाहेब पुढें म्हणतो: "आपण भोळे आहां. आपल्या घरांतलीं माणसं कशा प्रकारचीं आहेत हें आपल्याला माहीत नाहीं. पण जाऊं द्या. त्या बोलण्यानं आपल्याला वाईट वाटतं तर मांही तें खरं आहे तरी

उच्चारून दाखवीत नाहीं. पण माझी बायको मरणाच्या दारीं बसलेली आहे अशा वेळीं माझी आणखी तिची ताटातूट करूं नका. मला इथें राहूं द्यायचं तुमच्या मनांत नसलं तर मी तिच्या घरीं तिला घेऊन जातों. मला वाटतील ते उपाय करीन. पण तिला बरं करण्याकरितां मला माझे प्रयत्न करूं द्या. लोक मुंबईस माझ्या तोंडावर थुंकले कीं, बायको मरायला टेंकली आहे, तिची घटका घातली आहे आणखी हा स्वस्थ-पणानं मुंबईत हॉटेलांत चैनीनं राहिला आहे. मी इतकी बडबड करतों आहें म्हणून आपल्याला मोठा अचंबा वाटत असेल. पण तुम्ही ह्मणा, तुमच्या मुलानं ह्मणा, असं कृत्य केलं आहे, कीं या बोलण्याचं तर काय पण याहून एखादं जास्त अचंबा वाटण्याजोगं कृत्य मीं कसं केलं नाहीं, याचा मला अचंबा वाटतो आहे ! मग काय ? आतां पुढें आपण काय करण्याचा विचार ठरवून टाकला आहे ? पण मी आपल्याला काय विचारतों आहे ? आपल्या हातीं या घरांत आहे काय ? वसंतरावाच्या हातीं सगळं कांहीं आहे. त्यांना हांक मारा. काय वाटेल तो आपला विचार करा. पण माझी बायको इथें आहे, तर मी आतां इथून कांहीं हलायचा नाहीं. मी तिच्या उशाशीं बसून रहाणार. अन् या बाबतींत तुम्हीं मला आतां कांहीं जरी केलंत तरी मी कांहीं बघायचा नाहीं. मी आतां तिच्या खोलींत जाऊन तिला पाहिल्या-खेरीज पाणी प्यायचा नाहीं. मी तुमच्या औषधपाण्याच्या आड येत नाहीं. ट्रीट्-मेंटच्या आड यायचा नाहीं, कांहीं नाहीं. पण मी तिच्याजवळ बसून रहाणार, हला-यचा नाहीं; असा निश्चय करून आलों आहें."

दादासाहेब तें ऐकून फार चकित झाले. त्यांस काय बोलावें तें समजेना.

# प्रकरण ५७ वें.

## अण्णासाहेब व पद्मा.



दादासाहेबांची स्थिति फार चमत्कारिक झाली. सहा महिनेपर्यंत या माणसानें बायकोची वास्तपुस्त केली नाहीं. आणि आतां हा एकाएकीं कां आला ? हें त्यांस समजेना. परंतु तो जें एकंदर बोलला, त्याचा त्यांच्या मनावर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. हा आपल्या बायकोची शुश्रूषा करूं म्हणतो, बायकोजवळ बसून राहीन ह्मणतो, याला नाहीं कसें ह्मणावयाचें, हें त्यांना मोठें गूढ पडलें. पद्मेची प्रकृति सुधारेल, ती लवकर बरी होईल, अशा आशेनें त्यांनीं-त्यांच्या मुलीनें व मुलानें-तिला घरीं आणलें होतें. परंतु त्यांच्या त्या हेतूप्रमाणें कांहींच न होतां तिची प्रकृति जास्तच बिघडून ती आतां जगणें शक्य नाहीं, ती केव्हां हा लोक सोडून जाईल याचा नेम नाहीं, असें त्यांना डॉक्टरांनीं स्पष्टपणें दोन दिवसांपूर्वींच सांगितलें होतें. ती गर्भवती होती. तिचे प्रसूतीचे दिवस अगदीं जवळ आले होते. या प्रसूतींतून ती वांचेल हें अगदींच संभवनीय नाहीं. तीही वांचणार नाहीं, आणि जें मूल होईल, तेंही वांचणार नाहीं, असेंही भविष्य त्यांनीं केलें होतें. तें सर्व त्यांच्या अंतःकरणांत जागृत होतेंच. अशा स्थितींत हा गृहस्थ त्यांच्याकडे येऊन त्यानें असें अकांडतांडव चालविलें, तें ऐकतांच त्यांना काय करावें आणि काय नाहीं हेंच सुचेना. वसंतराव त्या वेळीं घरांत नव्हता. तो आल्यानंतर त्याचें व याचें भांडण होईल, असेंही त्यांस वाटलें. शेवटीं त्यांनीं असा विचार केला कीं, आतां याच्याशीं आपण वाद घालीत बसलों, तर हा ऐकण्याच्या स्थितींत नाहीं, तेव्हां आपण याला याच्या बायकोच्या खोलींत नेऊन तिची व याची भेट तर होऊंच द्यावी. तिची स्थिति किती भयंकर झाली आहे, हें याला दिसलें ह्मणजे याची मनोवृत्ति बदलेल, आणि हा आपण होऊन खरोखरीच तिची कींव करून तिच्या शुश्रूषेला लागेल.

असा विचार करून ते त्याला म्हणाले: " आपलं सगळं बोलणं आम्हीं ऐकलं. आपण तिच्याजवळ असूं नये, असं ह्मणेल कोण ? पण तिला आमच्या घरीं येऊन राहण्याची उत्कट इच्छा झाली. ' अशी मी येऊन राहिलें, तर मला लवकर बरं वाटेल ' असं तिच्या मनानं घेतलं, म्हणून तिला इथें आणलं. आतां देवाच्या घरचा नेमानेम नव्हता तसा, त्याला इलाज नाहीं. नाहीं तिची प्रकृति सुधारत. जे उपाय शक्य तेवढे सगळे केले, पण...... "

" हें पहा " अण्णासाहेब मध्येंच त्याला म्हणतात: " आतां मला तें असं झालंन् तसं झालं " हें कांहीं नको. तें सगळं पुराण मला माहीत आहे. त्यांत कोणाचा काय कावा होता तें मी जाणून आहें. पण या प्रसंगीं त्या

मागल्या गोष्टी उकरून काढून भांडण्यासाठीं मी आलों नाहीं. माझी तिची एकदां नजरभेट होऊं या म्हणजे झालं. मला दुसरं कांहीं नको. ती होऊं देणार नसलां तर मी इथून कांहीं हलायचा नाहीं या निश्चयानं आलों आहें. आजपर्यंत मी, तुम्ही थोर, तिच्या वडिलांच्या ठिकाणीं, तेव्हां आपल्या मर्जीप्रमाणें होऊं यावं; आज नाहीं उद्यां आपलं आपल्यालाच वाटेल कीं नवराबायकोंची अशी ताडातोड करणं हा कांहीं शहाणपणा नाहीं, असा विचार करून सहा महिने—एक नाहीं दोन नाहीं सहा महिने—पर्यंत गप्प बसलों. मध्यंतरीं तुम्हांला एक बोटभर चिठ्ठी पाठवूनसुद्धां त्रास दिला नाहीं. पण तुम्हीं मी जिवंत आहें का मेलों याचीसुद्धां चौकशी केली नाहीं. आतां माझ्यानं कांहीं धीर धरवत नाहीं. म्हणून मनाचा निश्चय करून इथें आलों. लोकोपचाराकरितां आजपर्यंत राहिलों गप्प; आतां राहवत नाहीं. आतां मलाच लोक वाईट म्हणतात कीं तुम्हांला, हें तरी पाहूं. चला. मला एकदां तिच्याकडे घेऊन चला."

दादासाहेब त्यावर कांहीं एक बोलले नाहींत. स्वस्थ चित्तानें त्यांनीं त्याचें बोलणें ऐकून घेऊन ते तेथून उठले व पद्मातांईच्या खोलींत गेले. तेथें त्यांनीं तिची प्रकृति कशी काय आहे ? औषधपाणी झालें कीं नाहीं ? वगैरे चौकशी केली, तों काय कारण असेल तें असो, पद्मातांई आपण होऊनच त्यांना म्हणाली: " मुंबईहून कोणी यायचं झालं आहेना ? काय म्हणणं असेल, त्याप्रमाणें करा. आतां आपण आणखी त्रास करून घेऊं नका. माझं काय होणार आहे हें दिसतंच आहे. वसंतरावाला सांगा कीं झालं एवढं पुरे झालं. "

तिचें तें बोलणें ऐकतांच दादासाहेब थोडे अचंबले. अण्णासाहेब आल्याची बातमी हिला इतक्यांत कशी लागली याचें त्यांस नवल वाटलें; परंतु कोणीं तरी येऊन सांगितलें असेल, असें लागलीच मनाचें समाधान करून ते तिला म्हणाले: " मी तुला तेंच सांगायला आलों होतों. ते तुला भेटायला येऊं म्हणताहेत. "

"बोलवा, जरूर बोलवा. आणखी सांगा कीं, मला जिथें कुठें न्यायचं असेल तिथें न्या. मी यायला तयार आहें. "

पुढें तिच्यानें बोलवेना. ती स्थिति पाहून दादासाहेब कांहीं अधिक बोलले नाहींत. परत दिवाणखान्यांत गेले; आणि त्यांनीं अण्णासाहेबांस " चला " एवढेंच म्हटलें. त्यांच्यानेंही अधिक बोलवेना. अण्णासाहेब लागलीच उठले व निघाले. दादासाहेबांनीं त्यांस पद्मेच्या पुढें नेऊन उभें केलें. तेथें असलेली मथुराताई चटकन् बाहेर गेली. दादासाहेब अण्णासाहेबांस एवढेंच म्हणाले: " ही पद्मा. हिची काय अवस्था झाली आहे तें आपल्याला दिसतंच आहे. " पुढें त्यांच्या तोंडूनही शब्द निघेना. ते स्तब्ध झाले.

दादासाहेब एकपट स्तब्ध झाले, तर अण्णासाहेब अगदींच एखाद्या दगडाच्या पुतळ्याप्रमाणें उभे होते. पद्मेला—नव्हे तिचें तें अस्थिचर्मरूप—पाहून त्याच्या त्या कठोर हृदयालासुद्धां मोठा धक्का बसल्याप्रमाणें दिसलें. आतां आपण येथें उभें राहूं नये, असें मनांत येऊन दादासाहेब बाहेर गेले. बाहेर जातांना त्यांनीं दार लाविलें. बाहेर येतात तों त्यांना त्यांच्या कुटुंबानें येऊन सांगितलें कीं, मालती बाळंत झाली आणि तिला मुलगा झाला. उत्तररात्रीपासूनच ती सर्व मंडळी त्या गडबडींत होती. परंतु

त्यांनीं दादासाहेबांस कांहीं कळूं दिलें नव्हतें. दादासाहेबांस तें कळतांच फार आनंद झाला. परंतु तो आनंद निर्मिश्र नव्हता. दुसऱ्याच क्षणीं त्यांस असें वाटलें कीं, पद्मेचीही अशीच सुटका झाली असती तर फार चांगलें झालें असतें. त्या विचारांत ते आपल्या बसण्याच्या खोलाकडे गेले तों वसंतराव बाहेरून आला. त्यांनीं त्यास आपल्या खोलींत नेऊन म्हटलें:

" अण्णासाहेब इथें आले आहेत. त्यांना मीं पद्मेच्या खोलींत नेऊन बसवलं आहे. तूं आतां विनाकारण कांहीं गडबड करूं नको. लोकापवादाला विचारायचं नाहीं ह्मटलं तरी तसं करण्याला कांहीं मर्यादा आहे. अण्णासाहेब इतका निर्दय, परंतु पद्मेला पाहून त्याच्या हृदयालासुद्धां पाझर फुटले असतील. तो दगडासारखा तिच्यापुढें उभा राहून तिच्याकडे पहात राहिलेला मीं प्रत्यक्ष पाहिला. आणखी मुकाट्यानं दार लावून निघून आलों आहें. तूं एव्हां तिकडे जाऊं नको. मालती बाळंत झाली. मुलगा झाला... "

वसंतरावानें तें त्यांचें शेवटलें बोलणें मुळींच ऐकलें नाहीं. तो त्या पहिल्या बातमीनेंच अगदीं स्तब्ध झाला. आपले आजपर्यंतचे सर्व प्रयत्न वायां गेले. हेंच त्याच्या मनांत आलें. तो आपल्या बापाला कांहीं एक बोलला नाहीं. नुसत्या कपाळाला आंठ्या घालून तो आपल्या खोलीकडे गेला. आदले दिवशीं रात्रीं त्याला एक तार आली होती, तींत आपण मुंबईस ताबडतोब निघून या असा मजकूर होता. मालती प्रसूत होण्याचीं चिन्हें थोडींबहुत त्याच्या कानावर आलीं होतीं, यामुळें त्यानें " आपण एक दिवसानंतर येतों " असें उत्तर पाठवावयाचें असें ठरवून तो सकाळींच त्याप्रमाणें तार करण्यास गेला होता. अण्णासाहेबांच्या येण्याचा आणि त्या तारेचा संबंध असावा, असें एकदम त्याच्या मनांत आलें. तोंपर्यंत—रात्रीं तार आल्यापासून तों सकाळींच तो तारेचें उत्तर पाठवून परत येईपर्यंत—त्याला कांहीं शंका नव्हती. परंतु तो आला आहे ही बातमी कळतांक्षणींच त्याच्या मनांत एकदम वर सांगितल्याप्रमाणें विचार आला. मालती प्रसूत होण्यासंबंधाची गडबड जर नसती, तर आपण त्या तारेप्रमाणें सकाळींच मुंबईस निघून गेलों असतों. हा विचार मनांत आल्यानें अण्णासाहेबांच्या येण्यांत सरळ हेतु नाहीं हें त्याला वाटलेंच आणि आपल्या बापानें त्याला एकदम पद्मेच्या खोलींत नेऊन सोडलें हें बरोबर केलें नाहीं. त्याला क्षणभर सुद्धां थारा द्यावयाचा नाहीं असेंही वाटलें. आतां पुढें काय होणार ? याविषयीं तो विचार करीत उभा राहिला. अण्णासाहेब आपल्या घरांत राहणार नाहीं हें त्याला अगदीं उघड दिसलें, तो आतां पुनः पद्मेला आपल्या घरीं नेण्याविषयीं आग्रह धरणार हेंही त्याच्या मनानें घेतलें आणि आपण इतके दिवस हें सगळें केलें त्याचें फळ काय झालें ? हा विचार त्याच्या मनांत घोंटाळूं लागला. त्या घोंटाळ्यांतच तो आपल्या खोलींत आपल्या टेबलाजवळ उभा राहिला.

इकडे अण्णासाहेब सुमारें पांच मिनिटें-पर्यंत अगदीं दगडासारखा स्तब्ध उभा राहिला. त्याची दृष्टि त्याच्या त्या प्रेतवत् झालेल्या पत्नीकडे लागून राहिली होती. त्यानें आजपर्यंत आपल्या पत्नीच्या आजारावगैरेसंबंधाच्या बातम्या टेविल्या होत्या. ती अगदीं मरणाच्या दारीं बसली आहे हेंही त्याला कळलें होतें; परंतु त्या बातम्यांनीं

त्याच्या मनांत तिचें जें चित्र उभें राहिलें होतें, तें इतकें भयंकर नव्हतें. आतां जें त्यानें पाहिलें, तें त्याच्या कल्पनेच्या अगदीं बाहेर होतें " तुमची पत्नी ही नव्हे, तुम्हांला फसविण्याकरितां ही कोणी तरी दुसरीच स्त्री तुम्हांला दाखविली आहे " असें जर त्याला कोणीं सांगितलें असतें, तरीसुद्धां त्याला तें अगदीं खरें वाटलें असतें. इतका विलक्षण फरक तिच्या शरीरांत झाला होता. पूर्वीचें कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां सौंदर्य किंवा तेज उरलें नव्हतें. इतकेंच नव्हे, तर तिच्या चर्येवर अगदीं प्रेतकळा आली होती. तिच्याकडे त्याच्यानें पाहवेना. आणि पहात रहावें किंवा नाहीं हें त्याच्या मनानें ठरवावयाचें असतें, तर त्यानें केव्हांच आपलें तोंड फिरविलें असतें. परंतु तिची ती स्थितिच अशी कांहीं भयंकर होती कीं, त्याच्या मनांत नाना प्रकारचे विचार येऊन त्यास तेथून हलण्याची किंवा आपले नेत्र दुसरीकडे नेण्याची बुद्धि होईचना. किंवा ती स्वतंत्रताही त्याला राहिली नाहीं. फार जबरदस्तपणें चिकटवून टाकण्याचा गुण असणाऱ्या कांहीं पदार्थानें त्याचे पाय जणूं काय जागच्याजागीं चिकटविल्याप्रमाणें झाले होते. त्यानें आपल्या कोटाच्या दोनही खिशांत घातलेले हात तेथल्या तेथेंच चिकटवून राहिल्याप्रमाणें स्तब्ध होते आणि डोळे शून्य दृष्टीनें असोत किंवा कसेही असोत, पद्मेच्या त्या मुखाकडे टक लावून राहिले होते.

तो खोलींत येऊन तिच्या पुढें उभा रहातांच पद्मेनें एकवार डोळे उघडून त्याच्याकडे पाहिलें आणि अंगांत हात उचलण्याचेंही त्राण नसतां उठण्याची खटपट केली. छे, खटपट केली हें म्हणणें अगदींच चुकीचें; कारण तिला तशी खटपट करणें अगदीं अशक्यच होतें. तिच्या मनानें मात्र ती खटपट फार जोरानें केली, परंतु ती खटपट अगदीं व्यर्थ म्हणून तशीच सोडून देऊन तिनें आपले डोळे मिटले. त्या डोळ्यांतून एक एक मोठमोठा अश्रुबिंदु मात्र—किंचिन्मात्र—बाहेर आलेला दिसत होता. तिचा श्वासोच्छ्वास त्यावेळीं इतका मंद चालला होता कीं, दूर उभा राहून पहाणारा तर काय, परंतु अगदीं जवळ बसून तो चालला आहे कीं नाहीं, हें मुद्दाम पाहूं इच्छिणारास सुद्धां तो चालला आहे हें समजणें फार कठिण होतें.

पांच मिनिटेंपर्यंत अण्णासाहेब वर सांगितल्याप्रमाणें उभा राहिला. तेवढ्या वेळांत त्याच्या मनांत काय विचार आले असतील आणि काय नाहीं याचा तर्क करून त्यांचें वर्णन करणें केवळ अशक्य ! परंतु त्याचे ते श्वासनिश्वास आणि चर्येवर क्षणोक्षणीं दिसणारे फरक त्याच्या मनांत विचाराचें फार मोठें काहूर चाललें असलें पाहिजे याबद्दल मात्र खास साक्ष पटवीत होते. परंतु हें सारें फक्त पांचच मिनिटें चाललें. शेवटला काय विचार त्याच्या मनांत आला आणि तो एकदम गहिंवरून पद्मेच्या पायांपाशीं जाऊन तिचे पाय धरून म्हणालाः " प्रिये, प्रिये, मीं दुष्टानं तुझी काय ही स्थिति केली ! मी किती नीच; किती निर्दय, " इतकेच शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडले. आणि पुढचे शब्द त्या गहिंवरांत गुटमळले. त्यानें पाय धरण्याबरोबर पद्मेच्या मनास कांहीं तरी धक्का बसला असला पाहिजे. तिनें आपले डोळे पुनः एकदां उघडले आणि त्याच्याकडे पहाण्याचा व आपले पाय आंखडून घेण्याचा यत्न करण्याचा मानसिक यत्न केला. परंतु तो अगदीं व्यर्थ गेला. त्याच्याकडे पहाण्यास मान जितकी उचलणें अवश्य होतें ति-

तकी उचलणें किंवा गहूंभरही पाय इकडचा तिकडे करणें तिला अशक्य होतें. त्याचे शब्द तिच्या कानीं पडतांच तिची मानसिक स्थितीही चमत्कारिक झाली. तिला आंतून गहिंवराचा फार मोठा उमाळा आला पण तो समजून येण्यास अश्रुपाताखेरीज कोणतेंही चिन्ह बाहेर दिसणें शक्य नव्हतें. कांहीं बोलण्याचा तिनें प्रयत्न केला पण तोही व्यर्थ गेला. ओंठ हलण्यापलीकडे कांहीं झालें नाहीं. ही तिची स्थिति तिच्या नवऱ्यास समजणें शक्य नव्हतें. आणि यदाकदाचित् ती त्याला समजेल अशीं बाह्य चिन्हें झालीं असतीं तरी तो आपल्या शोकावेगानें इतका शून्यचित्त झाला होता व त्याचे डोळे इतके अश्रुपूर्ण झाले होते, कीं तीं चिन्हें त्याला दिसलींही नसतीं.

तो तसाच कांहीं वेळ तिच्या पायाशीं बसला आणि मग उठून तिच्या उशाशीं आला. त्यानें मांडी घालून तिचें मस्तक आपल्या मांडिवर ठेविलें. तसें त्यानें करण्याबरोबर तिचें शरीर किंचित् कंपित झाल्याचा त्यास भास झाला. तिचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून त्यानें एकवार तिच्या हनुवटीला हात लाविला. नंतर एकदम आपल्या खिशांतला रुमाल काढून तिचे अश्रु त्यानें पुसले आणि अगदीं स्तब्ध असा तिच्याकडे शून्य दृष्टीनें पहात बसला. त्याच्या मनांत मागल्या सर्व गोष्टी उभ्या राहून त्याचें मन त्याला खात होतें काय ? त्याचें मन पश्चात्तापानें व्याकुळ झालें होतें काय ? हा सर्व प्रताप आपल्या दुष्टपणाचा, आपल्या निर्दयपणाचा, असा विचार त्याच्या मनांत उभा राहिला होता काय ? आपल्याला आतां पश्चात्ताप झाला तरी झाल्या गोष्टीची दुरुस्ती होणें अगदीं अशक्य असें मनांत येऊन त्याचें मन विव्हल झालें होतें काय ?

असें झालें असलें पाहिजे असें दाखविणारीं सर्व बाह्य चिन्हें त्या वेळीं दिसत होतीं आणि हा पद्मेच्या खोलींत गेला आहे, तो करतो आहे तरी काय हें पाहण्याच्या उद्देशानें दाराशीं आलेल्या व किलकिल्या दारांतून पाहणाऱ्या वसंतरावास तरी तसें वाटलें असावें. आपल्या बायकोचें मस्तक मांडीवर घेऊन हा कांहीं एक न बोलतां एकसारखी दृष्टि लावून तिच्या मुखाकडे पाहणाऱ्या अण्णासाहेबांस पाहातांच वसंतराव अत्यंत चकित झाला आणि जागच्याजागींच खिळल्याप्रमाणें तशाच्या तसाच तेथें उभा राहिला, इतकेंच नव्हे तर आतांच वर दिलेले प्रश्न त्याच्याही मनांत उभे राहून तोही त्यांचीं उत्तरें शोधण्यांत गर्क झाला.

# प्रकरण ५८ वें.

## पश्चात्ताप झाला काय?



**वसंतराव** त्या खोलीशीं आला होता, तो प्रथम अशाच उद्देशानें आला होता कीं, हा दुष्ट काय करतो आहे हें पहावें. तो तिला कांहीं तरी टाकून बोलत असेल, तिची निर्भर्त्सना करीत असेल, तिच्या क्षीण अशा स्थितीकडे पाहून यत्किंचित्‌ही करुणा त्याच्या मनांत उभी न रहातां तो तिच्या मनाला अधिकच दुःख होईल अशीं बोलणीं बोलत असेल, तेव्हां त्याला तेथून उठवावें, असाच त्याचा विचार होता. परंतु जें त्यानें पाहिलें, तें अगदींच निराळें. निर्भर्त्सनेची, मर्मच्छेदी भाषणांची तर गोष्ट राहोच, परंतु तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन तो तिच्या अश्रूंचें परिमार्जन करतो आहे, असें त्याच्या नजरेस पडलें. तें पहातांच तो क्षणभर अत्यंत चकित झाला. आपण जें काय पहातों आहोंत तें स्वप्नांत पहातों आहोंत कीं जागेपणीं पहातों आहोंत, याचाच त्याला संशय पडला. तो देखावा इतका विलक्षण, इतका अनपेक्षित होता कीं, त्यांत असत्यता असेल, हा विचार त्याच्या मनांत येतां क्षणींच त्यानें तो दूर सारला. पत्नीची ही दुर्दशा पाहून त्या कठोर-हृदयी माणसाला खरोखरी पश्चात्ताप झाला आहे, आणि त्या पश्चात्तापाच्या भरांतच त्याचें हें वर्तन चाललें आहे असें त्यास स्पष्ट वाटलें. अशा भयंकर स्थितींतही तो लबाडीनें वागत असेल, जें काय करतो आहे तें ढोंगच असेल, हा विचारच त्याला कसासा वाटला आणि त्याच्याही डोळ्यांत पाणी आलें. हा पतिपत्नींचा एकांतप्रसंग फार पवित्र! हा आपण त्यांच्या न कळत पहात उभें रहाणें सुद्धां अगदीं अयोग्य. येथें आतां आपण उभें राहूं नये असेंही त्याच्या मनांत आलें, व तो तेथून परतून आपल्या खोलींत आला. त्या देखाव्यासंबंधीं विचारांनीं व्याप्त होऊन तेथें एकसारखा येरझारत राहिला. त्याच्या डोळ्यांसमोरून तो त्यानें त्या खोलींत पाहिलेला देखावा कांहीं केल्या हलेना. तो हलावा अशासाठीं त्यानें प्रयत्नही पण केला नाहीं. त्या दुष्टासही कृतकर्माचा पश्चात्ताप अगदीं खचित झाला आहे, असें त्यास पक्कें वाटलें. याच मूर्खानें—नव्हे दुष्टानें—केवळ द्रव्याच्या लोभानें अंध होऊन तिची खरी योग्यता आजपर्यंत जाणली नाहीं. तिला वाटेल तसें छळलें आणि त्या आपल्या छळण्यानें तिची कितीं भयंकर दुर्दशा झाली आहे हें दृष्टीस पडतांच आतां त्याचे डोळे उघडले असावे, त्याखेरीज आपण पाहिला

तो देखावा दिसलाच नसता. कृत्रिमपणानें-कपटानें हा देखावा दाखविण्याची आतां अवश्यकता नाहीं आणि जो देखावा आपण पाहिला, त्यांत कृत्रिमपणाची, कपटाची—छटाही खचित नाहीं, असेंच त्याच्या मनांत आलें. अण्णासाहेब कपटी आहे, दुष्ट आहे, स्वार्थसाधु आहे, अप्पलपोट्या आहे-आजपर्यंत त्यानें पद्मावतीशीं वर्तन केलें, तें अगदीं लबाडीचें, आपला कावा साधण्याचें, तिच्या मनाची किंवा शरीराची कसलीही पर्वा न करतां केलें, याबद्दल त्याला शंकाच नव्हती, परंतु आतांचें त्याचें वर्तन त्यांतलें नव्हे. त्याच्या अंतःकरणाला-तात्पुरता तरी-पश्चात्ताप खचित झाला आहे असें त्याला वाटलें. नवऱ्याच्या या वर्तनानें पद्माताईला अंतकाळीं तरी खचित समाधान होईल; आणि तसें समाधान झालें तर फार चांगलें असें त्याच्या मनांत आलें. आतां आपण त्याच्याशीं भांडूं नये, तोही भांडण्याला सिद्ध होणार नाहीं. आपण आतां सामोपचारानें त्याच्याशीं वागावें आणि पद्मेचे शेवटले दिवस सुखांत जातील अशी तजवीज करावी असेंच त्याच्या मनांत आलें. तो त्या खोलीशीं या अपेक्षेनें गेला होता कीं, अण्णासाहेब तेथें आपल्या बायकोला तशा स्थितींतही छळतांना दिसेल, दुरुत्तरें करीत असेल, तर काय वाटेल तें झालें तरी त्याला तेथून हांकून द्यावें. परंतु तो देखावा पाहून परत आल्यानंतर त्याच्या मनाचा असा विचार झाला, कीं तो पश्चात्तापानें विव्हल झाला आहे, तेव्हां त्याच्या स्वतःकरितां नव्हे, पण त्याच्या त्या अत्यंत पवित्र रमणीय पत्नीकरितां तरी त्याच्याशीं सामोपचारानें वर्तन करून त्याच्याकडून तिला अंतीं तरी सुख देववावें.

इकडे अण्णासाहेब पद्मेचें मस्तक मांडीवर घेऊन किती वेळ तरी तसाच तटस्थ बसला. तिनेंही त्याच्या मांडीवरून मस्तक ढळविलें नाहीं. तिच्या डोळ्यांतून चाललेले अश्रु तिच्यानें पुसवेनात ते तो मधून मधून पुशी, तिच्या चर्येकडे करुणार्द्र दृष्टीनें पाही व दीर्घ उसासे टाकी. त्यानें एक दोन वेळां बोलण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याच्या तोंडून शब्द निघेना. अशा स्थितींत तो अर्धा तास बसला. शेवटीं तो पश्चात्तापाचा व दुःखाचा भर ओसरल्यावर तो तिला " पद्मे, तुला दूध वगैरे कांहीं पाहिजे का ? मी आणून तुला दोन चमचे घालूं का ? आतां तरी मला तुझी सेवा करूं देतेस का ? " असें विचारूं लागला. परंतु त्या प्रश्नांचें उत्तर तिच्याकडून आलें नाहीं. कसें येणार ? शब्दांनीं येणें तर शक्य नव्हतेंच; परंतु खुणांनींही येणें त्या वेळीं शक्य नव्हतें. ती त्या वेळीं आंत उत्पन्न झालेल्या समाधानसुखाचा अनुभव घेत होती काय ?

अण्णासाहेब आतां आपण पुढें काय करावें, या विचारांत पडला. कोणी इतक्यांत इकडे येईल तर त्याला सांगून आपण दूध आणवूं आणि आपल्या हातांनीं दोन चमचे हिच्या तोंडांत घालूं, असें त्याच्या मनांत आलें. जवळ कोठें झांकून ठेविलें असलें तर पाहावें, म्हणून त्यानें बसल्याबसल्याच सभोंवताली दृष्टि फिरवून पाहिलें, परंतु तसें कोठें दिसलें नाहीं. तेव्हां आतां कोणास हांक मारल्याखेरीज गत्यंतर नाहीं, असें मनांत वाटून त्यानें हळूच तिची उशी नीट करून आपल्या मांडीवरून तिचें मस्तक उचलून त्या उशीवर ठेविलें; आणि तो उठून दाराशीं आला, तों त्याला मथुराताई दिसल्या. त्यानें मोठ्या गहिंवरल्या स्वरानें त्यांना म्हटलें: " मथुराबाई, थोडें दूध आणा. तुमच्या मैत्रिणीला मी आपल्या हातानें दोन चमचे

घालतों मग तुम्ही तिच्याजवळ बसा. मी इतका वेळ बसलों, परंतु आतां डॉक्टराकडे जाऊन येतों. मला कांहीं नीट चिन्ह दिसत नाहीं. "

त्याचा तो गहिंवरलेला स्वर कानीं पडतांच मथुराताईही चकित झाली. आपण ऐकतों आहोंत हें काय स्वप्नांत कीं जागेपणीं हें तिलाही समजेना. गहिंवर आणि अण्णासाहेब या दोन गोष्टींत अगदीं विरोधच असला पाहिजे, असा इतरांप्रमाणें तिचाही समज होता. परंतु आतां त्याच्याकडे पहाते तों त्याची चर्या, त्याचा तो सद्गद स्वर हीं सर्व अगदीं खरीं खरीं दिसलीं. तसें दिसतांच ती साहजिकच आश्चर्यपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली. त्याबरोबर अण्णासाहेब तिला म्हणतोः-" मथुराबाई, पाहूं नका. तिचा घसा कोरडा पडला असेल इतकी ती मघापासून आंतल्या आंत रडते आहे. मला दूध आणून द्या."

मथुराबाई तावडतोब गेल्या आणि दूध घेऊन आल्या. त्यांचे हातून त्यानें तें दूध घेतलें आणि तो आंत गेला व पद्मताईच्या तोंडापाशीं त्यानें वाटी धरून चमचानें तिच्या तोंडांत दूध घातलें. पद्मताईनें पुनः एकदां डोळे उघडून पाहिलें-पाहिलें कसलें ! पाहण्याचा यत्न केला. कारण तिनें डोळे अगदीं उघडले होते तरी ते अश्रुजलानें भरले असल्यामुळें तिला कांहीं दिसलें नाहीं. तरी पण आपल्यास अण्णासाहेबच मायेनें दूध पाजीत आहेत हें तिनें पाहिलें आणि तिच्या चर्येवर एकदम किंचित् आनंदकला दिसूं लागली. ढगांनीं व्याप्त होऊन अगदीं गर्द अंधार पडल्याप्रमाणें आकाश झालें असतां त्यांत एकदम मध्येंच वीज चमकली म्हणजे आकाशाची जशी स्थिति होते तशीच त्या वेळा प्रेतकळेनं व्याप्त अशा तिच्या मुखावर आनंदाची तिरीप दिसल्यामुळें स्थिति झाली. अण्णासाहेबांस तें दिसलें आणि त्यालाही फार समाधान झालें. परंतु तें समाधान फार वेळ टिकलें नाहीं. कारण तिनें पुनः डोळे मिटले आणि अश्रुपातास सुरुवात झाली. तिच्या तोंडून एकही शब्द उच्चारला गेला नाहीं.

अण्णासाहेब आल्यावेळेपासून आतांपर्यंत त्यांनीं अंगावरले कपडे काढले नव्हते. ते बराच वेळ पद्मावतीच्या खोलींत आहेत, तेव्हां आतां त्यांना चहापाणी घेण्यास बाहेर बोलवावें असें मनांत येऊन वसंतराव तेथें आला. आतां आपण अण्णासाहेबांस एकही उणा शब्द बोलावयाचा नाहीं असा त्यानें निश्चय केला होता. तो आला व त्यानें "चला माझ्या खोलींत. चहा वगैरे आणला आहे, तो घ्या आणि मग पुनः पाहिजे तर इकडे येऊन बसा." अशी अण्णासाहेबांस विनंति केली. नंतर काय त्याच्या मनांत आलें तो पद्मताईकडे वळून म्हणालाः "पद्मताई, मालती सुखरूपपणानें बाळंत होऊन तिला मुलगा झाला आहे, हें तुला कोणीं कळविलं का नाहीं ? " ते शब्द ऐकतांच पद्मताईनें एकदम डोळे उघडले आणि "हो का ! केव्हां झाली बाळंत ? " असा आपल्या क्षीण आवाजाला जितका जोर देतां येईल तितका देऊन प्रश्न विचारला. ती बातमी ऐकून तिच्या चर्येवर एकदम फार फरक पडला. इतका कीं, चर्येवरची ती प्रेतकळा जाऊन एकदम जीवकलेनें पूर्ण संचार केल्याप्रमाणें होऊन तिच्या मुखावर स्मित दिसूं लागलें. आतांपर्यंत अगदीं निचेष्ट होऊन पडलेली पद्मावती हीच काय असें पाहणारास वाटलें असतें. मालतीला मुलगा व्हावा आणि त्यास आपण डोळ्यांनीं पहावें अशी तिची फार

उत्कट इच्छा. ती इच्छा बहुतेक तृप्त झाली. आतां त्या मुलास प्रत्यक्ष पहाण्याचें, त्याला आपल्या मांडीवर घेण्याचेंच काय तें उरलें. वर सांगितलेले दोनच प्रश्न तिनें विचारले. परंतु तेवढ्या श्रमांनींच ती अगदीं थकून गेली. तिच्यानें अधिक कांहीं बोलवेना. मालतीला पुत्र झाला हें समजण्याबरोबर तिला झालेला आनंद पाहून वसंतरावास फार फार कौतुक वाटलें. आपल्या बहिणीवर हिचें अगदीं अकृत्रिम प्रेम हें त्याला पूर्णपणें ठाऊक होतें तरी आताचा तो आनंद पाहून त्या प्रेमाबद्दलची आजपर्यंतची आपली कल्पना अगदींच अपुरी असें त्यांस पक्कें वाटलें. आपल्या मित्राला किंवा मैत्रिणीला आनंद झाला असतां त्याचें अगदीं निर्मिश्र असें प्रतिबिंब दुसऱ्याच्या चर्येवर आज जसें त्याला दिसलें, तसें यापूर्वीं कधीं कोणाला दिसलें होतें ! तें प्रतिबिंब–अगदीं शुद्ध, निर्मळ, निर्मत्सर असें प्रतिबिंब–आज पद्मेच्या चर्येवर अगदीं स्पष्टपणें त्याच्या नजरेस पडलें. तें पाहून अण्णासाहेबासही आश्चर्य वाटलें. वास्तविक पद्माताईची स्थिति अशी होती कीं, दुसऱ्याचें सुख पहातांक्षणीं आपणास असें सुख लाभण्याला सर्व अनुकूल सामग्री असून आपल्याला कां हें सुख नाहीं असा विचार मनांत येऊन तिच्या मनांत थोडा तरी खेद उत्पन्न व्हावा, परंतु पद्माताईच्या आनंदास कसल्याच कारणांनीं खेद उत्पन्न झाल्याचें कांहीं चिन्ह नव्हतें. आनंद व समाधान यांखेरीज दुसरा विचार किंवा विकार तिच्या मनांत उद्भवलेला दिसला नाहीं. तिला बोलण्याची तितकी ताकद असती तर त्याबद्दल आणखी किती तरी ती बोलती. परंतु तिला बोलण्याची ताकदच नव्हती. तिला अंथरुणावरून उठून चालण्याची शक्ति असती, तर ती तावडतोब चालत नाहीं तर खुरडत मालतीच्या खोलींत जाऊन एकदां त्या नवीन अर्भकास पाहती. स्नान करण्याची ताकद असती, तर बाळंतिणीला शिवून तिच्यापासून मुलाला घेऊन एकदां मनसोक्त त्याचें तिनें निरीक्षण केलें असतें. त्याला आपल्या पोटाशीं धरून ठेविलें असतें. हा मालतीचा मुलगा म्हणजे आपलाच मुलगा असें तिला वाटून तसेंच त्याच्याशीं तिनें वर्तन केलें असतें. ती जर बरी असती तर मालती त्या मुलाची प्रसवणारी मात्र आई. त्याचें संगोपन करणारी आई पद्मावतीच असें जगास दिसलें असतें. त्या दोघींच्या भाषणांत असें भाषण कित्येक वेळां होई, आणि प्रत्येक वेळीं " मी जर बरी झालें, तर तुला जें मूल होईल तें नवऱ्याच्या चाकरीवर जातांना तुला बरोबर नेऊं देणार नाहीं. तीन महिन्यांच्या आंत त्याला मी आपला ळळा लावीन. आणखी त्याला इथें ठेवून घेईन " असें पद्मा मालतीस म्हणे. आणि मालतीही तिला " तूं बरी हो, मी तेवढ्या लहान मुलाला तुझ्याजवळ ठेवून एकटी जाईन. मग तूं दोन्ही मुलांचें–माझ्या मुलाचें आणि तुला होईल त्याचें–कसें करशील तें पाहीन " असें ह्मणत असे.

असा त्यांचा विनोद चाले. एकंदर दुःखमय स्थिति होती, त्यांत असे विनोदच काय आनंद द्यायचे ते देत. बाकीचा सगळा वेळ अर्थातच शोकांत जाई.

मालतवरील पद्मावतीच्या प्रेमाचें तें दर्शक प्रमाण पाहून वसंतरावास फारच कौतुक वाटलें आणि त्या भरांत तो अण्णासाहेबांस ह्मणालाः 'या दोघींचं एकमेकांवरलं प्रेम किती विलक्षण आहे. तिच्या तिला इतक्या यातना होताहेत पण मालतीला मुलगा झाला हें ऐकतांक्षणीं तिला

किती आनंद झाला, पाहिलांत ना! अशीच ती स्वतः एकदां सुखरूपपणानं सुटो, ह्मणजे झालं. फार प्रेमळ, फारच प्रेमळ..."

परंतु तिनक्यांत त्याला काय वाटलें, त्यानें आपलें भाषण तितकेंच थांबविलें आणि तो थोडा वेळ स्तब्ध झाला. नंतर पुनः अण्णासाहेबांस ह्मणालाः " चला, आपण बराच वेळ इथें काढला. आतां तिला मथुराताईची जरूरी असेल. तेव्हां त्यांना पाठवून देऊं. पुनः चार घटकांनीं इथें या." अण्णासाहेब कांहीं बोलला नाहीं. मुकाट्यानें त्याच्याबरोबर गेला. ते दोघेही खोलींत गेल्यानंतर तो वसंतरावास ह्मणतोः "मला आतां कांहीं सुचत नाहीं. माझी पद्मा मला नाहींशी होणार. हिची अशी स्थिति होईपर्यंत सुद्धां मला त्यांतलं कांहीं तुम्हीं कळूं देऊं नये अशी तुह्मांला बुद्धि व्हावी हें केवढं माझं दुर्दैव! आतां आशा तर नाहींच. पण मला एकदां डॉक्टरला भेटूं तरी द्याल ! काय आहे, काय नाहीं विचारतों. मुंबईस माझे चार डॉक्टर स्नेही आहेत त्यांच्यापैकीं कोणाला तरी बोलावतों आतां तरी माझे मला उपाय करायला हरकत तुह्मीं करूं नये असं मला वाटतं. याउपर......''

वसंतरावानें तें भाषण ऐकलें, तेव्हां त्याच्या कपाळाला आंठ्या चढल्या आणि तो कांहींतरी त्रासिकपणाचें उत्तर देणार होता इतक्यांत त्याची आई घाबऱ्या घाबऱ्या तेथें आली व त्याला तिनें बाहेर बोलाविलें. तो गेला तेव्हां "पद्माताईला कसंसंच होतं आहे तेव्हां कोणीतरी जाऊन डॉक्टराला घेऊन या" असें तिनें त्याला सांगितलें. सांगतांक्षणींच तो तशाचा तसाच डॉक्टरकडे जाण्यास निघाला. अण्णासाहेब त्याच्या खोलींत नुसताच एकटा बसला होता. त्याच्या मनांत काय विचार चालले असतील ते त्याचे त्यालाच माहीत.

वसंतराव डॉक्टर भगवंतरावाकडे गेला व त्यानें डॉक्टरला 'पद्माताईला कसेंसेंच होतें आहे तेव्हां आपण एकदां तेथपर्यंत चला' असें ह्मटलें. डॉक्टरांनीं त्याला कांहीं प्रश्न विचारले, त्यांत एक प्रश्न असा विचारला कीं, तिच्या मनाची विशेष कांहीं चलबिचल होईल अशी एखादी गोष्ट घडली काय? वसंतरावानें त्यास अर्थातच सकाळीं जेवढे प्रकार झाले तेवढे सांगितले. डॉक्टर त्यावर विचार करीत बसले व शेवटीं ह्मणालेः "तिच्या मनाला एकदम धक्का बसायला आणखी काय पाहिजे? या माणसाच्या नुसत्या येण्यानें तिच्या मनाची स्थिति फार चमत्कारिक झाली असली पाहिजे. न जाणों त्याच्या कठोर मनाला तिची ती फार वाईट स्थिति पाहून पाझर फुटला असेल आणखी पश्चात्तापही झाला असेल. जर तो पश्चात्ताप खरा असून बराच वेळ टिकला तर मला अजूनही आशा आहे कीं ती जगेल. ती इतकी अशक्त झाली आहे, अगदीं मरणाच्या द्वारीं बसली आहे, तरी आपल्याला मुलगा होईल या आशेनें तिला इतके दिवस तगवलें. त्यांत आणखी आपला नवरा निवळून आपल्यावर प्रेम करूं लागला, आपली इतकी वाईट स्थिति झालेली पाहून त्याला खरोखर दुःख झालें आहे, असें जर तिला वाटूं लागलें, तर ती खरोखर फार झपाट्यानें बरी होईल. तिचें दुखणें नव्याण्णव हिस्से मानसिक व्यथेपासून आहे. ती मानसिक व्यथा जर दूर झाली—तिच्या मनाची निराशा जर दूर—झाली तर ती बरी होण्याचा फार फार संभव आहे. मी आजपर्यंत तुह्माला बोललों नाहीं. ती जगणार नाहीं असेंच सांगत

आलों. पण एक अंशानें—शंभरांपैकीं एक अंशानें ती जगण्याचा–बरी होण्याचाही संभव आहे. एकच अंश म्हणून मीं तो तुम्हांला कोणता काय तो सांगितला नाहीं. ती जर सुखरूपपणें बाळंत झाली आणखी तिच्या त्या मुलाची जोपासना दुसऱ्या कोणी नीट करून तें मूल चांगलें वाढूं लागलें, तर पद्मावतीबाई खचित जगेल. तिचा स्वभाव प्रेमळ आहे. तिला कोणीना कोणी तरी प्रेम करायला पाहिजे. तिची अशी स्थिति होण्याला कारण तिला प्रेम करायला नाहीं हें एक आणि 'आपल्यावर या जगांत कोणी प्रेम करणारें नाहीं' हा विचार तिच्या मनांत घोळून तिला दुःख देतो हें दुसरें कारण. या दोन कारणांनीं तिच्या शरीराचा, मनाचा आणि आयुष्याचा नाश झाला. अजून तिला असें वाटूं लागूं द्या कीं, आपल्यावरचा आपल्या नवऱ्याचा राग जाऊन तो शुद्ध चित्तानें प्रेम करूं लागला. आणखी तिला मूल होऊन तीं सुरक्षितपणीं सुटूं द्या, म्हणजे ती बरी होईल. अशी माझी मनोदेवता तर मला सांगते आहे."

इतकें लांबलचक बोलून डॉक्टरांनीं शेवटीं वसंतरावास विचारलें: "तिच्या नवऱ्याला पश्चात्ताप खरोखर झाला आहे का?"

वसंतराव त्याला म्हणालाः "आपण त्यांना आतां भेटा. आपल्याला भेटण्याविषयीं तेही फार उत्सुक आहेत, तेव्हां त्या भेटींत आपल्याला तेव्हांच समजेल."

डॉक्टर "ठीक आहे पहातों." असें बोलून दोघेही वसंतरावाच्या घरीं आले.

# प्रकरण ५९ वें.

## प्रसूति.



**डॉक्टर** भगवंतराव व वसंतराव घरीं येतात तों त्यांची अगदीं चातकाप्रमाणें वाट पाहणारी वसंतरावाची आई वसंतरावाच्या कानांत कांहीं कुजबुजली. त्याबरोबर तो एकदम चकित झाला आणि आईनें जें काय सांगितलें होतें, तें त्यानें डॉक्टर भगवंतरावास सांगितलें. डॉक्टर भगवंतराव लागलीच आपल्या गाडीवाल्याकडे वळला व त्यानें त्यास कोणा एका मिडवाईफला तावडतोब घेऊन ये म्हणून सांगितलें. नंतर पद्माताईच्या खोलीकडे जातांना त्यानें वसंतरावास इंग्रजींत म्हटलें: "मला यांत कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. हा जर सातवा महिना असेल, तर ठीक आहे. परंतु सातवा नसेल आणि आठवा किंवा सहावा असेल तर प्रसंग मोठा कठीण आहे. तथापि आपली पराकाष्ठा करून पाह्यची. मी आतां तिची प्रकृति पाहिल्यानंतर काय तें सांगतों."

पद्माताईची प्रकृति फारच अस्वस्थ झाली होती. आपल्याजवळ कोण आलें आणि कोण नाहीं हें सुद्धां तिला समजतें आहे कीं नाहीं याची शंकाच होती. भगवंतरावानें तिची प्रकृति पाहिली आणि कांहीं एक न

बोलतां तो तेथून वसंतरावास घेऊन बाहेर आला. बाहेर आल्यावरही तो फार सचिंत दिसला. त्या तशा सचिंत स्थितींतच तो वसंतरावाच्या खोलींत अगदीं मुकाट्यानें गेला. तेथें पहातों तों खोलींत अण्णासाहेब बसलेला !

भगवंतरावास पाहतांच अण्णासाहेब एकदम म्हणतो: " काय डॉक्टर, आतां तरी आमचे आम्हांला उपाय करूं देतां कीं नाहीं ? आतां उपाय...... "

त्याचें तें बोलणें अर्धवट होतें आहे तोंच वसंतराव त्यास एकदम म्हणतो, " अण्णा, ही वेळ दुसरं तिसरं कांहीं बोलायची नव्हे. पद्मताईची प्रकृति फार बिघडलेली आहे. घटकेंत काय होईल आणखी काय नाहीं, याचा नेम नाहीं. तिचं पोट दुखूं लागलं आहे. डॉक्टरनीं एका मिडवाईफला बोलवायला धाडलं आहे. ती आली म्हणजे समजेल सगळा प्रकार काय आहे तो. पण सध्यां भयंकर प्रसंग आला आहे खरा. डॉक्टर आतां तिला पाहून आले. "

अण्णासाहेब हें सर्व बोलणें ऐकून अगदीं स्तब्ध बसला. त्याच्या मनांत काय विचार आले आणि काय नाहीं हें त्या वेळचा त्याचा चेहरा पाहून—त्याच्या चेहऱ्यावरून—त्या वेळीं कांहींसुद्धां सांगतां आलें नसतें. त्याचा चेहरा अगदीं कोऱ्या कागदाप्रमाणें क्षणमात्र झाला. शिवाय डॉक्टर भगवंतराव किंवा वसंतराव त्या वेळीं त्याला काय वाटतें आणि काय नाहीं हें पहाण्याच्या स्थितींत नव्हते. तो अगदीं स्तब्ध बसला आहे हें पाहातांच ते आपआपसांत बोलूं लागले.

अण्णासाहेब वर सांगितल्याप्रमाणें सुमारें पांच मिनिटें स्तब्ध बसला. नंतर एकदम भगवंतरावास इंग्रजींत ह्मणतो: "काय प्रसंग आहे आणखी काय होईलसं तुह्मांला वाटतं तें मला सांगण्याची तुमची इच्छा नाहीं काय ? माझी बायको मला सोडून जाणार असंच मी धरून चालावं काय ? माझी तिची शेवटची भेट सुद्धां होणार नाहीं का ? तुह्मी होऊं देणार नाहीं का ? "

त्याचीं हीं वाक्यें कांहीं खेद, कांहीं राग, कांहीं मत्सर अशा तीन विकारांनीं भरलेल्या स्वरानें बाहेर पडलेलीं दिसलीं. भगवंतरावानें त्याला उत्तर दिलें नाहीं. परंतु वसंतराव त्यास एकदम ह्मणाला: "अण्णा, आजपर्यंतच्या सगळ्या गोष्टी आपण विसरून जाऊं. पद्मताई तुमची बायको, ह्मणूनें तुमचं तिच्यावर अतोनात प्रेम असलंच पाहिजे. पण ती मला माझ्या मालतीपेक्षांही प्रिय आहे. तिला आतां प्रसूतीच्या वेदना होत आहेत. ती शुद्धीवर नाहीं. तिची प्रकृति किती अशक्त झाली आहे हें तुह्मांला ठाऊक आहे. ती या प्रसंगांतून जिवानिशीं पार पडेल असं डॉक्टरांना वाटत नाहीं. आणखी तिचा हा आठवा किंवा सातवा महिना आहे. हीही एक प्रतिकूल अशीच गोष्ट आहे. तेव्हां आपण स्वस्थ बसावं आणखी काय होईल तें पहावं एवढंच आपल्याला शक्य आहे. सुइणीनं येऊन पाहिल्यावर पुढें काय करायचं तें डॉक्टर ठरवितील आणखी आपल्याला सांगतील. यांतून ती नीटपणें पार पडली, तर पुढें उपाय काय करायचे ते तुह्मी वाटलं तर करा, पण आतां कांहीं करणं शक्य नाहीं. जरूर पडली, तर आपण सिव्हिल सर्जनाला घेऊन येऊं. पण आतां तुह्मी आह्मांला किंवा आह्मी तुह्मांला उपरोधिक बोलणीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. "

वसंतराव इतकें बोलून थांबला व आपल्या बोलण्याचा कांहीं तरी परिणाम

अण्णासाहेबांच्या मनावर झाला कीं नाहीं हें पहाण्यासाठीं त्याच्या डोळ्यास डोळा देऊन बसला. परंतु त्या त्याच्या करण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अण्णासाहेब मान खालीं घालून बसला; त्याला अत्यंत दुःख झालें असावें असें दिसलें. पुष्कळ वेळपर्यंत अशा तऱ्हेनें बसल्यानंतर तो वसंतरावास ह्मणतोः "ठीक आहे. तुह्मी सांगतां तसंच करूं. आतां मी कांहीं बोलत नाहीं. आतां बोलण्याची वेळ नाहीं हेंच खरं. डॉक्टर, मी मागें तुम्हांला काय बोललों असेन तें विसरा आणखी माझ्या बायकोला एकदां या संकटांतून बाहेर काढा. मला दुसरं कांहीं नको......"

अण्णासाहेब अशा प्रकारें अगदीं गहिंवरून बोलूं लागला. तोंच सुईण आल्याची बातमी गड्यानें येऊन दिली. लागलीच डॉक्टर तिच्याकडे जाऊन तिला त्यांनीं काय सांगावयाचें तें सांगितलें.

सुईणबाई आल्या, त्यांनीं मनःपूर्वक अर्धा तास तपासणी केली आणि डॉक्टरांस स्पष्टपणें सांगितलें कीं, या प्रसूतिवेदनाच आहेत, तरी बराच अवकाश लागेल, एकसारखें बसून मात्र राहिलें पाहिजे. त्याप्रमाणें त्यांनीं आतां परत न जातां तेथेंच राहाण्याचें ठरविलें. डॉक्टरांनींही तसेंच तेथें रहाण्याचें ठरविलें. अणुभरही कसर किंवा कानाडोळा केल्याचें आपल्या मनास वाईट वाटण्याला कारण होऊं नये, अशाबद्दल डॉक्टरांस आतुरता होती.

याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर सुमारें तीन तास गेले. मध्यंतरीं जशी ज्याला सवड झाली तसें त्यानें थोडेंबहुत खाऊन घेतलें. खाण्यापिण्याकडे अशा वेळीं कोणाचें तसें लक्ष्य लागणार आहे! मंडळीचें सगळें लक्ष्य पद्मातांईच्या खोलीकडे होतें. सर्व मंडळी अगदीं तटस्थपणें परंतु काय होतें काय न होतें अशा उत्कंठेनें तात्कळत राहिली होती. पद्मातांईच्या खोलींतून बाहेर येऊन सुइणीनें सांगितलें 'पद्मातांईची सुटका झाली व त्यांना मुलगा झाला. मुलगा अगदीं अव्यंग आहे. मात्र पद्मातांई अगदीं बेशुद्ध आहेत, डॉक्टरांना आंत आणा, त्याखेरीज गत्यंतर नाहीं."

डॉक्टरांनीं व इतरांनींही समाधानाचे सुसकारे टाकले. "बेशुद्ध असल्या तरी हरकत नाहीं आतां पाहून येऊं" असे उत्तेजक शब्द बोलून डॉक्टर आंत गेले ते पंधरा वीस मिनिटांनीं बाहेर येऊन ह्मणाले, "मला आतां कांहीं संकट दिसत नाहीं. बाळ आणि बाळंतीण दोघेंही सुरक्षित आहेत. मूल सात महिन्यांचं आहे. पण हरकत नाहीं; त्याला किंवा त्याच्या आईला दगा होण्याचं चिन्ह कांहीं नाहीं. पद्मातांई लवकरच शुद्धीवर येईल. अर्धवट शुद्धीवर आलीच आहे, उपचार काय करायचे काय नाहीं तें मी मिडवाइफला सांगून आलों आहें. आतां सगळं ठीक होईल."

हीं सर्व बोलणीं अण्णासाहेबांनीं ऐकलींच. परंतु तो एक अक्षरही न बोलतां अगदीं स्वस्थ बसला. त्याच्याकडे कोणीं लक्ष्यच दिलें नाहीं. डॉक्टर निघून गेले. वसंतरावही त्यांच्याबरोबरच औषध वगैरे आणण्यासाठीं ह्मणून गेला. अण्णासाहेब वसंतरावाच्या त्या खोलींत एकटाच राहिला. आपण एकटे आहों असें पहातांच अण्णासाहेबांच्या मनांत जणूं काय एकदम विचारांची वावटळ उठली आणि त्याला बसल्या जागीं बसवेना. तो उठला आणि इकडे तिकडे हिंडूं लागला. तो वसंतरावाच्या घरीं आपण आल्यापासून आतांपर्यंत जें काय झालें, त्याबद्दल आपल्या मनाशीं वि-

चार करूं लागला. पुढें काय करावें याच्याहीबद्दल त्याच्या मनांत विचार आले असावेत. तो हिंडतां हिंडतां मध्येंच थांबे. वसंतरावाच्या टेबलाजवळच एक वेळ थांबला आणि तेथें असलेले कागद वगैरे चाळूं लागला. आपण काय करतों आहोंत हें त्याचें त्यालासुद्धां कळत होतें कीं नाहीं कोण जाणे. त्यानें टेबलाचे खणही उगीच हलवून पाहिले. तों एक खण उघडा दिसला. तो त्यानें उघडला. त्यांत त्याला कांहीं पत्रें दिसलीं; तीं तो पाहूं लागला. पहातां पहातां एक पत्र त्यानें वाचण्यास सुरुवात केली. त्याचा प्रारंभ पहातांच तो दचकल्यासारखा झाला आणि त्याची तें पत्र वाचण्याविषयींची आतुरता फारच वाढली. अमुक गोष्ट कशी करूं असा विचार त्याच्या मनास कधींच शिवत नसे, यामुळें त्याच्या मनांत आतुरता उत्पन्न होतांच त्यानें तें पत्र वाचण्यास सुरुवात केलीच. तें समग्र वाचलें आणि मुकाट्यानें आपल्या खिशांत घातलें; नंतर दुसरीं पत्रें पहाण्याला सुरुवात केली. परंतु तितक्यांत वसंतराव परत आल्याची चाहूल त्यास लागली. तेव्हां पटकन् तो ड्रॉवर ( खण ) त्यानें आंत सारून टेबलावर असलेलें एक बुक घेऊन तें वाचण्यांत अगदीं गढून गेला. सुमारें पन्नास पानें उलटूनच त्यानें वाचण्याचा बहाणा चालविला व चेहरा असा केला कीं, त्या पुस्तकाच्या वाचनांत आपण कांहीं नाहीं तरी तास दोन तास गढून गेलों आहों असें कोणासही वाटावें.

वसंतराव येऊन तो पद्मावतीच्या खोलीशीं सुइणीला औषधें देऊन व डॉक्टरांनीं काय सांगितलें होतें तें सांगून वर आपल्या खोलींत आला. तों अण्णासाहेब वाचनांत अगदीं गढून गेलेले! वसंतराव आंत आला तरी यांना त्याची दादच नाहीं. तें पहातांच वसंतराव थोडा वेळ उभा राहिला. नंतर पलीकडे एक इझीचेअर होती तिजवर जाऊन पडला. त्यालाही सकाळपासून अगदीं थकल्यासारखेंच झालें होतें आणि आपण होऊन अण्णासाहेबांपाशीं कांहीं तरी बोलण्याची त्याला कधींच उत्सुकता नसे. यामुळें तो आपल्याकडून अगदीं गडबड न करतां त्या आरामखुर्चीवर जाऊन बसला. तो बसला मात्र, आणि अण्णासाहेबांनीं एकदम मान वर करून वसंतरावाकडे पाहून म्हटलें: " अं! अन् तुह्मी केव्हां आलां? अगदीं कांहीं चाहूल लागली नाहीं ती? मी अगदीं पुस्तकांत गढून गेलों होतों; यामुळें कांहीं मला समजलं नाहीं. मनाला अतिशय त्रास झाला कीं नाहीं म्हणजे मन बधिर झाल्यासारखं होतं मग त्याचं सगळं ज्ञानच नाहींसं होतं ह्मणाना? तशी माझी स्थिति झाली आहे. खुशाल आपला तुह्मी गेल्यापासून जो वाचीत सुटलों तो इतक्या अवकाशांत पन्नास साठ पानं वाचलीं. पुस्तक मोठं चित्तवेधक आहे बोआ. आणखी आह्मी पडलों नादीच. मग काय विचारतां? गेलों सगळं विसरून. अन् डॉक्टरांनीं तसं सांगितल्यापासून मनाला कांहीं भयच वाटेनासं झालं आहे, ती अगदीं सुरक्षितपणानं बाळंत झाली, आणखी हो काय पाहिजे? बरं चला हेंही मोठं संकट टळून माझी बायको मला मिळणार, असं तर आतां दिसतं. पोराचं कुणीं पाहिलं आणखी कुणीं संवरलं आहे ह्मणा. आमच्या सासूबाईंना तर आतां अगदीं हर्षवायुच झाला असेल. त्या नाहीं कुठें दिसल्या सकाळपासून......"

वसंतराव त्याचें बोलणें ऐकत अगदीं स्तब्ध बसला होता. हा बोलतो आहे तरी

काय ! आणखी माणूस तरी काय आहे ! जें बोलतो आहे त्याला कांहीं ताळतंत्र नाहीं. सकाळीं आपण त्याला पद्मेचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन अगदीं दुःखाविष्ट झालेला पाहिला तो अण्णासाहेब एक, पुनः बाहेर आल्यावर आपल्याशीं बोलणारा अण्णासाहेब दुसरा, पुढें डॉक्टर आल्यानंतर त्यांच्याशीं व आपल्याशीं बोलणारा अण्णासाहेब तिसरा आणि आतां आपल्याशीं बोलणारा अण्णासाहेब चवथा. असा क्षणोक्षणीं निराळाच भासणारा हा माणूस आहे तरी कोण ! याला कांहीं सुखदुःख विकार आहेत कीं नाहींत; का हा कोणी प्राचीन काळच्या असुरांपैकींच कोणी तरी असुर मनुष्याच्या रूपांत जन्म घेऊन आला आहे ? असे कांहीं तरी विचार वसंतरावाच्या मनांत त्या वेळीं आले असावे आणि त्यामुळेंच तो त्याच्याकडे नुसता टक लावून पहात बसला. आपल्या या सर्व बोलण्याकडे कांहींच लक्ष न देतां हा वसंतराव नुसता आपल्याकडे पहातो आहे याचा अर्थ काय असें मनांत येऊन अण्णासाहेब वसंतरावाला ह्मणतोः—

" कां ? आपण अगदींच कांहीं बोलत नाहीं ? बरं पण तिच्या प्रकृतीचं लेटेस्ट बुलेटिन ( अगदीं ताजी खबर ) आणाल कीं नाहीं. आतां कांहीं आम्हांला तुम्ही तिच्याजवळ बसण्याबोलण्याची परवानगी देणार नाहींच आणखी आम्हीही तसं करण्याचा आग्रह धरणार नाहीं. पण तिची प्रकृति बरी आहे, सुधारते आहे. मघाशीं ती अर्धवट शुद्धीवर आली होती, आतां जास्त आली आहे असं कांहीं सांगा. कां मी जाऊं दाराशीं आणखी विचारूं त्या सुइणीला नाहीं तर मथुराताईंना ? मला घटकोघटकीं बातमी कळली पाहिजे बोआ. जा. जा. एकदां बातमी घेऊन या. नाहीं तर तुह्मीन् मी दोघेही जाऊं या. "

वसंतरावः—आतांच मी डॉक्टरांनीं दिलेलीं औषधं देऊन त्यांनीं काय सांगितलं तें त्या मिडवाइफला सांगून आलों, अजून पांच मिनिटंसुद्धां झालीं नाहींत, तेव्हां इतक्यांत पुनः जायची जरूरी नाहीं. प्रकृति सुधारत चालली आहे. आणखी दोन तासांनीं डॉक्टर भगवंतराव येणार आहेत, तेव्हां मग करूं चौकशी. तोंपर्यंत त्यांना विश्रांति मिळूं द्या, डॉक्टरांनीं मुद्दाम सांगितलं आहे, कीं, या वेळीं पद्मातांईला बिलकुल त्रास देऊं नका.

अण्णासाहेबः— ऑल राइट. तसा कांहीं माझा आग्रह नाहीं. कुणीकडून तिची प्रकृति कशी काय आहे त्याबद्दल बातमी कळण्याशीं आपला संबंध. त्या पोराबद्दल आपला कांहीं इतका........"

वसंतरावः—मुलगा अगदीं चांगला आहे, मात्र त्याला आतां संभाळायची तजवीज केली पाहिजे. पद्मातांईच्या जवळ त्याला ठेवून कांहीं निभायचं नाहीं. माझी तर अशी समजूत आहे कीं, त्याला त्या खोलींतसुद्धां ठेवूं नये. त्याच्या रडण्यावरून त्याची प्रकृति अगदीं छान आहे असं दिसतं आहे. तेव्हां त्याच्या रडण्यापासून तिला त्रास होण्याचा संभव आहे. वरदुधाची योजना त्याच्या पचनीं पडली तर कांहीं कशाचीही पंचाइत पडायची नाहीं.

अण्णासाहेबः— त्या मथुराताई नाहीं का हें मुलाला संभाळण्याचं काम करूं शकणार ? मला वाटतं तिला जर चांगले पैसे दिले, तर तें सहज होईल. तिची चाकरी सध्यां गेली आहे तेव्हां......"

वसंतरावः—पाहूं आतां काय करतां

येईल तें. त्या बऱ्या आहेत. पण त्यांनीं तें काम पत्करलं पाहिजे; दुसरं कांहीं नाहीं.

अण्णासाहेबः—आपण आणखी भगवंतरावांनीं दोघांनीं सांगितल्यावर त्या सहज पत्करतील. त्यांत काय आहे ! डॉक्टर भगवंतरावांनीं तर त्यांच्यावर फार उपकार केले आहेत आणखी आपणही कांहीं कमी नाहीं करीत. घरांत आणून ठेवलं आहे, सर्वस्वी सांभाळ प्रतिपाळ करतां आहां आणखी काय पाहिजे. छे. छे. छे. त्यांनीं हें एवढं काम केलंच पाहिजे. आणखी त्यांनीं हें हें काम पत्करलं म्हणजे तिलाही फार संतोष होईल. अहो आपल्यासारख्यांनीं तिला आश्रय दिला नसता तर त्या पोरांची आणखी तिची काय अवस्था होती ? तिचं तिला कांहीं समजत नाहीं ? अन् त्यांत वावगं काय आहे ? कुणाच्या इथं सैपाकपाणी करायचं यापेक्षां हें काम ...''

वसंतरावः—पाहूं. पाहूं. सध्यां ती सुईण आहे. ती आतां दहा पंधरा दिवस डॉक्टरांच्या सांगीप्रमाणें सर्व व्यवस्था करीलच. तिच्यापासून या काय करायचं कसं करायचं तें शिकून घेतीलच. आम्हांला मुलाची काळजी कांहीं वाटत नाहीं. काळजी बाळंतिणीची.

अण्णासाहेबः—ओ यस्. ती तर आहेच. मला तर ती फारच वाटते. पहिल्यापासून तें सगळं बिघडलं. असो चला. एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून कांहीं तरी एखादे वेळ होतं तसंच माझं झालं. पण आतां त्याचा पुनः उच्चार दिखील करायचा नाहीं, असा निश्चय मीं केला आहे. ती जरा बरी झाली, कीं मागल्या सगळ्या चुकांची पूर्ण दुरुस्ती करून झाल्या नुकसानीची पुरी भरपाई करून टाकूं. Better late than never. खरं कीं नाहीं ? बरं तर आतां आम्ही कांहीं वेळ बाहेर गेलों, तर हरकत आहे का ? येऊं एक दोन तासांनीं डॉक्टर येताहेत तों. आजच्या आज माझ्या मनांत तिला घेऊन घरीं जायचं होतं. आणखी सगळी तुमची पहिली ट्रीटमेंट वगैरे बदलून टाकून आपल्या मनानं काय व्यवस्था लावतां येते ती पाहायची होती; परंतु ह्या मधल्या कॉम्प्लिकेशननं सगळंच तिरपगडं झालं. पण तेंही एक उत्तमच झालं. अहो मी तिला घरीं घेऊन जातों न जातों तों हा प्रसंग झाला असता, तर मीं काय केलं असतं ? तुमच्या घरीं दहा माणसं. तुम्ही तिकडे थोडेच आले असतां! चांगलं एखादं व्हायचं असलं, म्हणजे असं होतं. आणखी नसलं व्हायचं म्हणजे सरळ चाललेलं असलं, तरी त्यांत अडचणी येतात; खरं कीं नाहीं वसंतराव ? आतां तूं मागलं सगळं विसरून जाऊन मला अगदीं वुइथ ओपन आर्म्स घेतलं पाहिजेस. मागल्या गोष्टी विसरल्याच पाहिजेस. माझ्या पुढल्या वागणुकीनंच मी तुला विसरायला लावीन. मी अगदीं पाषाण आहें असं समजूं नकोस. ते आमचे मेहुणे कुठें आहेत ! कांहीं लागला आहे का पत्ता ? काय मूर्ख आहेत हो दोघे. पण त्यांनाच कशाला हंसावं ? आम्ही काय आहोंत. खरंच कांहीं लागला आहे का तुला त्यांचा पत्ता ? मला वाटतं ते कुठें तरी परागंदा झाले असतील. शर्यतीचा नाद मोठा वाईट. त्या पायीं गुलामांनीं आपलं सगळं बुडवून टाकलं. त्यांना....पण जाऊं द्या. त्यांच्याबद्दल पुसतपास करण्यांत मीं तर आतां अगदीं हात टेंकले. कांहीं कुठें पत्ता लागेल........''

आतांचें हें भाषण करणारा हा आणखी नवाच अण्णासाहेब आपल्यापुढें उभा राहिला, असें आतां वसंतरावास वाटलें.

वत्सलेच्या लग्नांत राक्षसांनीं अनेक रूपें घेऊन मायेचा बाजार भरविला व जुनें देऊन नवें घेण्याचा यादवांनीं तडाखा सुरू केला. तो बाजार भरविणाऱ्या राक्षसांपैकींच हा लेंकाचा एक आहे असें वसंतरावाच्या मनांत आलें. हा जें ज्या वेळीं बोलतो, त्या वेळीं, किती स्वाभाविक दिसेल असें त्याचें वर्तन असतें! त्यांत आंत एक, बाहेर एक असें मुळींच कांहीं नाहीं असें कोणासही वाटण्याजोगें त्याचें बोलणें अगदीं सहजगत्या चाले, त्याचा अनुभव या वेळीं वसंतरावास आला.

आपल्या बोलण्यावरून वसंतराव आपल्याकडे कांहीं निराळ्याच वृत्तीनें पहातो आहे, असें पहातां क्षणींच अण्णासाहेबांस वाटलें कीं, आतां आपण येथून बाहेर जावें तेंच उत्तम. आणि तसा विचार करून तो उठला. त्यानें आपले कपडे चढविले आणि पुनः एकदां " दोन तासांनीं मी येतों " असें म्हणून स्वारी चालती झाली.

# प्रकरण ६० वें.

## आतां आपण काय करणार



अण्णासाहेब घराच्या बाहेर पडला, तो अगदीं मोठ्या मौजेच्या वृत्तींत पडला असें दिसलें. परंतु घराच्याबाहेर पडून दोन पावलें स्वारी गेली नाहीं तों त्याच्या वृत्तींत आणि त्यामुळें चर्येवरही फरक पडला. एकदम कपाळाला आंठ्या चढल्या. भिवया नाकाच्या वरच्या टोंकास संकोचून एकमेकांस शिवल्या. डोळे अगदीं निमुळते दिसूं लागले आणि पावलें मंद पडूं लागलीं. एके वेळीं तो रस्त्यांतच थांबला व आपला डावा हात उचलून त्याच्या तळव्यावर त्यानें उजव्या हाताची बुक्की मारली आणि आपल्याशींच पुटपुटला, " काय एक एक अडचणी येताहेत. आतां तर आपला हेतु मुळींच साधणार नाहीं. कसा साधणार ? आणखी आतां आपण काय करणार ? "

इतकें बोलून त्यानें आपल्या कोटाच्या आंतल्या बाजूच्या छातीजवळच्या खिशांत हात घालून एक जाडसें पाकीट बाहेर काढलें. नंतर " ड्याम दिस डॉक्यूमेंट नाउ" असें ह्मणून पुनः तो कागद जेथल्या तेथें–खिशांत–घालून ठेविला.

त्याचा पोषाख अगदीं साहेबी थाटाचा होता. तो जेथें उभा होता ती जागाही अगदीं गटाराच्या जवळची होती. अशा वेळीं जर कोणी त्याला हे असे वेड्यासारखे हातवारे करतांना–खिशांतील कागद काढून पाहून पुनः खिशांत घालतांना पाहिलें व वरील शब्द पुटपुटतांना ऐकलें असतें, तर हा कोणी हाफ मॅड हाफ कास्ट दारूच्या धुंदींत कांहीं तरी वेडगळपणा करीत आहे असेंच त्याला वाटलें

असतें. वाटलें असतें कशाला ? रस्त्यानें जाणाऱ्या-येणाऱ्यांपैकीं पांच चारजणांस त्या प्रमाणें वाटून ते जातां जातां याच्या जवळ थबकलेही. असे पांच चार लोक थबकून याच्याकडे पाहूं लागल्याबरोबर आणखी काय पाहिजे ? जो त्या बाजूनें त्या वेळीं जाऊं लागे, त्याला साहजिकच थबकण्याची इच्छा होई. अशी आपल्या-भोंवतीं तमासगिरांची गर्दी जमूं लागली आहे असें पहातांच हा चपापला आणि तेथून निघाला. निघतांना क्षणमात्र त्यानें आतां कोठें जावें याबद्दल विचार केला असावा असें दिसतें. कारण तो किंचित् घुटमळला. नंतर आतां आपले स्नेही मॅजिस्ट्रेट यांजकडे जावें असा विचार त्यानें कायम केला. तो थेट गेला तों तेथें त्याचे आणखी एक दोघे स्नेही व मॅजिस्ट्रेट सहपीतीच्या ऐन रंगांत होते. त्यास पहातांच त्यांनीं याचें मोठ्या उत्साहानें स्वागत केलें व एकतर मोठ्यानें हंसून ह्मणाला: "आज तर यांनीं आह्मांला पार्टी दिली पाहिजे. यांना सन अँड एअर झाला आहे. आतांच मी डॉक्टर भगवंत-रावांच्या येथें गेलों होतों तिथें यांचं कुटुंब प्रसूत झाल्याबद्दलच्या गोष्टी निघाल्या होत्या, आणि तितक्यांत तो बसंतरावही त्याची हकीकत सांगण्यासाठीं आला होता. आपल्याला हा लाभ झाल्याबद्दल आनंद-प्रदर्शन करून आह्मी आपलें आरोग्यपान करतों."

वरील गृहस्थ हें लांबलचक भाषण करीत असतां अण्णासाहेबांनीं आपलें पात्रही भरून घेतलें. सहपीतीच्या शिष्टाचाराप्रमाणें त्यांनीं पात्राला पात्रें लावण्याचा आविर्भाव केला आणि सहपीति सुरू झाली, परंतु त्या प्रसंगीचें वर्णन येथें करीत बसण्याची अवश्यकता नाहीं आणि त्याला अवकाशही नाहीं. मंडळीचें पान सुरू होऊन थोडा अवकाश जातो न जातो तों मंडळी फारच रंगांत आली आणि मॅजि-स्ट्रेटनीं सहज अण्णासाहेबांला ह्मटलें: "काय अण्णासाहेब, आतां कसं काय ? आतां तर आपल्याला कांहींच चॅन्स नाहीं. माझं ऐका, तुह्मी हा नाद सोडून द्या. तुमची बायको शहाणी आहे. तिच्याच तंत्रानं घ्या. तुह्माला कांहीं श्रम न पडतां तुमचं सगळं कांहीं यथास्थित होईल. आणखी काय पाहिजे ? तुह्मी कुठेंही राह्यचं म्हणा-लांत तरी तुम्हांला तो ठरलेला अलावन्स देईल. तुह्मी का उगीच तिच्याजवळ राहून आणखी तिच्यामागें लागून तिच्यानं आपल्या सुखांत माती कालवतां ? तुह्मी इथें नसलां तर ती अगदीं सुखांत असते. तुह्मी आलांत कीं तिला......"

मॅजिस्ट्रेटसाहेब काय हेतूनें बोलत होते हें कळणें त्या वेळीं फार दुरापास्त होतें, कदाचित् ते कांहीं धुंदींत व कांहीं मनः-पूर्वकही बोलत असतील. परंतु त्यांच्या त्या बोलण्याचा अण्णासाहेबांच्या मनावर विशेष परिणाम झाला. आणि मॅजिस्ट्रेट-साहेब बोलत असतां वर जेथें त्यांचें बो-लणें तुटलेलें दाखविलें आहे. तेथपर्यंत बोलणें होतांच अण्णासाहेब एकदम तडकन उठून उभे राहून म्हणतात: "काय ! मी इथें असलों म्हणजे मी तिच्या सुखांत माती कालवतों असं का तुमचं ह्मणणं आहे ! हं ! एकूण इतकी ही गोष्ट जगन्य झाली आहे अं ! ठीक आहे ठीक आहे. पहातों आतां."

हें तो काय हेतूनें बोलला असेल, तें त्या वेळीं त्याचें त्याला माहीत. परंतु त्या बोल-ण्याच्या वेळीं त्याचे आधींच लाली चढत चाललेले डोळे फारच लाल झाले, नाक-पुड्या फेंदारल्या, ओंठ थरथरूं लागले

आणि तो पहिल्या झटक्यास जरी उभा राहिला होता, तरी संताप आणि उन्मत्तता यांच्या अतिरेकानें त्याच्या पायांचा जोर कमी पडून तो एकदम खालीं पडला. तो सगळा जोर जणूं काय त्या वेळीं एका जिभेच्या ठिकाणीं मात्र एकवटला आणि ती बडबड करूं लागली. ती सगळी बडबड येथें उतरून देणें मुळींच शक्य नाहीं आणि शक्य असतें तरी इष्टही नाहीं. ती काय होती ती त्याची त्याला पुरती समजली नाहीं आणि त्याचे स्नेही तर आतां समजून घेण्याची इच्छा होण्याच्याही स्थितींत नव्हते. त्यांची तंद्री लागून घोरही लागला होता ! थोड्याच वेळांत अण्णासाहेबांच्याही तंद्रीचा सूर त्या स्नेही मंडळींच्या सुरास मिळून निरनिराळ्या सुरघोरांत तेथें तंद्रीवादन सुरू झालें. त्या नादांत यांचें सर्वांचें भान पार हरपून गेलें.

अशा त्यांच्या त्या स्थितींत रात्र जाऊन मंडळी सूर्योदयानंतर जागी झाली आणि आपण असे कसे पडलों ? आपल्याला अशी कशी झोंप लागली ? मधून मधून जागे कसे नाहीं झालों ? अशी चौकशी आपापसांत करूं लागली. परंतु ती चौकशी फार वेळ न चालतां चहाची मागणी मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं आपल्या घरांत केली. मंडळींपैकीं पुनः एकानें ' काल रात्रीं वेळ नव्हता, परंतु आज संध्याकाळची पार्टी तुमची' असें अण्णासाहेबांस म्हटलें. तो गृहस्थ सहजगत्या म्हणालाः " अहो, अनायासानें हा सुप्रसंग आला आहे तेव्हां आम्ही कांहीं तुम्हांला सोडणार नाहीं. तुम्हांला आम्ही कांहीं आयास पडूं देणार नाहीं, पण पार्टी झाली पाहिजे."

तो गृहस्थ हें सर्व बोलणें मनांत कांहीं निराळा हेतु धरून बोलला कीं काय हें समजण्याला कांहीं मार्ग नव्हता; परंतु अण्णासाहेबांच्या मनाला त्याच्या त्या बोलण्यांत कांहीं तरी निराळा हेतु असावा असें वाटलें. कारण तो एकदम उसळल्याप्रमाणें होऊन त्यास इंग्रजींत म्हणालाः " One does not come amongst friends to be insulted like this माणूस स्नेह्यांकडे येतो; तो अशीं उपमर्दाचीं भाषणं ऐकून घ्यायला येत नाहीं. " आणि इतकें बोलून तो लागलींच उठला. त्याचे बहुतेक कपडे त्याच्या अंगावरच होते. कोट त्यानें काढून ठेविला होता तो एकदम त्यानें चढविला आणि मॅजिस्ट्रेटकडे पाहून त्यांला इंग्रजींत म्हणतोः "तुम्ही आमचे स्नेही खरे, परंतु तुम्ही आपलं स्नेहाचं कर्तव्य मुळींच करीत नाहीं. तुमच्या घरांत तुमच्या समक्ष दुसरे गृहस्थ मला अत्यंत उपमर्दाचीं भाषणं बोलतात आणखी तुम्हीं तीं मुकाट्यानं ऐकून घेतां. ठीक आहे. आपल्या घराचा उंबरठा आतां मी आपल्या सावलीनें काळा करायला पुनः येणार नाहीं. "

त्याचें तें बोलणें ऐकून मॅजिस्ट्रेटसाहेब, "अहो तुम्ही म्हणतां काय ? उपमर्द कसला, आणखी हें आहे काय " असें ह्मणणार तों स्वारी तेथून झटकली. याला कसला एवढा राग आला ? कोणत्या शब्दांनीं त्याचा एवढा उपमर्द झाला, हें त्या मंडळीला कांहीं समजेना. ते गोंधळून वेड्यासारखे त्याच्या त्या जाणाऱ्या मूर्तीकडे पहात राहिले. नंतर मॅजिस्ट्रेट आपल्या स्नेह्यांकडे वळून ह्मणतोः " बरं झालं लेकाचा खराच रागावून गेला असला तर. आह्मांला काय याच्या स्नेहाचा असा फायदा होता. फार विक्षिप्त. काय केव्हां त्याच्या मनांत येईल आणि भरांत आल्यावर काय करील याचा नेम

नाहीं." मॅजिस्ट्रेटसाहेबांचें असें बोलणें होत आहे, तों चहाचे पेले वर आले, तेव्हां अण्णासाहेबांचद्दलचें बोलणें तितकेंच राहून मंडळी चहापानास व पावरोटीखान्यास लागली.

इकडे अण्णासाहेब जो संतापाच्या लहरींत निघाला, तो कांहीं वेळ त्या लहरींतच वाट फुटेल तिकडे चालला. शेवटीं इकडे तिकडे पहातो, तों आपण वसंतरावाच्या घराचा रस्ता सोडून भलत्याच रस्त्याला फार दूरवर आलों असें त्याला दिसलें. तेव्हां आतां परत फिरावें असा विचार करून तो फिरला. इतक्यांत चहाच्या एका दुकानाकडे त्याची नजर गेली आणि चहा घेऊन जाण्याचा त्यानें बेत केला. दुकानांत जाऊन त्यानें चहा, बिस्किट, केक वगैरे मागून एका टेबलाजवळ खुर्चीवर बैठक मारली. ती वेळ सकाळच्या चहाचीच असल्यामुळें तेथें मंडळींची गर्दी व गडबड बरीच होती; परंतु याला त्या गर्दीचें व गडबडीचें भान मुळींच नसावें असें दिसलें. तो आपल्या विचारांत गर्क होता. चहावाल्यानें चहाचा पेला व साखरपात्र त्यापुढें आणून ठेविलें, बिस्किटें ठेविलीं. परंतु हा थोडा स्वस्थच होता. कांहीं तरी विचित्र विचार त्याच्या मनांत घोळत असावा असें दिसलें. नंतर विचार करतां करतां कांहीं बेत पक्का ठरला ह्मणजे माणूस जसा आपल्याशींच मान हालवतो, तशी हलवून त्यानें पेल्यांतला चहा चमच्यानें ढवळण्यास सुरुवात केली. नंतर त्या बिस्किटांतलीं कांहीं बिस्किटें भराभरा खाल्लीं. चहाही भराभरा ढोंसला व तो त्या दुकानांतून झटकन् बाहेर पडून झपाझप पावलें टाकीत वसंतरावाच्या घरीं गेला. त्याच्या डोक्यांत त्याचे विचारच चालले असले पाहिजेत. कारण त्याची चर्या अजून पूर्व स्वरूपावर आली नव्हती. तो तडक वसंतरावाच्या खोलींत गेला. वसंतराव तेथें अगदीं सचिंत बसला होता. हा एकदम त्याच्यापुढें जाऊन त्याला म्हणतो: "मला तूं आणखी दादासाहेब एकत्र असतांना कांहीं बोलायचं आहे. आणखी तेंही या घटकेस. कारण मला काय बोलायचं आहे, तें बोलून मी लागलींच मुंबईस निघून जाणार आहें. तेव्हां उगीच कांहीं तरी सबबीवर मला नाहींनू होय करूं नको. दादासाहेबांना वास्तविक मला कांहीं सांगायचं नाहीं. कारण ते या घरांत आहेत आणखी नाहींत सारखंच आहे. जें काय कर्तुमकर्तु सामर्थ्य आहे तें आपलंच आहे. पण मीं कांहीं सांगितलं म्हणजे तें दादासाहेबांना विचारलं पाहिजेनू, असं आहेनू तसं आहे, असं तूं म्हणूं नयेस म्हणून दादासाहेबांच्या देखत बोलायचं इतकंच. निदान त्यांच्या कानावर घातलेलं असावं. तुझ्या हट्टामुळं जर पुढं मागं मला वेडं वाकडं वर्तन करावं लागलं, तर त्यांना आपण कळवलं नव्हतं, बजावलं नव्हतं, असं कांहीं वाटायला नको, आणखी मला तुम्हीं कळवलं नाहीं, बजावलं नाहीं असं त्यांनींही मला म्हणायला नको...... "

असें बोलत बोलत अण्णासाहेब वसंतरावाच्या समोर येऊन त्याच्याकडे टेहळत उभा राहिला.

वसंतरावाच्या मनांत दुसरेच कांहीं विचार चालले होते. तेव्हां याच्या एकदम अशा येण्यानें व बोलण्यानें त्यास दचकल्याप्रमाणेंच झालें. तो चमत्कारिक दृष्टीनें अण्णासाहेबांकडे पाहूं लागला. आदल्या रात्रींपासून हा जो नाहींसा झाला, तो सकाळपर्यंत आला नाहीं. रात्रींतून पद्मा-

नाईच्या प्रकृतींत कितीतरी तऱ्हा झाल्या आपली बायको अशा प्रकारानें आजारी असतां याला असें दूर राहवलें कसें ? पद्मताईचा आपला तसा कांहीं संबंध नसतां आपल्याला तिच्याबद्दल कितो तरी प्रेम वाटतें, आणि हा प्रत्यक्ष नवरा, त्यांत आतां मुलगा झालेला असें असून हा खुशाल दूर कोणा तरी स्नेह्याच्या घरीं जाऊन बसतो, हें आहे तरी काय ? आणि अशा स्थितींत पुढें होणार काय अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत कांहीं वेळ आले. पुढें आजपर्यंतचें अण्णासाहेबांचें वर्तन मनांत येऊन त्याला असेंही वाटलें कीं, त्याचें आपल्या बायकोवर अणुभर सुद्धां प्रेम नाहीं. तो केवळ तिच्या पैशासाठीं परत आला आणि तिचा सर्व पैसा आपल्या हातीं आला तर पहावा एवढ्याच हेतूनें येथें राहिला आहे. आपण मध्यें पडलों म्हणूनच त्याच्या हातीं सर्व कारभार गेला नाहीं, नाहीं तर केव्हांच तसा तो जाऊन निकाल लागला असता. पण आपण मध्यें पडल्यानें बरें केलें कीं वाईट केलें ? पद्मताईला सुख व्हावें, तिला दुःख होऊं नये, तिनें फसूं नये म्हणून आपण सर्व केलें, परंतु त्याचा परिणाम काय झाला ? तिला सुख झालें काय ? तिला दुःख किती झालें ? नवऱ्याच्या मर्जीविरुद्ध वागण्याला तिला आपण प्रवृत्त केलें, त्याचा परिणाम ती आतां जगत नाहीं हा झाला. तेच आपण जर त्या भानगडींत पडलों नसतों, तीं दोघें काय वाटेल तें करोत ह्मणून स्वस्थ बसलों असतों, तर काय झालें असतें ? पद्मताईला तिच्या बापानें ठेविलेल्या साऱ्या इस्टेटीचें वाटोळें झालें असतें, अण्णासाहेब सर्व ऐवज घेऊन निघून चालता झाला असता किंवा येथेंच राहून त्यानें ती उधळून टाकली असती आणि तिला टाकून तो कोणीकडे निघून गेला असता. तिला दारिद्र्यावस्था प्राप्त झाली असती. अशी दुरवस्था प्राप्त झाल्यानंतर मग काय झालें असतें ? मग आपण तिला साहाय्य केलें असतें, तर तिची आज जी स्थिति झाली आहे, ती स्थिति आली नसती. ती अशी हाल हाल होऊन मरावयाला टेंकली नसती. आपण तिला त्या तशा दुःखी स्थितींत सुखी ठेवण्याकरितां झटलों असतों. जसा एखादा प्रेमळ भाऊ आपल्या घरीं आलेल्या सद्गुणी बहिणीला फार प्रेमानें व आदरानें वागवितो. तिच्या मनाला तिच्या पूर्वस्थितीचें स्मरणसुद्धां होऊं नये म्हणून फार काळजी घेतो. तसें आपण केलें असतें तर तिला सुख जास्ती झालें असतें कीं आपण जें केलें त्यामुळें झालें ? असे नानाप्रकारचे प्रश्न त्याच्या मनांत येऊन तो त्याबद्दलच्या विचारांत गर्क होऊन गेला होता. मध्यंतरीं कांहीं विचार त्याच्या मनांत आले.आपण एखादे दिवशीं अण्णासाहेबासच एकीकडे गांठून त्याला उपदेश केला, त्याला त्याच्या बायकोचे सद्गुण काय आहेत, ती किती आदराला पात्र आहे, तीची योग्यता केवढी मोठी आहे ? हें त्याला समजावून सांगितलें, तर त्याच्या मनावर परिणाम होणार नाहीं काय ? परंतु हे प्रश्न त्याच्या मनांत उभे राहण्याबरोबरच त्याला हंसूं आलें. अण्णासाहेबांच्या मनांत पत्नीबद्दल किती आदर होता हें त्याला फार पूर्वींपासून कळून चुकलें होतें. अण्णासाहेब आपल्या सासऱ्याच्या घरीं राहण्याला आले, तेव्हांपासून वसंतरावास त्याची माहिती. तेव्हांपासून तो आपल्या बायकोबद्दल कसें बोले, हें त्यानें ऐकलें होतें. तिचें शाळेंत जाणें, तिचें शिकणें, बापाशीं तिचें वागणें वगैरे गोष्टींवर तो आच-

रटपणाच्या टीका करी. आपण दरिद्री म्हणून आपल्याला निवडून आबासाहेबांनीं आपल्या मुलीला दास करून दिलें, नवरा नव्हे असें तो निर्लज्जपणानें वाटेल तेथें बोले. आबासाहेबांच्या वर्तनावर तर तो इतकी अप्रयोजक व अप्रशस्त अशी टीका करी, कीं ऐकणारांनासुद्धां त्याचा तिट्कारा येई. त्याचा एक वडील भाऊ होता तो असाच मुंबईस कोठें होता. तो आबासाहेबांच्या घरीं असाच येऊन राही आणि वेड्यासारखा वागे. इतक्या प्रकारानें वेड्यासारखा कीं, आबासाहेबांनीं त्याला एकवार संतापाच्या भरांत घरांतून घालवून दिलें. आबासाहेबांच्या मनाची अशी खात्री झाली होती कीं, त्यानें आपल्या दोघां पोरांना नाना प्रकारचीं व्यसनें लाविलीं, तो आपल्या पोरांना सर्वथा बिघडविण्याला कारण झाला. आपल्या वडील भावाचा उपमर्द करून आपल्या सासऱ्यानें मला घालवून दिलें याबद्दल अण्णासाहेबांस फार राग आला आणि त्यांनीं ते दिवशीं तर आबासाहेबांस त्यांच्या पाठीमागें फारच विलक्षण शिव्या दिल्या. त्या शिव्या वसंतरावाच्या देखतच दिल्या असल्यामुळें आज त्यास चांगल्या आठवल्या. अण्णासाहेबानें त्या सबबीवर घरांतून निघून जाण्याचासुद्धां आविर्भाव आणला होता, परंतु आविर्भावाच्या पलीकडे त्याचें स्वरूप गेलें नाहीं. अशी अण्णासाहेबाची सारी मागली वर्तनपरंपरा आज वसंतरावास आठविली. तिच्या भरीला, त्याची पुढची वर्तनपरंपराही त्याच्या नजरेसमोर उभी राहिली. तेव्हां आपण उपदेश करून हा गृहस्थ कसला ताळ्यावर येणार ? आपल्याला मनसोक्त शिव्या मात्र देईल आणि आजपर्यंत झालें नाहीं त्याच्याहीपेक्षां भयंकर भांडण करील. असले विचार त्याच्या मनांत एकसारखे येत होते. सगळ्यांत एक विचार फारच जोरानें आणि वारंवार त्याच्या चित्तांत येई. तो हा कीं, पद्मावतीसारखी गुणवती स्त्री–जिच्याबद्दल आपल्याला एखाद्या देवतेप्रमाणें पूज्यबुद्धि वाटते, जिच्या नखाला धक्का लागला तर आपल्या काळजाला धक्का पोहोंचतो, जिला वांचविण्यासाठीं आपण वाटेल तें साहस करूं—त्या पद्मावतीबद्दल याला अणुभरही आदर वाटत नाहीं. तिला हा बेधडक मारतो, तिच्या प्रकृतीची काळजी घ्यावयाचें त्याच्या मनांत सुद्धां येत नाहीं. मधेंच एखादे वेळ लहर आली म्हणजे प्रेमाचें सोंग मात्र आणतो. याला काय म्हणावें ?

अण्णासाहेब त्याच्या खोलींत येऊन त्याला उद्देशून वर सांगितल्याप्रमाणें बोलला त्या वेळीं वसंतराव एकटाच बसून हे असेच विचार करीत होता. हेच विचार त्याच्या मनांत चालले होते. अण्णासाहेब एकदम येऊन बोलूं लागला. तेव्हां या व अशाच विचारांत तो अगदीं गढून गेला होता. यामुळें प्रथम त्याला अण्णासाहेबाचें बोलणें ऐकूं गेलें नाहीं. आणि तो काय बोलतो आहे तें उमगलेंही नाहीं, परंतु अण्णासाहेब एकसारखाच बोलत राहिला. तेव्हां ते सर्व विचार दूर जाऊन त्याच्या मनांत अण्णासाहेबाचें बोलणें शिरलें व तो त्याला म्हणालाः " मी कांहीं बोवा दादासाहेबांच्याकडे आतां येत नाहीं. तुह्मांला काय सांगायचं असेल, तें तुम्हीं आपलं मला इथें सांगा. आणखी दादासाहेबांच्याकडे जाऊन दादासाहेबांना सांगा."

तें अगदीं शांतपणानें दिलेलें वसंतरावाचें उत्तर ऐकून अण्णासाहेब थोडासा चिडल्यासारखा होऊन एकदम म्हणतोः " ठीक आहे. सांगतों, त्याप्रमाणें

व्यवस्था मात्र झाली पाहिजे. मी आतां आज इथून जाणार. मला तुझ्या इथें राहायचं नाहीं. दहा दिवस होईपर्यंतची मी तुम्हांला मुदत देतों, पण अकरावे दिवसाला माझी बायको आणखी तें पोरगं हीं माझ्या घरीं गेलीं पाहिजेत. तिथें राहायला मी येणार आहे. मग माझ्या माझ्या मर्जीप्रमाणें मी औषधोपचार सुरू करीन. माझ्या माझ्या इच्छेप्रमाणें तिची शुश्रूषा करीन. पोराची व्यवस्था लावीन. आणखी दहावे दिवशीं जर मंडळी तिकडे गेली नाहींत तर माझ्यासारखा वाईट कुणी नाहीं. मग मी अब्रू बेअब्रू कांहीं पहाणार नाहीं. मला जो उपाय सुचेल तो करीन. हें सारं आपलं माझं उगीच वायफळ भाषण आहे असं समजूं नको. मला कितीही त्यांत...... परंतु आतांच मी सगळं काय बोलायचं तें बोलून दाखवीत नाहीं. वेळ पडली कीं करूनच दाखवीन. बस संपलं. आतां मी जातों, हेंच सारं दादासाहेबांना सांगतों" असें म्हणून तो ऐटींत तेथून जाऊं लागला.

तेव्हां वसंतराव उठला. त्याच्याजवळ गेला. त्यानें त्याच्या खांद्यावर हात ठेविला आणि सद्गदित स्वरानें त्यास तो इंग्रजींत म्हणालाः "अण्णासाहेब, असं करूं नका. पद्माताई दहा दिवस तरी वांचेल कीं नाहीं याचाच संशय आहे......"

पुढें त्याच्यानें बोलवेना.

# प्रकरण ६१ वें.

## सैतान कशाला? मी उचलतों.



वसंतरावाच्या त्या बोलण्याचा परिणाम अण्णासाहेबांच्या मनावर काय झाला हें सांगणें फार कठिण होतें. परिणाम झाला हें तर खास. पण तो काय झाला? त्याला भय वाटलें, दुःख झालें, त्याची निराशा झाली की झालें तरी काय? अण्णासाहेबाचें मन जितकें निर्ढावलेलें तितकीच त्याची चर्याही निर्ढावलेली, किंवा असें ह्मटलें तर चालेल कीं मनाचा व चर्येचा साधारण माणसाच्या ठिकाणीं जो अभेद्य असा संबंध दिसतो, तो त्याच्या ठिकाणीं मुळींच नव्हता. केव्हां त्याच्या चर्येवर एका विकाराची छाया दिसत असली तर मन दुसऱ्याच विकाराच्या स्वाधीन झालेलें असे. मन अत्यंत चिंतामग्न असलें तरी चर्या फार आनंदी दिसावयाची. चर्या मोठी दुःख-व्याप्त असली तरी मन दुःखाचा ज्यांत लवलेश नाहीं अशा विचारांनीं व्याप्त असावयाचें. अशी कांहीं त्या माणसाच्या मनाची स्थिति होती. तो तुमच्याबरोबर समदुःखी होऊन अश्रु ढाळीत असला, तरी मनांतून कांहीं तरी निराळाच-तुमचा घात करण्याचा सुद्धां-विचार करीत असावयाचा!

वसंतरावाला अण्णासाहेबाची एकंदर वृत्ति माहीत नव्हती असें नाहीं, ती त्याला पूर्णपणें माहीत होती. परंतु रात्रींतल्या रात्रीं पद्मातार्इच्या प्रकृतीचें इतकें परिवर्तन झालें कीं त्याला आतां ती जगत नाहीं असें वाटलें आणि डॉ. भगवंतरावांनीही आतां त्याला तेंच सांगितलें. ही चाळंत झाली, ह्मणजे या दुखण्यांतून पार पडण्याचा संभव आहे असा धीर डॉक्टर आतांपर्यंत देत होते, तो धीर आतां नाहींसा झाला. तो धीर देणें त्यांना सुद्धां असंभवनीय वाटलें. त्या वेळच्या पद्मातार्इच्या प्रकृतींत एक मात्र फरक विशेष दिसला. तो हा कीं, ती फार बोलावयाला लागली. केव्हांही बोलावयाला नको अशी मूळपासूनच तिची वृत्ति नव्हती, तिला अधिकआगळें बोलावयास पाहिजे असे, परंतु मध्यंतरीं आजारांत ती फार थोडें बोलूं लागली होती. आज क्षीणतेची परमावधि झाली असतां ती वृत्ति पार गेली. जणूं काय अंगांतलें सगळें बळ तिच्या जिभेंत आलें. आवाज अतिशय खणखणीत झाला. डोळे स्वभावसिद्धच पाणीदार, परंतु आतां विशेषच तेजस्वी दिसूं लागले. यामुळें वसंतरावास असें वाटूं लागलें कीं, ही आतां जगणार. परंतु त्या चिन्हांवरूनच ती आतां जगणें कठिण असें अनुमान काढणें जरूर आहे असें

डॉक्टर भगवंतरावांनीं सांगितलें. तें ऐकल्यापासून त्याची आशा अगदीं समूळ नाहींशी झाली. आणि डॉक्टर भगवंतरावाच्या घरून कांहीं औषध आणून तें त्यानें नर्सला दिल्यानंतर मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तो विचार करीत बसला होता. पुढें अण्णासाहेब आल्यानंतर वरीलप्रमाणें त्यांचा व त्याचा संवाद झाला.

अण्णासाहेब कांहीं वेळ तसाच तटस्थ उभा राहिला. जणूं काय काय बोलावें हें त्याला समजेना. नंतर एकदम दुःखानें व्याप्त झालेला माणूस जसा कोसळतो तसा कोसळल्याप्रमाणें होऊन झटकन् वसंतरावाचा पलंग शेजारीं होता त्याच्या एका काठीला धरून कोंपऱ्यावर बसला. बसतां बसतां अगदीं करुणस्वरानें म्हणतो: "काय ? एकूण माझी पद्मा शेवटीं मला सोडून जाणार ? आणखी मग मी तरी कशाला जगतों आहें ! अरेरेरे, मीं दुष्टानं तिला फार फार छळलं. त्याचा मला पश्चात्ताप होऊन आजच सकाळीं मीं निश्चय केला होता कीं आजपर्यंत जें झालं तें झालं; पण यापुढें मागल्या सगळ्या गोष्टी ती पार विसरून जाईल असं वर्तन करायचं. पण तीच गेली, तर हें कसं होणार ? बरं झालं मी काल सकाळीं चार घटका तिच्याजवळ बसून आपल्याला सगळ्या मागल्या गोष्टींचा किती पश्चात्ताप झाला आहे, वगैरे सगळी हकीकत तिला सांगितली. वसंतराव, तिची माझी भेट होईल कारे ? ती बोलते आहे कारे ? माझ्याशीं बोलेल कारे ? वसंतराव, पूर्वीचं सगळं विसर. आतां माझ्यावरला राग सोड. मी आतां रागाला योग्य नाहीं. दयेला, कींव करायला योग्य आहें. आतां या पोराचं मी काय करूं ? ही वारली, तर मला इथून हालतां यायचं नाहीं. हें पोराचं लचांड माझ्या गळ्यांत पडणार. त्या पोराची व्यवस्था कोणीं करावी ? पद्मेच्या पाठीमागें तें कसचं जगतं आहे म्हणा ! पण जगेल तितके दिवस तरी त्याची बाळग कोणीं काढावी ? सासूबाई आहेत पण त्या काय ? एककल्ली. तुझ्या बहिणीनं आपल्या पोराच्या बरोबर वाढविलं, तर कांहीं वावगं होणार नाहीं. फार चांगलं होईल. पण मग मला त्या पोराचं दर्शनसुद्धां होणार नाहीं. आतां मी करूं तरी काय ? मला तर कांहीं सुचत नाहीं. पण वसंतराव, खरंच का कांहीं आशा नाहीं ? तुला त्या डॉक्टर भगवंतरावानं सांगितलं असेल अगदीं निराशा आहे म्हणून. हो. तोच. तो फार निराशा करतो बोवा. मला वाटतं त्याची ट्रीटमेंट सोडून द्यावी. त्या ट्रीटमेंटपेक्षां आमच्या त्या...पण तुमचा त्याच्यावर विश्वास नाहीं. या तुमच्या गैरविश्वासानं माझी बायको या पंथाला आली. पण आतां बोलण्यांत काय अर्थ आहे. अरे ट्रीटमेंट बदला, ट्रीटमेंट बदला असं मी कितीदां तरी कानीकपाळीं ओरडलों; पण तुम्ही तिकडे अगदीं कानाडोळाच केला. आधीं माझाच तुम्हांला विश्वास नाहींसा झाला. पण यानं काय झालं ! तुमचं कांहीं नुकसान झालं आहे का ? कांहीं नाहीं. माझा मात्र संसाराचा पार नाश झाला. काय करावं ! ही वेळ चमत्कारिक, त्यामुळें मला बोलतां येत नाहीं. पण बोलल्याखेरीज तर रहावत नाहीं. वसंतराव, तूंच विचार कर. या तुमच्या एकंदर वागणुकीनं आणखी माझ्याशीं धरलेल्या द्वेषानं माझं किती नुकसान झालं ? तुमचं कांहीं तरी नुकसान झालं आहे का ? कांहीं नाहीं. आतां उगीच दुःख वगैरे दाखवतां आहां.

पण ती वारल्यानंतर तुम्हांला काय त्याचं आहे! कांहीं नाहीं......"

अण्णासाहेबाच्या बोलण्याचा प्रारंभ कोणत्या सुरांत झाला आणि पुढें तो सूर बदलत बदलत कोणत्या सुरांत तें बोलणें आलें तें पाहूनच वसंतराव अगदीं चकित झाला. पुढें पुढें तर त्याला त्याचें तें बोलणें ऐकवेना म्हणून तो किंचित् त्रासून त्याला म्हणाला: "अण्णासाहेब, हीं बोलणीं बोलण्याची ही कांहीं वेळ नाहीं आणि तीं मुकाट्यानं ऐकून घेण्याची माझी वृत्ति नाहीं. तेव्हां......"

"हेंच, हेंच तें." अण्णासाहेब एकदम उसळून म्हणाला: "खरं बोलूं लागलं आणखी तें आपल्याला रुचेसं नसलं, कीं झाली वृत्ति बेफाम! पण तूंच सांग...तूंच सांग...तूंच बोल. माझ्या स्थितींत तूं असतास आणखी मी तुझ्या स्थितींत असतों आणखी आज तूं जसं मला वागविलंस, तसं मीं तुला वागवलं असतं......"

वसंतराव आतां भानावर नव्हता, असेंच म्हणावयाला पाहिजे. पद्मताई मरणार या विचारानें त्याचें मन अगदीं भडकून गेलें होतें आणि तशांत या मूर्खाचें तें तसलें बोलणें त्याच्या कानीं पडलें. त्याबरोबर त्याला त्या वेळीं एकदम काय चमत्कारिक स्फुरण आलें, त्याच्या वृत्तींत काय एकदम फरक पडला, तो एकदम संतापून त्याला म्हणाला: "मूर्खा, मी तुझ्या स्थितींत असतों तर काय केलं असतं हें विचारतोस काय! जिच्या पायांतलीं खेटरं उचलण्याची योग्यता नाहीं तिचा पति तूं होऊन तिच्या आयुष्याची धूळधाण केलीस. तिच्या पवित्र देहावर फुलं टाकण्याचा सुद्धां ज्या तुझा अधिकार नाहीं त्या तूं तिच्या अंगावर हात टाकलास ......मला जर हें भाग्य असतं तर मीं तिची देवतेसारखी पूजा केली असती..."

हें त्याचें बोलणें चाललें असतां अण्णासाहेब अत्यंत भेसुर असें हंसला आणि मोठ्यानें म्हणतो: "माझ्या लग्नाच्यामुळें तें भाग्य तुझ्या हातून निसटलं, पण तें पुनः सांपडलं तर पकडावं म्हणून एवढा खटाटोप केलासना? आणखी पकडलंसना? त्या पकडण्याचंच फळ तें पो......"

अण्णासाहेबांच्या तोंडांतून पुढचें अक्षर निघण्याच्या पूर्वीच वसंतरावानें त्याचें मानगूट धरून त्याला म्हटलें: "एक, एक शब्द, नव्हे एक अक्षर जर जास्त उच्चारलंस तर जीवं मारीन. तूं जें बोलतो आहेस तें अक्षरशः खोटं आहे हें तुला माहीत आहे. पण तूं केवळ दुष्टपणानं बोलतो आहेस."

पुढें तो कांहीं बोलला नाहीं. पण त्याची मुद्रा इतकी संतप्त व उग्र दिसली कीं ती पाहून तो भ्याड अण्णासाहेब अगदीं घाबरून गेला आणि आपल्या मानेवरला वसंतरावाचा हात थोडासा ढिला पडतांच आपल्यास सोडवून घेऊन त्याच्यापासून दूर जाऊन उभा राहिला. त्याच्या मनांतून पुष्कळ बोलावयाचें होतें असें त्याच्या चर्येवरून दिसलें. परंतु तें बोलावयाला तो भीत होता. त्याचा हात त्याच्या त्या कोटाच्या आंतल्या खिशांत ठेविलेल्या कागदावर होता. जणूं काय बायको मरणार तेव्हां, त्या कागदास आतां विशेषच जपलें पाहिजे असें वाटून तो त्या कागदावर आपला हात ठेवून उभा राहिला होता. वसंतराव त्याच्याकडे अगदीं तिरस्कारपूर्ण दृष्टीनें पहात होता. याला या घरांत आतां एक क्षणभर सुद्धां राहूं देऊं नये. याला येथें राहूं दिलें, तर हा आपल्या पवित्र पत्नीस सुखानें मरूं सुद्धां देणार नाहीं. आतां त्याची व तिची दृष्टादृष्ट देखील होऊं देतां उपयोगी

नाहीं. हे विचार वसंतरावाच्या मनांत येत होते. ती मरणाच्या द्वारीं पडली असतांना हा पाजी तिच्याबद्दल अशा प्रकारें बोलतो, हा काय एखादा हिंस्र पशु आहे, कीं कोणी दुष्ट राक्षस किंवा पिशाच्च आहे, आहे तरी कोण ! असे प्रश्न त्याच्या मनांत येऊं लागले. आतांपर्यंत झालें तें झालें, परंतु पत्नीताई आतां खचित जगत नाहीं असें कळल्यावर तरी याच्या मनाला खरी उपरति होईल असें वाटून वसंतरावानें मोठ्या केविलवाणीनें त्याला ती अत्यंत दुःखद वार्ता सांगितली होती. परंतु त्याला अजूनही अण्णासाहेबांच्या स्वभावाचें खरें मर्म समजलें नव्हतें. अण्णासाहेबाशीं संबंध आलेल्या माणसांत जर कोणाला अण्णासाहेबाचा एकंदर स्वभाव नीटसा कळला असेल, तर तो आपल्यालाच असें वसंतरावास वाटत असे. परंतु त्यालासुद्धां या वेळीं असें वाटलें कीं आपल्याला त्याचा खरा स्वभाव कळला नाहीं. असो.

वर सांगितल्याप्रमाणें अण्णासाहेब भेदरून, परंतु भेदरल्याचें चिन्ह यत्किंचितही न दाखवितां फणफणून गेल्यासारखें दाखवून वसंतरावाकडे अत्यंत क्रूर दृष्टीनें पहात राहिला असतां एक गाडी वसंतरावाच्या दाराशीं थबकली. आणि वसंतरावास कोणा तरी ओळखीच्या माणसानें हांक मारल्याचा भास झाला. जो आवाज त्याच्या कानीं पडला, तो अगदीं ओळखीच्या गृहस्थाचा, परंतु या वेळीं येथें तो गृहस्थ येईल अशी अपेक्षा करण्याला कारण नव्हतें; म्हणून वसंतराव तावडतोब खिडकीशीं गेला. पहातो, तो गंगाधर रस्त्यांत उभा असून गाडींतून कोणाला तरी उतरवीत आहे असें दिसलें. त्याला पहातांच वसंतराव अगदीं चकित झाला. आणि तावडतोब खालीं गेला. तो इतक्या तांतडीनें खालीं कां गेला आणि त्यानें खिडकींतून काय पाहिलें हें समजण्याच्या इच्छेनें अण्णासाहेब खिडकीशीं जाऊन पाहूं लागला, तों त्याला जें दिसलें तें पहातांच त्याला विजेचा जबरदस्त धक्का बसल्याप्रमाणेंच झालें. तो एकदम खिडकीशीं चिकटल्यासारखा उभा राहिला. गाडींतून उतरणाऱ्या माणसांवर त्याचे सारखे डोळे लागले. तीं माणसें तीन होतीं. एक वसंतरावाचा स्नेही गंगाधर आणि दुसरे दोघे. ती मंडळी आंत गेली. ती आंत गेल्यावरही हा खिडकींत पक्की करून बसविल्याप्रमाणेंच उभा राहून पहात होता. त्याचे डोळे मात्र आतां कोठें तरी अगदीं शून्यवत् पहात होते. त्याच्या मनांत नाना प्रकारचे उद्वेगजनक विचार चालले होते. उद्वेगाचा लवकरच संताप झाला आणि त्या संतापाच्या भरांत त्यानें एकदम आपली टोपी डोक्याला होती ती दूर फेंकून 'Damn that brother of mine. The whole game is lost' असे उद्गार काढले. नंतर त्यानें आपल्या त्या खिशांतला तो कागद काढला. वरूनच त्याच्याकडे एक वेळां नीट पाहिलें; जणूं काय त्याचें काय करावें, याबद्दल त्याच्या डोक्यांत विचार चालला आहे असें दिसलें. दोनतीनदां त्यानें तो फाडून टाकावा अशा विचारानें दोनही हातांनीं घट्ट धरला असावा; पुनः तो घुटमळला. फाडण्यांत आपला लाभ काय ? आतां ठेवण्यांतच आपल्याला लाभ असें त्याच्या मनांत आलें आणि त्यानें तो उलगडला. पुनः एकदां वाचून पहावा अशी त्याला इच्छा झाली असावी असें दिसलें. लागलींच तो शेजारच्या खुर्चीवर मटकन् बसला.

तो जें काय करीत होता, त्यांत आतां विचार ह्मणून कांहीं नव्हता, असाच प्रकार दिसला. त्यानें कांहीं व्यक्तींना गाडींतून उतरून घरांत शिरतांना पाहिलें तेव्हांपासूनच त्याचें चित्त अगदीं बावरलें असावें. खुर्चीवर बसल्यावर त्यानें तो उलगडून हातीं धरलेला कागद वाचण्यास सुरुवात केली. तो कागद आजपर्यंत त्यानें असंख्य वळां वाचलेला होता. तरी पण या वेळीं पुनः त्यानें त्याच्यावरून डोळा फिरविण्यास आरंभ केला. त्या वाचनांत त्याचें मन होतें कीं नाहीं, ही शंकाच होती. कसें तरी त्यानें वाचन संपविलें आणि एकदम त्रासून त्यानें पुनः "Damn the papers. If she does not die soon the Devil take them now" असें ह्मणून त्रासानें ते कागद दूर फेंकून दिले. असें त्यानें करण्याला आणि वसंतराव व त्याच्या मागोमाग गंगाधरपंत हे दोघे माडींत येण्याला एकच गांठ पडली. वसंतरावाच्या कानीं ते त्याचे शब्द पडले व त्याची दृष्टि त्या कागदांकडे गेली. ती जातांच 'Why the Devil? I shall take them" असें म्हणून ताडकन् उडी मारून त्यानें ते कागद उचलले. वसंतरावाचे हात त्या कागदांना लागतांक्षणीं अण्णासाहेब भानावर आला आणि एकदम चवताळून वसंतरावाच्या अंगावर धांवला. त्या वेळीं तो इतका क्रूर दिसला कीं, आतां वसंतरावाचा प्राण तो खचित घेणार असें त्यास भासलें. एखादा अत्यंत घातुक कृष्णसर्प विषाचे सुस्कारे व फवारे सोडीत आपल्या शत्रूच्या अंगावर जावा तसा अण्णासाहेब त्या वेळीं दिसला. त्यानें वसंतरावास मगरमिठी मारली आणि ज्या हातांत ते कागद होते त्या हाताचा डास घेण्याचा त्याचा बेत दिसला. त्यानें त्याच्या मनगटावर आपले दांत लावलेही. हेतु हा कीं, असा डास घेतला असतां तो ते कागद हातांतून सोडील आणि ते खालीं पडतांच आपण उचलूं. परंतु तें सर्व व्यर्थ झालें. गंगाधर मागें होताच. त्यानें त्याच्या डोक्यावर एक गुद्दा हाणून त्याला मागें ओढलें. गुद्दा फार जबर आणि मर्मावर बसला, त्यामुळें त्याला तिरीमिरी आली व तो अगदींच निर्बल झाला. त्याचे हातांतली शक्ति नाहींशी झाली, त्याचे पाय लटपटले व तो "murder murder खून खून!" असें मोठ्यानें ओरडला!

# प्रकरण ६२ वें.

## विजय कोणाचा ?



परंतु त्याच्या त्या ओरडण्याचा आतां तादृश उपयोग झाला नाहीं. गंगाधरानें त्याच्या डोक्यावर ठोसे मारूनच तो राहिला नाहीं; त्यानें त्याचें मानगूट बळकट धरलें, आणि त्यास बरेचसे हिसके देऊन गद्गदां हलविलें व दूर झटकून टाकलें. आपली स्थिति इतकी होईल याची कल्पना अण्णासाहेबांस नव्हती; आतांपर्यंतचा त्याचा अनुभव असा होता कीं, ही मंडळी नुसतीं तोंडानें फार झालें तर बोलावयाची; परंतु आजचा अनुभव अगदींच विपरीत. गंगाधरानें त्यास झटकून टाकल्यावर तो धडपडत पलीकडे पडला, कांहीं वेळ सांवरण्याचीसुद्धां त्याची त्याला मारामार पडली. तथापि ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. तो थोड्याच वेळांत उठला आणि शेजारच्या एका खुर्चीवर बसला. तो मनांत कांहीं तरी विचार करीत असावा असें दिसलें. तो तेथें बसला होता तेथपर्यंत वसंतराव व गंगाधर वसंतरावानें त्याच्या पुढून उचलून घेतलेले कागद चाळून पहात होते. ते पाहिल्यानंतर वसंतराव गंगाधरास म्हणतो: "That's all right" सगळें ठीक आहे. अण्णासाहेब त्यांच्याकडे पहात होताच. इतक्यांत त्याच्या मनांत काय आलें, तो आपल्या जागचा उठला. आपले कपडे वगैरे ठेविले होते त्या खुंटाळ्यापाशीं तो गेला आणि टोपी चढवून बाहेर जाण्यासाठीं म्हणून दाराकडे वळला. तों गंगाधराच्याही मनांत कांहीं विचार आला. तो तावडतोब दारांत आडवा झाला. आणि त्यानें त्याला इंग्रजींत म्हटलें: "चाललां कुठें राजश्री ! अजून पुष्कळ गोष्टींसाठीं आपली आम्हाला जरूरी आहे. आपले मुंबईस असलेले बंधु आपल्याला कांहीं लिहितील संवरतील, पण त्याच्या आधीं आपण या पोरांपासून काय काय लिहून घेऊन आणखी कसकसं त्यांना गुंतवून टाकलें आहे तें सांगा."

अण्णासाहेब इंगळासारखे लाल डोळे करून त्याच्याकडे नुसता पहातच राहिला. जणूं काय त्या इंगळाच्या प्रतापानें आपले हे शत्रु दग्ध होतील अशी त्याची खात्रीच होती. ते त्याचे वटारलेले लाल डोळे पाहून गंगाधर फारच उपमर्दकारक तऱ्हेनें हंसला, आणि अण्णासाहेबाच्या मानगुटास हात घालून त्यास मागें ओढून त्याला म्हणतो: "या, या तुमची आमची ताळाबाकी झाडून टाकूं."

वसंतराव नुसता त्या दोघांकडे पहात होता. एक अक्षर देखील बोलला नाहीं. त्याला ते कागद अचानक हातीं आल्यानें आनंद होण्यापेक्षां ते आतां हातांत आले यांचा उपयोग काय करावा आणि कसा करावा

हेंच सुचेनासें झालें. त्यासंबंधाचा विचार करण्यांतच तो गुंग होता. मध्येंच त्याच्या मनांत काय आलें, तो गंगाधरास म्हणतो: "तूं त्याला जाऊं दे. आतां कुठें जातो आहे तो. अशा वेळीं तो घरांत असणंसुद्धां वाईट!" परंतु गंगाधर त्यास म्हणतो: "वसंतराव, ही तुझी चूक आहे. हा लेंकाचा आपल्या तावडींत आहे, तोंपर्यंतच याच्या-पासून काय निघायचं तें निघेल. या पोरांना या लेंकांनीं किती आणखी कशा प्रकारानं गुंतवलं अडकवलं आहे याची कल्पना तुला तितकी यायची नाहीं. तें एकदां समजलं आणखी त्यांचीं तीं सगळीं कारस्थानं आपल्याला कळलीं म्हणजे इथून हे राजश्री निघून गेल्यावर काय करणार काय नाहीं याचा अंदाज लागेल. तसा अंदाज आप-ल्याला जर आतां लागला नाहीं, तर हे लोक कोण्या वेळीं काय करतील, आणखी काय नाहीं हें समजण्याला मार्गच राहिला नाहीं. गेली बोआ हातची शिकार असं म्हणून हे काय स्वस्थ बसणार आहेत? माझी अशी समजूत आहे कीं, यांनीं त्यांच्या-पासून नाना प्रकारचे कागद लिहून घेतले असले पाहिजेत. प्रॉमिसरी नोटी तर कितीक असतील. शिवाय चेकावर सह्या घेतल्या असतील. तें काय आहे तें त्या दोघांच्या-कडून कांहीं निघेलसं वाटत नाहीं. धाकस्या मन्याचं तर डोकंच पार बिघडलं आहे. त्याला या लेंकांनीं बडव बडव बडवून अगदीं इम्बेसाईल—मनानंन् शरीरानं दोनही तऱ्हेनं दुबळा—करून टाकलं आहे. थोर-ल्याला तर कांहीं समजेनासंच झालं आहे. त्याला इतके महिने नुसत्या दारूवरच ठेवून यांनीं जगवलं होतं कीं काय कोणास कळे. अन् इतकं सगळं कां त्यांनीं केलं तें कारण विचारलं, तर कांहींच त्याला सांगतां येत नाहीं. तो नुसताच हंसतो व माणसाकडे पहातो. काय शिताफीनं त्यांना दोघांना मीं काढून आणलं तें माझं मला माहीत. उघड-पणें पोलिसाकडे फिर्याद देण्याची सोय नव्हती. कारण यांनीं त्यांना काय काय लिहून घेऊन आपल्या कचाटींत धरलं आहे हें समजेना. शेवटीं हिंम्या करून एकदां यांच्या त्या गुप्त ठिकाणावर खोटाच पोलिशी छापा घातला. आणखी लागलींच या दोघांना इथें घेऊन आलों."

गंगाधराचें तें बोलणें वसंतरावानें शांत-पणें ऐकून घेतलें. परंतु तो त्याला लागलीच म्हणतो: "तूं म्हणतोस ती सगळी गोष्ट खरी, परंतु ही वेळ ती नव्हे. तुला जर याला कुठें घेऊन जाऊन वाटेल तें करणं शक्य असलं, तर घेऊन जा. तूं या दो-घांना अगदीं वेळेवर घेऊन आलास पण त्याचा उपयोग करून घ्यायचा असेल, तर हा येथें नको, त्याला जाऊं दे. काय करायचं असेल तें करूं दे. मग पुढें त्याचं काय निर्दळण करायचं असेल तें करूं. माझं तुला सांगणं इतकंच कीं याला आतां इथें......"

तें ऐकून अण्णासाहेब संतापल्यासारखें करून म्हणतो: "आतां आपण हा डाव करणार काय? पण मी इथून हलणारच नाहीं. कसं मला घालवतां आणखी काय करतां पाहूं. काय लेंकांचीं कारस्थानं, माझी बायको उपटलीत. ती आतां मरणारच. म्हणून तिची इस्टेट उपटण्याचीं कारस्थानं करतां आहां......"

"माझी बायको उपटलीत" हे शब्द ऐकण्याबरोबर वसंतराव जागचा उठून चवताळून एकदम अण्णासाहेबांच्या अंगा-वर धांवला, आणि त्याला म्हणतो: "तूं काय कोणी राक्षस आहेस कारे? या वेळीं

सुद्धां तुला तिच्याबद्दल कांहीं वाटत नाहीं. ती अत्यंत शुद्ध, अत्यंत निर्मल अशी तुझ्या मनाची पक्की खात्री आहे. आपण बोलतों हें अक्षरशः खोटं आहे हें तुला ठाऊक आहे; तरी असं बोलतोस ! तिचा अंतरात्मा आतां तिच्या कुडीला सोडून जाईल कीं चार घटकांनीं जाईल अशी तिची स्थिति झाली आहे आणखी या वेळीं..."

अण्णासाहेबाचा चेहरा एकदम बदलला. तो अत्यंत खिन्न दिसूं लागला व मध्येंच म्हणाला: "अशा वेळीं माझी आणखी तिची ताटातूट करून मला घराबाहेर घालवून देणारे तुम्ही राक्षस का तुमच्या या कृतीनं वेडावून जाऊन जें तोंडाला येईल तें बोलणारा मी राक्षस ? तुमच्या आजपर्यंतच्या सगळ्या वर्तनानं मी समजूं काय ! माझ्या बायकोची काळजी तुम्हांला–मला नाहीं; असं जगाला भासवून माझी नाचक्की करणारे तुम्ही मोठे साळसूद, मोठे दयाळू–शिव्हलरस Chivalrous आणखी मी तिचा नवरा लुच्चा, डांबिस राक्षस......ही आतां तुमच्याशीं बोलायतंडायची वेळ नाहीं. पण तिची जर इतकी प्रकृति बिघडली आहे, तर मला घराच्या बाहेर घालवणारे तुम्ही कोण सांगा ? माझी तर समजूत अशी आहे कीं, तुम्ही मला या अशा वेळीं घालवून देऊन तिच्यापासून कांहीं वुइल करून घेऊन आपल्या नांवानं सारी इस्टेट करून घेण्याचा हा कावा चालला आहे. तेवढं तुमचं साधलं म्हणजे त्या पोराची वाट लावायला तुम्हांला किती वेळ लागतो आहे ! असं जर नसतं तर हा गृहस्थ आयत्या वेळीं या दोघांना घेऊन इथें आला कसा ? इतके दिवस हे दोघे होते कुठें ? तुम्ही दोघांनींच त्यांना...पण मी तें आतां बोलत नाहीं. आतां तें बोलायची वेळ नाहीं. आणखी मी बोलतही नाहीं. पण मी आतां इथून हलायचा म्हणून नाहीं. तुमचा कावा साधण्यासाठीं तुम्ही काय काय गोष्टी करतां तें तरी पहातों. माझी बायको आणखी आतां तें पोर हीं जोंपर्यंत इथें आहेत, तोंपर्यंत मला इथें राहण्याचा पुरा हक्क आहे. घालवा मला कसे घालवतां ते. माझी बायको मरणाच्या दारीं बसली असतांना तुम्ही मला या घरांतून द्याच घालवून. त्यांत काय आहे ? द्या ढकलून मला जिन्यावरून–दोघे धटिंगण तुम्ही. तुमचं संगनमत आणखी तुमचे संगनहात झाल्यावर मग काय पाहिजे ? होऊन जाऊं द्या, आमचीं दोघांचीं प्रेतं बरोबरच बाहेर काढा. द्या सांगून लोकांना कीं, बायकोच्या शोकानं यानं आत्महत्या केली आणखी करा हत्या तुम्ही........"

गंगाधर मोठा धीट–पण तो सुद्धां त्याच्या या चमत्कारिक बोलण्यानें अगदीं स्तब्ध झाला. मग वसंतरावाची काय कथा ! ते दोघे नुसते त्याच्याकडे पहात उभे राहिले. इतक्यांत डॉक्टर भगवंतराव त्या खोलींत आले. त्यांचा चेहरा फारच खिन्न दिसत होता. ते पद्मताईला नुकतेच पाहून आले होते व त्यासंबंधानें ते बोलणार तों अण्णासाहेब त्यांना एकदम म्हणतो: "या तुमचीच उणीव होती. आतां तुमचं त्रिकूट जमलं. आतां करून टाका तिचं वुइल. तुमची काय पार्ती आहे ! वुइल करतांना ती चांगली शुद्धीवर होती, तिनें राजीखुषीनें नीट समजून उमजून हें वुइल केलं आहे असं सर्टिफिकिट द्या लिहून, म्हणजे सगळं जमलं. या वेळीं तुम्ही आलां आहांत ते दुसरं काय करणार ! आतां फक्त एखादा मॅजिस्ट्रेट घेऊन या म्हणजे तुमचा सगळा संच जमला........"

त्याचें तें बोलणें ऐकून डॉक्टरही तर अगदीं चकित झाला. गंगाधराला असें वाटलें कीं, या माणसाला खरोखर अलद्द उचलून खिडकीच्या बाहेर फेंकून द्यावें. वसंतरावाला वाटलें कीं याला वेड्याच्या इस्पितळांत कोंडून टाकावें आणि डॉक्टर भगवंतराव आपणापुढें कोणत्या वर्गांतला पशु उभा आहे त्याचें मनन करण्यांतच गुंग झाला.ते तिघेही एकमेकांशीं बोलले नाहींत. एकमेकांकडे पहात मात्र उभे राहिले. हा मात्र एक प्रकारची आपली सरशी झाली अशा दृष्टीनें चेहेऱ्यावर थोडेंसें स्मित आणून त्यांच्याकडे ऐटीनें पहात होता. या वेळीं त्यानें आपली ती इंग्रजी तऱ्हेची पनामा टोपी कपाळापासून पुष्कळ वर सारली होती व एका बाजूला कलतीही ठेविली होती. आपला एक हात आपल्या कोटाच्या छातीच्या भागाच्या आंत घातला होता. नेपोलियन बोनापार्टच्या बहुतेक चित्रांत तसा हात घातलेला दिसतो. तीच लकब या नेपोलिअनांनीं पकडली होती. दुसरा हात नुसता कमरेवर ठेविला होता.

याप्रमाणें क्षण दोन क्षण गेल्यावर वसंतराव इंग्रजींत आपल्या मित्रांना म्हणालाः "या असल्या उपमर्दकारक भाषणामुळें तुमच्या मनाला काय वाटलं असेल, आणखी काय होत असेल तें मी जाणतों आहें. पण माझ्याकरितां आणखी या दुःखमय जीविताचा त्याग करून जाऊं पहाणाऱ्या आत्म्याकरितां हें एवढं सोसून घ्या. या वेळीं घरांत जितकी शांति राहील तितकी........ "

अण्णासाहेब त्याला मध्येंच म्हणालाः "हीं तुमचीं वक्तृत्वपूर्ण व करुणरसपूर्ण कांगावी भाषणं ठीक आहेत. मी कांहीं तत्वज्ञानी नाहीं. मला माझ्या बायकोजवळ जाऊन बसायचं आहे. माझ्या मांडीवर डोकं ठेवून तिचं काय व्हायचं असेल तें व्हावं अशी माझी इच्छा आहे. ती तुह्मी मला पुरी पाडूं देतां का नाहीं ? अशा वेळीं भलतासलता प्रकार होऊं नये अशी माझी इच्छा आहे. पहिल्यानं मी चाललों होतों तेव्हां मला या गृहस्थांनीं (गंगाधराकडे बोट करून) अडविलं नसतं तर एव्हांना आपल्या इथें तमाशाच सुरू झाला असता. माझे हक्क बुडवावे ह्मणून हीं माणसं खोटं मृत्युपत्र तयार करताहेत. आणखी यांनीं माझ्या बायकोला विषप्रयोग केल्याकारणानें ती आतां मरायला टेंकली आहे असा अर्ज मी आतां डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे देणार होतों. पण आतां मला वाटतं आहे, कीं या गृहस्थांनीं माझ्यावर उपकार केले. मी अविचाराची गोष्ट करीत असतां यांनीं माझं मानगूट धरून मला माघारीं आणलं. यांच्या मनांत माझ्याकडून सगळी तांळेझडती घ्यायची होती. ती मी आतां द्यायलाही तयार आहें, आणखी घ्यायलाही तयार आहें. मी मुकाट्यानं जाऊन तसं करणार होतों, तर आतां सांगून करीन. मला जर तिथें जाऊन बसूं दिलंत तर ठीक आहे. नाहीं तर इथून गेल्यापासून अर्ध्या तासाच्या आंत पोलिसचा पहारा आणून बसवीन कधीं सोडायचा नाहीं. तुह्मी तसे तर मी असा. पण तुह्मांला तुमचा कावा साधूं द्यायचा नाहीं."

अण्णासाहेब हें बोलणें अगदीं शांतपणें व त्या तिघांकडे टक लावून पाहून बोलला. आपल्या या बोलण्याचा यांच्या मनावर काय परिणाम होतो तो एकदम आपल्यास समजावा हाच त्याचा उद्देश असला पाहिजे. वरील बोलणें बोलल्यावर तो थांबला आणि जास्तच ऐटीनें त्यांच्याकडे पाहूं लागला.

या अशा स्थितींत काय करावें आणि काय बोलावें त्यांस कांहींच सुचेना हें उघड दिसलें. ते नुसते त्याच्याकडे पाहात उभे राहिले. वेळ फार नाजूक. शेवटीं आपला या वेळीं पूर्ण जय झाला असें पक्कें वाटून मनुष्य प्रफुल्लित चेहरा करतो तसा करून अण्णासाहेब त्यांस ह्मणाला: " शहाणे व्हा. माझ्या बायकोच्या खोलींत कोणी फालतू मंडळी असतील ती लावून द्या. आणखी तिच्या या शेवटल्या क्षणांत तरी मला तिच्याजवळ बसूं द्या. तुह्मांला जें काय करायचं असेल तें तुह्मी इथें बसून खुशाल करा. त्याबद्दलचं भांडण आपण मागून मांडूं पण सध्यां मला माझ्या बायकोच्या अंतकाळीं तरी तिच्याजवळ बसूं द्या. अंतकाळ जवळ आहे हें तरी खरं आहे का काय तें मला दिसूं द्या. मला जर कांहीं उपाय करून पहावा असं वाटलं तर तो तरी केल्याचं मला समाधान मिळूं द्या. मी ह्मणजे एक हिंस्र पशु आहें असं का समजतां ? नवरा बायकोची ताडातोड–जिच्याशीं तुमचा अर्थाअर्थी संबंध नाहीं अशा बायकोला घरांत आणून ठेवून तिच्या नवऱ्याची आणखी तिची दृष्टादृष्ट सुद्धां होऊं द्यायची नाहीं असा कट करून ताडातोड करण्यांत काय तुह्माला पुरुषार्थ वाटतो? तुह्मी इतकं सगळं करून मी गय करतों करीत आलों–मीं आपल्या अब्रूसाठीं, तिच्या अब्रूसाठीं आणखी तुमच्या घराच्या अब्रूसाठीं गय केली. त्याचा तुह्मी किती फायदा घेत घेत मला चेपीत चाललां आहां, विचार करा. बरं, जर अधिक उणं कांहीं बोललों, तर मला मारायला उठतां तेव्हां... "

इतक्यांत खालून मथुराताई धांवत धांवत येऊन घाबऱ्या घाबऱ्या डॉक्टरांस ह्मणाल्या: " आपण एकदां तिकडे येऊन जा. "

मथुराताईनीं डॉक्टरांस याप्रमाणें बोलाविल्याबरोबर सर्वच मंडळी फार घाबरली हें उघड आहे. डॉक्टर तर तावडतोब तिच्या मागोमाग जाऊं लागले. त्याबरोबर "या प्रसंगीं मलाही आलंच पाहिजे" असें म्हणून अण्णासाहेबही त्यांच्याबरोबर जाऊं लागला. परंतु तें ऐकतांच डॉक्टर भगवंतराव एकदम मार्गें वळून म्हणाला: "आपण जर घटकाभर आलां नाहीं तर बरं होईल. त्यांनीं मला एवढ्या तांतडीनं कां बोलावलं आहे तें मी पहातों, आणखी आपल्याला बोलावतों!" तें ऐकतांच अण्णासाहेब डोळे एकदम अगदीं तांबडेलाल करून त्याला म्हणतो: "किती ! किती वेळ तुम्ही मला आतां तिच्यापासून दूर ठेवणार ? जी गोष्ट करूं नये, आपल्यावर करण्याचा प्रसंग येऊं नये, अशी माझी मनापासून इच्छा आहे, ती करण्याचा मजवर तुम्ही प्रसंग आणणार असं दिसतं. तुम्ही सगळे एकाहून एक धटिंगण जमलां आहां व मी एकटा आहें. मी दांडगाई करूं लागेन, तर तुम्ही मला तेव्हांच अडकवून टाकाल; मारूनसुद्धां टाकाल. तेव्हां दांडगाई सुद्धां करण्याची मला सोय नाहीं. माझा पाठीराखा कोणी असता तर पोलिसनू मॅजिस्ट्रेट वगैरेंच्या गोष्टी न सांगतां मीं बेलाशक मला वाटेल तें केलं असतं......"

परंतु डॉक्टर भगवंतराव त्याची चर्पटपंजरी ऐकत उभा राहिलाच नाहीं. गंगाधर अण्णासाहेबाच्या पुढें उभा राहिला आणखी "पाहूंच तर मग तूं कसा जातोसनू, कुठें जातोस तें" एवढेंच म्हणाला. त्याबरोबर अण्णासाहेबाची चर्या एकदम बदलली. त्याचा संताप जागच्या जागींच जिरला आणि तो सगळ्यांना शिव्या देऊं लागला. त्याला असें पक्कें कळलें, कीं आपण येथून आतां निसटून जाऊन कांहीं दंगा करूं म्हटलें तर ही मंडळी आपल्याला धरून कोंडून ठेवण्याला सुद्धां

कमी करणार नाहीं. ती वेळच अशी होती कीं, आतां त्या मंडळीला त्याला जागच्या जागीं बसवून ठेवण्यापलीकडे गत्यंतर नव्हतें. त्यानें आपण होऊन बडबड करून आपण काय काय करावयाला चुकणार नाहीं त्या-च्याबद्दल बढाया मारून टाकल्या होत्या.

अशा बढाया त्यांनीं प्रत्यक्ष ऐकल्यानंतर त्याला वाटेल तिकडे जाऊं द्यावें, असें कसें कोणास वाटणार ? हे सर्व विचार त्याच्या मनांत उभे राहिलेच आणि आपण अमूक अमूक करूं म्हणून बढाया मारल्या, ही फार मोठी चूक केली, असें त्याच्या मनास वाटूं लागलें.

त्या वेळच्या त्याच्या मनःस्थितीचें पृथक्करण करणें सर्वथैव अशक्यच होय. आपल्याच अतिलोभानें सांपळ्यांत सांपडलेला वाघ जसा शेपटी आपटून डुरकण्या फोडतो, त्या सांपळ्याच्या गजांवर आपल्या दांताचा प्रयोग करतो आणि सांपळ्याच्या लांकडी फळ्यांवर धडक्या देतो, तशीच अवस्था अण्णासाहेबाची झाली होती. त्याच्या हातीं ओरडण्याआरडण्याप-लीकडे कांहीं राहिलें नाहीं. त्यामुळें त्यानें आरडण्याओरडण्याचा सपाटा सुरू केला. त्या त्याच्या आरडण्याचा परिणाम इतकाच झाला कीं, वसंतरावाचे वडील तेथें आले. त्यांना पहातांच यानें अधिकच अकांडतांडव सुरू केलें. परंतु वसंतरावानें दादासाहेबांस चटकन् तेथून एका बाजूस नेऊन असें सुचविलें कीं "आतां या वेळीं आपण त्याच्या आरडण्याओरडण्याकडे बिलकुल लक्ष्य देऊं नका. या वेळीं आपण असं लक्ष्य दिलं तर त्याला पद्मताईच्या खोलींत घेऊन जावं लागेल, व तें तर मुळींच इष्ट नाहीं. पण इथून जर याला लावून दिलं, तर तो पोलिस आणीन दंगा करीन अ-शल्या गप्पा मारतो आहे. आणखी त्याचा कांहीं नेम नाहीं. तो तितकं करायला चुकायचा नाहीं. पद्मताईची प्रकृति या घटकेला अशा प्रकारची झाली आहे कीं हा असा दंगा मुळींसुद्धां होऊं देतां उपयोगी नाहीं. तेव्हां आतां इतके दिवस आपण याच्याशीं ज्या तऱ्हेनं वागलों त्याच्यापेक्षां अधिक दांडगाईनं वागणंच जरूर आहे. पुढें जें काय होणं तें होईल. आपण अगदीं यांत पडूं नका. पद्मताईची प्रकृति कशी काय आहे ती पाहून या. तिला वाताचा झटका होण्याचा संभव आहे, असं डॉ. भगवंतराव मघाशीं म्हणाला होता. तसाच प्रकार असावा असं दिसतं. आतां तो तिच्या खोलींत गेला आहे, आला कीं समजेल काय तें. आह्मीं तर असा पक्का बेत केला आहे कीं त्याला आतां इथून हलूं द्यायचं नाहीं. हा हलला तर काय प्रसंग होईल याचा नेम नाहीं, तेव्हां कृपा करून आतां आपण यांत अगदीं मन घालूं नका. एवढा हा प्रसंग टळला ह्मणजे मग पाहतां येईल. भगवंतरावाला थोडी एक आशेची तिरीप राहिली आहे; तो म्हणत होता कीं आपले दोघेही भाऊ परत आले आहेत असं तिला समजलं, आणखी ते तिच्या खोलींत गेल्यावर तिनं जर त्यांना ओळखलं तर कांहीं तरी तिच्या प्रकृतीनं उलट खाण्याचा संभव आहे. ही आपली उगीच आशा आहे. त्या आशेला कांहीं किंमत देण्याची जरूरी नाहीं, पण आशेला जागा आहे, असं आपलं एक वेळ त्याला वाटलं, आणखी त्यानं अनेक गोष्टी सांगितल्या त्यांत ही एक गोष्ट सांगितली. तो आतां तिकडे गेला आहे. परत आला म्हणजे काय तें समजेल; बाकी आम्ही सगळी आशा सोडून बसलोंच आहों. आपण आतां याला कांहीं सुद्धां बोलूं नका.

त्याला ओरडूं द्या, आरडूं द्या, वाटेल तें करूं द्या...."

वसंतराव इतक्या लांचलचकपणानें आपल्या वडिलांशीं यापूर्वीं कधींच बोलला नव्हता. परंतु आतांची वेळ अशी होती कीं, त्यांना अण्णासाहेबांशीं नुसतें बोलून सुद्धां देऊं नये हें अवश्य होतें. तो बोलूं किंवा कांगाव करूं लागला म्हणजे दादासाहेबांच्या मनांत काय येईल आणि ते आपल्याला काय करावयाला सांगतील याचा नेम नाहीं. त्यांनीं एकदां "अमूक करा" "त्याला जाऊं द्या" असें सांगितल्यावर त्यांच्या मनाविरुद्ध वागणें बरें नव्हतें, यामुळें त्यानें आपलें चन्हाट वळून त्यांना त्याच्यापासून दूर करविलें.

हा इकडे वाटेल तें बडबडतच होता आणि गंगाधर त्याच्यावर एकसारखी नजर देऊन उभाच होता. त्यानें यत्किंचित् जरी हालचाल केली, तरी त्याला चेंपावयाचा हा त्याचा निर्धार होता. वसंतरावाचें बोलणें ऐकून दादासाहेबांस काय वाटलें कोण जाणें. ते आपले अण्णासाहेबांकडे पाहून नुसतें "जरा शांतपणानं घ्या म्हणजे सगळं ठीक होईल." इतकेंच बोलून तेथून चालते झाले. तें पहातांच त्यानें दादासाहेबांसही शिव्या देण्याला सुरुवात केली. गंगाधर व वसंतराव नुसते स्तब्धपणें त्याच्यापुढें उभे राहिले होते.

इतक्यांत डॉक्टर भगवंतराव आले. त्यांचा चेहरा जरा प्रफुल्लित व आशापूर्ण दिसला. तो पहातांच वसंतराव त्यांच्याकडे जाऊन त्यांस ह्मणालाः "कां, कशाला बोलावलं होतं ? तुमच्या चर्येवरून जरा बरा रंग दिसतो आहे."

"बरा कसला ? पण संकट अगदींच घटका अर्ध्या घटकेवर आलं होतं ते थोडं लांबलंसं वाटतं. तिला आपले भाऊ आले आहेत असं कळलं, त्याचा हा परिणाम आहे, अशी माझी समजूत आहे. हे दोघे एकदम आल्यानं चांगला किंवा वाईट परिणाम होईल, तिचा शेवट जवळ येईल किंवा लांब जाईल असं मला वाटत होतं, त्याप्रमाणें थोडा बरा परिणाम आहे, आणखी आपली जबाबदारी वाढली आहे. तिच्या नजरेला तें एकदां पडले ह्मणजे याच्याहीपेक्षां अधिक चांगला परिणाम होईल, किंवा...पण आतां मला अशीच आशा वाटते आहे कीं, अधिक चांगलाच परिणाम होईल. वाईट होणार नाहीं. मात्र तिला अगदीं स्वस्थपणा पाहिजे, कोणी सुद्धां तिच्या खोलींत जातां कामा नये. रोग्याच्या स्थितींत-या अशा रोग्याच्या स्थितींत-कोणत्या बारीक कारणानं काय परिणाम होईल याचा मुळींच कांहीं नेम सांगवत नाहीं. मला तिची आतांची स्थिति पाहून फार आश्चर्य वाटलं. तिच्या या दुखण्यांत अशा तन्हेचा पालट होईल हें शक्य वाटत असलं तरी मला संभवनीय वाटत नव्हतं. प्रथम मी खोलींत जातांक्षणीं मला असं वाटलं, कीं हिला हा शेवटला डेलिरियम झाला असावा, पण नाहीं; तिचं डोकं अगदीं शांत झालेलं दिसलं. जलद जलद बोलून त्यांनीं मला विचारलं "मन्याबापू आला आहे का ?" मीं त्यांना सांगितलं, "मन्याबापूच नव्हे तर आपला थोरला भाऊही-दोघेही आले आहेत." त्यांनीं मला पुनः विचारलंः "कुठें आहेत ते ? त्यांना माझ्याकडे आणा." तेव्हां मीं त्यांना म्हटलं, "तुम्ही कांहीं वेळ स्वस्थ पडा. तुम्हांला कांहीं वेळ स्वस्थ झोंप लागूं द्या. मग मी त्यांना इकडे घेऊन येईन..." त्यावर त्या कांहीं बोलल्या नाहींत. डोळे मिटून स्वस्थ पडल्या. मीं नाडी, हृदय वगैरे

तपासून पाहिली. तर त्यांत बरीच सुधारणा दिसली. मीं आजपर्यंत पुष्कळ रोगी पाहिले पण इतक्या दूरवर स्थिति पोंचून पुनः इतकी बऱ्याकडे उलट खाल्ल्याचं उदाहरण हें पहिलंच. अशीं उदाहरणं झालेलीं नाहींत असं मात्र नाहीं."

इतकें बोलून भगवंतराव किंचित् थांबला. परंतु तितक्यांत त्यांची दृष्टि अण्णासाहेबांकडे गेली. त्याबरोबर तो पुनः वसंतरावास म्हणतोः "या माणसाला मात्र त्यांच्या खोलीकडे फिरकूंसुद्धां देऊं नका. त्यांची अशी स्थिति झाली आहे कीं हा खोलीपाशीं जाऊन याची चाहूल लागली पुरे, त्यांना तो ओळखायला येईल. आणखी ओळखतां क्षणीं पुनः प्रकृति काय उलट खाईल याचा नेमच नाहीं. अति, अति नाजूक असं एखादं वाद्य असतं कीं नाहीं, तशी त्यांची अवस्था झाली आहे. अगदीं बारीक आघात झाला कीं. ....."

"त्याला तिकडे जाऊं देण्याची गोष्ट स्वप्नांतसुद्धां आणूं नका." वसंतराव एकदम त्यांना मध्येंच म्हणाला. "त्याला इथून आतां कांहीं दिवसपर्यंत कुठेंच जाऊं देऊं नये हें अवश्य आहे. तेव्हां तें कसं साधावं या विवंचनेंत आम्ही आहों. जाऊं दिला तर तो काय करील, आणखी काय नाहीं याचा नेम नाहीं. इथें राहूं दिला तरी काय करील आणखी काय नाहीं याचाही नेम नाहीं. अशी कांहीं मोठी पंचाइतीची वेळ आली आहे."

अण्णासाहेब त्या दोघांकडे अगदीं चित्त लावून पहात होता. ते दोघे फार हलके बोलत होते. यामुळें त्याला कांहीं ऐकूं गेलें नाहीं, यदाकदाचित् गेलें असलें, तरी क्वचित् एखादें वाक्य गेलें असलें तर असेल; परंतु त्यानें आपलें सगळें लक्ष्य त्यांच्याकडे लाविलें होतें. कांहीं ऐकूं आलें नाहीं, तेव्हां तो आपल्या जागेवरूनच डॉक्टर भगवंतरावाला म्हणतोः "अहो, मला कांहीं तरी सांगा, तुम्हीं काय एवढी कुजबुज चालविली आहे ती. माझा कांहींच त्यांत संबंध नाहीं असं का तुम्ही समजतां? तुमच्या मतानं मी अगदीं वेड्यासारखं करतोन् बोलतों, पण मी असं करायला बोलायला तसंच कारण आहे कीं नाहीं, याचा विचार तरी करालना?" असें म्हणून तो एकदम मोठ्यानें हंसला. आतां त्याची ती मघांची दांडगाईची आणखी संतापाची वृत्ति पार लयाला गेली, आणि तिच्या जागीं दुसरीच वृत्ति दिसूं लागली. तें त्याचें हंसणें ऐकतांच वसंतराव व गंगाधर त्याच्याकडे पाहूं लागले, तों त्याचा चेहरा अगदीं पार बदललेला असा त्यांना दिसला! वसंतराव तर डॉक्टर भगवंतरावाला एकदम हळूच म्हणाला: "या माणसाची एकंदर वृत्ति तरी काय आहे, आणखी स्वभाव काय आहे हें समजणं अगदीं अशक्य आहे बोआ. तुम्ही इथून गेलां तेव्हांची त्याची वृत्ति जर तुम्हीं पाहिली असती तर तुम्हांला वाटलं असतं कीं हा आतां तासा अर्ध्या तासांत पांचचार माणसांचे तरी प्राण घेणार खचित! आणखी आतां त्याची स्थिति पहा काय आहे ती?"

इतकें बोलून वसंतराव थांबला, तों अण्णासाहेब आपल्या जागेवरून उठला. उठतांच गंगाधर त्याला पुनः बसविण्यासाठीं जरा पुढें सरसावला. तें पाहून अण्णासाहेब पुनः मोठ्यानें हंसला व म्हणतोः "नका. अस्तन्या नका वर सारूं. मी इथून जाऊं नये असा तुमचा जर आग्रह आहे तर मी तरी कुठें जायला निघालों आहें? माझी बायको—जिला मी एकटा आणखी जी मला एकटी. तिला अशा भयंकर स्थितींत सोडून

मीं कुणीकडे तरी जावं असं मला तरी कसं वाटेल ? मीं जावं असं तुमचं सगळ्यांचं म्हणणं आहे, आणखी मला घालवून यायला तुम्ही धडपड करतां आहां, असं वाटून मी त्रासून वैतागून जात होतों. त्या त्रासावैतागानं मग माझ्या जें मनांत येईल तें तोंडांतूनही निघतं. माझ्यासारखी ज्याची स्थिति झाली असेल त्यालाच तें कां असं होतं हें बरोबर समजेल, इतरांना काय समजणार ? तुम्ही प्रत्येक जण आपल्याला माझ्या स्थितींत कल्पनेनं तरी घालून पहा म्हणजे माझं म्हणणं खरं का खोटं, तें तुमच्या लक्ष्यांत येईल. तें तुम्ही करीत नाहीं, आणखी मला नांवं ठेवतां, शिव्या देतां, तेव्हां काय म्हणावं ? बोला तुम्ही माझ्या स्थितींत असतां तर कसे वागलां असतां ?"

इतकें बोलून तो थांबला आणि थो. ड्याच वेळांत एकदम पुनः म्हणतो: "पण तिची प्रकृति कशी काय आहे, तें तर मला सांगाल ? का नाहीं सांगणार ? तुमच्या चेहेऱ्यावरून तर असं दिसतं आहे कीं आतां मघांच्या इतकी भीति बाळगायला नको. मग मला एकदां तिला भेटूं द्या. तिच्याजवळ मला बसूं द्या, तुम्ही म्हणाल त्या अटी मी कबूल करीन... "

"छे. छे. छे. छे. " भगवंतराव एकदम त्याच्याकडे वळून म्हणालाः "ती परवानगी देणं तर अगदीं अगदीं अशक्य. तसं जर आम्हीं केलं, तर जी काय किंचित् सुधारणा झाली आहे, ती पार नाहींशी होऊन काय केव्हां होईल याचा नेमच नाहीं. "

"माझ्या तिथें बसण्यानं आणखी तिला भेटण्यानं असं होईल ? मी कोणी राक्षस आहें का पिशाच्च आहें ? मला तुह्मी समजतां तरी काय ? "

भगवंतराव त्यावर चटकन् म्हणालाः "आम्ही तें काय समजतों आणखी काय नाहीं समजत त्याचा वाद आतां कशाला ? सध्यां पद्माताईच्या प्रकृतीच्या दृष्टीनं आम्ही काय तें पहातों आहोंत. त्या दृष्टीनं आम्हांला वाटतं कीं तुम्ही कांहीं त्यांच्याकडे जाऊं नये. आणखी आम्ही कांहीं तुम्हांला जाण्याची सल्ला देणार नाहीं."

"सल्ला कां म्हणतां ? परवानगी म्हणाना ! " अण्णासाहेब मोठ्यानें हंसून म्हणालाः "बरं बोआ, सध्यांचे दिवस डॉक्टरी अमलाचे आहेत. आम्ही जात नाहीं. तुम्ही जे दिवशीं म्हणाल ते दिवशींच जाऊं. पण इथें राहण्याला तर हरकत नाहीं ? "

"गुण्या गोविंदानं राहण्याला मुळींच हरकत नाहीं. " वसंतराव एकदम मध्येंच म्हणाला.

तें ऐकून अण्णासाहेब पुनः मोठ्यानें हंसून म्हणालाः "काय चमत्कार आहे पहा ! माझ्या नशिबाचीच एकंदर फार चमत्कारिक स्थिति आहे, एवढी गोष्ट खरी. मला इथून जाववत नाहीं, मी फिर्यादीन् अर्यादीच्या गोष्टी बोलतों, पण तिच्या अशा स्थितींत मला कांहीं तसलं करणं शक्य का आहे ? मी अगदीं गुण्यागोविंदानं राहीन. पण मला तिच्याजवळ बसूं द्या, बोलूं द्या, तिची शुश्रूषा करूं द्या. याला काय म्हणून तुमची आडकाठी ? मला भेटल्यानंन् मी तिच्याशीं बोलल्यानं तिचं दुखणं उलट खाईल, हें काय तुमचं म्हणणं ? बरं मी गुण्यागोविंदानं राहीन. असं जरी तुम्हांला अगदीं जीव तोडून सांगितलं तरी तुम्ही थोडाच विश्वास ठेवणार आहां ! मला मोठी पंचाईत झाली आहे. राहीन ह्मटलं, तर तुम्ही तिच्याजवळ जाऊं देत नाहीं. इथून निघून जाईन

म्हटलं, तर माझ्याच्यानं जाववत नाहीं. मघांपासून तुम्ही मला जाऊं देत नाहीं. मला नजर कैदेंत ठेवण्याचा तुमचा विचार दिसतो आहे. दुसरं तिसरं कांहीं नाहीं. इथें कांहीं तुम्ही मला स्वस्थपणानं राहूं देणार नाहीं. चोरासारखं राहवं लागेल. तसं माझ्याच्यानं राहणं शक्य नाहीं, तेव्हां आपला मला जाऊं द्या कसा. "

" नको कोण म्हणतो आहे ? " वसंतराव एकदम त्याला म्हणाला: " इथें राहून तुम्हांला स्वस्थता मिळायची नाहीं, असं तुम्ही म्हणतां. पण आम्हांलाही स्वस्थता मिळायची नाहीं, आणखी पद्मातांईलाही मिळावयाची नाहीं हेंही खरं आहे. तेव्हां तुम्हीं जावं तें चांगलं. त्याला आमची आडकाठी नाहीं. नाहीं तरी आम्ही आपल्याला किती दिवस आडकाठी करणार ? आपण खुशाल जा. पुनः त्रास द्यायला मात्र येऊं नका, तुमच्या मनांत खरोखर पद्मातांईविषयीं प्रेम असेल तर..."

" छे. छे. छे. मला कसलं आलं आहे तिच्याविषयीं प्रेम ? सगळं प्रेम तुलाच. "

अण्णासाहेबानें हें वाक्य इतक्या कांहीं विलक्षण तऱ्हेनें उच्चारलें, कीं त्याच्या त्या बोलण्याचा प्रत्येकाला तिरस्कार आला.

पद्मातांई आजारी–अत्यवस्थ आजारी–केव्हां तिचा अंत होईल याचा नेम नाहीं. अशा स्थितींत असतांना आपण हें काय बोलत बसलों आहों असें मनांत येऊन वसंतरावानें एकदम दीर्घ सुस्कारा टाकला व तो स्तब्ध झाला, इतक्यांत अण्णासाहेब म्हणतो: " बरं तें जाऊं द्या. मला नाहीं प्रेम, पण द्वेष तरी आहेना. मग अशा दुष्ट द्वेषी मनुष्याला कशाला अडवून ठेवावं ! जाऊं द्या त्याला म्हणजे झालं. पुनः तुमच्या दाराच्या उमऱ्यावर सावलीसुद्धां घालायला मी येणार नाहीं मग तर झालं. जाऊं द्या झाली एवढी माझी शोभा पुष्कळ झाली. " असें म्हणून त्यानें आपली टोपी चढविली. सर्वांकडे पाहून तो एकवार तिरस्कारानें हंसला आणि त्या घरांतून चालता झाला. काय असेल तें असो आतां त्याला कोणीं अडविलें नाहीं.

# प्रकरण ६३ वें.

## मध्यरात्रीं.



**अण्णासाहेब** गेल्याबरोबर त्या सर्व मंडळीस आपल्या छातीवरलें एक मोठें थोरलें दडपणच उचललें गेलें असें वाटलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जो तो क्षणमात्र संकटांतून सुटल्याप्रमाणें दुसऱ्याकडे पाहूं लागला. त्याला कोंडून ठेवणें, जबरदस्तीनें एका खोलींत बसवून ठेवणें वगैरे गोष्टी मनांत आणणें किंबहुना " तुला असं कोंडून ठेवूं, तसं बसवून ठेवूं " असा धाक घालणें सोपें होतें, परंतु तसें प्रत्यक्ष केल्यास सगळ्यांचें चित्त त्याच्याकडे अडकून राहणारच. त्याच्या आरडयाओरडयापुढें कोणालाच कांहीं सुचलें नसतें. तो होता तोंपर्यंतच काय स्थिति झाली होती हें वाचकांस माहीत आहेच. तीच स्थिति सगळ्या दिवसभर चालू ठेवणें कांहीं इष्ट नव्हतें. एकदोन माणसें आपलीं त्याच्या पहाऱ्यावर बसलेलीं असावयाचीं, हा उपद्व्याप करतो कोण ? आतां बडबडून व नानाप्रकारचे धाक घालून गेला आहे, तर पाहूं काय करतो तें. आलाच कांहीं लचांड घेऊन तर पहातां येईल. असें जो तो प्रथम आपल्या मनांत व मग दुसऱ्याशींही बोलून मोठा त्रास गेल्यासारखा उसासा टाकून स्वस्थ बसला.

अण्णासाहेब गेल्यानंतर थोड्याच वेळानें डॉक्टर भगवंतराव वसंतरावास व गंगाधरास ह्मणालाः " पद्मताईचं डोकं आतां अगदीं क्लिअर झालं आहे. तिच्या भावांच्या येण्याचा व तें तिला समजण्याचा हा परिणाम आहे. ज्या गोष्टीचा रोग्यास निदिध्यास लागलेला असतो ती झाली असं एकदम कळतांच एकदम कांहीं तरी विकार भडकून रोग्याची शुद्धि नाहींशी होते किंवा त्याचं मस्तक अगदीं शुद्धीवर यायचं, असे दोन प्रकार होतात. त्यांपैकीं दुसरा या केसमध्यें झाला आहे. हा किती वेळ राहील कांहीं सांगवत नाहीं. पण फार वेळ राहील असं मात्र समजूं नका. पद्मताई आतां वांचत तर नाहींच; तिच्या डोक्यांत काय तें चैतन्य येऊन एकवटलं आहे. यामुळें ती आतां शेवटपर्यंत अगदीं शुद्धीवर राहील असा माझा समज आहे. आधींच ती अतिशय तल्लख बुद्धीची आहे, आणखी आतां त्यांत तिचं सगळं चैतन्य मस्तकांत एकवटून आलं आहे. तेव्हां एकदम बडबड करील, किंवा बराच वेळ शांत राहून मग एकदम आपल्या मनांत काय आहे तें सांगायला लागेल. तेव्हां तिच्याजवळ एकसारखा पहारा राहूं द्या. ती बोलतां बोलतां केव्हां प्राण सोडील याचा अगदीं नेम नाहीं. फार तर एखाददुसऱ्या दिवसाच्यावर आतां ती जगेल हें कांहीं शक्य नाहीं. "

डॉक्टराचें तें बोलणें ऐकून त्या खिन्नावस्थेंतही वसंतराव भगवंतरावाकडे व गंगाधराकडे पाहून हंसला व म्हणतोः " डॉक्टर,

तुम्ही कांहीं म्हणा, पण तुमची विद्या या पद्मातांईच्या बाबतींत अगदींच चकली व थकली असं तुम्हांला कबूल केलं पाहिजे. ज्या ज्या वेळीं जें जें तुम्हीं भविष्य केलं तें तें निराळंच झालं. "

" असं झालं खरं बोआ " भगवंतरावही त्यास हंसत हंसत म्हणाला " शारीरिक व्यथेपेक्षां ज्या माणसाला मानसिक व्यथेचीच पीडा जबरदस्त–किंवा ज्याची शारीरिक व्यथा मानसिक व्यथेमुळेंच उत्पन्न झाली, त्याच्या बाबतींत आमच्या भविष्यांची अशीच स्थिति होते. तेव्हां पद्मातांईच्या वांचण्याबद्दलही माझं भविष्य खोटं ठरलं तर मला तुमच्या इतकाच आनंद होईल, हें कांहीं मी सांगायला पाहिजे असं नाहीं. पण आतां माझं तुम्हांला असंच सांगणं आहे, कीं, तुम्ही, आणखी मालतीबाई व मथुराताई ही सारी मंडळी त्यांच्याजवळ असा. आतां त्यांना औषधाचा कांहीं उपयोग नाहीं. त्यांची जगण्याची इच्छाच ( Will ) प्रबल असली तर त्या अशा भयंकर स्थितींतूनही जगतील, परंतु ती इच्छा कितपत प्रबळ होईल, किंवा केव्हां नष्ट होईल हें कांहीं सांगवत नाहीं. तुम्ही हंसा. पण मी सांगतों त्याप्रमाणें करा. तुम्ही दोघं तिघं त्यांच्याजवळ असा. आणखी या गंगाधरपंतांना इथें त्या राजश्रीसाठीं पहाऱ्यावर ठेवा मीही पुनः येऊन बसेन माझ्या चार पांच व्हिझिटस् उरकून. आतां एक दोन दिवस तुमच्या घरींच काढीन. "

इतकें म्हणून डॉक्टर भगवंतराव निघून गेले आणि वसंतरावानें त्यांच्या सांगण्याप्रमाणें अक्षरशः करण्याचा निश्चय केला. त्यानें मालतीलाही त्याप्रमाणेंच सांगितलें. मालती, वसंतराव व मथुराताई यांनीं आळीपाळीनें आपलीं जेवणींखाणीं उरकून पद्मातांईच्या खोलींत तिच्याजवळ बसून उरलेला दिवस काढला. वसंतरावास ते राजश्री काय करताहेत याचें एकसारखें भय वाटत असल्यामुळें तो मधून मधून बाहेर येऊन जाई. अण्णासाहेब गेला आहे तो अगदीं मुकाट्यानें राहील हें त्याला संभवनीय वाटेना. जों जों वेळ चालला, तों तों अजून हा कांहीं तरी लचांड घेऊन कसा येत नाहीं याचें वसंतराव आश्चर्यच करीत राहिला.

शेवटीं रात्रीचे नऊ वाजून गेले. पुनः डॉक्टर आले, त्या वेळीं पद्मातांईला गाढ झोंप लागल्याप्रमाणें झालें होतें. डॉक्टरांनीं पाहून " तिला कांहीं त्रास देऊं नका. झोंप लागली आहे हें सुचिन्ह आहे. " असें सर्वांना सांगितलें. परंतु बाहेर येऊन गंगाधराला मात्र ते म्हणाले: " तिच्या शरीरांत कुठेंही आतां प्राण नाहीं. हार्ट ( काळीज ) पासून वर धुगधुगी आहे. मध्यरात्र उलटली तर फार झालें. मी आज इथेंच पडतों. काय असेल तें असो. मला असं वाटतं आहे, कीं आज एक एंजल ( देवता ) हा लोक सोडून जाणार आहे. तेव्हां आपण जवळ असावं तें बरं. "

डॉक्टर याप्रमाणें गंगाधराजवळ बोलत होते; त्या वेळीं साडेनऊ वाजून गेले होते. डॉक्टर आपला जामानिमा उतरून तेथेंच ईझीचेअरवर पडले. त्यांचें मन फार उद्विग्न झालें आहेसें दिसलें. अशा देवतेसमान स्त्रियांना अशा प्रकारें दुःख कां सोसावें लागतें ? हा प्रश्न त्यांच्या मनांत येऊन त्याचें उत्तर शोधण्यांत ते गुंग झाले असावे. इतक्यांत वसंतराव तेथें येऊन 'तुम्ही आज आपण होऊन इथें राहणार हे तुमचे केवढे आमच्यावर उपकार आहेत ! ' असें म्हणून त्यांच्याकरितां एक व गंगाधराकरितां एक असे दोन बिछाने टाकवून, पद्मा-

ताईच्या भावांची निजण्याची व्यवस्था लावून पुनः पद्मातार्ईच्या खोलींत गेला. तेथें फक्त मालती व मथुराताई दोघीच होत्या. मुलांच्या रडण्यापासून पद्मेला त्रास होऊं नये म्हणून पद्मेची आई पद्मेच्या मुलाला घेऊन खालच्या मजल्यावर एका बाजूच्या खोलींत निजे. त्याला पद्मेजवळ क्वचितच आणीत. पद्मेची आईच त्याचें सगळें करी.

वसंतराव पद्मेच्या खोलींत येतांच त्यानें मालतीस व मथुराताईस "तुम्ही पडा. मला झोंप यायला लागली कीं मी तुम्हांला उठवीन," असें म्हणून त्या दोघींना पडण्याविषयीं आग्रह करीत होता, इतक्यांत पद्मातार्ईनें एकदम डोळे उघडून सभोंवार पाहिलें तों खोलींत अर्धवट उजेड होता, त्यामुळें तिला नीट दिसेना. उठून किंवा मान उचलून पहाण्याची ताकद तिला मुळींच नव्हती. तिनें डोळे उघडले आहेत, हें वसंतरावास किंवा दुसऱ्या कोणास कळलेंही नाहीं. तिची झोंपमोड होऊं नये म्हणून हीं तिघें मात्र अगदीं हलके कुजबुजत होतीं. पद्मातार्ईनें त्यांचें कुजबुजणें ऐकलें आणि ती एकदम मोठ्यानें ह्मणाली: "कोण वसंतराव, आणखी कोण आहे तें?

वसंतरावः--मी, मालती आणखी मथुराताई तिघेंजण बसलों आहों. तुला गाढ झोंप लागली होती. केव्हां जागी झालीस?

पद्माः--तुह्मी कशाला बसतां इथें? माझा हा तुह्मांला किती त्रास! आणखी किती दिवस माझा हा त्रास तुह्मांला भोगावा लागणार आहे कुणाला ठाऊक. वसंतराव, कोणी इथेंच आहे की...

पुढें तिच्यानें बोलवेना इतका गहिंवर आलासें दिसलें.

वसंतरावः--अण्णासाहेब केव्हांच बाहेर गेले.

पद्माः--आणखी तें वुइल त्यांच्या हातांत...

वसंतरावः--नाहीं, ताई, तें वुइल माझ्या हातीं आलं आहे.

ते शब्द ऐकण्याबरोबर विजेनें एकदम एखाद्या पदार्थांत चेतना येते, त्याप्रमाणें पद्मातार्ईची अवस्था झाली व ती एकदम पहिल्यापेक्षांही मोठ्यानें ह्मणते: "काय? तुझ्या हातीं आलं आहे? तें वुइल तुझ्याजवळ आहे?"

वसंतरावः--होय, माझ्याजवळ आहे.

पद्माः--तर मग तें इकडे आण, मला एकदां पाहूं दे.

मालतीः--पद्माताई, आतां तें वसंतरावाजवळ आहे. तुला पाहून काय करायचं आहे? तूं जरा बरी हो, मग पहातां येईल.

पद्माः--नाहीं, नाहीं. तें माझ्याजवळ आण.

वसंतरावः--पण ताई......

पद्माः--वसंतराव, माझी तुला ही शेवटची विनंति आहे. तूं तें वुइल मजजवळ आण. नाहीं ह्मणूं नको.

पद्मा आतां शांत होती, आणि तिच्या मनाचा कांहीं तरी पक्का निश्चय झाल्याप्रमाणें दिसत होतें.

वसंतराव तेथून उठून गेला. मालती पद्मेजवळ गेली व तिला ह्मणाली: "तूं उगीच आपल्या मनाला अस्वस्थ कां करून घेतेस? अगदीं स्वस्थ पड. दोन तीन दिवसांनीं तुझ्या अंगांत थोडा तकवा......."

पद्मा तें ऐकून एकदम तिला ह्मणते: "मालुताई, ही वेळ पुनः यायची नाहीं. तूंच आतां स्वस्थ बसून रहा, मी अगदीं स्वस्थ आहें. शांत आहें. वसंतरावाला लवकर बोलाव."

वसंतराव इकडे आपल्या खोलींत गेला. त्यानें डॉक्टराला झालेली हकीकत सांगितली. डॉक्टरांनीं त्याला "तुह्मी तिच्या

मनाविरुद्ध कांहीं करूं किंवा बोलूं नका. ती ह्मणेल तसं करा. ही वेळ अशी आहे कीं, तिच्या मर्जीविरुद्ध एवढंसं जरी झालं, तरी तिचं मस्तक......"

परंतु डॉक्टराचें बोलणें पुरतें झालें नाहीं तोंच वसंतरावाला बोलावण्यासाठीं मालती आली व त्यास ह्मणालीः "पद्मताईनं एकसारखा हट्ट धरला आहे कीं तें वुइल लवकर आण. आधीं चल. ती अगदीं इतकी अशक्त झाली आहे, पण आतां आवाज कांहीं विलक्षण खणखणीत झाला आहे. आज इतक्या महिन्यांत अशा खणखणीत आवजानं ती बोलतांना मीं कांहीं कधीं ऐकलं नाहीं. ज्ञानवायु का काय वैद्यलोक म्हणतात तो तिला झाला आहे का काय कुणास कळे ! चल लवकर. ती मला जवळ बसूं देईना. जाऊन वसंतरावाला आण म्हणून पाठीस लागली तेव्हां मग आलें. काय करूं ! "

वसंतराव तें ऐकतांच लागलींच तें वुइल ठेविलें होतें तेथून काढून घेऊन तिच्याबरोबर गेला.

तो खोलींत शिरलेला पहातांच पद्मताई त्याला म्हणतेः " आणलंस ! आण माझ्याजवळ. आणखी जरा मला तुह्मी दोघी उठवून बसवा. "

मालतीः--पद्मताई, तुझ्या मनांत तरी काय आहे ! तुला उठून बसायचं त्राण नाहीं. आणखी तूं असं काय करतेस ! तूं जरा बरी हो. मग दोन दिवसांनीं तुझ्या मनाप्रमाणें काय करायचं तें करूं.

पद्मताईः--नाहीं. नाहीं. मला जें काय करायचं तें आत्तां या घटकेला, याक्षणीं झालं पाहिजे. तुमचं दोघांचं माझ्यावर जर प्रेम असेल, तर माझी मरते वेळची एवढी गोष्ट तुम्ही ऐकाल. मला उठून बसतां आलं नाहीं तरी हरकत नाहीं पण मी सांगतें तें करा. मी चार घटकांची सोबतीण आहें. माझ्या म्हणण्याप्रमाणें केलं नाहींत, आणखी मी जर तशीच मेलें, तर तुम्हांला पस्तावा होईल.

इतक्या अशक्त स्थितींत ही इतकी खणखणीत बोलते आहे तरी कशी ! याचें त्या तिघांना खरोखरी फार आश्चर्य वाटलें. मथुराताई व मालती या दोघींना तर असेंच वाटलें, कीं, हिच्या अंगांत कांहीं तरी निराळा संचार झाला आहे.

वसंतरावानें तें वुइल पद्मेच्या हातीं दिलें. तें हातीं घेतांच पद्मा त्याच्याकडे कांहीं वेळ स्तब्धपणें पहात पडली. नंतर वसंतरावाकडे पाहून म्हणतेः " वसंतराव, माझं एक काम करशील का ? एवढं काम केलंस, तर पुनः मी कधीं म्हटल्या कधींसुद्धां अमुक एक काम कर असं म्हणायला यायची नाहीं. "

वसंतराव क्षणमात्र कांहीं बोलला नाहीं. त्याबरोबर त्याला पद्मा पुन म्हणतेः " कां बोलत नाहींस तो ? "

वसंतरावः--पद्मताई, तूं कोणती गोष्ट मला आजपर्यंत सांगितली आहेस आणि मीं केली नाहीं ! सांग काय करूं तें.

पद्माः--पण मी आतां सांगणार आहे ही चटकन् करशील कीं नाहीं कुणाला ठाऊक. करीन असं एकदां तोंडानं म्हण, मग सांगतें.

वसंतराव किंचित् स्तब्ध झाला. पद्मा त्याच्या चर्येकडे एकसारखी टक लावून पहात होती. त्याचे व तिचे नेत्र मिळाले आणि वसंतरावानें एकदम "करीन, करीन, खचित करीन. " असें गहिंवरल्या आवाजानें म्हटलें. पद्मेनें एक समाधानाचा दीर्घ सुस्कारा टाकला व लागलींच म्हटलें: " हें वुइल या क्षणीं माझ्या समोर जाळून टाक. "

वसंतराव, मालती व मथुराताई तिघेंही चकित होऊन तिच्याकडे टक लावून पाहूं लागलीं. पद्मा लागलीच त्यांना म्हणतेः "माझ्याकडे पाहूं नका. वसंतराव, करीन, करीन म्हणालास तें आतां कर."

वसंतरावः—पण पद्माताई......

पद्माः—पण नाहीं, कांहीं नाहीं. म्हटल्याप्रमाणें कर. माझ्या अंगांत त्राण नाहीं, नाहीं तर मीच तें केलं असतं. पण तूं करतों म्हणाला आहेस.

वसंतरावः—पण ताई, तूं हें काय सांगते आहेस ? तें बुड्ल.........

पद्माः—वसंतराव, आतां उगीच वेळ घालवूं नको. माझी वेळ भरत आली. आण दिवा जवळ आणखी जाळ तें......

वसंतरावाला असें वाटलें कीं, आपली इच्छा आपल्या ताब्यांत नाहीं. ती सांगते आहे तें केलेंच पाहिजे. इच्छा तिची, मन तिचें आणि त्या इच्छेप्रमाणें करणारे हात पाय आपले. तो चटकन् उठला. त्यानें दिवा तिच्याजवळ आणला व तिला म्हटलें: "ताई, तूं हें काय करायला सांगते आहेस ? तूं आपल्या मुलाचं..."

पद्मा एकदम त्याला म्हणतेः "अगदीं अगदीं बोलूं नको. तुझ्या हातून तुला जाळायचं नसलं, तर माझ्या हातांत दे, आणखी त्याच्या खालीं दिवा धर. पण मला तें जळालेलं पाहूं दे. ज्याच्यायोगानं एवढा सगळा कहर झाला, सत्यानाश झाला, तें अगदीं सुद्धां मला नको."

तें ऐकतांच वसंतरावाचा नाइलाज झाला. मालती तर तें सर्व ऐकून अगदीं तटस्थच झाली. तिला एक शब्दही बोलवेना. मथुराताई नुसती पहात होती. ती काय बोलणार ?

वसंतरावानें किंचित् वेळ विचार केला. नंतर पद्मेकडे पाहिलें. पद्मा त्याच्याकडे पहातच होती. दृष्टादृष्ट होतांच त्यानें ते कागद दिव्यावर धरले व त्यांचा भडका झाला. एका मिनिटांत त्या कागदांची पार राख झाली.

पद्मेनें मोठ्या संकटांतून सुटल्यासारखा सुस्कारा टाकला. नंतर पुनः वसंतरावाकडे पाहून मालतीला ह्मणतेः "माझी दागिन्यांची पेटी इकडे आण. मथुराताई, तुम्ही खालीं आईकडे जाऊन एकदां त्याला माझ्याजवळ घेऊन या."

अशा प्रकारें तिनें आपण होऊन आपल्या मुलाला आपल्याकडे आणण्याला केव्हांही सांगितलें नव्हतें. तेव्हां सगळ्यांनाच थोडें आश्चर्य वाटलें. मथुराताई जाऊं लागल्या तेव्हां पुनः पद्मा त्यांना ह्मणतेः "तुह्मी आईला मात्र इकडे येऊं देऊं नकाहो, फक्त त्याला घेऊन या."

मथुराताई गेल्या. पद्माताईनें सांगितलेली पेटी मालतीनें आणली व तिच्याजवळ ठेवली. पद्मेनें वसंतरावाला जवळ बोलावून सांगितलें: "या पेटींत एक कागद् आहे. त्या कागदावर लिहिल्याप्रमाणें माझ्या पश्चात् अक्षरशः करण्याचं मी तुझ्याकडे सोंपवतें. तो कागद् आतां काढ. तिकडे ने आणखी वाच. पण नको..."

असें ती बोलते आहे तों मथुराताई तिच्या मुलाला घेऊन तेथें आल्या. त्यांना पहातांच तिचें चित्त तिकडे गेलें. तिनें मथुराताईंना आपल्याजवळ बसावयाला सांगितलें. त्या बसतांच मालतीला हांक मारून ती तिला ह्मणालीः "मालुताई, तूं मला धरून थोडी टेंकून बसव ग. मला याला एकदां घेऊं दे."

आतां मालतीच्यानें 'नको' म्हणवेना. तिनें व वसंतरावानें मिळून तिला अर्धवट टेंकवून बसविलें. त्यामुळें तिला दम लागला

व ती कांहीं वेळ स्तब्ध बसली. इतक्यांत त्या मुलानें रडण्यास सुरुवात केली. त्याबरोबर पद्मा मथुरातांईस ह्मणाली: "त्याला माझ्याजवळ द्या."

मुलाला घेतां येण्याइतकी सुद्धां तिच्या अंगांत ताकद नव्हती. परंतु अशा वेळीं नाहीं कसें म्हणावें ? असें मनांत येऊन मथुरातांईनीं तिच्या हातांवर त्याला ठेविलें. तिनें आपल्या हातांवर त्याला घेऊन ती लागलींच मथुरातांईना ह्मणते: "मथुराताई, हा मी तुमच्या ओंट्यांत घालण्याकरितां जवळ घेतला. त्याला तुमच्या ओंट्यांत घालतें. याच्यापुढें त्याचं संगोपन तुह्मी करा. त्याला वाढवा. जशीं तुमचीं भावंडं तसाच हा एक. आणखी याच्याबरोबर ही पेटी मी तुह्मांला देतें. या पेटींत जें काय आहे, तें तुमचं. तें मीं तुह्मांला दिलं आहे. यांच्या साक्षीनं दिलं आहे. तसं लिहून आंत कागदसुद्धां टाकला आहे, घ्या. घ्या याला. आतां हा तुमचा."

याप्रमाणें बोलून ती त्याच्याकडे पहात त्याला उद्देशून म्हणते: "पोरा, जगला वांचलास तर तसा होऊं नको. वसंतराव, याला तुझ्या किंवा मालतीच्या स्वाधीन न करतां मथुरातांईच्या स्वाधीन कां करतें, तें माझं मला ठाऊक. मालती, तूं कबूल केल्याप्रमाणें माझ्या पेटींतलं तें पत्रांचं पुडकं न वाचतां जाळून टाक. वसंतराव, मथुरातांईच्या जवळ मीं याला दिला आहे, पण यांना तिकडून काय त्रास होईल आणखी काय नाहीं, याचा नेम नाहीं. मीं यांना बहीण ह्मटलं आहे, तूंही यांना आजन्म अंतर देऊं नको. पोरगा जगला तर त्याचं या संगोपन करतीलच. न जगला किंवा तिकडे न्यायचा हट्ट धरून यांच्यापासून नेला तरी यांना जें मीं दिलं आहे तें सारं दिलंच आहे. आचार्यांनीं आपल्या हयातींत, जें मला दिलं आहे, तें त्यांत आहे, त्यांत यांना सगळ्यांना सुखानं रहातां येईल. आपल्या पश्चात् आचार्यांनीं जें कुळानं मला दिलं होतं त्यांतला सुतळीचा तोडा सुद्धां मला नको. त्याचा स्पर्शसुद्धां मला नको. मथुराताई, घ्याहो याला, माझ्या हाताला कळा लागल्या."

मथुरातांईना आपले हात पुढें करवेनात. त्याजवळ बसून स्फुंदून स्फुंदून रडत होत्या. चाललेला प्रकार पाहून त्यांना आपले अश्रु आवरेनासे झाले. मालतीची अवस्था तशीच झाली. परंतु तिनें पुढें होऊन पद्मातांईपासून त्या मुलास घेण्याकरितां आपले हात पुढें केले, तेव्हां पद्माताई तिला म्हणाल्या: "घे, तूं घे. पण त्यांच्याजवळ दे. तो मीं त्यांना दिला आहे. आतां मला खालीं निजवा, पाठीला कळ लागली."

तिला वसंतरावानें व मथुरातांईनीं नीट निजविलें. तेव्हां मालतीकडे पहात पद्मा तिला म्हणते: "दे. दे त्यांच्याजवळ दे. आतां त्याला तूं आवडीनें घेत आहेस, पण तीं वाईट पत्रं वाचलींस तर त्याला हात सुद्धां लावणार नाहींस. त्याचं नशीब..."

परंतु पुढचे शब्द तिच्या तोंडांतल्या तोंडांतच राहिले. बाहेर उमटले नाहींत. फक्त "झालं. आतां माझं कांहीं राहिलं नाहीं. राम. राम. राम." असे कांहीं शब्द गुटमळत तिच्या तोंडांतून निघतां निघतां एकदम सारें शांत झालें.

# प्रकरण ६४ वें.

## पुढें.



पद्मातांईचा प्राण तिची कुडी सोडून गेला हें त्या तिघांस किंचित् वेळपर्यंत खरेंसुद्धां वाटलें नाहीं. इतका वेळ विलक्षण खणखणीतपणानें सर्व गोष्टींची निरवानिरव केल्याबरोबर इतक्या अकस्मात् सर्व कांहीं शांत होईल हें संभवनीच वाटण्याजोगें नव्हतें, परंतु वस्तुस्थिति तशी झाली. तिच्या मनांत जी निरवानिरव करावयाची म्हणून अत्यंत प्रबल इच्छा होती, त्या इच्छेच्या प्रबलतेनें किंचित् कालपर्यंत शारीरिक दौर्बल्यावर तिनें पूर्ण विजय मिळविला. त्यांतही वडिलांचें मृत्युपत्र वसंतरावाच्या हातीं आलें आहे हें कळतांच तिला विशेषच स्फुरण आलें, तिला आज कित्येक दिवस असें वाटत होतें, कीं तें मृत्युपत्र जर आपल्या हातीं आलें, तर आपण तें जाळून टाकूं. तें मृत्युपत्र जर नसतें, तर झाले हे आपल्या आयुष्याचे भंडवडे झाले नसते असें तिला वाटूं लागलें होतें. आपल्या बापानें आपल्या दोघां भावांस एक कपर्दिकही न देतां आपल्या नांवानें सगळें करून टाकलें होतें हा तिला फार मोठा अन्याय वाटत असे; आणि अशा अन्यायाचा पैसा आपण उपभोगावा हें तिच्या मनास कसेंसच वाटे. आपले भाऊ कोणीकडे तरी नाहींसे झाले त्यांची पूसतपास सुद्धां आपल्याला लागेना यामुळें तर तिला अधिकाधिकच खेद वाटूं लागला; आणि नवरा विलायतेहून आल्यानंतर त्यानें जो धिंगाणा सुरू केला, त्यानें तर तिला त्या मृत्युपत्राचा अगदीं वीट आला. त्यानें आपल्याला अतिशय त्रास दिला तर एखादे दिवशीं भयानें व त्रासानें आपण सही करून देऊं आणि आपण तशी सही करून दिली कीं मग काय थरावर गोष्टी जातील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं, असें तिचें तिलाच वाटूं लागलें. पुढें कसकशा गोष्टी होत गेल्या हें वाचकांस माहीत झालेंच आहे.

वसंतरावाच्या घरीं आल्यानंतर आपल्या चित्ताला कांहीं तरी समाधान वाटेल, आपल्या अडचणींतून निघण्याला आपल्याला वसंतराव कांहींतरी मार्ग काढून देईल असें तिला वाटलें; आणि त्याप्रमाणें वसंतरावानें तिला एकदोन वेळां मार्ग सुचविलेही. परंतु तिच्या दुखण्यानें एकसारखाच जोर चालविल्यामुळें त्या मार्गांचा नीट विचार करण्यासही तिला अवकाश मिळाला नाहीं. यदृच्छेनें एक एक गोष्ट होत चालली. त्यांत कोणाच्या इच्छेचें कांहींच चालेनासें झालें. पद्मातांईनें एखादे दिवशीं मध्येंच कांहींतरी

प्रश्न विचारावे, तसे तिनें प्रश्न विचारले, म्हणजे वसंतरावानें किंवा मालतीनें " पाहूं आतां. तुझी प्रकृति थोडी नीट होऊं दे. मग त्याचा नीट विचार करूं " असें म्हणून तिचें समाधान करावें. पुनः कांहीं दिवस तसेच जावे, असा कांहीं प्रसंग चाले. पद्मातांईच्या पैशाच्या व्यवस्थेच्या काळजीपेक्षां तिच्या प्रकृतीचीच काळजी वसंतरावास फार वाटे. फार म्हणजे इतकी कीं जर कोणत्या अमक्या शक्य उपायानें पद्मा खास बरी होईल असें छातीला हात लावून कोणीं सांगितलें असतें तर तो उपाय करून पाहण्यास त्यानें कधीं कमी केलें नसतें. एखाद्या नामांकित डॉक्टरानें जर असें सांगितलें असतें कीं, " या बाईचं एक फुप्फुस अगदीं निरुपयोगी झालं आहे, पण त्याच्या जागीं दुसरं फुप्फुस घालणं शक्य आहे. मात्र आपलं फुप्फुस काढून देण्याला कोणी धट्टाकट्टा माणूस तयार पाहिजे. तसं केल्यानं त्याच्या जीवाला दगा होईल, पण ती जगेल." तर वसंतराव एक क्षणाचा सुद्धां विचार न करतां आपलें फुप्फुस काढून देण्याला तयार झाला असता. डॉक्टर भगवंतरावाला त्यानें हजारों वेळां ह्मटलें असेल कीं, तुमच्या डॉक्टरी ज्ञानाचा अगदीं जो कांहीं उपयोग करणें शक्य असेल तो करून हिला वांचवा. आपण इतकी हिच्याबद्दल आतुरता दाखवितों यावरून लोक काय म्हणतील याचा विचार त्याच्या मनास फार क्वचित् शिवला असेल; आणि जेव्हां जेव्हां तो विचार त्याच्या मनांत आला, तेव्हां तेव्हां स्वतःपेक्षां पद्मातांईसाठींच त्याच्या मनाला भय वाटे. त्याच्या मनांतले विचार दोन. तिला या दुखण्यांतून बरी करावी कशी, व तिला तिच्या पशुतुल्य नवऱ्याच्या छळापासून सोडवावी कशी? हे दोन विचार त्याच्या मनांत अहर्निश वागत. त्यांपैकीं एक विचार त्यानें युक्तिप्रयुक्तीनें पार पाडला. तिला त्या नरपशूच्या तडाख्यांतून सोडवून आपल्या घरीं आणून ठेविलें. पण दुसरा विचार पार पाडणें त्याच्या किंवा कोणाच्याच हातीं नव्हतें; पद्मातांईची प्रकृति इतकी बिघडली, डॉक्टरांनीं अगदीं स्पष्टपणें " ही आतां जगत नाहीं " असें सांगितलें, तरी त्याला मात्र तसें वाटेना. त्याची आशा कमी होईना. कांहीं तरी नवे उपाय कोठें युरोपांत कोणीं काढले असतील, त्यांचा प्रयोग करून पहा, असें डॉक्टर भगवंतरावांस तो नेहमीं सुचवी. असें कांहीं त्याचें मन मोठें चमत्कारिक झालें होतें आणि दिवा जाते वेळीं जसा मोठा होतो, तशी पद्मातांईची स्थिति होऊन ती जेव्हां आपली निरवानिरव खणखणीतपणानें करूं लागली, तेव्हां तर त्या वेड्यास एक वेळ असें सुद्धां वाटलें, कीं हें तिच्या बरें होण्याचेंच लक्षण आहे! शेवटले शब्द गुटमळत गुटमळत तिच्या तोंडून निघतां निघतां जेव्हां अगदीं शांत झालें तेव्हां ती वारली असें त्याच्या मनांत न येतां ती थकल्यामुळें शांत पडली असेंच वाटलें.

परंतु हा भ्रम किती वेळ टिकणार? दोन तीन मृत्यु पाहिलेल्या मथुरातांईनें एकदम ओक्साबोक्शीं रडण्यास सुरुवात केली. वसंतरावानें व मालतीनें एकदम जवळ जाऊन पद्मातांईला हांका मारल्या. ती ओ देईना. तेव्हां दिवा जवळ नेऊन पाहिलें तों तोंडांतून रक्ताचा एक ओघळ आलेला मात्र दिसला. लागलींच भगवंतरावास बोलावून आणतांच त्यांनीं " या साध्वीच्या सर्व दुःखांचा शेवट झाला " असें सद्गदित कंठानें सांगून एक दीर्घ सुस्कारा टाकला, व हातरुमाल डोळ्यांपाशीं नेला. थोड्याच

वेळांत सर्व घरादारांत आक्रांत झाला. गंगाधरानें व डॉक्टर भगवंतरावांनीं वसंतरावास त्या खोलींतून त्यांच्या खोलींत नेलें.

आतां सकाळीं जर अण्णासाहेबांस हा झालेला प्रकार कळला, तर तो त्या बुइलासाठीं प्राण टाकण्यास येईल व बुइल मिळत नाहींसें पाहून प्रेत नेण्याच्या कामांत सुद्धां आडकाठी घालील कीं काय, असें गंगाधराच्या मनांत आलें, आणि त्यानें तें हळूच डॉक्टर भगवंतरावासही सुचविलें. डॉक्टर भगवंतरावांस तें बरोबर वाटलें आणि त्या दोघांनीं दादासाहेबांस सांगून प्रेताची उजाडण्यापूर्वीं व्यवस्था करून टाकण्याची तयारी केली. अण्णासाहेब काय केव्हां करील, याचा नेम नाहीं. तो अमक्यापर्यंत जाईल आणि अमक्यापर्यंत जावयाचा नाहीं, हें कोणालाच सांगणें शक्य नव्हतें. यामुळें शास्त्रदृष्ट्या नवऱ्याची जरूरी आहे वगैरे कांहीं एक मनांत न आणतां चार माणसें चटकन् जमवून व वसंतरावास काय चाललें आहे तें कळूंही न देतां त्या दोघांनीं अगदीं अखेरपर्यंत व्यवस्था करून टाकली. पद्मातार्डच्या आईनें जांवईबोवांना तरी बोलवा, असा आग्रह धरला. परंतु वसंतरावाच्या आईनें व दादासाहेबांनीं "तो आल्यास काय विटंबना करील आणि काय नाहीं याचा भरंवसा नाहीं." हें तिच्या मनांत भरवून देऊन तिला स्वस्थ बसविलें. तेव्हां सर्व व्यवस्था ठीक झाली. लवकरच प्रेत हलविलें गेलें.

कर्मधर्मसंयोग. तो दिवस नाटकाचा होता, आणि दिगंबरपंतांला मानाचें तिकीट फुकट मिळाल्याकारणानें ते नाटकाला जाऊन परत घरीं जातांना त्यांस वाटेंत हें स्मशानांत चाललेलें प्रेत भेटलें. त्यांच्या चौकस स्वभावामुळें त्यांनीं "कोण वारलें, काय झालें," याबद्दल चौकशी केली, आबासाहेबांच्या पद्मेचें हें प्रेत असें त्यांस कळलें; तेव्हां ते मोठ्यानें म्हणतात: "अरे मग तिचा नवरा नाहीं तो बरोबर? तो तर आतां थिएटरांत होता. त्याला न बोलावतां हें प्रेत चालवलंत कुठें? पुढें कोण आहे? सुधारकांना काय! कोणी कुणाचें मढकं धरावं." असे उद्गार काढून स्वारी जागच्या जागीं उभी राहिली. या मंडळींपैकीं कोणी त्याला जास्त उत्तर दिलें नाहीं.

दिगंबरपंतांस अर्थातच धर्मविरुद्ध कृत्य होतें आहे याबद्दल फार फार वाईट वाटून त्यांनीं असा विचार केला कीं, आपण अण्णासाहेबाला गांठून ही बातमी सांगून स्मशानांत पाठवावें. म्हणून ते लागलींच त्या महत्कार्याकरितां धांवत सुटले. त्यांच्याबरोबर आणखी कोणी होते, त्यांस त्यांनीं आपल्या तऱ्हेनें पद्मातार्डची सर्व हकीकत सांगितली. ती कशी असेल, काय असेल याची कल्पना वाचकांस स्वतःस करतां येईलच.

ते जे तडक निघाले ते अण्णासाहेबांच्या शोधासाठीं चालते झाले. अण्णासाहेब थिएटरांत होते, त्यांच्याजवळ कोण कोण मंडळी होती त्यांचें त्यांनीं स्मरण केलें. त्यांना मॅजिस्ट्रेटसाहेब तर आठवलेच. तेव्हां त्यांच्याकडे ते गेले. परंतु अण्णासाहेब तेथें नाहींत असें त्यांना कळलें. तेव्हां त्यांची निराशा झाली आणि विशेष निराशा झाली ती यामुळें कीं ते कोठें असतील त्याचा नीट पत्तासुद्धां मिळेना. परंतु मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं त्यांना एवढेंच सुचविलें कीं, ते कदाचित् थिएटरांतच नाटक मंडळींत असतील. त्या मंडळीची व त्यांची दाट ओळख आहे. तेवढें दिगंबरपंतास पुरे झालें. तो लागलींच त्या बाजूस धांवला. परंतु तेथें त्याची कांहींच दाद लागेना, तेव्हां दिगंबर-

पंतांस फारच वाईट वाटलें. अण्णासाहेब येथें नाहींत, ते केव्हांच निघून गेले असेंही कोणी सांगेना आणि येथें आहेत असेंही कोणी सांगेना. अशा स्थितींत त्यांनीं काय करावें हे सुचेना आणि " नाहीं, हा गृहस्थ सांपडत नाहीं. तर आपण आपल्या घरीं जाऊन स्वस्थ निजावें, " असेंही त्यांच्या मनास वाटेना. कारण त्यांच्या स्वभावास अधर्म खपेना. त्यांच्याबरोबर असणारे गृहस्थ त्रासून केव्हांच निघून गेले होते. शेवटीं ते त्या नाटक्यांपैकीं एका गृहस्थास म्हणाले: " अहो, अण्णासाहेब गेला तेव्हां त्याच्याबरोबर कोण होते एवढं तरी आम्हांला सांगाल ? "

त्या गृहस्थानें त्रासून त्यास म्हटलें: "अहो ठाऊक नाहीं तर सांगूं काय ? ठाऊक असतं तर सांगायला कांहीं हरकत होती का काय ? "

दिगंबरपंतांची फारच निराशा झाली. आतां काय करावें तें त्यांस कांहींच सुचेना आणि कांहीं तरी केल्याखेरीज चैन पडेना. तेव्हां ते अगदीं बुचकळ्यांत पडले. नंतर जेथें जेथें अण्णासाहेब सांपडण्याची शक्यता त्यांना वाटली, त्या त्या ठिकाणांचें ते स्मरण करूं लागले व तीं सारीं ठिकाणें एकदां शोधावयाचीं, त्याखेरीज कांहीं स्वस्थ बसावयाचें नाहीं असा त्यांनीं निश्चय केला. इतक्या निश्चयानेंच माणूस धडपड करूं लागल्यावर मग काय पाहिजे ? पांच चार ठिकाणें शोधतां शोधतां स्वारी एका ठिकाणीं सांपडली. परंतु सांपडून उपयोग नव्हता अशीच त्याची स्थिति होती. दिगंबरपंतांनीं आपल्याकडून त्याला जागृत करण्याचा बराच खटाटोप केला, त्याचा उपयोग कांहींच झाला नाहीं. त्यानें दिगंबरपंतांस व सगळ्या जगास वेड्यावांकड्या शिव्या मात्र दिल्या. परंतु एकदां जी गोष्ट हातीं धरली ती अर्धवट सोडण्याची संवय नसल्यामुळें दिगंबरपंतांनीं सर्व शिव्या सोसून पुनः त्याला " तुम्ही असे वेड्यासारखे काय करतां ? असं करून कसं चालेल, तुमचा सगळा नाश होईल " वगैरे पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु पद्मातार्इच्या नशिबानें तिच्या प्रेताचें दहन होतांना कांहीं विटंबना व्हावयाची नव्हती म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें ह्मणा, दिगंबरपंतांचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाले. शेवटीं दिगंबरपंतांस आपले सर्व प्रयत्न सोडून घरीं जाऊन स्वस्थपणें निजावें लागलें.

इकडे मंडळी स्मशानांतून परत आली आणि जागोजाग स्वस्थ पडली. प्रत्येकास अत्यंत दुःख झालें होतें आणि दगदगही झाली होती. वसंतराव स्मशानांत गेला नव्हता. पद्मातार्इ वारली असें समजल्यापासून अगदीं निचेष्टच झाला होता. कोणाशीं भाषण सुद्धां करावेंसें त्याला वाटेना आणि कोणी त्याच्याशीं बोललेंही नाहीं. त्याच्या मनांत नानाप्रकारचे विचार चालले असावे हें तर उघड आहे; परंतु त्या सर्व विचारांत एक विचार त्याच्या मनांत एकसारखा घोळत राहिला. पद्मातार्इनें आपला मुलगा आपल्या आईच्या स्वाधीन न करतां किंवा मालतीच्या ओंट्यांत न घालतां मथुरातार्इच्या ओंट्यांत काय ह्मणून घातला. मथुरातार्इवर थोड्या दिवसांत तिचें फार प्रेम जडलें होतें, ही गोष्ट खरी; परंतु आपला मुलगा आणि आपले दागदागिने त्यांना देण्याचा विचार तिच्या मनांत कां आला ? त्या मुलाच्या आजीच्यानें त्याचें पालन होणार नाहीं असें वाटून तिच्या स्वाधीन केला नसेल; परंतु मालतीला ती असें म्हणावयाची कीं तुझ्या

मुलाबरोबर तूं याचेंही संगोपन कर. यालाही वाढीव. तसें न करतां हें तिसरेंच तिच्या मनांत आलें कसें? त्याला कांहीं उत्तर सुचेना. विचार चालतां चालतां त्याला असेंही वाटलें कीं; आपल्याला किंवा मालतीला ठाऊक नसतां हिनें आपल्या मागें काय व्यवस्था करावयाची त्याचा कागद लिहिला केव्हां? ती केव्हां केव्हां "आतां मला स्वस्थपणें पडूं द्या. चार घटका इकडे कोणी येऊं नका." असें म्हणत असे व 'जा, जा' म्हणून मंडळीच्या पाठीस लागे हें त्याला आठवलें; परंतु तो एकांतांतला वेळ ती कांहीं लिहून ठेवण्याकडे उपयोजीत असेल ही कल्पना नव्हती. तें वुइल पुनः आपल्या हातीं आलें, तर तें आपण जाळून टाकूं असा तिचा कांहीं दिवसांपूर्वींच निश्चय झाला असेल, कीं आपल्याजवळ ते वुइल आलें आहे असें कळतांच तसा तिचा निश्चय झाला? वुइल जाळून टाकण्याचा तिचा निश्चय इतका कायम दिसला कीं, तो त्या क्षणींच केलेला निश्चय नसावा असें त्यास खास वाटलें. त्यानें एकदां दोनदां असें मनांत आणलें कीं, तिला त्यासंबंधानें अमुक एक प्रकारची व्यवस्था करण्याची सूचना करावी. परंतु तिच्या दुखण्यांत त्यासंबंधानें तिला कशाला त्रास द्यावा? पहातां येईल पुढें असें ह्मणून त्यानें तो आपला विचार अमलांत आणला नाहीं. तिनें व्यवस्था तरी काय लिहून ठेविली असावी याच्याहबिद्दल त्याच्या मनांत विचार आला. पहातां येईल. पेटी उघडून कागद पाहिला म्हणजे समजेल, असें म्हणून त्यानें आपलें समाधान केलें, परंतु मुलाची व्यवस्था तिच्या म्हणण्याप्रमाणें त्याला शक्य दिसेना. मुलगी वारल्यानंतर तिचा मुलगा आजी कोणाजवळ देऊं द्यावयाची नाहीं, हें अगदीं खास. तो मुलगा आपण वाढविणार. असा हट्ट ती धरून बसेल, आणि असा हट्ट तिनें धरला, तर तिच्या पुढें आपलें कोणाचें कांहीं चालणार नाहीं. अशा स्थितींत काय होईल त्याची कांहीं त्याला कल्पना होईना. आणि अशा विविध विचारांतच त्याला झोंप लागली.

झोंप चांगली दोन अडीच तास लागली असेल; परंतु कोणी आपल्यापासून जवळच मोठमोठ्यानें भांडताहेत असें त्यास वाटून तो स्वप्नांतून जागा झाल्याप्रमाणें जागा झाला.

पहातो, तों गंगाधर व अण्णासाहेब भांडत आहेत.

# प्रकरण ६५ वें.

## पद्मातांईच्या इच्छा.



अण्णासाहेबांस पहातांच वसंतरावाच्या मस्तकांत एकदम तिडिक उठली; आणि तो झट्कन उठून उभा राहिला. ह्या तिडकीसरसा जो विचार त्याच्या मनांत आला, तो जर त्यानें अमलांत आणला असता, तर त्यानें अण्णासाहेबांला गचांड्या मारूनच खालीं घालवून घराच्या बाहेर हांकून दिलें असतें. परंतु तो विचार एक क्षण—एकच क्षण त्याच्या डोक्यांत होता, दुसऱ्या क्षणीं त्यानें तो विचार, एखादा तरबेज घोडेस्वार भडकलेल्या घोड्यास सफाईनें आकलन करून धरतो त्याप्रमाणें एकदम आकळून धरिला आणि त्याला म्हणाला: "अण्णासाहेब, विनाकारण कां आरडाओरडा करतां? घरांत सगळीं दुःखी कष्टी आहेत. तुम्हांलाही दुःख झालें आहे. जरा शांतपणानं बोला......"

"हो; हो; मला सगळा वेदांत ठाऊक आहे. तें मृइल कुठें आहे तें आण; मग सांग वेदांताच्या गोष्टी. दुःखी कष्टी! केवढा दुःखीकष्टीपणा! ती वारली तर मला कळूं देखील दिलं नाहींत, तिला मुकाट्यानं चोरासारखी नेऊन जाळलीत! तुमच्या मनाला यत्किंचित् तरी कांहीं वाटलं का? मला तिला शेवटची पहायला-सुद्धां संधि दिली नाहींत. मीं तिची शेवटची सेवाचाकरी केली असती, माझ्या मांडीवर डोकं घेऊन बसलों असतों, निदान मी आपल्या हातानं तिला शेवटीं चमचाभर दूध तरी पाजलं असतं, पण तुझी कसले मांग! वसंतराव, तुला तर वाटत होतं, कीं ती तुझीच......"

"गप्प बस मूर्खा" वसंतराव संतापानें लाल होऊन त्याच्या अंगावर खेंकसून ओरडला. "आतां ती मेल्या-गेल्यावर तरी तिच्यासंबंधानं पाजीपणाची बोलणी बोलूं नकोस. आतां इथून मुकाट्यानं चालता हो. तें मृइल तिनं आपल्या हातानं जाळून टाकलं."

"काय? तें मृइल तिनं जाळून टाकलं! मृइल जाळून टाकलं? तूं खोटं बोलतो आहेस.—तें मृइल तुझ्याजवळ आहे, मी फसायचा नाहीं तुझ्या अशा थापांना. काढ, काढ तें मृइल. आतां तुमचा त्या मृइलाशीं कांहीं संबंध नाहीं. तें जर आतां तूं काढलं नाहींस तर मी पोलिसांत वर्दी देऊन आतांच्या आतां सर्च वॉरंट काढवीन. आणखी सगळ्या घराचा झाडा घेववीन, कधीं सोडणार नाहीं. तुम्हांला कांहीं अब्रू असली, तर मुकाट्यानं तें मृइल माझ्या स्वाधीन करा. आतां ती सगळी मालमत्ता माझी झाली!"

तें ऐकतांच गंगाधर मोठ्यानें हंसला, आणि म्हणतो: "नका. नका. त्या मालम र नका इतक्यांत हक्क सांगूं. त्या

मालमत्तेचे दोघे मालक याच घरांत आहेत. आपल्या हातीं आतां त्यांतला एक छदामसुद्धां लागायचा नाहीं ! ”

गंगाधराच्या हंसण्यानेंच चिडलेला अण्णासाहेब त्या त्याच्या भाषणानें फारच चिडला. इतका कीं, त्याला आपण काय करतों आहोंत याचें भान राहिलें नाहीं आणि तो एकदम त्यांच्या अंगावर धांवून जाऊन म्हणतो: “ You are liars. त्या पोरांना एक कवडी कवडीसुद्धां त्यांतली मिळायची नाहीं, आणखी ते कसे काय मागायला येताहेत तें तरी मी पाहीन. त्या वुइलांत सगळी मालमत्ता तिला—तिला दिली आहे आणखी तिचा वारस आतां मी आहें. ”

गंगाधर पुन्हां त्याच्याकडे पाहून विकटपणानें हंसला आणि त्याला म्हणतो: “वाहवा ! वाहवा ! पण आपण दोन गोष्टी राजश्री विसरतां. एक तर पद्मातार्ईनीं तें वुइल जाळलं, आणखी दुसरं असं कीं, जरी यदाकदाचित् तें त्यांनीं ठेवलं असतं तरी त्यांनीं त्याला वारसही ठेवला आहे, त्याची आपण अगदींच पूसतपास केली नाहीं ती. ”

“ वारस ? कोणाचा वारस ? तें कारटं ? ” अण्णासाहेबानें असा प्रश्न विचारला. तो विचारतांना त्यानें वसंतरावाकडे अतिशय क्रूर व भेसुर मुद्रा करून पाहिलें आणि पुनः वेडेवांकडें तोंड करून म्हटलें: “त्याची, त्या कारट्याची पूसतपास?” इतकेंच बोलून त्याच्या काय मनांत आलें, त्यानें जीभ चावली आणि म्हटलें: “ त्याचा गार्डिअन तरी मीच आहें, तुम्हांला आतां मी सामोपचारानं सांगतों कीं, तुम्ही मुकाट्यानं तें वुइल माझ्या स्वाधीन करून या आणखी तिचे दागदागिने, वस्त्रपात्र काय असेल तें माझ्या स्वाधीन करा. पुनः मला इथें यायला नको, आणखी तुमच्याशीं संपर्क नको. ”

गंगाधरास त्याच्या बोलण्याचें व आविर्भावाचें हंसूंच येत होतें. तो त्याला त्यावर म्हणाला: “ आतां ते मांडे मनांतल्या मनांतच खा. वुइल जाळून टाकल्यामुळें आबासाहेबांची इस्टेट त्यांच्या मुलांची झाली. आणखी पद्मातार्ईनीं आपलं स्त्रीधन, दागदागिने वगैरे सारं दुसऱ्याला देऊन टाकलं आहे. आमच्या देखत त्यांनीं दिलं. त्यांनीं लेखी वुइलच केलं आहे, परंतु नसलं केलं, तरी तोंडी केल्याला साक्षीदार पुष्कळ आहेत. आतां आपण आल्या वाटेनं चालते व्हा. ”

तें ऐकत असतांना अण्णासाहेबांच्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला. त्या संतापानें त्याला क्षणभर बोलवलें नाहीं, परंतु तो लागलींच दांत ओंठ खाऊन वसंतरावाकडे हात करून म्हणतो: “आपले दागदागिने तिनं कुणाला दिले म्हणतोस ? याला याला तिनं आपल्या या जा. ...”

परंतु पुढचे काय शब्द असतील ते त्याच्या तोंडावर एकदम फारच जोराची चापट बसल्या कारणानें जेथल्या तेथेंच जिरले. गंगाधरानें वसंतरावास दूर केलें व आपण पुढें होऊन त्याचें मानगूट धरून त्याला हिसडलें आणि म्हटलें: “ तुला काय करायचं बोलायचं असेल, तें या घरांतून बाहेर जाऊन कर जा; इथें आतां एक शब्द जर तोंडांतून काढशील, तर थोबाड फोडून—अगदीं खरोखर बत्तीशी पाडून—गाल हाडं मोडून टाकीन. मग माझं काय व्हायचं असेल तें होईल. चल, चल, इथून चालता हो. चालता हो इथून दुसरी गोष्ट नाहीं. ”

त्यानें उच्चारिलेले ते शब्द अण्णा-

साहेबानें ऐकले, त्याची ती क्रूर व निश्चयी मुद्रा पाहिली, आणि शौर्यावीर्यापेक्षां विचारच बरा असें मनाला पटवून स्वारी कांहींएक न बोलतां तेथून चालती झाली.

तो तेथून गेल्यानंतर सुमारें अर्धातास वसंतराव व गंगाधर एकमेकांशीं बोलले नाहींत. वसंतराव एका कोंचावर विचार करीत पडला होता आणि अण्णासाहेब दाराच्या बाहेर गेला असें पाहून मग गंगाधरही दुसऱ्या कोंचावर येऊन पडला होता. परंतु वसंतरावास असाच पडूं देणें कांहीं बरें नाहीं असें मनांत येऊन गंगाधर त्यास सुमारें अर्ध्यातासानें म्हणतो " आतां असं स्वस्थ बसून काय करणार ? हा पाजी तुला स्वस्थ बसूं देणार नाहीं. तो पोलिसांत वर्दी वगैरे देऊन सर्च वॉरंट आणून झाडा घेण्याची खटपट केल्याशिवाय कधीं रहायचा नाहीं. आणखी त्याला पाजीपणाचा सल्ला देणारीं माणसंही पुष्कळ मिळतील. तेव्हां आपण तयारीनं असलं पाहिजे, पहिली गोष्ट अशी कीं, पद्मातार्इनीं आपल्या पेटींत काय कागद लिहून ठेविला आहे तो काढून वाचून त्याच्याप्रमाणें व्यवस्था करून टाकली पाहिजे. असं स्वस्थ बसून कसं चालेल ? "

वसंतरावानें गंगाधराचें तें बोलणें ऐकलें व त्याला तें पटलेंही. हा दुष्ट माणूस आतां त्या वुइलासाठीं आकाशपाताळ एक करील, कधीं चुकावयाचा नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या बायकोच्या दागदागिन्यांसाठींही अकांडतांडव करील. कारण बायकोला बापानें दागिने व सरकारी नोटी वगैरे मिळून कांहीं नाहीं तरी पांच पंचवीस हजारांची इस्टेट दिली आहे असें त्याला ठाऊक होतेंच. परंतु त्या वुइलानें सर्वच इस्टेट तिला दिली असल्यामुळें ती ताब्यांत घेण्याच्या आशेनें त्याचें चित्त तिकडे गेलें नव्हतें. आतां वुइल जाळलें गेलें असें पक्केपणें त्याला कळलें म्हणजे बायकोच्या स्वतःच्या इस्टेटीपलीकडे काय राहिलें ? तेव्हां ती तरी आपल्या ताब्यांत घ्यावी असें मनांत येऊन तो खटपट करणारच. म्हणून पद्मातार्इनें काय लिहून ठेवलें आहे काय नाहीं तें लागलींच पहाणें जरूर आहे आणि कोणाचा तरी चांगल्याचा सल्ला घेऊन त्याप्रमाणें पुढें व्यवस्था केली पाहिजे असा त्यानें विचार केला. ह्या हेतूनें त्यानें मालतीकडे जाऊन तिला सांगितलें कीं, मथुरातार्इपासून तेवढी पेटी मागून घेऊन त्यांत काय कागद पद्मातार्इनें लिहून ठेविला आहे तो काढून तावडतोब पाहिला पाहिजे. मालतीनें प्रथम एवढी काय गर्दी आहे ? असें म्हणून लांबणीवर टाकण्याचें सुचविलें. परंतु अण्णासाहेब आला होता वगैरे कळतांच तिनें मथुरातार्इना बोलावून आणून ती पेटी उघडवून आंतील कागद तावडतोब काढविला. हा कागद बराच विस्तृत लिहिलेला होता. इतका मजकूर लिहिण्यास पद्मातार्इला संधि केव्हां सांपडली याचेंच सगळ्यांना आश्चर्य वाटलें. मजकूर असा होता:—

मी आतां फार दिवस जगत नाहीं. आणि जगावें अशी मला इच्छाही मुळींच नाहीं. तीर्थ० आबासाहेबांनीं आपल्या शेवटल्या वुइल–पत्रानें मला सर्व स्थावरजंगम इस्टेट दिली आहे. त्यांनीं माझ्या दोघा भावांची त्यांत कांहीं सोय केलेली नाहीं, हा त्यांनीं फार मोठा अन्याय केला आहे. शिवाय तें वुइल दृष्टीस पडल्या दिवसापासून तिकडलें जें वर्तन चाललें आहे, त्यामुळेंही मला त्या इस्टेटीचा पुरा तिटकारा आला आहे. तें वुइल–पत्र पुनः माझ्या हातीं आलें, तर मी तें जाळून

टाकीन ह्मणजे मला त्याचा मोह राहणार नाहीं. दागदागिने व सरकारी प्रॉमिसरी नोटी मिळून पंचवीस हजारांच्या वर इस्टेट मला आबांनीं आपल्या हयातींत दिली आहे. ती मी आहें तोंपर्यंत मला पुष्कळ झाली. मी मेलें-मरणारच, महिन्या पंधरा दिवसांत मरणार.– तेव्हां माझ्या पाठीमागें ती इस्टेट खिडूकमिडूकसुद्धां माझी मैत्रीण मथुराताई हिला द्यावी. तिचें आपल्या भावंडांवरलें प्रेम पाहून आणि त्यांच्याकरितां ती आपली उपासमार करून दिवस कंठीत असतांही कोणाजवळ दीनवाणी न काढतां अगदीं समाधानानें राहण्याची तिची वृत्ति पाहून, मला तिच्याबद्दल अतिशय प्रेम वाटतें. माझी सेवा ती मनःपूर्वक करते! आणि त्याबद्दल कांहीं देण्याचें तुमतें सुचविलें तरी तिला किती संकोच होतो; परंतु माझ्या इस्टेटीचा खरा सदुपयोग जर होईल, तर तिला ती सर्व दिल्यानेंच होईल, माझे दिवस पुरते भरून मी जर बाळंत झालें, आणि मी मरतें असें वाटून मी शुद्धीवर असलें तर माझें मूल मी तिच्याच ओंट्यांत घालून तिला 'याला तुह्मी संभाळा' असें म्हणेन. तें मूल जगलें वांचलें तर तिच्या शिक्षेंतच तें शहाणें होईल आणि तिच्या ओंट्यांत तें घातलें तर ती मोठ्या प्रेमानें व प्रामाणिकपणानें त्याला वाढवील याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. त्या पोराच्या नांवानें मी कांहीं ठेवीत नाहीं. कारण एक तर तें जन्मण्यापूर्वींचे मी मरेन असें मला पक्कें वाटतें आहे, आणि यदाकदाचित् तें जन्मल्यावर मेलें, तर तें माझ्या इस्टेटीचें मालक होईल. तसें झालें कीं, मला जो त्रास झाला तो त्या पोराला होणार. तें आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं वाटतील ते उपाय होतील आणि तसें तें ताब्यांत गेलें म्हणजे काय होणार? सगळ्या इस्टेटीचें पुरें वाटोळें होऊन पोराची पुरी दुर्दशा! दुसरें काय? पण पोर आपल्या ताब्यांत घेतलें तरी इस्टेट मिळत नाहीं हें पक्कें दिसलें कीं कोणी त्याला आपल्या ताब्यांत घेण्याची मुळींच इच्छा करणार नाहीं. मी सहज बोलतां बोलतां—कां विचारतें हें त्याला मुळींच न कळूं देतां–वसंतरावाला युक्ति विचारली. आणखी त्यानें ती सहज सुचविली तीप्रमाणें व्यवस्था करतें आहें. तिकडचा माझा संबंध जन्माचा. तेव्हां तिकडे खाण्याची केव्हांही भ्रांति पडण्याची स्थिति येऊं नये म्हणून सर्व इस्टेटीची रोकड करून व्याजीं लावल्यावर त्यांतून रुपये पंचवीसप्रमाणें दरमहा जेथें असतील तेथें पाठवून द्यावे. पाठवून घेतले नाहींत तर पुनः आपण होऊन मागेपर्यंत पाठवूं नयेत. होतां होई तों मूल तिकडच्या स्वाधीन करूं नये. कायद्यामुळें करावेंच लागलें, तर त्या मुलाचें नशीब. पण मुलाबरोबर पैसा नाहीं, तेव्हां तें आपल्या ताब्यांत घेण्याचा आग्रह होणार नाहीं. माझी आई वृद्ध झाली आहे. तिला मुलाची बाळग उरकावयाची नाहीं आणि त्यांतून तिकडे त्रास देण्याचें मनांत आलें, तर काय परिणाम होईल याचा नेम नाहीं. माझी प्रिय मैत्रीण मालती इच्यामागें माझ्या मुलाचें लचांड लावणें मला बरें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर कांहीं कारणानें मला तशी व्यवस्था करण्याची मुळींच इच्छा नाहीं. तें कारण माझ्या हातून येथें लिहवत नाहीं आणि तें कोणास कळावें अशी माझी इच्छा नाहीं. मला आपल्या घरीं आणून माझ्या खस्ता ज्यांनीं साहल्या त्यांना माझ्या जिवंतपणीं त्रास व्हायचा तो झालाच. परंतु माझ्या पश्चातूही तो तसाच होत रहावा

अशी माझी इच्छा नाहीं. माझ्या दुर्दैवाचा असा कांहीं प्रभाव आहे कीं, माझ्याशीं ज्यांचा ज्यांचा संबंध येईल त्यांना त्रासाखेरीज व निंदेखेरीज कशाचाच लाभ होऊं नये. माझ्या मरणानंतर जितक्या लवकर होईल तितक्या लवकर वसंतरावानें ही सर्व व्यवस्था करून टाकावी अशी माझी त्याला शेवटची विनंति आहे. त्याच्यावर हा भार टाकणें माझ्या फार फार जिवावर येत आहे; परंतु ही व्यवस्था करण्याला त्याच्याखेरीज मला कोणी दिसत नाहीं. तो जसा मालतीचा तसाच माझा भाऊ आहे. माझ्या जन्माची अशी दुर्दशा झालेली पाहून त्याला अत्यंत दुःख होतें आहे हें पावलोपावलीं मला दिसतें आहे. त्याच्याइतकें निष्काम, निष्कपट, निर्मळ प्रेम करणारा भाऊ कोण्या स्त्रीला कधीं मिळाला असेल असें मला वाटत नाहीं. तेव्हां जिवंतपणीं माझी जशी काळजी त्यानें वाहिली तशीच माझ्या पश्चात् तो वाहील. आतां आणखी कांहीं ल्याहावयाचें नाहीं आणि मला आज कांहीं लिहवतही नाहीं. म्हणून येथेंच सही करून ठेवतें. जसजसें सुचलें तसतसें पांचचार वेळां मिळून हें लिहिलें आहे तसेंच आणखी कांहीं सुचेल तें लिहीन. पण आतां तशी संधि मिळेल असें वाटत नाहीं. माझी प्रकृति दिवसानुदिवस अधिक अधिकच बिघडून आतां तर मला उठून बसण्याचीसुद्धां ताकद नाहींशी झाली आहे. आतां जितक्या लवकर सुटका होईल तितकें मला आणि सगळ्यांनाच बरें.

याच्याखालींच पूर्ण सही होती. वसंतरावानें तें वाचलें; परंतु वाचतांना त्याच्या मनाची स्थिति काय झाली, त्याच्य डोळ्यांत अश्रू उभे राहून त्याला दिसेनासें कसें झालें वगैरे वर्णन करून सांगणें फार कठिण आहे. वाचन संपतांच त्याच्या हातून तो कागद गळाला. तोंडांतून एक दीर्घ उसासा निघाला आणि डोळ्यांतून अश्रूंचे बिंदू घळघळ्या बाहेर पडले. मालती आपल्या अश्रुपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे एकसारखी पहात राहिली. तिलाही कांहीं बोलवेना. तो कागद वाचून होतांच दोघांनींही दीर्घ उसासे टाकले. पद्मताईनें हा एवढा थोरला मजकूर लिहिला केव्हां आणि तो पांचचार वेळां मिळून लिहिला असला तर आपल्याला कोणालाच कसा समजला नाहीं ! हा विचार त्यांच्या मनात एकदम आला. मग त्यांना असें आठवलें कीं, केव्हां केव्हां ती सगळ्यांनाच आतां तुम्ही बाहेर जा मला एकटीला, बसूं द्या असें म्हणे व आग्रहानें बाहेर लावी. त्याचप्रमाणें वसंतरावास हेंही आठवलें कीं, तिनें आपल्याला एकदां मुलाची मालकी कोणाकडे असते ? बायकोनं आपली माहेरची इस्टेट दुसऱ्या कोणाला देऊन टाकली तर तिच्यावर दुसऱ्या कोणाचा हक्क चालतो का वगैरे प्रश्न विचारले होते. त्या प्रश्नाचें त्या वेळीं त्यास कांहींच महत्व वाटलें नाहीं, परंतु आतां तें विचारण्याचें कारण काय तें समजून आलें. आपल्या नवऱ्याला अगदींच कांही मिळूं नये हें बरें नव्हे असें वाटून तिनें पंचवीस रुपये दरमहा त्याला यावे असें लिहिलें याचें तर त्याला फारच आश्चर्य वाटलें. असो.

वर सांगितल्याप्रमाणें बराच वेळ तटस्थपणें बसल्यानंतर वसंतराव मालतीस म्हणतो: “ मालुताई, पद्मताईला इथें आणलं त्या वेळीं जशी युक्ति केली तशी युक्ति आतां पुनः करण्याची पाळी आली आहे. मात्र आतां त्यांत मथुराताईचं साहाय्य पाहिजे आहे, अण्णासाहेब गेला आहे तो उगीच बसायचा नाहीं. तो वॉरंटबिरंट

काढवण्याच्या धमक्या घालून गेला आहे, परंतु तितक्या पंथावर त्याला कोणी जाऊं देणार नाहीं. तो फार तर वकिलाकडून नोटीस देईल किंवा फिर्याद लावील. त्याच्या आंत या पोराला इथून लावून दिलं पाहिजे. तेव्हां तूं आपल्या नवऱ्याकडे जा आणखी या पोराला घेऊन मथुरातांईनाही तुझ्याबरोबर जाऊंदे. तुला राह्यचं तितके दिवस राह्यला नाहीं सांपडत पण पद्मातांईच्या मलासाठीं एवढं करच. मथुरातांईचा मनोहर इथें राहील. बची आणखी दुसऱ्या दोघांना त्यांनीं आपल्याबरोबर न्यावं. उद्यां शक्य असेल, तर उद्यां जावं असं माझं मत आहे. अगदीं उशीर करतां कामा नये. मुलास इथून नेलं आणखी तो तुझ्या नवऱ्याच्या तिथें असला तर तिकडे कांहीं तो त्रास द्यायला येणार नाहीं. इथें आमच्याशीं काय भांडेल तंडेल तें पाहूं. त्याची नाहीं मला पर्वा. तेव्हां तूं जाण्याची हुटहुट लावून आतां मथुरातांईला आणखी त्या पोराला घेऊन जा."

मालतीला त्याचें बोलणें पहिल्यानें कसेंसेंच वाटलें. पण शेवटीं ती त्याप्रमाणें करण्यास तेव्हांच तयार झाली. पद्मातांई वारली त्यामुळें आपल्याला अगदीं करमेनासें होणार हें तिला उघड दिसत होतें. तेव्हां लवकर निघून जाणें तिला एका दृष्टीनें इष्टच वाटलें, आणि त्याप्रमाणें करण्याचा दोघां बहीणभावंडांचा विचार तर झालाच. मालती लागलींच मथुरातांई या गोष्टीला कबूल होतात कीं नाहीं हें पहाण्यासाठीं निघून गेली व वसंतराव त्या पेटींतील कागदपत्रांची आणि डागदागिन्यांची यादी करावयास बसला.

# प्रकरण ६६ वें.

## शेवटीं.



**प**द्मातांईनें याप्रमाणें लिहून ठेविलेला कागद वाचून व तिच्या इस्टेटीची वगैरे यादी करून झाल्यानंतर अर्थातच आतां ह्या कागदाप्रमाणें सर्व गोष्टी पार पाडण्याची तजवीज काय करावयाची हा प्रश्न वसंतरावापुढें आला. आणि त्याचें जें काय उत्तर त्याला सुचलें तेंच त्यानें विचारांत घेऊन आपल्या बहिणीस असें सांगितलें कीं, आतां क्षणाचाही विलंब न करतां तूं येथून या पोराला व मथुरातांईला घेऊन आपल्या नवऱ्याच्या गांवीं चालती हो. केव्हां जाणार वगैरे गोष्टींची गंधवार्तासुद्धां अगदीं कोणाला लागतां कामा नये. तूं याप्रमाणें येथून निघून गेल्यानंतर मग आम्ही आणखी तो काय करावयाचें तें पाहून घेतों.

मालतीसही आतां जास्त दिवस येथें रहाण्याची आतुरता नव्हती, हें वर सांगितलेंच आहे. ज्या मैत्रिणीसाठीं आपण येथें आलों, तिला वाटेला लाविल्यानंतर आतां आपण येथें रहाण्यानें आपल्यास चैन पडावयाचेंच नाहीं तेव्हां येथून चालतें होणें हेंच बरें असें तिच्याही मनानें घेतलें. दादासाहेबांनीं व तिच्या आईनेंही, मोठ्या कष्टानें, तिला जाण्याची अनुमति दिली. लांबचा प्रवास तेव्हां कोणीतरी चांगलें माणूस बरोबर पाहिजे ह्मणून वसंतरावाच्या विनंतीवरून गंगाधरानें त्यांच्याबरोबर जाण्याचें कबूल केलें.

सगळ्यांत फार कष्टानें गोष्ट घडली ती मथुराताईनीं मनोहरास सोडून जाण्याचें कबूल केलें ही होय. परंतु वसंतरावानें असें सांगितलें कीं, मनोहर तुमचा भाऊ नव्हे माझा भाऊ आहे; तो एखादी स्कॉलर्शिप मिळवून एखाद्या कॉलेजांत गेला तर तुम्ही काय कराल ? त्याचा तुमचा अगदीं वियोग होणारच नाहीं असें थोडेंच आहे ! वगैरे गोष्टी बोलून त्यानें त्यांची समजूत घातली. परंतु ज्या गोष्टीबद्दल त्यांची समजूत घालण्याचें सगळ्यांत फार कठिण गेलें, ती गोष्ट म्हणजे पद्माताईनें तिला दिलेल्या द्रव्याचा स्वीकार करणें होय. मथुराताईनीं साफ सांगितलें कीं, आपण एवढी थोरली देणगी स्वीकारण्यासारखी पद्माताईची कांहींही सेवा केली नाहीं आणि त्यांनीं अशी देणगी देण्याइतका माझा त्यांचा जुना स्नेहही नव्हता. तेव्हां ती देणगी सर्व त्या मुलाच्याच नांवानें ठेवण्याबद्दल त्यांनीं आग्रह धरिला. मालती व वसंतराव या दोघांनीं तिची पुष्कळ समजूत घालून असें सांगितलें कीं, त्या मुलाच्या नांवानें ती सारी ठेव ठेविल्यास त्या मुलाला त्याचा बाप तातडतोब आपल्या ताब्यांत घेण्याविषयीं आग्रह धरील, आणि कायदेशीर इलाज करील, एवढ्याचकरितां पद्माताईनें ही युक्ति केली आहे. अण्णासाहेबांस द्रव्यलोभ, दुसऱ्या कशाचा लोभ नाहीं. तें द्रव्य आपल्यास मिळत नाहीं असें पाहतांच तो तें मूल आपल्या ताब्यांत मागण्याच्या भानगडींतच पडावयाचा नाहीं. हें सर्व त्यांनीं मथुराताईस समजावून सांगून कसेंतरी वर्ष सहा महिने तुह्मी बाहेर काढा अशी अगदीं काकुळतीनें विनंति करतांच त्यांनीं आपला आग्रह सोडून त्या सर्वांच्या ह्मणण्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें. त्यांत त्यांच्या मनोहरानें मोठें धैर्य धरून आपल्या ताईस जाण्याविषयीं सांगितलें.

मुलाच्या आजीचीही समजूत घालण्याला बरेच श्रम पडले. ती ह्मणे माझी पद्मा गेली तर गेली, पण तिचा मुलगाही महिन्याचा झाला नाहीं तों तुम्ही माझ्यापासून दूर परदेशांत कोणाबरोबर तरी पाठवितां याचा अर्थ काय ? परंतु त्या मुलास तसें पाठविलें नाहीं तर जांवईबोवा कायदेशीर हक्क सांगून पोराला कोठें नेईल आणि काय करील याचा नेम नाहीं, हें त्या म्हातारीच्या मनांत भरावितांच तिनें आपले सगळे आढेवेढे अगदीं बाजूला ठेविले. जांवईबोवा पैशाच्या लोभानें काय करील आणि काय नाहीं, तो एक ब्रह्मराक्षसच आपल्या पाठीस हात धुवून लागला आहे, असें तिला वाटतच होतें. आपला जांवई व त्यांचा भाऊ या दोघांनींच आपल्या दोघां मुलांची सगळी दुर्दशा केली हेंही तिच्या मनांत वसंतरावानें भरवून दिलें होतें, यामुळें त्याचा धाक तिला एकदम बसला.

अशी सर्व जुळवाजुळव होऊन मालतीच जाण्याचा दिवस मुक्रर ठरला. इतकें सर्व झालें, परंतु त्यांस अण्णासाहेब येऊन कोण्या वेळीं काय करील याचा नेम वाटत नव्हताच. जें काय करील त्याला आपण आतां मोठ्या धीटपणानें तोंड द्यावयाचें असा वसंतरावानें निश्चय केला होता. दर घटकेस तो कांहींतरी घोंटाळा घालण्यास येणार असें त्याला भय वाटत होतें, परंतु एक दिवस झाला, दोन झाले, तीन झाले, अण्णासाहेबाचा मागमूसही लागेना, तें पाहून त्या सगळ्यांना फार आश्चर्य वाटलें कीं, हा गृहस्थ अगदीं स्वस्थ बसला कसा ? बायको मेली तेव्हां पश्चात्ताप होऊन त्यानें आतां या मंडळीच्या वाटेस जावयाचें नाहीं असा निश्चय केला असेल, अशी कल्पनासुद्धां कोणाच्या मनांत आली नाहीं. दर मिनिटास त्यांना असें वाटत होतें कीं, तो कांहीं तरी मोठा बेत करून आपल्यावर हल्ला करणार. शेवटीं मालती व मथुराताई यांनीं जाण्याचा दिवस जो ठरविला होता ता येऊन ठेपला. सर्व तयारी झाली. मथुराताई व मनोहर यांचा परस्परांचा निरोप घेण्याचा अत्यंत करुण प्रसंग होऊन मंडळी निघणार, अशा वेळीं दिगंबरपंत त्यांच्या घरीं आले व मथुराताईस आपल्यास भेटावयाचें आहे असें म्हणाले. मथुराताईही त्यांस भेटल्या. तेव्हां दिगंबरपंत तिला म्हणतातः " इतके तूं कष्ट केलेस त्यासारखं तुला देवानं बक्षीस दिलं, आतां त्या दागिन्यांची व्यवस्था लावून रक्कम उभा रायची असली, आणखी ती कुठें एखाद्या शहाजोग ठिकाणीं व्याजीं लावायची असली तर मी संगलं करायला तयार आहे. माझ्या पोक्त सल्ल्यावांचून कांहीं करूं नकोस. वसंतराव वगैरे मंडळी हुषार खरी, पण त्यांची विद्या पुस्तकी. त्यांना त्यांतलं खरं वर्म समजणं शक्य नाहीं. त्यांचं ज्ञान व्यवहाराला अगदीं कुचकामाचं. माझं ऐकशील तर जे काय दागदागिने असतील ते माझ्याजवळ दे; मी ते कसोशीनं काढून टाकून जास्तींत जास्त किंमत येईल तितकी आणून आमच्या स्नेह्यांच्या पेढीवर रक्कम ठेवून देईन. ते दरसाल दर शेंकडा सहा रुपये व्याज तुला देतील. इतकं व्याज कोणत्याही दुसऱ्या पेढीवर तुला मिळायचं नाहीं. मी तुझ्या बापाचा जुना स्नेही म्हणून असा थोडा बुद्धिवाद तुला सांगायला आलों आहें. काय काय जिन्नस आहेत, आणखी दुसरं एकंदर काय आहे तें मला सांग तर खरं. मीं ऐकलें आहे कीं, बरंच चांगलं पन्नास साठ हजारांचं बारदान तुला पद्माताईनं दिलं आहे. फार फार चांगलं झालं. मला तें ऐकून मोठा संतोष झाला. वाटलं कीं पोरगी अगदीं चांगल्या जुन्या तऱ्हेनें राहून तिनं आपलं नशीब चांगलं काढलं. तिनं तुला एकदां घरीं बोलावलं आहे. चल येत असलीस तर आज तिकडेच जेव खा. "

मथुराताईनें त्याला सांगितलें कीं, आपण आतां गांवाला जाण्याच्या तयारींत आहों.

तें ऐकतांच तो अगदीं चकित झाला. आणि म्हणालाः " तूं गांवाला जाणार, पण त्या दागदागिन्यांची व्यवस्था काय ! ते माझ्याजवळ देत असलीस तर मी त्यांची व्यवस्था करतों. वऱ्हाड-खानदेशांत आमच्या जमिनीच्या शेजारींच शेंदोनशें बिघे जमीन घेतों. तूं या लोकांच्या नादीं लागूं नकोस."

त्यावर मथुराताई त्याला कांहींच बोलली नाहीं. आणि तितक्यांत वसंतरावही निघण्याविषयीं गर्दी करण्याला

आला. तेव्हां दिगंबरपंत निर्लज्जपणानें वसंतरावास म्हणतो: " अहो, तुह्मी विद्वान् ग्रॅज्युएट एम. ए. एल एल. बी. खरे, पण व्यवहारज्ञानाच्या बाबतींत आमचा तुम्हांला उपयोग होईल. आणखी या पोरीचं आणखी त्या पोराचं खरं खरं हित पाहणारा कोणी असेल, तर यांच्या बापाचा मी स्नेही. यांच्या संकटकाळीं मीं यांना मदत केली, तेव्हां तुह्मी मला या कामांत घ्या. मी तुम्हांला..."

वसंतरावास ही व्यक्ति चांगली माहीत होती तेव्हां तो त्यांना म्हणतो: "हो. हो. मला आपली चांगली माहिती आहे. तेव्हां मी आपली सल्ला जरूर घेईन. पण सध्यां आतां यांची जाण्याची गर्दी आहे. ही मंडळी गेली म्हणजे मी आपल्याकडे मुद्दाम येईन. काय करायचं तें आपल्या सल्ल्यानंच करूं; पण आतां तुह्मी चला. आपण यांना किती मदत आजपर्यंत केली तें त्याही विसणार नाहींत आणि आम्हीही विसरणार नाहीं."

वसंतरावाच्या भाषणाचा उपरोधिकपणा त्या निगर्गट्टाच्या ध्यानांत आला नाहीं असें नाहीं, तो ध्यानांत येऊन त्यास रागही आला. परंतु ती वेळ राग दाखविण्याची नव्हती. यामुळें दिगंबरपंतांनीं गम खाल्ली. शिकार आपल्या हातची जाते हें त्याला पक्कें कळलें, तेव्हां ती कोठें जाते काय जाते याची चवकशी करून घ्यावी आणि जावें. मग पहातां येईल असें मनांत येऊन त्यांनीं "ठीक आहे. मी पुनः येईन" वगैरे बोलून मधुराताई आतां कोठें जाणार ? मनोहर कोठें रहाणार ? या प्रश्नांस सुरुवात केली. परंतु मंडळीची निघण्याची अगदीं तयारी असल्यामुळें, त्यांस कोणी फारशीं उत्तरेंही दिलीं नाहींत. तें पाहतांच आतां आपण येथें रहाण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून ते तेथून बाहेर पडले. दारापासून थोड्या अंतरावर जातात तों त्यांस डॉक्टर भगवंतराव पायींच येतांना दिसले. त्यांना पाहून दिगंबरपंतांच्या स्वभावानें उचल खाल्ली व दिगंबरपंत एकदम त्यांस आडवे जाऊन म्हणाले: " पोरीची सोय तर आपण उत्तम लावून दिली, पण ती आतां आपल्या हातून कायमची सुटलीच म्हणायची, कीं कांहीं आहे धुगधुगी ?" भगवंतरावानें अत्यंत तिरस्कारानें त्याच्याकडे पाहून ते पुढें गेले. दिगंबरपंत आपण केवढी शहामत केली अशा अर्थानें विकटपणें हांसला व आपल्या वाटेनें गेला.

इकडे ठरलेल्या बेताप्रमाणें ही गांवाला जाणारी मंडळी निर्विघ्नपणें स्टेशनावर जाऊन गाडींत बसली व योग्य वेळीं गाडीही निघाली. शेवटपर्यंत वसंतरावास अण्णासाहेब घोंटाळा घालतो कीं काय असा फार धाक वाटत होता. गाडी निघाली आणि गंगाधरास त्यानें निरोप दिला तेव्हां त्याचा जीव खालीं पडला. शें दोनशें मैल निघून गेल्यानंतर एखाद्या स्टेशनावरून तार कर असें गंगाधररावास त्यानें फार आग्रहपूर्वक सांगितलें. न जाणों, मध्येंच कोठेंतरी त्याजवर वारंट वगैरे बजावून त्यांस परत आणण्याचा खटाटोप तो दुष्ट करतो कीं काय हें भय त्याला होतें.

सुदैव, कीं तसें कांहीं न होतां ती मंडळी पोंचावयाची तिकडे सुखरूप पोंचली. परंतु अण्णासाहेबांचा मुद्दा पत्तासुद्धां नाहीं हें आहे तरी काय ? हा ते दिवशीं येथून निघून गेला त्या वेळच्या त्याच्या चढाया लक्ष्यांत घेतल्या तर त्यानें एव्हांना केवढेंतरी आकांडतांडव करावयास पाहिजे. परंतु तसें कांहींच कोठें चिन्ह दिसेना. तो विचार करून स्वस्थ बसेल हें कोणालाच

शक्य वाटेना. तो एखादें भयंकर कारस्थान रचून अचानक कांहींतरी घोरपड आपल्या गळ्यांत आणावयाच्या खटाटोपांत असावा. तेव्हां आपण आपलें तयार असावें असें वसंतराव मनांत म्हणत असे; परंतु पद्मा-ताई वारल्यापासून आठ दिवस होऊन गेले तथापि त्याचा कांहीं पत्ता नाहीं. पुढें वसंतरावास असें वाटलें, कीं तो मुंबईस जाऊन वकिलांचा सल्ला वगैरे घेण्याच्या विचारांत असेल, आणि म्हणून गप्प असेल. हा शोध आणण्यासाठीं त्यानें मुंबईस एकदोघां स्नेह्यांस त्याची चौकशी करण्याबद्दल लिहिलें.

त्याच दिवशीं त्याच्या हातीं एक वर्तमानपत्र आलें. आज आठ दिवसांत त्यानें वर्तमानपत्राला हातसुद्धां लावला नव्हता कीं कोणाकडे गेला नव्हता. घराच्या बाहेर पडला नाहीं म्हटलें तरी चालेल. कारण अण्णासाहेब केव्हां येऊन दत्त म्हणून उभा राहील याचा त्याला नेमच वाटेना. त्यानें तें वर्तमानपत्र घेतलें आणि त्यावरून सहज डोळा फिरवीत असतां त्यास एक 'पॅरिग्राफ दिसला, त्याचा मथळा असा होता.

**" एक सोनेरी टोळी पकडली "**

त्यानें तो त्याग वाचला तों त्यांत पुढील मजकूर होता. सुमारें आठ दिवसांपूर्वीं एक सोनेरी टोळी पकडली गेली. या टोळीवर पोलीसचा पुष्कळ दिवस डोळा होता. या टोळीच्या लोकांचा फसवेगिरीचा धंदा एकच प्रकारचा नव्हता. या टोळीचे लोक पुष्कळ मोठमोठ्या शहरांत होते, त्यांचा तपास चालू आहे. सांपडलेले लोक भराभर माहिती देत आहेत. इंग्लंडांतून नुकताच परत आलेला एक तरुण गृहस्थ या टोळींत येऊन मिळाला होता. तो एकाएकीं फरारी झाला आहे आणि दुसरे ठिकठिकाणचे एजंटही फरारी होत आहेत, पण बरेच सांपडले आहेत. श्रीमंत लोकांचीं मूर्ख मुलें फसवून त्यांच्याकडून खोटे वाटेल तसे दस्तैवज घ्यावयाचे, त्यांच्या हातून कांहीं गुन्हे करवून त्याचप्रमाणें त्यांस व्यसनें लावून त्यांस आपल्या ताब्यांत ठेवावयाचें व त्यांच्या नातेवाईकांस ' अमूक रक्कम द्या नाहीं तर या मुलांना पोलिसच्या ताब्यांत देतों ' असे धाक घालून वेळोवेळीं पैसे उपटावयाचे हा त्यांचा धंदा असे. दुसरा धंदा असा असे कीं, उगीच एखाद्या कापडाच्या अगर जवाहिराच्या दुकानांत जाऊन लांबच्या गांवचें एक मोठेंसें नांव देऊन त्या नांवानें दहा पांच हजारांचा माल व्हॅल्युपेबल पाठविण्यास सांगावयाचें. व्हॅल्युपेबल गेलें कीं लागलींच पाठविणाऱ्या व्यापाऱ्याच्या नांवानें त्या रेल्वेस्टेशनवरील स्टेशनमास्तरास अगर पोस्टानें पार्सल गेलें असल्यास पोस्टमास्तरास तार जावयाची कीं अमुक व्हॅल्युपेबल पार्सल पाठविलें आहे, त्याचे पैसे येथेंच मिळाले आहेत, तेव्हां आतां पार्सल नेण्यास येणाऱ्या इसमास पार्सल तसेंच द्यावें ! झालें पार्सल गेलें कीं गेलें. अशा एक कीं दोन ! किती तरी युक्त्यांनीं हीं माणसें ठकबाजीचा धंदा चालवून यांनीं आपलें जाळें पसरलें होतें. यासंबंधानें बरीच माहिती मिळविण्यासारखी आहे. सर्व माहिती मिळाल्यावर ती प्रसिद्ध करूं. मध्यें मिळालेली माहितीही इतकी विलक्षण आहे कीं, एखादा कादंबरीलेखक तिजवर विलक्षण कादंबरी लिहूं शकेल. "

वसंतरावानें या पॅरिग्राफांतील पहिला भाग व त्यांत विलायतेंतून आलेला एक गृहस्थ यांत गुरफटला आहे व आतां कोणीकडे फरारी झाला आहे हा मजकूर वाचतांच अगदीं थक्क झाला. अण्णासाहेबांचा भाऊ या

टोळींत होता, आणि तोच पद्मेस मधून मधून पैशाची तसदी लावी हें त्याला माहीत होतें. पोलिसानें त्या टोळीवर हल्ला करून लोक पकडले हें याला आपल्या घरांतून निघून गेल्यावर लागलेंच कळलें असावें व त्यामुळें तो आपल्याला त्रास देण्याचें सोडून फरारी झाला हें त्यानें जाणलें.

या टोळीला पकडण्यांत आलें, तें अगदीं ऐन वेळींच पकडण्यांत आलें, आणि अण्णासाहेबांला बातमी लागली तीही ऐन वेळीं लागली. ती तशी लागल्यामुळें तो फरारी झाला हें आपलें सर्वांचें सुदैव असें त्यास वाटून क्षणभर समाधान झालें, त्यांतही पद्मातारई या बातमीच्या आधीं वारली हें मनांत येऊन विशेष समाधान झालें. आतां तो आपल्याला किंवा कोणाला प्रत्यक्ष त्रास देण्यास खचित येत नाहीं हें त्यास दिसलें. तो कोठें आहे याचा शोध करण्याची त्यानें शिकस्त केली पण बिलकूल पत्ता लागला नाहीं.

अण्णासाहेबांचा पत्ता नाहींसा झाल्यावर त्यास पुढली सगळी व्यवस्था योग्य प्रकारें लावण्याच्या मार्गांत अडचणी आल्या नाहींत. त्यानें पद्मातारईच्या दोघां भावांस डॉक्टर भगवंतरावाच्या मदतीनें ताळ्यावर आणण्याचे प्रयत्न करून त्यांत त्याला यावयाचें तितकें यशही आलें. त्याचप्रमाणें मथुरातारईचीही व्यवस्था त्यानं उत्तम लावून दिली. पद्मातारईच्या मलाची जोपासना योग्य प्रकारें व्हावयाला लागली, हें सांगावयासच नको. दिगंबरपंतांनीं एकदां दोनदां मथुरातारईस आपल्या इस्टेटीची व्यवस्था कशी लावावी ह्मणजे फायदेशीर होईल याबद्दल पत्रें लिहिलीं, परंतु त्यांचीं उत्तरें येईनात, असें पाहून ते आपल्या मित्रांजवळ वारंवार उद्गार काढूं लागले कीं "आतां त्या सोन्याच्या चिखलांत रुतलेल्या गाईचा उद्धार तो वसंतराव करणार. भगवंतरावाला तें पुण्य लाभत नाहीं ?"

परंत तसें झालें असें लोकांना सांगण्याचा प्रसंग दिगंबरपंतास कधींच आला नाहीं. वसंतराव अविवाहितच राहिला. डॉक्टर भगवंतरावांचेंही दुसरें लग्न झाल्याची बातमी कधीं उठली नाहीं आणि मथुरातारई मालतीकडून परत आल्यावर वसंतरावाच्या शेजा-

रा[illegible] चांगलेंसें स्वतंत्र घर पाहून [illegible]लें. तेव्हां डॉ. भगवंतरावांनीं [illegible] मथुरातारईच्या जवळ नेऊन [illegible]तारई नको कसें म्हणणार! त्या आपल्या पदरांत पद्मातारईनीं घातलेल्या मुलाच्या जोपासनेंत व या मुलीच्या आणि आपल्या भावंडांच्या शिक्षणांत आपला सर्व वेळ खर्चून उरेल तो शेजाऱ्यापाजाऱ्यांपैकीं गरीब व गरजू लोकांस साहाय्य करण्यांत घालवीत. आपल्या आपत्कालीं दिगंबरपंतांच्या पत्नी बगुतारई यांनीं आपल्यावर केलेले उपकार व आपल्याकरितां सोसलेले हाल त्या कधीं विसरल्या नाहींत. त्या बगुतारईकडे क्वचित् जात, व बगुतारईना वारंवार बोलावीत. दिगंबरपंत तें आतां कसें तरी सहन करी! रावसाहेब इन्स्पेक्टर आतां खरोखरीच बढतीवर दुसरीकडे गेल्यामुळें मोरमास्तरांची चहाची कामगिरी नाहींशी झाली. ते मथुरातारईकडे कधीं कधीं येत व त्यांनीं पुढें मुलांस शिकविण्याचें पत्करलें होतें. इतर मंडळी आपल्या भिन्न भिन्न कक्षेंत राहून आपला आयुःक्रम चालवीत राहिली.

पद्मातारईच्या मुलाचें नामकरण झालें नव्हतें हें वाचकांस माहीत आहेच. मालतीनें त्याचा नामकरणविधि आपल्या मुलाच्या नामकरणविधीबरोबरच केला. तिनें आपल्या मुलाचें नांव सुधाकर व पद्मातारईच्या मुलाचें पद्माकर ठेविलें.

या सुधाकर-पद्माकरांस या जगांत दिवसांमासांनीं वाढण्यास व वाढीबरोबर या जगांतील सुखदुःखांचा अनुभव घेण्यास व वाचकांस त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाची कल्पना करण्यास सोडून मी सध्यां त्यांची रजा घेतों.